

# चांदोवा

जानेवारी 1988



## अनुक्रमणिका





एक प्रत : २-५०
वार्षिक वर्गणी : ३०-००

# चांदोवा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी

नोव्हेंबरच्या अंकात "अग्नि द्वीप" हे धारावाहिक संपले. या अंकापासून नवे धारावाहिक सुरु होत आहे–"सोन्याची दरी"

लोकांची आवश्यकता, उदारता व सरल स्वभावाचा फायदा घेऊन काही लोक विपरीत उपायांचा अवलंब करून पैसे मिळविण्याचा प्रयत्न करतात. या अंकातील 'रोगी आणि वैद्य' या कथेवरून हेच दिसून येईल.

### अमर वाणी

जातस्य नदीतीरे तस्यापि, तृणस्य जन्मसाफल्यम् ।
यत् सलिलमज्जनाकुल-जनहस्तालंबनं भवति ॥

[जल प्रवाहात बुडणाऱ्या व्याकुळ माणसाला मदतीचा हात दिला, तरच नदीच्या किनाऱ्यावर उगवलेल्या गवताचा जन्म सफल ठरेल. बुडणाऱ्या माणसाला काडीचा आधार ही पुष्कळ होतो.]

वर्ष : ३७ जानेवारी १९८८ अंक : ७

## चांदोबातील नव

### हित-अहित

मध्यप्रदेशात गव्दी नावाच्या गावात वीज पडून एक मूल मेले, तर जन्मापासून मुका असलेला एक मुलगा त्याच वेळी बोलू लागला.

### खजिनदाराची कबर

इजिप्तच्या विख्यात फारो तुत चे नाव आपण सर्वांनी बहुधा ऐकलेच असेल. त्याचा खजिनदार व पुजारी याची व त्याची पत्नी यांच्या कबरींचा नुकताच शोध लागला आहे. या सुप्रसिद्ध खजिनदाराच्या कबरीत मोठा खजिना पुरलेला सापडेल असा समज आहे.

### मॉस्कोतील सर्वात उंच वृक्ष

मॉस्कोत 'फेस्टिव्हल ऑफ इंडिया' उत्सवाच्या उद्घाटनप्रसंगी तेथील उद्यानात सालवृक्षाचे एक रोपटे लावले आहे. हा वृक्ष १०० फुट इतका उंच वाढू शकतो. अशा प्रकारे या उद्यानातील हा सर्वात उंच वृक्ष गणला जाईल.

### लपून राहिलेला सैनिक

दुसऱ्या जागतिक महायुद्धाचे वेळी पळून गेलेल्या कुस्मापंचल्को नावाच्या ७० वर्षांच्या सैनिकाचा युक्रेनच्या अधिकाऱ्यांनी नुकताच पत्ता लावला आहे. जर्मन सेनाधिकाऱ्यांसमोर त्याने आत्मसमर्पण केले होते. त्याला भीती वाटत होती की आता पकडलो गेल्यास आपल्याला सैबेरियात पाठवले जाईल. या दहशतीमुळे पचल्को स्वयंपाकघर सोडून बाहेर येत नसे. त्याच्या कुटुंबातील माणसे



      





# जडभरत

भरत नावाचा एक राजा वृद्ध झाल्यावर आपले राज्य मुलांवर सोपवून संन्यस्त जीवन व्यतीत करण्यासाठी वनात निघून गेला. एके दिवशी स्नान करताना त्याने एक मृगशावक पाहिले. त्याची आई मरून गेली होती म्हणून दया येऊन राजा त्याला आपल्या झोपडीत घेऊन आला व आपल्या मुलाप्रमाणे त्याचे पालन करू लागला. ते शावक वाढून मोठे झाले. त्याच्यावरील विशेष वात्सल्यामुळे मृत्युसमयी राजाला त्याचेच स्मरण होत होते. पण त्यामुळे त्याला हरिणाच्या रूपात पुन्हा जन्म मिळाला. मागील जन्मी हरिणात फार मन अडकल्याने आपल्याला पुनर्जन्म मिळाल्याचे त्याला या जन्मी फार दुःख वाटले. या हरिणाच्या मृत्युनंतर त्याला एका ब्राह्मणाच्या घरी जन्म मिळाला.

पूर्वजन्माची आठवण असल्यामुळे आता तो प्रत्येक वस्तूच्या बाबतीत अनासक्त राहिला. पण ही वस्तुस्थिति माहीत नसल्याने त्याला इतर सर्वजण 'मंदबुद्धि' म्हणून चिडवू लागले. त्याची सावत्र आई त्याला छळू लागली. त्यामुळे त्रासून संन्यासी बनायला तो घरून बाहेर पडला.

त्या अवस्थेत राजाच्या काही सेवकांनी त्याला पकडले आणि त्याला राजाची पालखी वाहण्याच्या कामी लावले. पालखी वाहताना पायाखाली कृमि-कीटक मरू नयेत म्हणून तो फार सावधगिरी बाळगीत असे. पण त्यामुळे पालखी डोलू लागे. यावर चिडून राजा भरताला लाथ मारू लागला. ते सहन करीत मोठ्या शान्तिपूर्वक भरत त्याला पुराण व इतिहासांतील दाखले सांगू लागला. राजा चकित होऊन पालखीतून उतरला व त्याने भरताच्या पायावर लोळण घेतली. तो विचलित न होणारा मुनि म्हणून 'जडभरत' या नावाने ओळखला जाऊ लागला.





## रोगी आणि वैद्य

दिवाकर नावाचा एक श्रीमन्त माणूस एकदा अचानक आजारी पडला. एका वैद्याच्या औषधाने तो बरा झाला. यानंतर वैद्य त्याला म्हणाला–"हे पहा, तुमचा रोग असाध्य आहे. तात्पुरता इलाज म्हणून मी तुम्हाला औषध दिले खरे, पण हा रोग पुन्हां डोकं वर काढणार."

"रोग पुन्हा उद्‌भवू नये म्हणून काही औषध नाही का?" दिवाकरने विचारले.

"का नाही ? औषध अवश्य आहे. एक महिनाभर एक विशिष्ट प्रकारचं औषध घ्यावं लागेल. तरीही रोग मुळापासून नाहीसा होईलच असं नक्की नाही सांगता येत. आपल्या नशीबावरच सर्व अवलंबून आहे." वैद्य म्हणाला.

"नशीबावर माझा मुळीच विश्वास नाही. पण तुम्ही तुमचा इलाज सुरू करा." दिवाकर म्हणाला.

थोडा विचार करून वैद्य म्हणाला–रोगचिकित्सेसाठी बराच खर्च येईल. पहिल्या महिन्यातच जवळ जवळ पंचवीस हजार रुपये लागतील. दुसऱ्या महिन्यात दहा हजार, तिसऱ्या महिन्यापासून पुढे तीन महिने दरमहा एक हजार–असा खर्च होईल. म्हणूनच मी जरा विचारात पडलो आहे."

"म्हणजे दहा महिन्याच्या अवधीत एकूण पंचावन्न हजार रुपये? ही तर फारच मोठी रक्कम झाली!" दिवाकरने विचारले.

"शेठजी, आपण तर लाखो रुपये कमावले आहेत, तेव्हा ही रक्कम आपल्याला भारी नाही. केवळ पैशांसाठी मागेपुढे पाहू नका." वैद्य समजावू लागला.

दिवाकर हसून म्हणाला–"हे पहा, मी आता साठ वर्षांचा झालो. मी आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर भरपूर पैसा मिळवला



ही गोष्ट खरीच. पण आमचे व्यवहार बाहेरून डामडौलाचे असले तरी आतून ढोलारा पोकळच असतो! माझ्याजवळ जितकं धन आहे, तितकंच जवळजवळ कर्जही माझ्या डोक्यावर आहे. अलिकडे काही दिवस माझा व्यापारही नुकसानीतच आहे. मी विचारच करीत होतो की एकादं वर्षभर आपल्याला हात राखूनच खर्च करायला हवा. अन् तेवढ्यात मी आजारी पडलो. मी जिवंत रहाण्याने मुलांना काही मोठा फायदा होणार आहे असंही नव्हे. त्यामुळे पूर्वी काही परिस्थिती असली तरी आता माझ्या देहाची किंमत पंचावन्न हजार रुपये नक्कीच नाही."

"आपण चिंता करू नये. या बाबत मी आपल्या मुलांशी बोलणं करीन." वैद्याने सुचवले.

"माझ्या उपचारासाठी आवश्यक इतकं धन मी कमवू शकलो तर हे शरीर वाचवायचा प्रयत्न करीन. नाहीतर तसाच माझा अन्त होऊ दे. आपण माझ्या मुलांना सांगून माझा औषधोपचार करू पहाल तर मी एकही औषध घेणार नाही. माझं सर्व जीवनच असं आहे की– मी कधीं कुणावर अवलंबून राहिलो नाही, पुढे ही रहाणार नाही."

"शेठजी, माझं नीट ऐकून घ्या. ताबडतोब इलाज करवला नाही तर आपण फार दिवस जगणार नाही. पुन्हा पैसा कमवून इलाज करू म्हणाल तर तोपर्यंत उपचार करण्याची वेळच निघून गेलेली असेल." वैद्याने पुन्हा समजवायचा प्रयत्न केला.

"वैद्यबुवा, मला नक्की जगवू शकाल अशी आपली पूर्ण खात्री असेल तर आत्ताच आपण औषध सुरु करा. मी तुम्हाला सहा महिन्यांनी एक लाख रुपये देईन." दिवाकर म्हणाला.

"काय एक लाख? सहा महिन्यात आपण इतका पैसा मिळवू शकाल?" वैद्याने आश्चर्याने विचारले.

"तुमच्यासारखा सामान्य वैद्य जर दहा महिन्यात पंचावन्न हजार रुपये मिळवू शकणार असेल तर मी एवढा व्यापारी असून सहा महिन्यात एक लाख नाही मिळवणार?" दिवाकरने उलट प्रश्न विचारला.

आणि काय! वैद्याने त्याच दिवसापासून इलाज सुरू केला. एक महिना गेला आणि वैद्याने दिवाकरला म्हटले–"शेठजी आपण किती कमाई करू शकलात हे मला माहिती नाही, पण आत्ता मला दहा हजार रुपये देऊ शकाल?"

"सहा महिने पुरे होऊ देत. एक लाख रुपये एकदमच देईन मी तुम्हाला." दिवाकरने सांगितले.

"पण माझ्या घरात अनेक गरजा निर्माण झाल्या आहेत. मी इतका थांबू शकणार नाही." वैद्य म्हणाला.

"सांगा पाहू काय काय अडचणी आहेत? मीं त्या सोडवून दाखवतो." दिवाकर म्हणाला.

"पूर्वी मी मोठ्या मुलीचं लग्न केलं, तेव्हांचं हुंड्याच्या रकमेचं दहा हजार रुपयांचं कर्ज माझ्या डोक्यावर आहे. आता त्या मुलीची मुलगी उपवर झाली आहे. आणि आतां जर मी त्या लोकांचं कर्ज न फेडलं तर मुलीचं लग्न जमणं कठीण–



म्हणून माझी मुलगी पैशांचा तगादा करीत आहे." वैद्य म्हणाला.

"यात काय मोठं कठीण? तुमच्या मोठ्या मुलाचा मुलगा त्या मुलीच्या वयाला साजेसा आहे ना? मग द्या बार उडवून–हुंडा घेऊ नका म्हणजे मिटलं!" दिवाकरने सल्ला दिला.

"मीही हाच विचार करत होतो, पण माझ्या सुनेला मुलाचा हुंडा हवा आहे. ते लोक पूर्वीच आमच्यापासून निराळे झाले आहेत ही आणखी अडचण." वैद्य कुरकुरला.

"एवढच? मग मी सहा महिन्यात एक लाख रुपये देणार आहे ही बातमी सर्वांच्यात पसरवून द्या. तुमचा मुलगा आणि सून

      



पुन्हा तुमच्याकडे येतील." दिवाकरने युक्ती सांगितली.

यानंतर दोन दिवसांनी वैद्य मोठ्या उत्साहाने सांगत आला–"महाराज, आपण म्हटल्याप्रमाणे घडलं! मुलगा माझ्याकडे परत आला आणि सूनही माझी नात आपल्या मुलाला करून घ्यायला तयार आहे."

यावर दिवाकर फक्त हसला.

आणखी एक महिना गेल्यावर पुन्हा वैद्याने पैशांची मागणी केली. म्हणाला–"माझी बायको दागिने घडवायचे म्हणत आहे. एक लाखाची गोष्ट ऐकल्यापासून प्रत्येक जण आपापली इच्छा प्रकट करू लागला आहे. कर्जदारही घराकडे चक्कर मारू लागलेत. त्यांचं कर्ज पाच हजार उरलं आहे."

"चांगली गोष्ट आहे. समजा मी आत्ता तुम्हाला एक लाख रुपये दिले तर काय होईल? तुमचा मोठा मुलगा काही हिस्सा घेईल, तुमची पत्नी दागिने घडवील, तुमचं घर थोडं आणखी मोठं केलं जाईल, सर्व कर्ज फेडलं जाईल–असंच ना? पण तुम्हाला पुढेही जगायचं आहे. तुम्ही तर आत्ता कर्जाखाली दबले जात आहात. म्हणजे याचा अर्थ असा की तुम्ही प्राप्ती-पेक्षा खर्च अधिक करता. होय की नाही?" दिवाकरने विचारले.

वैद्य दुःखी होऊन म्हणाला–"आपलं म्हणणं खरं आहे. माझा धाकटा मुलगा आपली जबाबदारी संभाळत नाही–तो बेपर्वा आहे. माझी बायकोही त्याचीच बाजू घेते. खर्चाच्या मानाने माझी प्राप्ती कमीच आहे."

"म्हणजे, केवळ वैद्यकीच्या आधारे तुम्ही आपलं कुटुंब पोसू शकत नाही. माझ्यासारखा रोगी तुम्हाला नेहमीच मिळणार नाही. तेव्हां तुम्ही आपल्या मुलाला व्यापारात घालावे. त्याला जर पैसा मिळवायची गोडी लागली तर तो आपोआप सुधारेल." दिवाकरने सुचवले.

"शेठसरकार, मला तर अशी भीती वाटते की त्याला व्यापारात घातला तर तो मुद्दलच खाऊन बसेल." वैद्याने सांगितले.

दिवाकर हसत म्हणाला–"तुमचा मुलगा तुम्हाला वाटतो तितका नालायक नाही. रत्नसेनशी त्याची चांगली दोस्ती आहे. पण त्या बरोबरच तो अतिशय कुशल आणि समर्थ आहे. माझ्या कुटुंबात कोणी योग्य वयाची मुलगी असती तर मी त्याला आपला जावई करून घेतले असते. रत्नसेनला तुम्ही आपला घरजावई करून घ्या, मग पहा! दोघं मिळून कसा व्यापार करतील ते! तुमचा मुलगा खरोखरच व्यापारात छान चमकेल."

"आपला प्रस्ताव खूप चांगला आहे, परंतु व्यापारासाठी भांडवल नको का? कमीत कमी भांडवलासाठी तरी थोडी रक्कम आपण द्याव." वैद्याने मागणी केली.

"हे पहा, तुमच्या घरी पन्नास पोती धान्य पडलं आहे आणि दोनशे नारळ आहेत. ते नारायणपुरच्या बाजारात घेऊन जा. थोडा पैसा खर्च होईल त्याची काळजी करू नका. तिथे बाजारात दुप्पट दाम वसूल होईल. हा व्यापार सफल झाला तर त्याला सल्ला द्या की त्या पैशातुन माल घेऊन नारायणपुरलाच विकत रहा. अशी



संधी मिळाली की बाकी सर्व रत्नसेन स्वतःच संभाळून घेईल."

दहा दिवसांनी वैद्यबुवा आनंदी चेहऱ्याने दिवाकरकडे येऊन म्हणाले–"शेठजी, तुमची बत्तिशी खरी झाली. माझा मुलगा सुधारला, नीट मार्गाला लागला."

एक महिन्याने वैद्याने पुन्हा पैशांची मागणी केली तेव्हां मंद मंद हसत दिवाकर म्हणाला–"वैद्यबुवा, मी मुदती अगोदर पैसे देणार नाही हे तुम्हाला नक्की ठाऊक आहे. तरीही तुम्ही दर वेळी पैसे मागतच रहाता. याचं कारण असं की तुम्ही लोभी आहात. लोभी माणूस कधीही संतुष्ट होत



नाही. ज्याला सुख अनुभवायला मिळत नाही तो धन मिळवू शकत नाही. आपण जे धन मिळवतो ते खरं तर दुसऱ्यांसाठीच असतं!"

"माझ्याजवळ पैसा नसेल तर माझे नातेवाईक मला मान देणार नाहीत. म्हणूनच मी पैशांची मागणी करीत असतो." वैद्य म्हणाला.

"जे लोक आपल्याजवळील धनाला महत्त्व देऊन आपला मान ठेवतात ते खरे नातेवाईकच नव्हेत. अशा लोकांसाठी पैसा मिळवणं व्यर्थ आहे. जमेल तितकी दुसऱ्यांना मदत करा म्हणजे कितीतरी लोक तुम्हाला मान देतील." दिवाकरने सल्ला दिला.

आणखी एक महिना गेल्यावर वैद्य दिवाकरला म्हणाला—"पुन्हां तुमचंच म्हणणं खरं झालं. मी थोडे पैसे घेऊन अधिक लोकांची सेवा करू लागलो आहे. गरीबांना मी फुकट औषध देतो. गावातले लोक हल्ली माझा खूप आदर करतात हे पाहून मला खूप आनन्द वाटतो. आणि त्याच्या उलट आपणाकडून मिळणाऱ्या लाख रुपयांसाठीच माझे नातेवाईक मला चिकटू पहातात."

"हे मात्र धोक्याचं आहे खरं. तुम्ही लोकांना सांगून टाका की-शेठजींनी मला धोका दिला आहे. ते पैसे द्यायला आता नकार देत आहेत—ही गोष्ट जाणूनही जे तुमच्या पाठीशी उभे राहतील तेच तुमचे खरे नातेवाईक! पण जे तुम्हाला सोडून जातील त्यांना मात्र माझ्याकडून मिळणाऱ्या पैशांचा वाटा देण्याची जरूर नाही." दिवाकरने सुचवले.

"पण मला आपला म्हणणारं कोणी राहील का?" वैद्याने शंका काढली.

"आता पहा, आपल्या मुलीचं कर्ज फेडून झालं. विना हुंड्याने छोटीसाठी जावई मिळाला आहे. नालायक मानल्या गेलेल्या मुलाने व्यापारांत चांगला जम बसवला. आता तुम्हाला कसली अडचण उरली नाही. अशा परिस्थितीत तुमचे नातेवाईक सोडून गेले तर तुमचं नुकसान काय? गावातली माणसं मनःपूर्वक तुम्हाला मान देतात." दिवाकर म्हणाला.

दिवाकरने दगा दिला—ही गोष्ट वैद्याने फक्त आपल्या कुटुंबातच सांगितली. त्याबरोबर सुनेने रागाने आपल्या सुनेला माहेरी पाठवायची धमकी दिली. पण मुलाचे बायकोवर इतके प्रेम होते की त्यानेच 'असं झाल्यास मीच बायकोला घेऊन निराळा होईन'—अशी आईला धमकी दिली. आता काय, मुलापुढे सुनेला वाकायलाच लागले. सर्व गाववाल्यांकडून मान मिळणाऱ्या पित्याला सोडून जायला मोठा मुलगा तयार नव्हता. त्याचबरोबर जावई, छोटा मुलगा, मुलगी व पत्नीही वैद्याची दया घेऊन दिवाकरची निन्दा करू लागले, शाप देऊ लागले.

अशा प्रकारे आणखी एक महिना गेल्यावर दिवाकरने वैद्याला बोलावून घेऊन म्हटले—"आता मी स्पष्टच बोलतो, नाही-तर मी तुम्हाला धोका दिल्याचा लोक माझ्यावर आरोप करतील. मी तुम्हाला माझ्यावर इलाज केल्याबद्दल एक पैसासुद्धा देणार नाही."

वैद्याने चकित होऊन विचारले—"आपण खरोखरीच मला फसवणार आहात?"



"मी तुम्हाला फसवलेलं नाही, उलट तुम्हीच मला फसवलंत. मला अगदी सामान्य आजार झालेला असतानाही तुम्ही मला घाबरवून माझ्याकडून खूप पैसे उपटायचा घाट घातलात. पण ते ओळखूनच मी तुम्हाला लालूच दाखवली." दिवाकर म्हणाला.

"आपला रोग खरोखरीच प्राणांतक होता. केवळ माझ्या औषधांमुळेच आपण बरे झालात." वैद्य म्हणू लागला.

त्यावर कांही बाटल्या वैद्याच्या हातात देत दिवाकर म्हणाला—"आपण जी औषधं मला दिलीत ती सर्वच्या सर्व यात आहेत—नीट तपासून पहा. मी एकही औषध घेतलेलं नाही."

नीट तपासल्यावर दिवाकरच्या म्हणण्याबद्दल वैद्याची खात्री पटली. आश्चर्याने त्याने विचारले–"मी खोटंखोटंच तुमच्या रोगाबद्दल वाढवून बोलत होतो हे आपल्या लक्षात आलं, तरीसुद्धा आपण माझ्याकडून इलाज कसा करवून घेत राहिलात ?"

दिवाकर गडगडून हसत म्हणाला– "मला माहीत आहे की तुम्ही वास्तविक फार चांगले आहात. माझ्याकडून तुम्ही पंचावन्न हजार रुपये वसूल करायचा बेत केलात याचा अर्थ असा की, एकतर तुम्हाला पैशांची फार आवश्यकता आहे; किंवा दुसरे कारण म्हणजे तुमच्या घरच्या लोकांनी तुमच्या मनांत लोभ उत्पन्न केला. म्हणूनच मी नेहमी तुम्हाला बोलवून तुमच्या अडचणी विचारत राहिलो व त्यांचे उपायही सांगितले. प्रत्येक लोभी माणूस नेहमी दुसऱ्यांना लुटूनच आपल्या समस्या सोडवू पहातो. खरं पाहतां, अडचणी फार मोठ्या नसतात, पण मनातला लोभ त्यांना मोठं स्वरूप देत असतो. अशी माणसं स्वतःही सुखी होत नाहीतच व दुसऱ्यांनाही सुख लाभू देत नाहीत."

दिवाकरच्या गोष्टींनी वैद्याचे डोळे उघडले. त्याने हात जोडून दिवाकरला नमस्कार केला व म्हणाला–"महाराज, आजवर आपण रोगी व मी वैद्य होतो. पण आता मला कळलं की खरा रोगी मीच होतो. आपण माझी अद्भुत रोगचिकित्सा केलीत. मीच आपणाला यासाठी लाखो रुपये द्यायला पाहिजेत. मी आपला ऋणी आहे."

दिवाकर हसत म्हणाला–"पुरे, पुरे! तुम्ही सत्य जाणलंत याचा मला आनन्द आहे. असे म्हणून दिवाकरने वैद्याला दहा हजार रुपये बक्षिस दिले.

दिवाकरच्या म्हणण्याप्रमाणेच वैद्याची मिळकत उत्तरोत्तर वाढत गेली. थोड्याच दिवसात तो गावातल्या संपन्न माणसात गणला जाऊ लागला.






हजारो वर्षांपूर्वी उंच उंच पहाड व घनदाट जंगलांनी वेढलेले 'सोन्याची दरी' नावाचे एक राज्य होते. या पहाडांच्या मागील बाजूस आणखी उंच अशी पर्वत-श्रेणी होती. या सर्वांच्या भोवती आणखीही खूप उंच अशा पर्वतांचा घेरा होता. त्यांवरचे वृक्ष जणू ढगांतच तरंगत आहेत असे वाटे. राज्यातील नैसर्गिक सौंदर्य पाहून सर्व जण मोहित होऊन जात. राज्यात फळा-फुलांची रेल-चेल होती.

राज्यातले लोक आपापले व्यवसाय मेहनतीने करून सुखाने रहात असत. परंतु कांही असे ही लोक होते, कीं जे मिळणाऱ्या सुखात संतुष्ट नव्हते! ते लोक म्हणजेच–खुद्द राजा आणि त्याच्या दरबारातले पदाधिकारी!

राजाने जनतेच्या सुखासाठी व कल्याणासाठी केलेल्या योजनांवर देखरेख ठेवण्यासाठी कांही लोकांची नियुक्ति केली होती. त्या लोकांनी एकदा आपली सभा भरवली व त्यात असा निर्णय घेतला की, 'राजाचे कल्याण म्हणजेच देशाचे कल्याण, राजाचे सुख तेच देशाचे सुख!' राजालाही या लोकांची बुद्धिमत्ता कौतुकास्पद वाटली. प्रसन्न होऊन राजाने त्यांना असलेली पहिली 'ज्ञानी' ही पदवी बदलून 'महाज्ञानी' अशी पदवी बहाल केली.

यानंतर 'महाज्ञानीं' नी एक समारंभ घडवला. त्यात असा ठराव पास केला की–"राजाला तसे पाहता सर्व सुखे प्राप्त आहेत, परंतु केवळ मनोरंजनाचीच कम-



तरता आहे." महाज्ञान्यांनी नंतर असा आदेश दिला की—दरबारी गायकांनी शीर्षासन करून त्या अवस्थेत गावे. विवश होऊन बिचारे गायक तसे गाऊ लागले व ही करमणूक पाहून राजा पोट धरधरून हसू लागला.

राजा व दरबारी कसे का असेनात—प्रजा शांत प्रवृत्तीची होती. त्यामुळे राज्यातले लोक दुःखी मनाने जेव्हा-तेव्हा किल्ल्याच्या मागील पर्वताकडे पहात रहात असत. या पर्वताच्या नावामुळेच राज्याला 'सोन्याची दरी' असे नाव मिळाले होते.

जनतेत एक अफवा प्रचलित होती की—त्या पर्वतात कुठेतरी एक खूप मोठी सोन्याची खाण आहे. कोणे एके काळी त्या भागावर एका गुणी व धर्मात्मा राजाचे राज्य होते. तो राजा केवळ एक उत्तम चित्रकारच नव्हे तर एक महान् शिल्पकारही होता. राजा खूपदा ध्यानमग्न होत असे व त्या अवस्थेत सोन्याची खाण असलेल्या जागेबद्दल त्याला संकेत मिळत असत.

त्या शिल्पकार राजाने सोन्याची एक अनुपम व अद्भुत सुंदर अशी एक स्त्रीची प्रतिमा घडवली. राज्यातील सर्व प्रजेला एका विशिष्ट दिवशी ही प्रतिमा सर्व प्रजाजनांना पहावयास मिळेल—अशा अर्थाची दवंडी पिटायची त्याने आज्ञाही दिली. परंतु त्याच्या दुष्ट मंत्र्याच्या कारस्थानामुळे राज्यात खळबळ माजली.

राज-सिंहासन व सोन्याची दरी—या दोहोंवर मालकी मिळवायची लालसा मंत्र्याच्या मनात उत्पन्न झाली. आपली इच्छा कशी पुरी करावी याचा तो विचार करू लागला. अनेक योजना त्याला मनात आल्या. शेवटी त्याने एक योजना पक्की केली. शेजारच्या राजाशी खलबत करून त्याने एका रात्री राज्यावर हल्ला करवला. किल्ल्याच्या रक्षक दलाने या हल्ल्याला मोठ्या धैर्याने तोंड दिले. आणि अशा प्रकारे युद्ध सुरू झाले.





अशातच एक विचित्र गोष्ट घडली. पृथ्वी अचानक कापू लागली. आणि किल्ल्याच्या मागील भागात मोठा स्फोट झाला. पर्वतावरून मोठमोठ्या शिळा गडगडत येऊन किल्ल्यावर कोसळल्या व अशा रीतीने किल्ला उध्वस्त झाला. त्याबरोबर तेथे लढणारे सर्व सैनिकही प्राणास मुकले. मंत्री व त्याच्या मदतीला आलेले सैनिकही गाडले गेले.

सूर्योदयानंतर जनतेच्या लक्षात आले की सुवर्णमूर्ति व तिचा शिल्पकार राजाही अदृश्य झाले आहेत. जनतेला वाटले की राजा कुठेतरी पळून गेला असावा आणि सुवर्णप्रतिमा शिळांखाली जमिनीत दबली गेली असावी.

या घटनेनंतर काही वर्षांनी अशी बातमी पसरली की जवळच्या अरण्यात राजासारखाच दिसणारा एक मुनि रहात आहे, परंतु त्याला भेटून त्याच्याशी बोलण्याचे धाडस कोणी केले नाही. काही लोकांचे असे मत होते की, राजा धबधब्यांतून शिरून त्यामागील मोठी गुहा पार करून पुढे कित्येक कोस दूर समुद्राकडे निघून गेला असावा. धबधबा व त्यामागील गुहा याबद्दल बरेच काही बोलले ऐकले गेले, पण कोणीही ते ओलांडून पलीकडे गेले नाही. कारण त्यांचा दृढविश्वास



होता की कोणी पलीकडे जायचे साहस केले. तर त्याला जिवंत परतणे अशक्य!

युद्धाचा परिणाम असा झाला की राज्य मंत्र्याला सहायभूत असणाऱ्या शेजारच्या देशाच्या राजाच्या ताब्यात गेले. तेथील निसर्ग—सौंदर्याबरोबरच तेथे मिळणाऱ्या सोन्याबद्दल लोभ उत्पन्न होऊन नव्या राजाने आपले पहिले राज्य छोट्या भावाच्या हाती सोपवले आणि पडक्या राजवाड्यापासून थोडा दूर एक नवा राजवाडा बनवून तो राहू लागला.

भूकंपाने उध्वस्त झालेला जुना किल्ला व राजवाड्याच्या जागी झाड-झाडोरा



उगवत गेला. जनता त्या जागी जायलासुद्धा भिऊ लागली, कारण तिथे रात्रंदिवस भुता-प्रेतांचा संचार असल्याची अफवा पसरली होती! हळूहळू त्या उजाड झालेल्या भागात विषारी साप, अस्वले, इत्यादींचा संचार सुरू झाला.

परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे विनोद नावाचा एक तरुण त्या प्रदेशात निर्भयाने वावरत असे. लहानपणीच तो आईच्या प्रेमाला पारखा झाला होता. पण त्याचे वडील मात्र आपल्या पेशात चांगले प्रवीण होते. ते आपल्या मुलाची कधीच काळजी करीत नसत. त्यामुळे विनोद त्या निर्जन, तुटके अवशेष असलेल्या भागात स्वच्छन्द फिरत राही. कधी कधी भुकेने वखवखलेल्या वाघांपासून आणि विषारी सापांपासून युक्तीने त्याला आपले प्राण वाचवावे लागत.

एके दिवशी संध्याकाळी अचानक पश्चिमेकडील आकाश लाललाल झाले, वारा वाहायचा थांबला, शेकडो जंगली श्वापदांच्या गर्जना ऐकू येऊ लागल्या, थोड्याच वेळात वादळ सुटले आणि पूर्ण वनप्रदेश तडातड आवाजाने घुमून उठला!

शेतात काम करणारे व गल्ली, बोळात चालत असलेले लोक भयाने इतस्ततः पळू लागले. साऱ्या दरीत एकवार प्रतिध्वनि उठला! हाही एक भूकंपच होता. जुन्या किल्ल्याचे अवशेष असलेला भाग पुन्हा एकदा भूकंपाच्या आघाताने उसळला आणि तेथील शिळा उडून राजाच्या नव्या किल्ल्यावर पडल्या. किल्ल्याचे प्रमुख महाद्वार तुटून भयंकर आवाज करीत धराशायी झाले! राजा घाबरून गेला, त्याने तावडतोब 'महाज्ञानीं' ना बोलवून घेतले. क्रोधाने कापत तो त्यांच्यासमोर बोलू लागला—"किल्ल्याचे महाद्वार मोडून पडले आहे, तेव्हा ते निर्माण करणाऱ्या कारागिरांची मस्तकेही अशीच मातीत लोळली पाहिजेत."





यावर मंत्र्यांनी निवेदन केले—"प्रभु, चण्डमार्तण्ड, हा किल्ला व राजमहाल निर्माण करणारे कारागीर काही पिढ्यांपूर्वी जिवंत होते आता ते सर्व परलोकी गेले आहेत."

"म्हणून काय झाले? कर्ज घेतलेला माणूस मेला तर त्यांच्या वारसांना कर्ज फेडावे लागते ना? मी काही मूर्ख नाही." राजा म्हणाला.

"आम्ही केवळ 'महाज्ञानी' आहोत, परंतु राजेसाहेब, आपण तर 'महा-महाज्ञानी' आहात!" प्रधानमंत्री म्हणाला.

विनोदचे आजोबा त्या किल्ल्याच्या निर्मितीच्या वेळी काम करणारे प्रमुख शिल्पकार व वास्तु-विशेषज्ञ होते. म्हणून सैनिक विनोदच्या वडिलांना पकडून घेऊन गेले व त्यांना राजासमोर उभे केले गेले.

"याचे डोके उडवा!" राजाज्ञा झाली.

एका दरबारी अधिकाऱ्याने विनयाने म्हटले—"महाराज, एवढ्या प्रचण्ड किल्ल्याच्या महाद्वारासाठी या माणसाचे एवढेसे डोके मातीत लोळवणे—ही शिक्षा पुरेशी नाही." त्या दरबाऱ्याला विनोदच्या वडिलांची दया आली होती!

"मग काय करावे? तुमचे काय मत आहे?" राजाने विचारले.

"या माणसाला एक हजार वर्षांची कारावासाची शिक्षा द्या." कोणा अधिकाऱ्याने सुचवले.

"वा, वा! एक हजार वर्षांची शिक्षा? अजब आहे!" राजा टाळ्या पिटीत म्हणाला.

अशा प्रकारे विनोदचे वडील कैदी झाले. हे पाहून विनोद व्याकुळ झाला. 'आपले म्हणावे' असे वडिलांशिवाय त्याला कोणी नव्हते, असली कठीण शिक्षा देणाऱ्या राजाची भर सभेत निन्दा करावी असे त्याच्या मनात आले. पण त्याच्या हितैषी लोकांनी त्याला कसेबसे शांत केले.



"विनोद तू रागाने राजाची निन्दा केलीस तर तुझीही तुझ्या वडिलांसारखीच अवस्था होईल. तू असा आवेशात येऊ नकोस. आपण तुझ्या वडिलांना सोडवण्याचा प्रयत्न करू."

परंतु वर्षभर सुद्धा कैद व भोगता विनोदचे वडील कारावासात मृत्यु पावले.

ही बातमी एकून राजा दुःखाने मंत्र्यांना म्हणाला–"पाहिलेत, या कैद्याने नऊशे नव्याण्णव वर्षांची शिक्षा वाचवली?"

हे एकून मंत्र्यांपकी एक म्हणाला–"महाराज, माझी एक कल्पना आहे. पित्याच्या संपत्तीला पुत्र वारस बनत असेल तर कारावासाच्या शिक्षेचाही तो वारस का बनू नये?"

"शाबास, काय बोललास! त्या मृत माणसाच्या मुलाला ताबडतोब धरून आणून कैदेत ठेवा." राजाने सेवकाला आज्ञा दिली.

विनोदला या राजाज्ञेबद्दल कळताच तो जंगलाकडे निघून गेला.

जंगलाजवळ तो पोचला तेव्हा रात्र झाली होती. चहूकडे दाट अंधार पसरला होता. पण विनोदला त्या जंगलातील झाडझाडोऱ्यांतून फिरायची सवय होती म्हणून मोठ्या सहजपणे तो त्या अवशेषांजवळ पोचला. आणि तिथल्या नेहमीच्या दगडावर बसला. तोवर चंद्रोदय होऊन जंगलात चांदणे पसरले. बराच वेळ वडिलांच्या मृत्युमुळे अश्रू ढाळून, थकून तो झोपी गेला.

परंतु थोड्याच वेळात तो जागा झाला. त्याने पाहिले–समोर काही विशेष प्रकाश पसरला होता. चन्द्राचा प्रकाश तर तो नक्कीच नव्हता! विनोदला तेथे खडबडीत दगडांशिवाय कधीच काही पहायला मिळाले नव्हते.

पण आता त्याला त्या भागात एक गुहा दिसून आली. त्या गुहेत चकचक चमकणारी एक आकृति उभी होती. विनोद त्या दिशेने चालू लागला. गुहेजवळ गेल्यावर त्याला दिसले की, तेथे हातात कमल घेतलेली एक स्त्रीची सुवर्णप्रतिमा उभी आहे! विनोदच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही.

दुसऱ्याच क्षणी त्याला आठवले की सोन्याच्या दरी बद्दल आपण एक पौराणिक कथा ऐकली होती–शिल्पकलेत निष्णात असलेल्या एका राजाने बनवलेली तीच ही मूर्ति असावी!

विनोद त्या प्रतिमकेडे निर्निमेष पहात राहिला. थोड्या वेळाने त्याला शंका आली–आपण ही मूर्ति पूर्वी कुठेतरी नक्की पाहिली आहे! पण अशी प्रतिमा असेल यावर त्याचा विश्वास नव्हता. कारण जेव्हापासून 'सोन्याची दरी' राज्यावर नव्या राजाचा अधिकार सुरू झाला, तेव्हा-पासून त्या राज्यात कलांना प्रोत्साहन देणे जणू बंदच झाले होते!

विनोदने मूर्तिला स्पर्श केला! त्यावेळी त्याला झालेला आनंद वर्णनातीत होता! तन्मय होऊन त्याने मूर्तिच्या हातातील कमलावर हात ठेवला. त्यावेळी प्रतिमेच्या बोटातील एक अंगठी घसरून त्याच्या बोटात बसली.

अंगठी पाहून विनोद चकित झाला! त्याला अवर्णनीय आनन्द वाटला. त्या मूर्तिकडे टक लावून पहात तो तिथेच बसला. आणि दुसऱ्याच क्षणी त्याच्या शरीरात नशेसारखा सचार झाला.

त्या अवस्थेत एक कंठस्वर त्याला जणू आव्हान देत विचारू लागला–"तू या सुवर्णमूर्तीत प्राणसंचार करण्याचे रहस्य जाणू इच्छितोस?"

"हां, हां, जरूर इच्छा आहे माझी." विनोदने उत्साहाने उत्तर दिले.

"मग तू या मूर्तीच्या रक्षणाची व्यवस्था करून धबधब्यामागील गुहेत प्रवेश कर. गुहा ओलांडून गेल्यावर नवीन प्रदेशात तुला एक देवी दिसेल. त्या देवीकडून तुला हे रहस्य कळेल. जेव्हा ही सुवर्णमूर्ती सजीव कन्येत परिवर्तित होईल, तेव्हा तिच्याशी विवाह करण्यासाठी देवीकडे वर माग." त्या अज्ञात कंठाने सांगितले.

(क्रमश:)



# गंधर्वाचे शाप

दृढनिश्चयी विक्रमादित्य वृक्षाजवळ गेला. प्रेत खाली काढून त्याने खांद्यावर घेतले व नेहमी प्रमाणे मौन होऊन तो स्मशानाकडे चालू लागला. तेव्हा प्रेतात वास करणारा वेताळ बोलू लागला–"राजा, या मध्यरात्रीच्या समयी इथे स्मशानात, कष्ट सहन करीत तू आपल्याच निर्णयावर अडून आहेस ही गोष्ट प्रशंसनीय आहे. एकाद्या गोष्टीचा ध्यास घेतल्यावर ते कार्य साधत नाही असे कधी घडत नाही–ही गोष्ट खरीच. पण साधलेले कार्य स्वत:च्या किंवा दुसऱ्याच्या कामी येत नाही असेही कधीकधी घडते. स्वत:त अद्भुत शक्ति व महानता असणाऱ्या गंधर्वासारख्या लोकांनाही कधीकधी अपमान सहन करावा लागतो. याचे उदाहरण म्हणून मी तुला चित्रवर्ण नावाच्या गंधर्वाची गोष्ट सांगतो. एक, तुझा श्रमपरिहारही होईल.

## वेताळाच्या गोष्टी



वेताळ गोष्ट सांगू लागला–चित्रवर्ण नावाच्या गंधर्वाने इतर गंधर्वांच्या तोंडून पृथ्वीवरील सौंदर्याबद्दल ऐकले, तेव्हा हे सौंदर्य निरखण्याचा निश्चय करून तो पृथ्वीलोकाकडे निघाला.

आकाशमार्गाने येतायेता चित्रवर्णाने एक सुंदर उद्यान पाहिले. उद्यानांत रंगी-बेरंगी फुले वाऱ्याच्या प्रवाहात सुरेख डोलत होती. काही फुलांचा सुगंध वातावरणांत दरवलला होता. ते अनपम सौंदर्य पाहून चित्रवर्ण मोहित झाला. त्याला काही वेळ इथे घालविण्याची इच्छा झाली. आणि तो त्या उद्यानातील एका कुंजाजवळ अवतरला!

उद्यानाच्या अनुपम सौंदर्याने मुग्ध होऊन चोहोबाजूंना पहात असताना एक ठिकाणी चित्रवर्णाला काही तरुण स्त्रिया दिसल्या. गंधर्वलोकात सुद्धा कधी न दिसणाऱ्या अद्भुत लावण्याने नटलेली सौंदर्याची मूर्तीच अशी एक युवती त्यांच्यात होती!

मंत्रमुग्ध झाल्यासारखा चित्रवर्ण त्या तरुणीकडे चालू लागला. त्याला पाहून सर्वजणी आश्चर्यात पडल्या. त्या सुंदरीवर दृष्टि स्थिरावत तो तिला म्हणाला–"हे सुंदरी, मी चित्रवर्ण नावाचा गंधर्व. आपणा सारखे अनुपम सौंदर्य मी गंधर्वलोकातही कुठे पाहिले नाही. आपण कोण?"

या प्रश्नाचे उत्तर त्या युवतींपैकी एकीने दिले–"ही शरच्चंद्रिका राज्याची युवराज्ञी नलंदादेवी."

"ओहो, असे आहे होय? मी तुमच्या या युवराज्ञीला आमच्या गंधर्वलोकात घेऊन जातो." असे म्हणून चित्रवर्णने युवराज्ञीचा हात पकडला.

युवराज्ञी भिऊन एकदम किंचाळली. एक राजसैनिक तिथे धावत आला व गंधर्वाशी लढण्याकरता त्याने तलवार उपसली.

हे पाहून विकट हास्य करीत गंधर्व म्हणाला, "अरे बाबा, मी कोण आहे हे



तुला माहीत नाही, म्हणूनच तू माझ्याविरुद्ध तलवार उचलू घजलास- खरे ना?"

"मी युवराज्ञीचे रक्षण करण्यासाठी नेमलेला सैनिक आहे, लढाऊ वीर आहे. तू त्यांचा हात पकडला आहेस, मी तुला नक्कीच कैद करणार. तू कोणीही अस, मला काय करायचय!" त्या वीराने रागाने उत्तर दिले.

हे ऐकून चित्रवर्णने चिडून त्या योध्याला शाप दिला, "अरे नीच माणसा, मी विशेष शक्ति असणारा गंधर्व आहे. तू माझ्यावर तलवार उगारायचा अपराध केलास–मी तुला याची शिक्षा दिल्यावाचून सोडणार नाही. मी असा शाप देत आहे की तू ताबडतोब लुळा होशील."

परंतु चित्रवर्णच्या शापाचा त्या योध्या-वर काहीही परिणाम झाला नाही. योध्याच्याही क्रोधाला सीमा राहिली नाही, आणि तो चित्रवर्णाच्या गळ्यावर वार करणार तोच युवराज्ञीचा हात सोडून देऊन विजेसारखा अदृश्य झाला.

एका सामान्य माणसावरही आपल्या शापाचा काही परिणाम न झाल्याचे चित्र-वर्णला मोठे आश्चर्य वाटले. आणखी थोडी यात्रा केल्यावर चित्रवर्ण संध्याकाळी एका वनात पोचला. थोडी पावले टाकतोय तोच एका डोंगराच्या गुहेतून प्रकाश किरण



बाहेर येत असलेले त्याने पाहिले. कसला प्रकाश आहे हे पाहण्यासाठी तो गुहेच्या तोंडाशी पोचला, तेव्हा गुहेच्या मध्यावर लटकत असलेले एक रत्न त्याला दिसले.

असा अद्भुत प्रकाश फेकणारे रत्न त्याने पूर्वी कधीच पाहिले नव्हते. मग काय, ते रत्न घेऊन जाऊन गंधर्व राजाला अर्पण करावे या उद्देशाने तो गुहेत शिरू लागला.

एवढ्यात मागून एक भयंकर आवाज आला–"अरे, तू कोण आहेस?"

चित्रवर्णने मागे वळून पाहिले अन् त्याला एक अक्राळविक्राळ राक्षस समोर उभा असलेला दिसला. त्याने रागाने चित्रवर्णला

विचारले–"तू माझ्या गुहेत काय म्हणून शिरत होतास?"

थोडासुद्धा विचलित न होता चित्रवर्ण उत्तरला–"अद्‌भुत प्रकाश फेकणारे हे रत्न मला फार आवडलं. ते घेऊन जावं म्हणून मी गुहेत जात होतो."

"दुसऱ्याची संपत्ती लुटायचं मनात आणणाऱ्या तुझ्यासारख्या चोराला मी जिवन्त सोडत नसतो. थांब, आत्ताच तुला पकडून खाऊन टाकतो." असे म्हणत राक्षस पुढे येऊ लागला.

विकट हास्य करीत चित्रवर्ण म्हणाला–"अरे अधमा, विशेष शक्ति असणारा गंधर्व आहे मी. तू माझं काही वाकडं करू शकत नाहीस. मी मनात आणलं तर तुझी अवस्था 'मेल्यातच जमा' अशी करू शकतो, समजलास? आपले प्राण वाचवायचे असतील तर तावडतोब ते रत्न माझ्या हातावर ठेव अन् माझी क्षमा माग. काय?"

गंधर्वाचे बोलणे ऐकून राक्षस आणखीच उत्तेजित होऊन गरजला–"अरे, उगीच बढाया मारू नकोस. आत्ता तुला माझ्या मुठीत दाबून तुझ्या हाडांचं चूर्ण करून टाकतो बघ." असे म्हणत राक्षस चित्रवर्णावर तुटून पडला.

पण चित्रवर्ण चपळाईने राक्षसाच्या हाती न सापडता हवेत उडाला आणि त्याला शाप दिला–"दुष्ट राक्षसा, जीव असूनही अचेतन खेळण्याप्रमाणे तुझी अवस्था होवो."

परंतु राक्षसावर काहीच परिणाम न झाल्याचे पाहून चित्रवर्णाला अति आश्चर्य वाटले, आणि त्याच्या मनात आले–पृथ्वीलोकातल्या रहिवाश्यांवर शापाचा परिणाम होत नसावा.

गंधर्व त्याच वनात आणखी थोडा पुढे गेला. तेव्हा एके ठिकाणी एक म्हातारा तहानेने तडफडत असलेला त्याला दिसला. चित्रवर्णने आसपास पाणी शोधले पण त्याला कुठेच पाणी दिसेना.

इतक्यात एका झाडाखाली तप करीत बसलेला एक मुनि त्याला दिसला. चित्रवर्ण त्याच्या जवळ जाऊन हात जोडून नम्रपणे म्हणाला–"स्वामीजी, इथे जवळच एक वृद्ध तहानेने तडफडत आहे. आपल्या कमंडलुतलं थोडं पाणी देण्याची कृपा करावी."

त्या मुनीने डोळे उघडले, चित्रवर्णाकडे क्रोधाने पहात तो म्हणाला–"अरे दांभिका, मधेच हाका मारून तू माझ्या तपात विघ्न आणलंस. थांब, याबद्दल तुला चांगली शिक्षा देतो." असे म्हणून मुनिने कमंडलुतले थोडे पाणी हातावर घेतले.

चित्रवर्ण पुन्हा विनयपूर्वक म्हणाला–"मुनिवर, आपण रागावू नये. तहानेने तडफडणाऱ्या एका वृद्धाला वाचविण्यासाठीच मला आपले ध्यान भंग करावे लागले."

"कारण काहीही असेल, तुला शिक्षा झालीच पाहिजे." असे म्हणून हातातले





पाणी चित्रवर्णावर उडवत मुनिने शाप उच्चारला—"तू मुका हो."

परंतु चित्रवर्णावर मुनिचा हा शाप प्रभाव पाडू शकला नाही. मुनिच्या अहंकाराबद्दल आता चित्रवर्ण ही संतापला व त्याने उजवा हात हवेत हलवत उलट मुनिला शाप दिला—"तू आत्ताच शिळा होऊन पडशील."

दुसऱ्याच क्षणी तो मुनि शिळा होऊन पडला.

एवढी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, विशेष प्रकारच्या शक्ति प्राप्त असलेल्या गंधर्ववंशी चित्रवर्णाच्या शापांचा एक सामान्य सैनिक व एक राक्षस यांच्यावर काहीही परिणाम झाला नाही, परंतु एक तपस्वी मुनि मात्र त्याच्या शापाला बळी पडला. तो योद्धा किंवा राक्षस यांच्यात काही विशेष शक्ति होती का? या शंकेचं समाधानकारक उत्तर दिलं नाहीस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे-तुकडे होतील.

यावर विक्रमादित्य म्हणाला—"सहजपणे प्राप्त असणाऱ्या महान् शक्तीचा उपयोग आपल्या तुच्छ स्वार्थासाठी करायचा प्रयत्न चित्रवर्णाने केला. राजकुमारीला पकडताना, तिच्या रक्षणासाठी कर्तव्य-पालन करण्यास सिद्ध अशा सैनिकाला त्याने शाप दिला—म्हणून तो शाप खरा झाला नाही. त्याचप्रमाणे राक्षसाचे रत्न चोरायला जाऊन उलट त्याने रत्नाच्या मालकालाच शाप दिला, म्हणून तोही शाप राक्षसाचे काहीही वाकडे करू शकला नाही. चित्रवर्णाचं कार्यच अधर्मयुक्त होतं. आता राहिला—मुनीच्या बाबतीत गंधर्वाचा शाप सफल होण्याचा प्रश्न? यावेळी चित्रवर्ण दयेने प्रेरित होऊन एका म्हाताऱ्याला मदत करू पहात होता, परंतु मुनिला अहंकार होता. त्याची वृत्तिही अधर्माची होती. झाले, याचं तात्पर्य असं नव्हे की तो योद्धा किंवा राक्षस यांच्याजवळ कांही विशेष शक्ति होत्या!"

अशाप्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# पदाचे रक्षण

कोसल देशावर राजा शैलेन्द्रवर्मा राज्य करीत होता. एके दिवशी काही कारणाने दरबारी विदुषक शकट याच्यावर राजाची इतराजी झाली. 'यापुढे आपलं तोंड मला कधीही दाखवू नकोस.' अशी आज्ञा राजाने त्याला फर्मावली.

शकटाचे दुर्भाग्य एवढ्यानेच संपले नाही. त्याच दिवशी विदर्भ देशातून दामोदर नावाचा विदुषक शैलेन्द्रवर्माला भेटायला आला. त्याच्या बोलण्याने राजा फार खुश झाला. आपला विदुषक शकट याच्यावर खप्पा मर्जी झाली होतीच, त्यामुळे या दामोदरलाच शकटच्या जागेवर विदुषक म्हणून नेमावे असे राजाच्या मनात आले.

या विचारावर शैलेंद्रवर्माने मंत्री मंगलकाकडे सल्ला विचारला.

मंगलक म्हणाला—"प्रभु, यापूर्वीही आपण अनेक वेळा शकटवर नाराज झालात, तरीही आपल्या चमत्कारपूर्ण बोलण्याने त्याने आपले मनोरंजनही केले आहे. त्यामुळे माझे असे मत आहे की त्याला आणखी एक संधी द्यावी."

यानंतर मंगलकने शकटला बोलवून घेऊन दरबारातल्या आपल्या पदाचे रक्षण करण्यासाठी जागरूक रहाण्याचा सल्ला दिला.

दुसऱ्या दिवशी राजा व मंत्री काही गोष्टींवर विचारविनिमय करीत असताना शकट एक काळा बुरखा पांघरून तेथे आला व म्हणाला—"महाराज, मी तोंड दाखवू नये—अशी आज्ञा आपण दिली, म्हणून नाइलाजाने मला बुरख्याचा आधार घ्यावा लागला. पण आपण मला बोलायला बन्दी केली नाही न? मला असं कळलं की आपण माझं पद दुसऱ्या कोणाला देऊ पहात आहात. माझी आपणाला अशी

रतन देसाई

विनन्ति आहे की–आपण मला माझ्या जागेवरून दूर करू नये. खूप वर्षे मी आपल्याच आश्रयावर जगत आहे."

शकटाचा अवतार पाहून मोठ्या कष्टाने आपले हसू दाबत राजा शैलेन्द्रवर्मा म्हणाला–"मला असं वाटतंय की विदर्भातून आलेला दामोदर आपल्या दरबारचा विदुषक होण्यास सर्वस्वी योग्य आहे. पण तू आपले पद वाचवू इच्छित असशील तर तुला आणखी एक संधी द्यायला माझी काही हरकत नाही."

"महाराज, आज्ञा व्हावी, यासाठी मला काय करायला हवे?" शकटने विचारले.

"एक तर, उद्याच्या दरबारात तुला दामोदरची असं म्हणून स्तुति करावी लागेल की–त्याच्यासारखा विदुषक अलम दुनियेत दुसरा कोणी नाही. पण त्याबरोबरच तुला ही खबरदारी घ्यावी लागेल की हे करीत असताना तू स्वत:ची निन्दा करायची नाहीस आणि स्वत:ला कमी लेखायचे नाहीस. अशा प्रकारे चतुर भाषणानेच तू आपल्या पदाचे रक्षण करू शकशील." राजाने आपली अट सांगितली.

दुसऱ्या दिवशी शकटने राजसभेत दामोदरची अशी स्तुति केली–दामोदरची बरोबरी करू शकेल असा विदुषक दुनियेत अन्यत्र कुठेही नाही. माझ्यासारख्या महान विदुषकाच्या जागी दुसऱ्या कोणाला नेमायचे महाराजांच्या मनात आले तर त्यासाठी दामोदरच सुयोग्य माणूस आहे.

दरबारच्या सर्व सदस्यांना शकटच्या या बोलण्याने विस्मय वाटला. त्यांना हे समजेना की या संदर्भात असल्या गोष्टी करायची शकटला जरूरच काय होती!

राजाने आनंदित होऊन टाळ्या वाजवून म्हटले–"शकटचे स्थान कायम शकटकडेच राहील." यानंतर सिंहासनावरून उतरून येऊन शकटला आलिंगन दिले.

यानंतर राजा शैलेन्द्रवर्माने विदर्भातून आलेल्या दामोदरचा सन्मान केला. त्याची पाठवणी करून शकटलाही अनेक उपहार दिले.



भारतातील अद्‌भुत स्थळे :

# मंडू

इसवी सन १६१८ मधे जहांगीर बादशहाने मंडू प्रदेशाच्या सौंदर्याबद्दल लिहिले होते–"सुगंधित व रमणीय अशा फुलांनी भरलेल्या मंडू पर्वताच्या दऱ्यांचे वर्ण मी कोणत्या शब्दात करू?" १३ व्या शतकात परमार राजांनी एक किल्ला बांधून त्याचे नाव 'मांडवगड' असे ठेवले. कालाच्या ओघात तो 'मंडू' म्हणून ओळखला जाऊ लागला.




एके दिवशी एक शेतकरी जमीन खोदत असताना त्याचे फावडे एका बारक्या दगडावर आपटले व ते सोन्याचे झाले. त्या दगडाचे महात्म्य शेतकऱ्याला कळले नाही, पण एका लोहाराला ते कळून आले व शेतकऱ्याकडून दगड घेऊन तो निघून गेला.

दगडाच्या मदतीने अपार धन मिळवून थोड्याच दिवसात तो लोहार 'कुबेर' बनला. खूप दिवसांनी त्याने तो दगड जयसिंह देवराजाला दिला. असे मानले जाते की त्या दगडाच्या सहाय्याने राजाने जो धनसंग्रह केला त्यातून त्याने हा किल्ला बांधला.





काही काळाने राजाही त्या दगडापासून धन मिळवून तृप्त झाला. सर्व जवाहर व सोने त्याने लोकांना वाटून टाकले. शेवटी एका पुरोहिताची पाळी आली, तेव्हा तो दगडच त्याने त्याच्या हातावर ठेवला. हाती दगड पाहून रागावलेल्या पुरोहिताने तो नदीत भिरकावून दिला. अशा प्रकारे तो अद्भुत दगड कायमचा पाण्यात गेला. (नर्मदेत सापडणाऱ्या शाळिग्रामात सोने असते म्हणतात!)

कालान्तराने राजाने निर्मिलेला दुर्गही कालौघात नष्ट झाला बाज बहादुर जेव्हा माळव्याचा शासक झाला तेव्हा दुर्गाच्या काही महालांचा पत्ता लागला, आणि त्याने त्यांची दुरुस्ती केली. त्याच प्रदेशात राहणाऱ्या रूपमती नामक युवतीवर त्याचे प्रेम बसले. ते दोघेही उत्तम गायक-गायिका होते.






बाजबहादुरने रूपमतिजवळ विवाहाचा प्रस्ताव मांडला तेव्हा ती म्हणाली– "मी नर्मदेची कन्या आहे. नर्मदेच्या पाण्यात स्नान केल्याशिवाय मी एकही दिवस काढू शकत नाही." आता नर्मदा नदी पहाडावर कशी न्यावी? ही अडचण सोडवण्यासाठी बाजबहादुराने नदीची प्रार्थना केली.

एके दिवशी नर्मदा नदी स्वप्नात येऊन म्हणाली–"तू पहाडावरील चिंचेच्या झाडाखाली खोद. मी तेथे झऱ्याच्या रूपात अवतरित होईन." त्याने त्याप्रमाणे खोदताच तेथून एक झरा फुटून तो ऊर्ध्वमुखी होऊन वाहू लागला. ते आजही 'रेवाकुण्ड' म्हणून प्रसिद्ध आहे.





माळव्यावर एकदा अकबराने हल्ला केला. संगीत–कलेतच व्यस्त राहिलेला बाजबहादुर या सैन्याला तोंड देऊ शकला नाही. रूपमतीने आत्महत्या केली. पण ज्या महालात ती राहिली तो 'रूपमति महाल' आजही पहायला मिळतो.

कालप्रवाहाचे धक्के खाऊनही रमणीय निसर्गाच्या सान्निध्यात राहणाऱ्या एकाद्या मौन यति सारखा स्थिर राहून, प्राचीन वैभवाची साक्ष देत उभा आहे.






बाजबहादुराने आपले शेवटचे दिवस अकबराच्या दरबारात घालवले. त्याच्या अद्‌भुत संगीतामुळे तो अकबराचा स्नेहपात्र बनला, तरीसुद्धा कायम आपल्या मंडू व रूपमती यांच्या आठवणीत हरवल्या सारखाच तो रहात असे.



# जादूची शिडी

मलयगिरीचा राजा महिपाल एकदा राजसभेत काही चर्चा करीत असताना, वितभर लांब दाढी असलेला एक कुबडा म्हातारा तेथे आला. त्याच्या पाठीवर एक शिडी होती. राजाला प्रणाम करून तो म्हणाला–"महाराज, माझे रक्षण करा."

"बोल, कसलं संकट आलं आहे तुझ्यावर? मी अवश्य तुला मदत करीन." राजाने त्याला आश्वासन दिले.

कुबडा म्हणाला–"महाराज, आयुष्यभर कष्ट करून मी ही शिडी मिळवली. पण ती पळवून तिच्या मदतीने द्रव्यार्जन करायच्या विचाराने मानसिह डाकू माझ्या मागे लागला आहे.

राजाने त्या म्हाताऱ्यासाठी किल्ल्यातच रहाण्याची व्यवस्था केली व त्याच्या रक्षणासाठी दोन पहारेकरीही नेमले. मानसिहाला जेव्हा या गोष्टीचा पत्ता लागला, तेव्हां पहारेकऱ्यांच्या डोळ्यांत धूळ फेकून त्याने किल्ल्यात प्रवेश केला. पण जंग जंग पछाडूनही त्याला शिडी मिळालीच नाही. परंतु जाताना त्याने बऱ्याच किमती वस्तु चोरून नेल्या. पहारेकरी त्याच्या मागे लागले, पण त्यांना यश मिळाले नाही.

शेवटी राजा महिपाल स्वतःच डाकूला पकडण्यासाठी निघाला. हेरांकडून मिळालेल्या माहितीप्रमाणे त्याच्या निवासस्थानी पोचण्यासाठी राजा डोंगराळ भागात पोचला.

परंतु डाकूने राजाला थोड्या दुरूनच पाहिले होते. राजाला फसवण्यासाठी गुराख्याच्या वेषात राजाकडे येऊन तो म्हणाला–"महाराज, या समोरच्या गुहेत रत्नांचे ढीग आहेत. मला गुराख्याला त्याचा काय उपयोग? आपल्याला त्याचा जास्त चांगला उपयोग होईल."



राजाला त्याच्या बोलण्याचे आश्चर्य वाटले व घोड्यावरून उतरून त्याने गुहेत प्रवेश केला. डाकूने ताबडतोब एक जड शिळा सरकवून गुहेचे तोंड बंद केले आणि राजाच्या घोड्यावर बसून गडाकडे निघून गेला.

गडात पोचल्यावर राजाचा धाकटा भाऊ अनंगपाल याला भेटून तो म्हणाला–"प्रभु, जंगलात माझी अन् राजाची भेट झाली. ते म्हणत होते की भौतिक सुखांचा वीट येऊन आपण संन्यास घेणार आहोत. आजपासून राज्यशासनाची जबाबदारी आपण शिरावर घ्यायला हवी. मी सांगत असलेल्या हकीकतीची साक्ष म्हणजे हा घोडा! महिपालचा घोडा पाहून डाकूच्या बोलण्यावर अनंगपालचा पूर्ण विश्वास बसला. आता आपण राजा होणार–या आनंदात गळ्यातला हार काढून त्याने मानसिंहाला बक्षिस दिला."

हार उलटा पालटा करून पहात मानसिंह डाकू म्हणाला–"महाराज, आपण जादूची शिडीही दिलीत तर जास्त आनंद वाटेल"

जादूच्या शिडीचे नाव ऐकल्याबरोबर अनंगपालला शंका आली. डाकूला पकडण्यासाठी त्याने सेवकांना पुकारले. परंतु तेवढ्यात डाकू तेथून पळून गेला.

चिडूनच डाकू गुहेजवळ पोचला. तोंडावरची शिळा बाजूला करून तो गुहेत गेला. महिपालला म्हणाला–"आपण दोघे भाऊ राम-लक्ष्मणांसारखे आहात ही गोष्ट मी राज्यांत सर्वत्र ऐकलेली आहे, म्हणूनच आपली परीक्षा घेण्यासाठी मी हा उद्योग केला! आपला भाऊ लक्ष्मण नव्हे, रावण आहे रावण! आपण संन्यासी होणार, असे मी त्याला सांगितले, तेव्हा प्रसन्न होऊन त्याने मला हा हार दिला. पहा, असे म्हणून अनंगपालने दिलेला कंठहार त्याने राजाला दाखवला.

राजाचा क्रोध अनावर झाला, तो तडक किल्ल्यात परत येऊन अंतःपुराकडे





निघाला, तेवढ्यात त्याला पाहून कुबड्याने ताडले की स्वारी रागात आहे! मुद्दाम मधे येऊन तो राजाला म्हणाला–"महाराज, आपण माझ्याकडे आलात तर एक अद्भुत आश्चर्य दाखवतो."

काय प्रकार आहे, तो पहावा म्हणून राजा कुबड्याबरोबर त्याच्या निवासस्थानी गेला, त्याच्या सांगण्यावरून त्या शिडीवर चढून गच्चीत गेला. तेथे राजाला एक विचित्र दृश्य दिसले–राजाचे वडील मृत्युशय्येवर पडले आहेत. त्यांनी महिपालला जवळ बोलवून बाजूला उभ्या असलेल्या दहा वर्षांच्या अनंगपालकडे बोट दाखवून म्हटले–"बाळा, तुझ्या छोट्या भावाला कसलीही कमतरता पडणार नाही, याबद्दल नेहमी जागरूक रहा. बाळबुद्धिमुळे त्याने कधी काही चूक केली तरी ती पोटात घाल अन् त्याला प्रेमाने वागव."

महिपाल अनंगपालला जवळ घेऊन बोलला–"बाबा, आपण काळजी करू नका. मी याला माझ्या प्राणापेक्षा अधिक जपेन."

नंतर महिपाल शिडीवरून उतरून कृतज्ञता व्यक्त करीत त्या वृद्धाला म्हणाला–"आज केवळ तुझ्यामुळेच माझ्या भावाचे प्राण वाचले. मी आपल्या वडिलांना दिलेल्या वचनाचे पालन करू शकलो. तू माझ्याजवळ तुला हवे ते माग."

"प्रभु, माझी आपणाकडून इतकीच इच्छा आहे की माझ्या या शिडीचे मानसिंहापासून रक्षण व्हावे, माझी अन्य कसलीही इच्छा नाही. या जादूच्या शिडीच्या मदतीने सर्वांना शत्रूच्या भयापासून मुक्त करून चांगले नाव मिळवण्याची माझी इच्छा आहे." कुबडा म्हातारा म्हणाला.

थोडा विचार करून राजा म्हणाला–"या शिडीचे महात्म्य 'शत्रूपासून रक्षण' इतकेच आहे ना? अशा परिस्थितीत तू जर शत्रूच्या बाबतीत विचार करीत असशील तर हे सर्व निरर्थक आहे. तू आत्ताच्या आत्ता किल्ला सोडून जा. तुझी अडचण दूर होईल."









किल्ल्यातून बाहेर न काढण्याबद्दल वृद्धाने राजाला खूप विनवले, पण राजाने त्याचे काहीही ऐकून घेतले नाही, आणि त्याला किल्ल्याबाहेर काढले.

राजाची निन्दा करीत शिडी खांद्यावर घेऊन कुबडा चालू लागला. तो थोडा पुढे जातो तोच डाकू समोरून आला व जबर-दस्तीने शिडी हिसकावून घेऊन जंगलात पळून गेला. कुबडा म्हाताराही त्याच वाटेने मागोमाग चालू लागला. जंगलात पोचल्यावर शिडीचे रहस्य जाणण्यासाठी डाकूने ती एका झाडाला टेकवली आणि सर्व पायऱ्या चढून वर गेला. तेथे दोन राजसेवकांनी त्याला धरले व ते म्हणाले— "अरे, तू जे अपराध केले आहेस, त्याची शिक्षा म्हणून तुला सुळावर चढवण्याची आज्ञा राजाने दिली आहे." असे म्हणून मानसिह डाकूच्या गळ्यात फास घालून त्याला झाडाला लटकावून निघून गेले.

फास गळ्यात जसजसा घट्ट होत गेला तसतसा डाकू भयाने कापू लागला. त्याच वेळी कुबडा म्हातारा तेथे पोचला व त्याने फास सोडवून डाकूला जमिनीवर निजवले.

थोड्यावर वेळात डाकू मानसिंह शुद्धिवर आला. व म्हाताऱ्याला पहाण्या-साठी नजर इकडे तिकड फिरवू लागला. इतक्यात म्हातारा दुरून येताना त्याला दिसला.

धावत जाऊन त्याच्या पायावर लोळण घेत मानसिंह म्हणाला, "दादा, मला क्षमा करा. तुम्ही वेळेवर येऊन माझे प्राण वाचवलेत. मी जन्मभर तुमच्या ऋणातून मुक्त होऊ शकणार नाही." असे म्हणून तो जंगलात निघून गेला.

जादूच्या शिडीमुळे मानसिहाच्या बुद्धीत परिवर्तन झालेले पाहून कुबडा प्रसन्न झाला आणि राजाच्या समयसूचकतेवर खुश होऊन त्याने ती शिडी राजाला बक्षीस दिली






कालिन्दीच्या तटावर एक खूप मोठे गाव वसले आहे–गोकुळ. गायी, वासरे, बैल आणि निरनिराळ्या कामात गढलेल्या माणसांनी गाव सदा गजबजलेले असते. वसुदेवाच्या प्रेरणेने नन्द आपल्या परिवारासह त्या गोकुळात पोचला. गावच्या वृद्ध व अनुभवी लोकांनी त्यांना सामोरा जाऊन त्यांचे अभिनन्दन केले. नंदाने त्यांना कुशल प्रश्न विचारले व प्रत्येकाचे नाव घेऊन त्यांच्याबद्दल चौकशी केली व सर्वांबरोबर गोकुळात प्रवेश केला. वृद्ध गोपिकांनी येऊन यशोदेच्या मुलाचा जन्मोत्सव साजरा केला. रोहिणीही आली. नंदाने तिला आदराने ठेवून घेतले.

आता बालकृष्ण गोपिकांच्या प्रेमळ सहवासात वाढू लागला. असेच काही दिवस गेले.

यशोदा आपल्या बालकाच्या हालचाली पाहून खुश होई. रोज सकाळी बाल-कृष्णाला तेल लाऊन न्हाऊ घाली. त्याला पाळण्यांत झोपवून अंगाई गीते म्हणी. शांत झोपलेल्या बालकृष्णाच्या सुंदर मुखाकडे निरखून पहात राही. मधूनच त्याचे पापे घेई, कधी गालगुच्चे पण !

बालकृष्ण झोपेतून जागा झाला की आपल्याशीच खेळत राही. रडणे जसे त्याला ठाऊकच नाही. कधी उगाच आपल्या मुठींनी डोळे चोळी. डोळ्यांतील काजळ सर्व तोंडावर पसरून टाकी. मग त्याचा



चेहरा अधिकच खुलून दिसे. यशोदा त्याला पाहून मनोमन खुश होऊन जाई.

तिकडे कंसाने गर्भपात व शिशुहत्या करण्यासाठी अनेक राक्षसांना नेमले. त्यांच्यात पूतना ही वयाने सर्वात मोठी आणि शरिरानेही भयंकर होती! ती रात्रीच्या वेळी बालकांच्या शोधाला निघाली. नन्दाच्या घरात आईच्या कुशीत झोपलेल्या कृष्णाला तिने पाहिले. बाळाचा चेहरा तेजाने चमकत होता. इतर सामान्य मुलांपेक्षा तो निराळाच दिसत होता. कंसाच्या वधासाठी जन्मलेले बालक हेच असेल का?

हा विचार मनात आल्याबरोबर पूतना क्रोधाने थरथरू लागली, दात ओठ खाऊ लागली. तिचे डोळे विस्तवासारखे लाल झाले! भुवया ताणल्या गेल्या, कपाळावर घाम आला, श्वास भात्यासारखा धपापू लागला आणि तिची जीभही लळलळू लागली. आईजवळचे ते बाळ तिने चटकन उचलले व वीष लावलेला आपला स्तन तिने त्याच्या तोंडात कोंबला. कृष्णाने आपल्या ओठांनी तो घट्ट पकडला व सर्व ताकत लावून तो जोराने तिच्या शरीरातले सप्त धातु शोषून घेऊ लागला. यावेळी तो जणू राक्षसांचा राक्षस बनला. पूतना आर्तनाद करून तिथेच जमिनीवर कोसळली.

पूतनेच्या भयंकर आवाजाने आसपासचे सर्व गोप जागे झाले. यशोदेला कृष्णाचे रुदनही ऐकू आले. तटकन उठून पहाते तो जवळ कृष्ण नाही! तिने नन्दाला हाका मारल्या. नन्दाबरोबर इतर गोपही तेथे पोचले. त्यांना त्या भयानक राक्षसीचे प्रेत तेथे दिसले व तिच्या अंगावर एकाद्या पक्ष्यासारखा बिलगलेला कृष्ण ही दिसला!

नंद-यशोदेने चटकन बाळाला चुचकारत उचलून घेतले.

"हा काय प्रकार आहे? ही राक्षसी इथे कशी आली? आपल्या बाळाला मारायला आली, तेव्हा तू गप्प कशी बसलीस?" चिडून नन्द यशोदेला विचारू लागला.

"मी बाळाला पोटभर दूध पाजून निजवले. मशाल जळत होती. मी बराच वेळ जागी होते. मधेच माझा थोडा डोळा लागला आणि ही राक्षसी केव्हा इथ आली—ही काय माया आहे—मला काही कळतच नाही." बावरलेली यशोदा स्फुंदत म्हणाली.

कृष्ण एका भयंकर संकटातून वाचला—या विचाराने सर्व गोपालांना आनन्द झाला. त्यांनी पूतनेच शव फरपटत नेऊन दूर फेकून दिले. नन्दाने आपल्या बाळाला उचलून घेतले. त्याची दृष्ट काढवली व त्याला मन:पूर्वक आशिर्वाद दिला.

बाळ गोकुळात वाढत होते. एके दिवशी वसुदेवाने आपला पुरोहित गर्ग याला गोकुळात पाठवले. लपतछपत जाऊन एका शुभमुहूर्तावर पुरोहित गोकुळात पोचला आणि यशोदा व रोहिणी यांच्या मुलांची जातककर्मे करून, मुलांची नावे कृष्ण व राम अशी ठेवून पुन्हा लपतछपत परतला.

आता नन्द खूपच प्रसन्न होता. ब्राह्मणांना बोलावून त्यांना त्याने षड्रस भोजन दिले, आणि गोदान व वस्त्रदान केले. अशा प्रकारे मोठाच उत्सव साजरा झाला. गोकुळातील आपल्या नातेवाइकांनाही नन्दाने वस्त्रे दिली, गोपूजा केली, गोठे सजवले. एका सुंदर बाळाला जन्म दिल्याबद्दल गोप-गोपिकांनी नंद-यशोदा यांचे अभीष्टचिंतन केले.





इकडे मथुरेत कंसाला पूतनेच्या मृत्यूची बातमी मिळाली. सेवकांनी तो वृत्तान्त सविस्तर सांगितला. आता नंदगोपच्या पुत्राबद्दल त्याच्या मनात संशय केन्द्रित झाला. त्याबरोबरच तो भीतीने शहारला. त्याने आपल्या राक्षस सेवकांना जागरूक राहण्याबद्दल ताकीद दिली. कंसाच्या आज्ञेने शकट नावाच्या असुराने गुप्त रूपाने नंदाच्या शकटात प्रवेश केला. आणी योग्य संधीची वाट पाहू लागला.

त्या दिवशी यशोदेने कृष्णाला झोपवून शकटाच्या खाली बिछान्यावर ठेवले व अन्य गोपीसह ती नदीवर स्नानाला गेली. थोड्या वेळात कृष्ण जागा झाला. जवळ कोणी नाही असे पाहून मुठी तोंडात घालून रडू लागला. डोळ्यातले अश्रु-काजळ एकत्र होऊन त्याच्या चेहऱ्यावर पसरले. थोडा वेळ तो तेथेच पाय हलवत, उसळत राहिला. असे करता करताच त्याने एकदा आपले पाय पसरले व एकदा जवळ घेऊन जोराने त्या शकटावर लाथ मारली. शकटाचे तुकडे-तुकडे होऊन पडले!

इतक्यात यशोदा स्नान करून परतली. मोडून उलटा पडलेला शकट पाहून तिच्या छातीत धडकी भरली, ती जोराने किंचाळली. कृष्णाला पटकन उचलून घेऊन म्हणाली—"आई ग, बाळ गाढ झोपला म्हणून स्नानाला गेले. तो हा प्रकार! आता याचे वडील काय म्हणतील? या गाड्याची अशी दुर्दशा कशी बाई झाली! कोण सांगेल सर्व हकीकत?" असे म्हणत तिने कृष्णाला पदराखाली घेतले!

इतक्यात धुळीने शरीरे व वस्त्रे माखलेल्या, हातात काठी घेतलेल्या गोपांसह बोलत बोलत नन्दही तेथे येऊन पोचला. गाडीची धुरी व चाके निघालेली पाहून तो आपादमस्तक भयाने कापू लागला, कारण-आपला बालकृष्ण नेहमी या शकटाखालीच झोपतो ना! गाडातर उध्वस्त झाल्यासारखा दिसत आहे, मग माझ्या बाळाचे काय झाले असेल?



दुसऱ्याच क्षणी नन्द कृष्ण-यशोदेपाशी आला. यशोदेच्या चेहऱ्याकडे निरखून पहात त्याने विचारले–"गाड्याची अशी अवस्था कशी झाली?" नन्दाला एकदा वाटले-वादळाने तर गाडा मोडला नाही ना? की बैलाने चिडून याची अशी अवस्था केली? पुन्हा मनातच त्याला वाटले-काही का असेना, माझा बाळ तर सुरक्षित आहे ना? इतकेच पुरे आहे. यशोदा सद्गदित कंठाने म्हणाली–"सर्व चूक माझीच आहे. बाळ झोपला आहे, नदी जवळच आहे म्हणून मी स्नानाला गेले आणि परत येऊन पहाते तर शकट मोडलेला! आपले भाग्य थोर, म्हणूनच आपला बाळ वाचला."

इतक्यात काही गोप-बालक तेथे आले- "बापरे, आम्ही इथे खेळत होतो. तुमच्या कृष्णाने पाय पसरून एकदम शकटावर लाथ मारली आणि शकटाची ही अवस्था झाली. काय अजब गोष्ट ही!" मुले एकदमच म्हणाली.

यावर नंद-यशोदेच्या आश्चर्याला सीमा राहिली नाही. मुठभर माती बाळावरून ओवाळून त्यांनी बाजूला फेकून दिली, आणि देवाची प्रार्थना केली– आमच्या बाळाचे असेच रक्षण कर देवा! इतक्यात आणखीही बरेच गोप तिथे गोळा झाले, आणि सर्व वृतान्त ऐकून आश्चर्य-चकित झाले. नतर त्यांनी मोडलेली गाडी दुरुस्त करून टाकली.

काही दिवस लोटले, कृष्ण आता रांगू लागला, बोट धरून उभे केल्यावर अडखळत पावले टाकू लागला. टाळ्या वाजवून बोलावले तर जवळ येऊ लागला. कोणी येताजाता पाहिले तरी त्याला उचलून, त्याचे चुंबन घेतल्याशिवाय पुढे जाईना. मधेच तो पायातले पैंजण वाजवत तिरकी नजर करून झरझर निघून जाई. त्याच्या बाळलीला पाहून लोकांना धन्यता वाटे!

यशोदा कृष्णाला रोज लोणी खायला देत असे. ती आपली कामे करी तेव्हां कृष्णही लटपटत्या पावलांनी तिच्या मागेमागे फिरे इतर गोपिकांच्या घरी जाऊन त्यांच्याजवळ लोणी मागे. सर्व लोणी त्यानी दिले तरी आणखी लोण्या-साठी हट्ट करीत असे. दिले नाही तर ताक घुसळणाऱ्या त्या गवळणीची रवी पकडी, त्यांची वेणी धरून ओढी, आंबाडा सोडून ठेवी, किंवा साडीचा पदरच ओढी.

गोपिका त्याला विचारत–"कृष्णा, आम्ही तुला लोणी दिलं तर तू थोडे नाचून दाखवशील?" मग तो पायातल्या घागऱ्या छमछम वाजवत नाचे. गोपिका ताक घुसळायचे सोडून त्याच्या बाळलीला पहात तल्लीन होऊन जात. कृष्ण दिवसभर सर्व गोकुळात फिरे. त्याच्या खोड्यांनी त्रासून गवळणी त्याच्या मागे लागत व ओरडत "धरा ग चोराला!" अन् शेवटी त्याला पकडून यशोदेच्या स्वाधीन करीत.

एके दिवशीं बालकृष्णाने गोकुळातल्या एका घरात प्रवेश करून तेथील लोण्यावर ताव मारला. तोंड सर्व लोण्याने माखून गेले. गोपींनी हा सर्व प्रकार पाहिला. त्याला कडेवर उचलून दोन-चार गोपी यशोदेकडे घेऊन आल्या आणि म्हणाल्या– "यशोदे, संभाळ हा तुझा लोणी-चोर पोरगा! सगळं लोणी साफ करून टाकलं यानं! बघ कसा बघतोय सगळ्यांकडे."



"कारे चोरा, चोरून लोणी खाल्लस? थांब, आता पाहते चांगलं तुझ्याकडे." रागाने यशोदा म्हणाली.

"आई, मी नाही ग लोणी खाल्लं! उगाच कां माझ्यावर आळ घेतेस?"

"तोंडावर सगळीकडे लोणी माखलंय आणि म्हणे मी नाही खाल्लं! खोटार्डा!" यशोदा उद्गारली.

कृष्ण म्हणाला–"आई, मी खोट नाही ग बोलत. या सर्व मित्रांनी माझ्याशी वैर मांडलं. त्यांनी जबरदस्तीने माझ्या तोंडाला लोणी फासलं आणि आता सगळे पळून गेले. आई, थोडा तरी विचार कर. मी छोटा बालक, माझे हात छोटे. ते शिक्या-

पर्यंत कसे पोंचतील? तू माझ्यावर उगाच चोरीचा आरोप करतेस. मी खरच लोणी नाही खाल्लं!

आणि आई, माझे मित्र मला काय म्हणत होते सांगू? ते म्हणाले–"कृष्णा, तुझी आई गोरी, नंद बाबा गोरे, तूंच कसा रे कसा असा काळा? आई, मला वाटत तुझ्या ही मनात असाच काही विचार असावा, म्हणून का तू माझ्यावर चोरीचा आळ घेत आहेस?"

कृष्णाचा हा युक्तिवाद ऐकून यशोदेचा सर्व राग वितळून जाई. ती म्हणे, "अरे लबाडा! खाऊन सवरून काय गोड गोड गोष्टी करतोस रे!" मग त्याला कडेवर घेऊन त्याचे खूप पापे घेई.

दिवसामासांनी कृष्णाच्या खोड्या वाढत चालल्या. गवळ्यांची सारी मुले त्याच्या भोवती जमत. सर्व मिळून टोळके करून गोकुळभर धिंगाणा घालीत. कृष्ण भांड्यांतले, मडक्यांतले दही-लोणी खाई, उरलेले जमिनीवर टाकून देई. त्याच्या खोड्या थांबवणे कोणाला जमेना. क्षीरसागरातले अमृत मोहिनीने जसे देवांना वाटले, तसा कृष्ण गवळणींच्या घरचे दूध, दही, मलई स्वत: खाई आणि आपल्या मित्रांना वाटून टाकी. नुसते खाऊन, सांडून त्याच्या खोड्या थांबत नसत. तो शिंकी तोडी, मडकी फोडून टाकी, घड्यातलं दूध ओतून त्यात ताक भरून ठेवी. तूप विस्तवावर ओतून आगीच्या ज्वाळा कशा निघतात ते पहात बसे. दह्यात दूध, लोण्यात दही, ताकात तूप असले काही एकत्र करून ठेवी. बांधलेली वासरे सोडून टाकी, ती मग गायींचे सर्व दूध पिऊन टाकत. घुसळ-खांबांच्या दोऱ्या तो तोडून टाकी. सर्व मुलांना एकत्र करून निरनिराळे खेळ खेळे, खेळांत तो सर्वांना हरवून टाकत असे. मुलांना कधीकधी मारी. त्याच्या पाठीवर स्वार होऊन त्यांचा घोडा करी. खेळात फसवणाऱ्या मोठमोठ्या मुलांना ही तो रडायला लावी.





# ज्योतिषाचे फळ

एक होता राजा. सर्व प्रकारचे सुखोपभोग घेत त्याने अनेक वर्षे निश्चिंतपणे घालवली. राजाला शत्रूचे भय नव्हते. राज्यकारभार चालवणारे मंत्री कुशल होते. त्यामुळे राजाला एकच काम उरले–चांगलेचुंगले खाणे आणि उरला वेळ मनोरंजक आणि विनोदी कार्यक्रम पहाणे!

असे अनेक वर्षे नुसतेच खातपीत आरा-मात बसले तर कोणीही माणूस लठ्ठ होईल की नाही? राजाचीही तीच अवस्था झाली. त्याचे पोट एखाद्या हंड्यासारखे गरगरीत होत गेले. शरीर जड व जाड झाले. एकदा बसले की उठणे कठीण झाले! चालण्याची मुळी शक्तीच राहिली नाही.

आपल्या अवस्थेबद्दल राजाला आता भीती वाटू लागली. शरीर हत्तीसारखे वाढलेले–एक एक पाऊल टाकणे ही मुश्किल! सडसडीत शरीराची, चपळ हालचाली करणारी, वेताप्रमाणे लवलव-णारी आणि सहजपणे पळणारी माणसे पाहिली की राजाच्या मनात येई–"अरे! मी या माणसांसारखे काहीच करू शकत नाही! माझे शरीर सडपातळ झाले तर काय छान होईल!"

अनेक वर्षे चांगले पोसून जाड झालेले शरीर केवळ मनात इच्छा करून बारीक कसे होणार? काहीतरी उपाय केला पाहिजे ना? शरीर बारीक करण्याचा उपाय शोधण्याबद्दल त्याने आपल्या मंत्र्यांना आज्ञा दिली. बिचारे मंत्री तरी काय करणार? त्यांनी वैद्यांना बोलावून सल्ला विचारला. वैद्यांनी निरनिराळी औषधे दिली, राजाने त्या सर्वांचा प्रयोग करून पाहिला, पण तो पथ्य मात्र पाळत नसे! पथ्य न पाळण्यामुळे औषधांचा काही

'चांदोबा' मध्ये २५ वर्षापूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट



उपयोग होईना! शेवटी वैद्यांनी साफ सांगितले–हे काही आपल्या आवाक्यांतले काम नाही.

वैद्यांचे प्रयत्न जसजसे असफल झाले तसतशी राजाची 'बारिक होण्याची' इच्छा वाढतच गेली. एक दिवस राजाने मंत्र्यांना म्हटले–"जो माणूस माझे शरीर छडी-सारखे सडसडीत करून दाखवील त्याला मी माझे अर्धे राज्य देईन." मंत्र्यांनी त्या–प्रमाणे दवंडी पिटवली. तरी ही उपचार करायला पुढे येण्यास कोणी धजेना.

दवंडी पिटवण्याचाही काही उपयोग न झाल्याचे पाहून राजाची चिन्ता आणखीच वाढली. अशातच एक दिवस योगानन्द नावाचा एक गोसावी राजवाड्यात आला आणि म्हणू लागला–"मी राजाचा लठ्ठपणा घालवून दाखवतो."

मंत्र्यांनी अट घातली–"आपण जी औषधे वापराल त्याची नावे आम्हाला सांगितली पाहिजेत आणि औषधे आमच्या देखरेखीखाली तयार करावी लागतील."

"सामान्यतः सर्व प्रकारच्या औषधांचा प्रयोग राजेसाहेबांवर केला गेला असेल. पण मी रोग्याची कुंडली पाहिल्याशिवाय औषध देत नाही. म्हणूनच माझी रोग-चिकित्सा अचूक होते. आपण महाराजांची जन्मकुंडली मागवावी." गोसावी म्हणाला.

मंत्र्यांनी राजाची जन्मपत्रिका मागवून गोसाव्याला दिली. गोसावी बराच वेळ कुंडली निरखून पहात राहिला. नंतर म्हणाला–"राजाला औषधांची काही जरूरी नाही. कारण आजपासून तीस दिवसांत राजेसाहेबांचे आयुष्य समाप्त होणार आहे."

"कुंडली पाहूनही आजपर्यंत कोणीही ही गोष्ट सांगितली नाही. आपण निखालस खोटे बोलत आहात." मंत्र्यांनी एकमुखाने गोसाव्याचे म्हणणे खोडून काढले.

"मी जे म्हणतो आहे ते नक्की होणारच. आपला माझ्यावर विश्वास नसेल तर आपण मला तीस दिवस कारागृहात कैदी म्हणून ठेवावे." गोसावी आपले म्हणणे ठासून सांगू लागला.

यानंतर मंत्र्यांनी गोसाव्याला कैदेत ठेवले आणि त्याच्या जेवणाखाण्याची योग्य व्यवस्था ठेवली. गोसाव्याचा त्याने सांगितलेल्या ज्योतिषावर विश्वास नसता तर तो कैदेत रहायला कसा तयार झाला असता–या विचाराने राजाचा मात्र गोसा-व्याच्या म्हणण्यावर पक्का विश्वास बसला.

आता आपण नक्कीच तीस दिवसात मरणार या विचाराने राजाला झपाटले व या चिंतेचे रूपान्तर मानसिक व्याधीत झाले. एक एक क्षण जाताजाता आपला प्राण कणाकणाने जात आहे असे त्याला वाटू लागले. मनोरंजनाच्या कार्यक्रमात त्याला रस वाटेना, अन्नावरची वासनाही उडाली, डोळ्यांतली झोपही उडून गेली.

दिवसेंदिवस मानसिक आजार वाढत गेला. मंत्र्यांनी खूप समजावले की–गोसा-व्याचे म्हणणे खोटे आहे–तरीही आजारात पालट झाला नाही. गोसाव्याने दिलेली मुदत समाप्त होत आली–राजाने अंथरूण पकडले. त्याने नातेवाईक व मंत्र्यांशी सुद्धा बोलणे बंद केले.

शेवटी कसेबसे तीस दिवस पार पडले. राजा वाळून कोळ झाला. आता तो केवळ अस्थिपंजरच राहिला होता. फक्त जिवन्त होता इतकेच!

एकतिसाव्या दिवशी राजाची मानसिक व्यथा कोणी मंत्र घातल्यासारखी नाहीशी



झाली. आणि तो पलंगावरून उठून भराभर चालत मंत्र्यांच्या जवळ गेला आणि गर्जून म्हणाला–"कोठे आहे तो दुष्ट गोसावी? खोटे बोलल्याबद्दल फाशी द्या त्याला."

मंत्र्यांनी गोसाव्याला कारागृहातून आणून राजापुढे उभे केले. पिंजऱ्यात बंद असलेल्या वाघाप्रमाणे राजा जोरजोरात येरझाऱ्या घालत होता. गोसाव्याला पाहून तो त्याच्यावर धावून गेला व रागावून त्याला म्हणाला–"दुष्टा, खोटे सांगून तू मला नाहक सतावलेस. सांग तुला काय शिक्षा देऊ?"

गोसावी गालातल्या गालात हसत म्हणाला–"शिक्षा? महाराज, मला वाटलं की आपण मला बक्षिस देणार आहात."

"माझं आयुष्य संपणार असल्यांच खोटं भविष्य सांगितल्याबद्दल तुला बक्षिस देऊ?" राजाने आश्चर्याने विचारले.

"महाराज, कृपा करून या गोष्टीची आठवण ठेवा की मी आपणावर इलाज करायला आलो होतो–ज्योतिष सांगायला नाही. आता आपण स्वतःच पहात आहात की आपल्या अंगावरची चरबी नाहीशी होऊन आपले शरीर लोखंडाच्या कांबी-सारखे झालेले आहे. आपण खूपच सहज पणे हिंडतफिरत आहात, मनात आणलंत तर पळूही शकाल–होय ना? हे कशामुळे झाले? माझ्या उपचारामुळेच ना?" गोसाव्याने विचारले.

राजाला मोठा विस्मय वाटला. तत्काल तो मोठ्या आरशासमोर जाऊन उभा राहिला. आपल्या शरीरातील परिवर्तन पाहून त्याला परमानन्द झाला! पोटाचा नगारा सपाट झाला होता, शरीरावरील चरबी उतरून गेली होती व तो सर्व-साधारण माणसासारखा दिसत होता! त्याच्या मानसिक चिन्तेनेच औषधाचे काम केले होते! आता काय, मोठ्या प्रसन्नतेने त्याने मंत्र्यांना आज्ञा दिली–या गोसाव्याला आता, या क्षणी माझं अर्धं राज्य देऊन टाका.





# विचित्र स्वप्न

एके काळी तुर्कस्तानात एक गरीब माणूस रहात होता. तो इतका दरिद्री होता की इतरांच्या चेहऱ्याकडे पहाण्याचीही त्याला हिंमत होत नसे. धनवान लोकां-सारख्या इच्छा-आकांक्षा मात्र त्याच्या मनात भरपूर असत. त्या आकांक्षा पूर्ण होत असल्याची स्वप्नेही तो खूपदा पहात असे.

एक दिवस तो एका उपहारगृहातल्या कोपऱ्यात बसला असताना त्याच्या मनांत आले की आत्ता आपण गुसलखान्यात जाऊ शकलो तर काय मजा येईल?

तो तेथून उठून सरळ गुसलखान्यात गेला व त्याने आपले कपडे काढले. त्याच वेळी त्याच्या असे लक्षात आले की गुसलखान्यात त्याच्या व्यतिरिक्त आण-खीही एक माणूस उपस्थित आहे, व गुसलखान्याचे लोक त्याला वरचेवर सरबत वगैरे देऊन त्याची खूप सेवा करीत आहेत.

दरिद्री माणसाने आत डोकावून पाहिले तर तो माणूस बरोबर आपल्याच अंगल-टीचा व रंगारूपाचा आहे! हे पाहून आपणच त्याची जागा घ्यावी असा विचार त्याच्या मनात आला. जवळपास कोणी नोकर वगैरे नाही असे पाहून तो आत घुसला. आतल्या माणसाने केवळ टॉवेलच नेसलेला होता. ह्याने त्या माणसाला खेचून पाण्याच्या टाकीत ढकलून दिले व स्वतः तो टॉवेल नेसून त्याच्या जागेवर बसला.

इतक्यात नोकर परतले आणि सर्व प्रकारच्या आदर-सन्मानाने त्यांनी या दरिद्र्याला आंघोळ घातली, व त्याच्या अंगावर खूप किंमतवान असा कमीज घालून त्याला बाहेर घेऊन आले. तेथे त्या श्रीमन्त माणसाचे नोकर निरनिराळ्या प्रकारची वस्त्रे घेऊन उभे होते. ताबडतोब

तुर्की लोक कथा

त्यांनी जवळ येऊन याला ते कपडे चढवले व त्याच्या हातात दिनारांनी भरलेली एक वजनदार थैली दिली.

दरिद्री माणसाने कपडे घालून घेतले व थैलीतून तीन दिनार काढून गुसलखान्याच्या तीन सेवकांना बक्षिस दिले. यावर ते सेवक मोठ्या आदराने त्याच्या बरोबर गुसलखान्याबाहेर आले.

बाहेर एक घोडा तयार होता. लोकानी त्याला घोड्यावर बसायचा संकेत केला. हे पाहून आता तो मनातल्या मनात भिऊन गेला. पण घोड्यावर बसायला नकार दिला तर आपले रहस्य उघडकीला येईल म्हणून तो मुकाट्याने घोड्यावर बसला व घोडा नेईल तिकडे जाऊ लागला.

शेवटी घोडा एका भव्य महालासमोर जाऊन थांबला. नोकर धावत आले, त्यांनी महालाचा दरवाजा उघडला. त्यांच्या मदतीने तो घोड्यावरून उतरला व महालात जाऊन चकित दृष्टीने सर्वत्र पाहू लागला.

तेवढ्यात नोकरांनी येऊन त्याला विचारले–"हुजूर, आपण आपल्या खोलीत जाणार की अंत:पुरात?"

"मी आपल्या खोलीतच जातो."-दरिद्री माणूस उत्तरला.

थोड्या वेळात नोकर खोलीत येऊन विचारू लागला–"सरकार, आपण जेवण आपल्या खोलीतच घेणार की अंत:पुरात?"

"इथेच घेऊन ये." दरिद्री म्हणाला.

जेवण झाल्यावर एक नोकर येऊन म्हणू लागला.

"हुजूर, उशीर झाला आहे. आपण आता अंत:पुरात जाणार?"

"ठीक आहे. हा मी निघतोच." असे त्याने म्हटल्यावर नोकर निघून गेला.

कोणत्या बाजूला जायचे हे दरिद्र्याच्या लक्षात येईना. तो घाबरून गेला. त्याने अनेक खोल्या उघडून पाहिल्या, तेव्हा शेवटी त्याला जनाना असलेली अंत:पुरातली खोली सापडली.

त्या घराची मालकीण फारच सुन्दर होती. दरिद्री माणसाला पाहून ती उठून पुढे आली. तिला पाहून तो जागेवरच खिळल्यासारखा झाला, एक पाऊलही तो हलू शकेना. ती त्याला आपल्या बरोबर घेऊन गेली. आपल्या बाजूला त्याला बसवून त्याच्याशी बोलू लागली. पण भयाने दरिद्र्याचे हृदय मात्र धडधडत होते.

"जरा ऐका वरं, परवा माझी मैत्रीण आली होती ना, तिला तुमचं नाव हवं आहे. लाख वेळा डोकं खाजवूनही मला काही तुमचं नाव आठवेना. कृपया काही गैरसमज न करून घेता मला आपलं नाव सांगा ना?"

आता दरिद्र्यापुढे मोठीच अडचण उपस्थित झाली! तरीही स्वत:ला वाचवण्यासाठी बहाणा करीत तो





म्हणाला–"इतके दिवस आपण संसार केला, आणि माझं नाव कशी विसरलीस?"

पण त्या सुन्दरीने नाव सांगण्यासाठी हट्टच घेतला. तेव्हा त्याने तोंडात आली ती नावे सांगून पाहिली आणि शेवटी उघडकीला आले की तो खोटे बोलत आहे! त्यामुळे त्याला आपली खरी हकीकत सांगणे भाग पडले.

"मला क्षमा कर." तो विनवू लागला.

"ठीक आहे, मी क्षमा करीन, पण एक अडचण आहेच. माझे पती राजाच्या पदरी 'मुख्य कथावाचक' आहेत. कोणत्याही वेळी राजाकडून बोलावणे येण्याची शक्यता आहे. अशावेळीं आपण काय कराल?" तिने विचारले.

त्या सुन्दरीचे बोलणे संपते न संपते तोच राजाकडून बोलवणे आले!

दरिद्री माणूस भयाने कापू लागला. त्याने सुन्दरीला विचारले–"बोल, आता मी काय करावे?"

तिने समजावले–"राजासमोर दोन आसने असतील. त्यापैकी एकावर मोत्याचा हार ठेवलेला असेल आणि दुसऱ्यावर सोन्याचा हार असेल. आपण मोत्यांचा हार आपल्या गळ्यात घाला आणि सोन्याचा हार हातात घेऊन राजेसाहेबांना म्हणा, 'माझ्या मित्रा', आणि लगेच पुढे कथा सुरू करा."

राजाने सेवकांबरोबर पाठवलेल्या वाहनातून दरिद्री राजवाड्यात गेला. राजवाडा पाहिल्याबरोबरच त्याला घाम फुटला. राजाच्या समोर पोचल्यावर नाइलाजाने त्याने मोत्याचा हार गळ्यात घातला आणि सोन्याचा हार हातात घेऊन म्हणाला, "माझ्या मित्रा."

झाले. इतक्यात तो जागा झाला. त्याला समजून चुकले की आपण अजून उपाहारगृहाच्या एका कोपऱ्यात बसलेले आहोत. आपल्या अंगावरील चिंध्या झालेले कपडे तसेच आहेत हे पाहून त्याला काय आनंद झाला!



# अर्धी किंमत

जगमोहनजवळ दहा एकर जमीन होती आणि गावात त्याचे किरकोळ सामानाचे एक दुकानही होते. तरीही तो 'एक नंबरचा कंजूस' म्हणून गावात ओळखला जाई. धान्य-मळणीच्या वेळी एक दिवस बायकोला दुकान पहायला बसवून तो खळ्यावर निघून गेला.

खळ्यात धान्याची रास लागलेली होती. मळणीनंतर गरीबांना थोडे धान्य दान करायची शेतकऱ्यांची पद्धत असते. पण जगमोहनचा कंजूसपणा सर्वांना ठाऊक होता. त्यामुळे त्याच्या खळ्यावर कोणीही गेले नाही. दान देत असताना इतर शेतकरी जगमोहनकडे पहात होते. ते पाहून जगमोहनला स्वतःची लाज वाटली. त्याने विचार केला–आपल्याला लोकांनी 'कंजूस' समजू नये. मग त्याने पाऊणपट कोंडा व पावपट धान्य एकत्र मिसळले व दूर खेळणाऱ्या काही मुलांना बोलावून त्यांना ते दान दिले!

कवडीचुंबकाचा हा दानशूरपणा पाहून तेथे जवळपास असणाऱ्या एक मोठ्या माणसाला आश्चर्य वाटले. त्याने मुलांना जवळ बोलवून त्यांना मिळालेले धान्य पाहिले. सर्व प्रकार त्याच्या लक्षात आला! त्याने त्या मुलांना एक योजना समजावून सांगितली.

इकडे जगमोहन सर्व धान्य पोत्यात भरून घरी घेऊन आला. इतक्यात त्याची बायको तेथे आली आणि कोपऱ्यात ओतलेल्या एका धान्याच्या राशीकडे बोट दाखवून म्हणू लागली–"अहो ऐका बरे, थोड्या वेळापूर्वी इकडून काही मुलं त्यांना कोणा धर्मात्म्याने दिलेलं धान्य बाजारात विकायला घेऊन चालली होती. मी त्यांना बोलवून ते सारं धान्य त्यांच्याकडून निम्म्या किंमतीत विकत घेतलं पहा."

हे धान्य पाहून जगमोहनच्या हृदयाचा एक ठोका चुकलाच. काही उपयोग नसणारं ते कोंडा मिश्रित धान्य खरेदी करणाऱ्या बायकोच्या मूर्खपणाचा त्याला पश्चात्ताप वाटू लागला!





# दुनियादारी

राजापुरात भोलाप्रसाद नावाचा एक शेतकरी रहात असे. तो अत्यंत विवेकशील व व्यवहारकुशल होता. त्याच्या गावातीलच नव्हे, तर आसपासच्या गावातूनही लोक आपल्या अडीअडचणींवर उपाय विचारायला त्याच्याकडे येत. काही मिनिटांच्या अवधीतच तो त्यांना उपाय सांगत असे.

एकदा त्याच गावचा एक गंगाराम नावाचा गरीब शेतकरी भोलाप्रसादकडे आला व म्हणाला–"माझं घर इतकं छोटं झालं आहे की माणसांना येणंजाणंही कठीण झालं आहे. टिचभर खोलीत घरातल्या सर्वांना वावरता येणं कठिण झालं आहे. कोणालाही शांतपणे बसता येत नाही. मुलांना अभ्यास करायला जागा नाही. रात्री झोपण्याच्या वेळी तर फारच अडचण होते. सर्वांचे पाय एकमेकाला लागत असतात. या कुशीवरचे त्या कुशीवर होता येत नाही. कुणालाही स्वस्थपणे झोपता येत नाही. याचा सर्वांच्या तब्येतीवर परिणाम होतो. आतां घर वाढवून मोठं करण्याची माझी ताकद नाही. असा काही उपाय सांगा की आमचं घर लहान वाटू नये–मोठं व्हावं.

भोलाप्रसाद थोडा विचार करून म्हणाला-"गंगाराम, तू घरात बकऱ्या व कोंबडयाही पाळतोस ना?"

गंगारामने आपण पाळलेल्या पशुपक्ष्यांची माहिती भोलाप्रसादला दिली.

यावर भोलाप्रसाद म्हणाला–"ठीक आहे, आजपासून तू आणखी एक बकरी आणि तिची पिल्लं आणून आपल्या घरात बांध. आणि चार दिवसांनी पुन्हा येऊन तुझ्या घराच्या अवस्थेबद्दल सांग."

हे उत्तर ऐकून खुष होऊन गंगाराम निघून गेला. त्याला वाटले की आता आपली अडचण दूर झालीच. तो पळत घरी गेला, भोलाप्रसादच्या सांगण्याप्रमाणे त्याने एक बकरी आणि तिची पिल्लं घरात आणून बांधली. त्यामुळे त्याचे घर आणखीच अडचणींचे झाले. आणि घरांतल्या लोकांना इतका त्रास झाला की ते चार दिवस त्यांना चार युगांसारखे वाटले.

चार दिवसांनी मोठ्या चिंतायुक्त व दु:खी मुद्रेने गंगाराम भोलाप्रसादकडे गेला. त्याला पाहून भोलाप्रसाद म्हणाला–"अरे गंगाराम, तू मुळीच काळजी करू नकोस. तुला हा अनुभव नवा आहे म्हणून सुरुवातीला असंच होणार. आजपासून आणखी एक बकऱ्यांची जोडी घरात बांध, आणि पुन्हा दोन दिवसांनी येऊन भेट, कळलं?"

दोन दिवसांनी गंगाराम भोलाप्रसादकडे येऊन हात जोडून म्हणाला–"महाराज, या वेळी तर आमच्या कडे पाय हलवायलाहीं जागा राहिली नाही. फार त्रास झाला सर्वांना."

भोलाप्रसाद गालात हसत म्हणाला–"गंगाराम, आता एक काम कर. घरांतली एक बकऱ्याची जोडी बाहेर नेऊन बांध आणि दोन दिवसांनी भेटायला ये."

दोन दिवसांनी गंगाराम आला तेव्हा त्याच्या चेहऱ्यांवर थोडेसे समाधान पाहून भोलाप्रसादला संतोष वाटला. त्याने



विचारले–"तुझं घर थोडंसं मोठं वाटतंय ना?"

"हां, हां! आपण म्हणता तसं थोडं मोठं वाटतं खरं! आम्ही जरा श्वास घेऊ शकतो." गंगाराम म्हणाला.

"मग आता आणखी एक काम कर. उरल्या-सुरल्या सर्व बकऱ्याही आता घरा बाहेर बांध. आणि थोड्या दिवसांनी पुन्हां येऊन भेट." भोलाप्रसादने सांगितले.

चार दिवसांनी आनंदाने चेहरा उजळलेला गंगाराम भोलाप्रसादकडे आला.

"आता कसं आहे तुझं घर?" भोलाप्रसादने हसत हसत विचारले.

"महाराज, आपले उपकार मी कधीही विसरणार नाही. आपल्या कृपेने आता माझं घर पहिल्यासारखं अडचणीचं राहिलं नाहीं, खूप मोठ्ठं झालंय ते! माझ्या घरच्या कोणालाही ते आता अडचणीचं वाटत नाहीं" असे म्हणून नमस्कार करून गंगाराम निघून गेला.

थोड्या दिवसांपासून साईनाथ नावाचा एक नोकर भोलाप्रसादकडे कामाला राहिला होता. तो सुरुवातीपासून गंगाराम व भोलाप्रसादचे बोलणे आणि आपल्या मालकाचा सल्ला ऐकत आला होता.

त्याला हा सर्व प्रकार विचित्रच वाटला. त्याने विचारले–"मालक, हा गंगाराम तर केवळ भोळा-भाबडा वाटतो. पहिल्याने तो सल्ला विचारायला आपणाकडे आला, तेंव्हापासून आजपर्यंत त्याचं घर होतं तसंच आहे? मग घरातली अडचण कशी दूर झाली?"

यावर भोलाप्रसाद म्हणाला–"गंगाराम मुळीच भोळा किंवा बावळट नाही. त्याला व्यवहारज्ञान कमी आहे. त्याच्याच म्हणण्याप्रमाणे एक मोठं घर बांधायची आज त्याची ऐपत नाही, तरीहि आहे त्या घरात त्याला सुखाने रहाता येत नाही. म्हणूनच घरात बकऱ्या बांधायला सांगितलं मी त्याला! एकच घर लहानं किंवा. मोठं कसं बनलं हे त्याला आता समजलं की नाही?"



## गोमेचे पाय



गोम व त्या प्रकारच्या शंभर पाय असणाऱ्या–शतपाद–प्राण्यांना इंग्रजीत 'सेंटिपेड' असे म्हणतात. परंतु फक्त काही प्रकारच्या शतपादांनाच पायांच्या बरोबर पन्नास जोड्या असतात. युरोपमधे आढळणाऱ्या 'हिमॅण्ट्रुम गॅब्रिलिस' नावाच्या शतपादाला १७२ ते १७७ जोड्या इतके पाय असतात!

## अत्यन्त मोठा हिमखण्ड



जगातील सर्वात मोठा हिमखण्ड (ग्लेशियर) दक्षिण पॅसिफिक महासागरात असल्याचा पत्ता १९५६ मधे लागला. त्याचे क्षेत्रफळ १२,००० चौरस मैल आहे. १९५८ मधे ग्रीनलॅण्डच्या पलीकडे उत्पन्न उंच असा हिमखण्ड सापडला. त्याची उंची ५५० फूट आहे.

## हमिंग बर्ड



दक्षिण अमेरिकेतील 'हमिंग बर्ड' नावाचा पक्षी तर सेकंदाला ८० वेळा पंख फडफडवतो. याचा अर्थ असा की सर्व प्राण्यापेक्षा अधिक शक्ती हा पक्षी उपयोगात आणू शकतो! हा पक्षी सरळ, वर, खाली–इकडेतिकडे–इतकेच नव्हे, तर मागे-शेपटाकडेही उडू शकतो!



# चांदोबा

फेब्रुवारी 1988

★

## अनुक्रमणिका





★




एक प्रत : २-५०

वार्षिक वर्गणी : ३०-००

# चांदोबातील नवलाई



## अतिप्राचीन अंडी

पश्चिम कोलोराडोमध्ये नुकतीच १४५ मिलियन वर्षांपूर्वीच्या राक्षसी आकाराच्या पालींच्या (डिनोसार) अंड्यांची कवचे सापडली आहेत. ज्या जागी पालीने अंडी घातली त्या जागी शास्त्रज्ञ डिनोसारच्या अन्य अवशेषांचा शोध घेत आहेत. या कवचांच्या सहाय्याने असे अनुमान केले जात आहे की या अंड्यांची लांबी २० सें.मी. व व्यास ९ सें.मी. असावा.

## छोटा पाणाड्या

सौदी अरेबियातील १० वर्षांचा हॉडन असेरी नावाचा मुलगा जमिनीखालील पाण्याबद्दल बरोबर माहिती सांगतो. वडील घराजवळ विहीर खोदत असताना या मुलाने किती खोलीवर पाणी मिळेल हे कोणत्याही हत्याराविना अगदी बरोबर सांगितले. यानंतर या मुलाच्या मदतीने त्या प्रान्तातील रहिवाश्यांनी जवळजवळ २५० विहिरी खोदल्या आहेत.





## सूर्याचे आयुष्य

असे अनुमान लावले गेले होते की सूर्याचे आयुष्य जवळजवळ '६,००० मिलियन वर्षे' इतके आहे. परंतु भारतीय खगोल शास्त्रज्ञ श्री बदनवाल श्रीकान्तचे म्हणणे असे आहे की सूर्याचे आयुष्य '४,६०० मिलियन वर्षे' इतकेच आहे. त्यांनी नुकतीच ही माहिती मॉस्कोतील आंतरराष्ट्रीय विश्वकिरण परिषदेतील चर्चेच्या वेळी घोषित केली. या अनुमानामुळे सूर्याचे आयुष्य १,४०० मिलियन वर्षांनी कमी झाले आहे.

## एका पायाने विश्वप्रदक्षिणा

दुसऱ्या महायुद्धात ट्रिस्टन जोन्स नावाच्या सैनिकाचा डावा पाय मोठी जखम झाल्याने निकामी झाला व त्याला 'समुद्रयात्रेसाठी अयोग्य' ठरवून ब्रिटिश रॉयल नेव्हीतून काढून टाकले गेले. तरीही त्याने गेल्या ३४ वर्षांत ६४०,००० कि.मी. इतकी समुद्रयात्रा केली, व अशा प्रकारे त्याने 'तीन वेळा विश्वप्रदक्षिणा' करण्याइतकी यात्रा केली.












# दुर्गम

प्राचीनकाळी दुर्गम नावाचा एक राक्षस ऋषिमुनि व सज्जन लोकांना त्रास देण्याच्या नवनवीन तऱ्हा शोधू लागला. ऋषिमुनि वेदांच्या सहाय्यानेच यज्ञ करू शकतात. वेदोक्त रीतीनेच यज्ञ संपन्न केला जातो. यज्ञ थांबवायचे तर वेदच नाहीसे केले पाहिजेत–या विचाराने दुर्गमने तपस्या करून काही अपूर्व सिद्धी मिळवल्या. त्या शक्तींचा उपयोग करून दुर्गमने वेद चोरले आणि त्याबरोबरच असा एक उपाय केला की ज्यामुळे ऋषिमुनि वेदमंत्र विसरून जातील.

यामुळे आता ऋषिमुनि यज्ञ करू शकेनात. यज्ञ व प्रार्थना बन्द झाल्यामुळे ते सर्व दुःखमग्न झाले. जीवनाबद्दल त्यांच्या मनात विरक्ति उत्पन्न झाली. प्रार्थना वगैरे विधि बन्द झाल्यामुळे मानव व दिव्यशक्ति यांचा संबंध तुटला. ऋतुचक्र थांबले. वेळेवर पाऊस न पडल्यामुळे झाडे-झुडपे वाळून गेली, नद्या आटून गेल्या. सर्वत्र हाहा:कार झाला.

मानव समाजात दररोज नवे संकट उद्भवू लागले. शेवटी ऋषि-मुनि हिमालयात जगन्माता दुर्गादेवीला शरण गेले.

दुर्गम राक्षसाला जेव्हा ही खबर कळली की ऋषि-मुनि दुर्गामातेच्या दर्शनाला गेले आहेत, तेव्हा तो ही तिथे जाऊन पोचला. त्याच वेळी जगन्मातेच्या दिव्य शरीरातून हजारो अस्त्रे निघाली व त्यांनी दुर्गमचा वध केला.

राक्षसाच्या मृत्युनंतर मुनींना पुन्हा वेद प्राप्त झाले, त्यांचे यज्ञ-याग इत्यादि पुन्हा यथाविधि सुरू झाले. अशा प्रकारे समस्त विश्व सुख-शांतिने भरून गेले.






डुमरू नावाच्या गावात शीतला प्रसाद नावाचा एक साधा माणूस रहात होता. त्याला एकुलती एक मुलगी होती. तिचे नाव सौजन्या. लहानपणीच ती मातृसुखाला वंचित झाली. म्हणून शीतला प्रसादनेच तिचे पालन-पोषण करून तिला लहानाचे मोठे केले. आता ती उपवर झाली.

शीतला प्रसादने आपल्या मुलीच्या लग्नासाठी प्रयत्न सुरू केले. शेजारच्या गावात श्यामसिंह नावाचे एक बडे व्यापारी रहात होते, त्यांचा मुलगा मुलगी पहायला आला. त्याला व त्याच्या आई-वडिलांना सौजन्या पसंत पडली. पण त्या लोकांनी आपला निर्णय त्याच वेळी सांगितला नाही.

त्या दिवशी सायंकाळी सौजन्या स्वयंपाक करीत होती. शीतला प्रसाद बाजारातून परत आल्यावर मुलीला म्हणाला–"बेटी सौजन्या, आज जो मुलगा तुला पाहून गेला, तिकडचा निर्णय बहुधा होकारार्थी येणार. नंतर मला स्वतःलाच स्वयंपाक करावा लागणार. म्हणून मुली, मला आज पासून स्वयंपाक करायला शिकव." एवढं बोलून शीतला प्रसाद हसू लागला.

इतक्यात शीतला प्रसादचा मित्र माधव सिंह तेथे पोंचला आणि म्हणाला–"मित्रा, तू आपल्या मुलीच्या लग्नाची तयारी करीत आहेस ना? माझ्या एका नातेवाईकाकडे राजाराम नांवाचा एक तरुण पाहुणा आला आहे. आपण त्याला सौजन्या दाखवू या का?

यावर शीतला प्रसादने सांगितले–"आज सकाळीच एक मुलगा पाहून गेला. पण अजून त्यांनी आपला निर्णय कळविला नाही. अशा स्थितीत दुसऱ्या कोणाला मुलगी दाखवण योग्य होईल का?"



माधव सिंह अमळ चिडून म्हणाला– "त्यांनी मुलीला पसंत केलं असेल तर गोष्ट वेगळी. पण जोपर्यंत त्यांनी आपली संमति कळवलेली नाही, तोपर्यंत दुसऱ्या कोणाला मुलगी दाखवायला काय हरकत आहे ?"

शीतला प्रसादने स्वीकृति दाखवली आणि गप्प राहिला. थोडयाच वेळात माधव सिंह राजारामला घेऊन हजर झाला.

दहा-पंधरा मिनिटे इकडच्या-तिकडच्या गोष्टी झाल्यावर राजाराम म्हणाला–"मला आपला म्हणणारं कोणी नाही. इस्टेट म्हणाल तर माझं एक छोटेखानी घर आहे. अवती-भवती पुरेशी जमीन आहे. तिथे मी निरनिराळया फळ-भाज्या, पाले-भाज्या पैदा करतो नि त्यांची विक्री करतो. माझ्याकडे चार म्हशी पण आहेत. शहरातला एक व्यापारी येऊन म्हशीचं दूध खरेदी करतो. या उत्पन्नांतून मी आपली बायको व मुलं यांचे पालन-पोषण करू शकेन असा माझा आत्मविश्वास आहे.

नंतर तिथून निघताना राजाराम शीतला प्रसादला म्हणाला–"आपल्या मुलीला कोणताही तरुण नापसंत करणार नाही, तेव्हां मी त्याबाबतीत बोलायची काही जरूरीच नाही. आपल्या मुलीकडून काही हरकत नसेल तर आपण विचार करून आपला निर्णय कळवावा."

सौजन्याला राजाराम आवडला. हे ओळखून शीतला प्रसाद म्हणाला–"राजाराम सुंदर आणि मनमिळावू आहे. पण सकाळी जे स्थळ आलं होतं, ती माणसं श्रीमंत घराण्यांतील आहेत."

आपल्या वडिलांच्या या बोलण्यावर सौजन्याने काहीं न बोलता मौन स्वीकारले.

दुसऱ्या दिवशी सकाळी शीतला प्रसाद आपल्या मुलीला म्हणाला–"बाळा, मी श्यामसिंहच्या गावी जाऊन त्यांचं काय म्हणणं आहे हे पाहून येतो. आपल्याला राजारामला आपला निर्णय कळवायला हवा ना?" असे म्हणून तो भाडयाची गाडी ठरवून निघून गेला.





वडील निघून गेल्यावर सौजन्या घराचे दरवाजे बंद करू लागली. इतक्यात एक अनोळखी इसम तेथे आला. त्याने विचारले–"शीतलाप्रसादचे घर हेच का ?"

"होय, पण ते तर आत्ता घरी नाहीत. काय काम होतं आपलं ?" सौजन्याने विचारले.

यावर तो इसम म्हणाला–"माझं नाव शंकरदास. मी रामापुरला रहातो. आमच्याच गावातल्या राजाराम नावाच्या मुलाशी, शीतलाप्रसाद आपल्या मुलीचं लग्न ठरवीत आहे असं ऐकलं. पण चोरीच्या अपराधावरून राजाराम दोन वर्ष कैदेत होता–ही खबर देण्यासाठीच मी इथे आलो." इतके बोलून तो भरकन तिथून निघून गेला.

ही बातमी ऐकताच सौजन्याला जणू डोक्यावर वीज कोसळल्यासारखे वाटले. पण या गोष्टीची शहानिशा करण्याच्या निश्चयाने तिने घराला कुलूप लावले व भाडयाच्या गाडीने ती रामापुराला निघून गेली. राजारामचं घर शोधायला सौजन्याला फारसे कष्ट पडले नाहीत. तिला पाहून राजारामने हसून विचारले–"एकाएकी कशी आलीस ?"

सौजन्या रागाच्या स्वरात उत्तरली– "मी आत्ताच थोडया वेळापूर्वी आपणाबाबत एक विचित्र बातमी ऐकली. चोरीच्या अपराधासाठी आपण कैद भोगून आला आहात. खरी गोष्ट आहे ही ?"

राजारामने यावर लगेच काहीही उत्तर दिले नाही. तो सौजन्याला बैठकीच्या खोलीत घेऊन गेला. तिला एक बैठकीवर बसायला लावून तो बोलू लागला–"तू माझ्यावर खूप नाराज आहेस असं दिसतंय, पण खरं तर मला शिक्षा का भोगावी लागली हे कळलं तर मी निरपराधी असल्याचं तुला पटेल. नीट ऐकून घे."

"लहानपणीच मी आईवडिलांविना पोरका झालो. मला माझ्या आईच्या आईने–आजीने वाढवले. आजीला छळून



तिच्याकडून पैसे घेऊन शहरात जाऊन ते हवे तसे उधळत असे मी! अन् पैसे संपले की पुन्हा घरी येत असे.

एकदा असाच भाड्याच्या गाडीने शहराकडे जात असताना एका प्रौढ वयाच्या बाईने गाडी थांबवली. तिच्या हातात एक डबा होता. तिने मला विचारले–"मुला, तू शहराकडेच जात आहेस ना?" मी म्हटले–"होय."

"मग बाळा, मला थोडीशी मदत करतोस! माझा मुलगा शिकायला शहरात रहातो. त्याच्यासाठी मी या डब्यात लाडू करून आणले आहेत, त्याच्या वडिलांची तब्येत बरी नाही. नाहीतर ते स्वतःच डबा घेऊन गेले असते." असं म्हणत त्या बाईने डबा माझ्या हातात दिला आणि म्हणाली–"शहरात रामाच्या देवळाजवळ नारायण नावाचा माणूस वाट पहात असेल. हा डबा त्याच्या हातात दे."

मी ज्या गाडीने जात होतो ती गाडी रामाच्या देवळाजवळ पोचताच दोन शिपायांनी अडवली. मी त्यांना म्हटले–"तुम्ही गाडी का अडवली हे मला माहीत नाही. पण माझ्याजवळ तर या लाडू भरलेल्या डब्याशिवाय दुसरं काहीच नाही." अन् असं म्हणत मी डबा त्यांच्या पुढे केला.

शिपायांनी डबा उघडून त्यातले लाडू बाहेर काढले, लाडूंच्या खाली त्यांना सोन्याचे दागिने सापडले!

त्याबरोबर त्यांनी माझा गळा धरला अन् म्हटले–"आम्ही इथे लाडूंची वाट पहात नाही थांबलो, या चोरीच्या मालासाठी थांबलो, कळलं? चल आता कोतवालाकडे." असं म्हणत त्यांनी मला गाडीबाहेर खेचलं. हे पाहून खऱ्या चोराने तिथून पळ काढला बहुतेक!

आणि मी मात्र स्वतः न केलेल्या अपराधाची दोन वर्षे शिक्षा भोगली तुरुंगात!

माझ्या शिक्षेची बातमी ऐकून आजीने हाय खाल्ली–ती अंथरुणाला खिळली आणि एका आठवड्यातच तिने 'राम' म्हटला!"

अशा प्रकारे राजारामने सौजन्याला खरे काय घडले ते सांगितले आणि म्हटले–"तुरुंगात शिक्षा भोगत असताना मी भाजीपाला कसा लावायचा, त्याची निगा कशी राखायची वगैरे सर्व शिकून घेतले. तुरुंगातून सुटल्यावर तेच माझे उपजीविकेचे साधन बनले."

"आपण अगोदरच आपल्या तुरुंगवासाबद्दल बोलला असता तर बरे झाले नसते का?" सौजन्याने विचारले.

राजाराम हसून म्हणाला–"ही काही फार मोठी चांगली खबर नव्हती. पण तरीही मी मुद्दाम आमच्या गावच्या एकाला पाठवून आपणाला कळवलेच ना?"

आपले शंका समाधान झाल्यावर सौजन्याला 'आपण उगीच घाई केली' असे वाटून पश्चात्ताप झाला व ती आपल्या गावी परतली.

या अवधीत शीतलाप्रसादही घरी परत आला होता. त्याने विचारले–"कुठं गेली होतीस बाळ? राजाराम चोर आहे–असं ऐकलं. तू त्या स्थळाबद्दल विसरून जा. सकाळी आपल्याकडे आलेल्या श्यामसिंहच्या मुलाला तू पसंत आहेस. पण ते पंचवीस हजार हुंडा मागत आहेत. मी आपलं घर विकून पैसा उभा करीन."

"बाबा, घर विकायची काही जरूर नाही. भरपूर इस्टेट असूनही इतका हुंडा मागणारे श्यामसिंह सारखे लोकच खरे चोर आहेत. मला राजारामकडून सर्व गोष्टी समजल्या, तो निर्दोष आहे. पण शिक्षा भोगल्यामुळे उलट त्याचा फायदाच झाला आहे. तुरुंगाबाहेर असता तर कदाचित रोजगारीवाचून त्याची उरली सुरली संपत्तीही खर्चून गेली असती. दोन वर्षे शिक्षा भोगत असताना तो श्रम करायलाही शिकला एक प्रकारे ती शिक्षाच त्याला वरदान ठरली. मी राजारामशीच लग्न करीन." सौजन्याने सरळ सांगून टाकले. शीतलाप्रसादलाही आपल्या मुलीचा निर्णय योग्य वाटला.



# नोकरीच्या शोधात



धनगुप्त श्रीपुरमधील एक प्रसिद्ध जव्हेरी होता. त्याच्या दुकानचे व्यापाराबद्दलचे हिशोब लिहिण्याचे काम श्रीधर नावाचा एक तरूण करीत असे. श्रीधर प्रामाणिक व कष्टाळू होता. आपले काम तो खूप मनापासून करी. मालकाची इमाने-इतबारे सेवा करणे हेच तो आपले कर्तव्य समजे. श्रीधरच्या बुद्धिमत्ता व चतुराईमुळे धनगुप्तला व्यापारात अधिक फायदा होत असे. असे असूनही धनगुप्ताने श्रीधरचा पगार कधीही वाढवून दिला नाही.

श्रीधरचा पगार त्याच्या कुटुंबाच्या उदरनिर्वाहाला जेमतेम पुरेसा होता, पण तरीही आपल्या बायको मुलांच्या काही बारीकसारीक मागण्या पुरवण्यासाठी श्रीधरला खूप कष्ट करावे लागत. मालक एक न एक दिवस आपला पगार वाढवील अशी आशा श्रीधर करीत राहिला. पण असे घडले नाही. शेवटी निराश होऊन तो दुसऱ्या जव्हेऱ्यांकडे नोकरी मिळवण्याचा प्रयत्न करू लागला.

कोमलपुरचा रत्नांचा व्यापारी अनंतगुप्त याने श्रीधरला व्यापाराबद्दल अनेक प्रश्न विचारले. आणि त्याची उत्तरे ऐकून तो फार खूष झाला. श्रीधर सारखा सेवक आपल्याला मिळाला तर व्यापारात आपल्याला याहून ही अधिक फायदा निश्चित मिळेल असे त्याला वाटले. उत्तम व्यापारासाठी चांगले नोकर आजकल कोठे? श्रीधरला काही दिवसांनी येऊन भेटायला सांगितले आणि त्याच्याबद्दल नीट माहिती मिळवण्यासाठी अनंतगुप्त धनगुप्तला भेटला.

धनगुप्तने सांगितले की–"श्रीधर केवळ विश्वासू आहे इतकेच नव्हे, तर तो फार हुशार आहे. त्याच्यामुळेच मी माझा व्यापार वाढवू शकलो."

स्वाती देशपांडे



अनंतगुप्तने श्रीधरला बोलावून घेतले व कामावर रुजू होण्यास सांगितले. परंतु त्याने जो पगार देऊ केला तो धनगुप्त देत असलेल्या पगारापेक्षाही कमी होता, म्हणून श्रीधरने ही नोकरी नाकारली.

यानंतर श्रीधर कामाक्षीपुरच्या चन्द्रगुप्त नामक जव्हेऱ्याला भेटला. चन्द्रगुप्तलाही त्याने सर्व माहिती दिली. चन्द्रगुप्ताला श्रीधरचे वागणे-बोलणे पसंत पडले. असा सेवक मिळाला तर आपल्याला व्यवसायांत आणखी प्रगति करता येईल याची त्याला खात्री पटली. तो मनातल्या मनात म्हणाला–"श्रीधर स्वतःच्या बुद्धिचातुर्याने स्वतःच व्यापार सुरू करू शकतो इतका हुशार आहे."

यानंतर चन्द्रगुप्तने श्रीधरला बोलावून कामावर हजर होण्यास सांगितले. चन्द्रगुप्तने सांगितले 'पगार धनगुप्तकडील पगारापेक्षा चार रुपयांनी अधिक असेल' परंतु कामाक्षीपुर श्रीधरच्या गावाहून फार दूर असल्याने श्रीधरने ही नोकरीही स्वीकारली नाही.

तिसऱ्या वेळच्या प्रयत्नात श्रीपुरच्या जवळील धर्मपुरीहून विकासदत्त नावाच्या व्यापाऱ्याकडून श्रीधरला बोलावणे आले. इथेही श्रीधरच्या उत्तरांवर खूष होऊन तो धनगुप्तकडे गेला व श्रीधरसंबंधी विचारू लागला.

धनगुप्त हसून म्हणाला–"श्रीधर अत्यंत आळशी आहे! याशिवाय तो विसराळूही आहे. त्याला नोकरी दिल्यामुळे माझं आतापर्यंत व्यापारात पुष्कळच नुकसान झालं. आपण विचारलंत म्हणूनच आपणाला मी ही खरी माहिती देत आहे." मला मुद्दाम त्याची बदनामी करण्याची इच्छा नाही. यावर आपणास त्याला संधि द्यायची असेल तर पहा. पण नंतर मला दोष देऊं नका.

"वा, वा! खरी माहिती देऊन आपण मजवर उपकारच केलेत." असे म्हणून विकासदत्त तेथून निघून गेला.

श्रीधरने त्या दोघांचा संवाद दुकानच्या आतील बाजूस बसून ऐकला होता. त्याला

फार वाईट वाटले. धनगुप्तला त्याने विचारले–"महाराज, आपण माझी एक चांगली संधी घालवलीत. आपण असं का बरे केलंत?"

धनगुप्त श्रीधरच्या खांद्यावर थापटत म्हणाला–"असं पहा, तू यापूर्वीही दोन व्यापाऱ्यांकडे नोकरीसाठी प्रयत्न केला होतास. त्यांनी तुला जो पगार देऊ केला तो, मी देत असलेल्या पगारापेक्षा काही विशेष जास्त नव्हता. मी वेळोवेळी मुकाट्याने सर्व माहिती काढत होतो. हा विकासदत्त तुला जरा अधिक पैसे द्यायला तयार आहे."

"मग आपण माझ्याबद्दल खोटी तक्रार करून माझं नुकसान का केलंत?" श्रीधरने विचारले.

"श्रीधर, जेव्हापासून तू माझ्याकडे कामाला आहेस, तेव्हापासून तू जसं हित पाहिलंस तसंच मीही नेहमी तुझ्या भल्याचाच विचार करत आलो. तू मुलांबाळांचा धनी आहेस, तेव्हां मी तुला थोडा पगार वाढवला असता तरीही तू त्यातून कांही बचत करू शकला नसतास. कोणता खर्च आवश्यक अन् कोणता अनावश्यक हे समजणं फार कठीण असतं. तुझी मुलगीही आता लग्नाला योग्य झाली आहे, म्हणून मी तुझ्या नावे थोडी थोडी रक्कम जमा करत आलो आहे. शिवाय विकासदत्त तुला जो पगार द्यायला तयार आहे, तेवढा पगार मी ही याच महिन्यापासून तुला देईन. मान्य आहे तुला?" धनगुप्तने विचारले.

आतापर्यंत आपण आपल्या मालकाबद्दल चुकीची समजूत करून घेतली याबद्दल पश्चात्ताप होऊन श्रीधरने धनगुप्तजवळ कृतज्ञता व्यक्त केली.

श्रीधर म्हणाला–"मालक, आपले माझ्यावर खरे खुरे प्रेम आहे हे जाणून मला फार आनन्द झाला. आपण माझे खरे हितचिन्तक आहात. आपण मला पगार वाढवून दिला असता तरी ते पैसे असेच खर्च झाले असते. कसे आपले आभार मानू?"






[२]

['सोन्याची दरी' राज्यात भूकंपामुळे तेथील गोपुराचे प्रवेशद्वार मोडून पडले. यासाठी शिल्पकाराचा नातू विनोद याला राजाने कारावासाची शिक्षा फर्मावली. तो अरण्यात पळून गेला. तेथे त्याला एक सुवर्णमूर्ति दिसली व त्याच वेळी एका आवाजाने त्याला धबधब्यामागील गुहेत जाण्याची सूचना दिली. पुढे वाचा...]

त्या आवाजाने विनोदला धबधब्यामागील गुहेतून जाऊन तेथील अधिष्ठात्री देवीकडून वर मागायला सांगितले, तेव्हा विनोदच्या आनंदाला सीमा राहिली नाही. परंतु प्रश्न होता तो गुहेत शिरण्याचा. गुहेत शिरून पलिकडे जाऊ पहाणारा कोणीही माणूस आजपर्यंत जिवन्त परत आला नव्हता! विनोदचा मात्र दृढ विश्वास होता की त्याला आवाजाने दिलेल्या सूचने-प्रमाणे खरेच घडणार आहे!

आपण धबधब्याच्या मागील गुहेत जाऊ. त्या गुहेतून पुढे गेल्यावर नवीन प्रदेशात आपल्याला एक देवी दिसेल. ती देवी आपल्याला रहस्य सांगेल. सुवर्ण प्रतिमा जेव्हा सजीव कन्येमधे परिवर्तित होईल तेव्हा त्या कन्येशी विवाह करण्याची परवानगी देवी आपल्याला देईल.

मनोज दास



याचवेळी विनोदला आठवले की या मूर्तीच्या रक्षणासाठी कोणाची तरी मदत लागेल. आपणास कोण मदत करू शकेल याबाबत तो चिंता करू लागला. सेनाधिपतीचा कसा काय उपयोग होईल? की महाज्ञानी आपणास अधिक मोला-तोलाची मदत करू शकतील? मंत्री-मंडळात सर्वात लायक कोण? थोडा विचार करून त्याने निर्णय घेतला की या कामासाठी खुद्द महाराजांशिवाय आणखी योग्य दुसरे कोणी नाही.

आता पहाटेचे किरण आकाश उजळू लागले होते. विनोदने एकदा सुवर्णप्रतिमेकडे नजर टाकली. त्यावेळी त्याला असे भासले की मूर्तीच्या ओठांवर मंदहास्य विलसत आहे. विनोद किल्ल्याच्या महाद्वाराच्या रोखाने निघाला. त्याचवेळी द्वाररक्षकांनी सूर्योदयाच्या सूचनार्थ तुतारी वाजवली. विनोदने त्यांच्याजवळ जाऊन म्हटले—"मला आत्ताच्या आत्ता महाराजांना भेटायचे आहे."

"हूँ! म्हणे महाराजांना भेटायचंय, मोठा चक्रवर्ती राजाच लागून गेलास की नाही, तुझ्या इच्छेप्रमाणे महाराजांनी तुला दर्शन द्यायला! प्रातःकाल झाल्याची सूचना देण्यासाठी शिंग वाजवून आम्ही आमचे कर्तव्य बजावले आहे. आता त्यांच्या शयनकक्षाच्या खिडकीतून सूर्यकिरण आत पाठवून महाराजांना जागे करण्याचे काम सूर्यदेवाचे!" द्वाररक्षक म्हणाले.

पण विनोदने त्यांच्याकडे लक्षच दिले नाही. महाद्वार ओलांडून तो आत शिरला.

'थांब' असे म्हणत दुर्गरक्षकांनी त्याला अडवायचा प्रयत्न केला, परंतु त्याचा चेहरा पाहून ते मागे हटले. पण असे का व्हावे हे त्यांचे त्यांनाच समजेना.

विनोदलाही हे जरा विचित्रच वाटले. त्याने एका रक्षकाकडे शयनकक्षाची चौकशी केली व तेथे जवळ जाऊन त्याने हाका मारल्या—"महाराज, जागे व्हा, उठा! मी आपल्याला एक अपूर्व वार्ता द्यायला आलो आहे."

विनोदचा पुकारा ऐकून एक सेवक क्रोधाने म्हणाला—"महाराजांच्या कितीतरी बिरुदावल्या आहेत, त्यातून निदान 'चण्डमार्तण्ड' असे तरी म्हण."

त्याकडे दुर्लक्ष करीत विनोद पुन्हा एकदा ओरडला—"महाराज, महाराज."

हे ऐकून महाराज दचकले व बिछान्यातून उठून उघड्या खिडकीकडे गेले. हे पाहून काही सेवक महालातील स्तम्भांमागे दडले, तर काहींनी भिंतींचा आधार घेतला! त्यांना भीती वाटली की आपण दृष्टीस पडलो तर सेवकांबरोबरच महाराज आपल्यालाही शिक्षा देतील!

महाराज दातओठ खात थोडा वेळ खिडकीशी उभे राहिले. नंतर अचानक त्यांच्या चेहऱ्याचे रंग बदलू लागले! उच्च स्वरात ओरडून ते म्हणाले—"कोण आहे रे तिकडे? त्या आगंतुक तरुणाला माझ्याकडे पाठवून द्या."

विनोद धावतच शयनकक्षात पोचला. त्या दोघात नंतर काय बोलणे झाले हे कोणालाच कळले नाही. पण महाराज धावतच पायऱ्या उतरून खाली आले.

राजमहालात पहारा करणारे पहारेकरी विनोदला ओळखण्यात आता थोडे सफल झाले. त्यांपैकी अधिकांश जण त्याला आधीपासूनच ओळखत होते. त्याच्या



या धाडसी कृत्याने ते आश्चर्यचकित झाले. एक मंत्री त्याच वेळी तेथे आला. सर्व हकीकत जाणून तो म्हणू लागला—"परंतु,... चण्डमार्तण्ड महाराज,..." पुढे तो काही बोलण्यापूर्वीच राजा चिडून ओरडला—"अरे वेडयांनो, तुम्ही लोक आता फक्त मुकाट्याने माझ्या मागे या."

पण त्या वेळी महाराजांचा घोडा झोपेत होता. ते आता उशीर लावू इच्छित नव्हते. विनोद पुढे जात होता—महाराज त्याच्यामागे पायीच चालू लागले.

चालता चालता विनोदने विचारले—"महाराज, आपण नेहमीच या अरण्याची सहल का नाही करत?"



"अरे मूर्खा, मी अरण्यात कशाला येऊ? राजे लोक नेहमी महालात रहातात, जंगलात नाही. राजमहालातील कामे उरकता उरकता नाकीं नऊ येतात. बाहेर कुठे जायला फुरसत आहे कोणाला? अरण्याची सहल करायला मी काय रिकामटेकडा आहे?" राजा म्हणाला.

"अरण्यातील सुंदर वनश्री पाहून मन प्रफुल होऊन जाते. रंगीबेरंगी फुले, त्यांच्या भोवती पिंगा घालणारे भ्रमर, पक्षांचे मंजुळ संगीत यांचा आस्वाद घेण्यात काय गंमत असते? जंगलात झाडांखालून धावणारे झऱ्याचे पाणी अंगावर उडवून घेत स्वच्छन्द फिरायला काय मजा वाटते!"

"स्वच्छन्दपणे? हूं, मी प्रत्येकाचा स्वच्छन्दपणा हिरावून घेऊ शकतो! यापेक्षा निराळा स्वच्छन्दपणा मला काय कामाचा? असो. पण तरुण मुला, जंगलात येण्याचा विचार तुझ्या मनात कसा काय आला?" राजाने विचारले.

"जंगलात आलो नसतो तर ती सुवर्ण-मूर्ती मला कशी दिसली असती? पहा पहा." असे म्हणत विनोदने थोडया दूर असलेल्या त्या मूर्तीकडे बोट दाखवले.

दोन्ही हात कमरेवर ठेवून महाराज मूर्ती पहायचा प्रयत्न करू लागले. त्यांच्या चेहऱ्यावर पुन्हा क्रोध दिसू लागला. चिडून ते विनोदला विचारू लागले—"तू माझ्याशी चेष्टा करतो आहेस काय? तू जी जागा दाखवत आहेस तिथे फक्त दगडच दिसत आहेत."

राजाचे बोलणे ऐकून विनोद आश्चर्यात पडला, म्हणाला—"चण्डमार्तण्ड महाराज, सूर्यकिरणात झळाळत असलेली सुवर्णमूर्ती आपल्याला खरोखरीच दिसत नाही काय? माझ्या डोळ्यांना स्पष्टपणे दिसणारी मूर्ति आपणास दिसूं शकत नाही हे काय आश्चर्य!"

"मला अजिबात काही दिसत नाही, बिलकुल नाही. मला जे दिसत नाही ते तुला कसे दिसते याचे मला आश्चर्य वाटते. मला सोन्या-चिन्याची मूर्ति मुळीच दिसत नाही." राजा आणखीच उग्र होत म्हणाला.

"असे कसे झाले महाराज?" विनोदने विचारले.

"कारण तिथे काही नाहीच आहे, मूर्खा! तू माझी झोप का मोडलीस? मला नवऱ्यामुलाच्या रूपात सजवत असलेलं दृश्य मी स्वप्नात पहात होतो! तू माझं सुन्दर स्वप्नही मोडलंस. आता तुला मृत्युदण्डच योग्य!" राजा हुंकारत म्हणाला.

पण विनोद थोडाही विचलित न होता धैर्याने म्हणाला—"आपण तर कित्येक वेळा नवरा बनलात, अनेकांना आपण असं मारूनही टाकलं आहे."

पण महाराज विनोदचे बोलणे ऐकण्याच्या स्थितीत नव्हते. जमिनीवर लाथ मारून ते म्हणाले—"शयनकक्षातून निघताना मी जोडे तेवढे बदलले. पण महाराजांचं झोपेतून उठल्यावरोबर पहिलं काम म्हणजे मिश्या विचरणे. आज मी हे कामही विसरलो."

विनोद आश्चर्याने महाराजांकडे पहातच राहिला. महाराज आपला राग आवरण्याच्या प्रयत्नात मोठ्याने गरजले. ते ऐकून त्या डोंगरात



दडलेले कोल्हेही जोराने ओरडू लागले. ते गर्जन व कोल्हेकुई ऐकून महाराज काही संकटात सापडले असावे असे वाटून प्रधानमंत्री व पाचही महाज्ञानी तेथे धावत आले.

डोळे गरगरत महाराज त्यांच्याकडे पाहू लागताच रुद्ध कण्ठाने एक महाज्ञानी पुकारू लागला—"महाराज."

दुसरा घाबरून दीन स्वराने म्हणाला—"प्रभु, चण्डमार्तण्ड!"

पाचही महाज्ञानी तेथे होते, पण कोणा-लाच खरे काय घडले हे कळेना! त्यांच्या मनात आले—"एक माथेफिरू युवक राज-वाड्यात येऊन बोलावू लागला, आणि



"त्याच्यामागे महाराज या अवशेषांच्या जागी आलेच कसे?"

इतक्यात महाराज जोराने शिकले, महाज्ञानी भिऊन त्यांच्याकडे पाहू लागले.

भुवया आकुंचित करत त्यांच्याकडे पहात महाराज म्हणाले–"माझ्यासारख्या राजाला ही सकाळची उघडी हवा मानवण्यासारखी नाही." आणि विनोदकडे पहात ते म्हणाले–"हा दुष्ट, मला त्याच्यामागे नाचवतो आहे."

"मी महाराजांना नाचवतो आहे?" आश्चर्याने असे म्हणत विनोद महाज्ञानींना म्हणाला–"आपण महाराजांना समजावून सांगा–आपणाला समोरची सुवर्णमूर्ती का दिसत नाही?"

त्याने दाखवलेल्या जागेकडे पहात एक ज्ञानी म्हणाला–"तू दाखवत आहेस तिथे मला एक घुबड दिसते आहे."

"घुबड? नाही नाही, आम्हाला तिथे एक मोठा कोळी दिसतो आहे. इतका मोठा कोळी तर आपण आयुष्यात पाहिला नाही!" एक महाज्ञानी म्हणाला.

विनोद वैतागून म्हणाला–"बऱ्याच काळापूर्वी जी सुवर्णमूर्ती शिळांखाली दबली गेली होती, ती आता प्रकट झाली आहे. तुम्हाला दिसत नाही ती?"

"काय म्हणालास? कित्येक हजार वर्षांपूर्वी भूकंपामुळे दगडांखाली पुरली गेलेली मूर्ती इथे आहे? मला वाटतं याचं डोकं फिरलं असावं." तिसरा महाज्ञानी म्हणाला.

यावर इतर सर्व महाज्ञान्यांनी संमती-दर्शक आपापली डोकी हलवली. हे सर्व ऐकून चिडलेला राजा टाळी वाजवत म्हणाला–"या धूर्ताला पकडून खालच्या दरीत फेकून द्या."

राजाची आज्ञा ऐकून विनोद घाबरला. आता आपण काय करावे याबाबत तो विचार करू लागला. आता दरीत आपला कपाळमोक्ष होणार. करावे तर काय करावे

या क्षणी ? अंवती-मंवती हे सर्व महाज्ञानी उभे आहेत. पळून जायचे म्हटले तर हे आपणाला जाऊ देणार नाहीत. तरी पण पळून गेल्याशिवाय गत्यंतर नाही. असा विचार करून विनोद तिथून पळणार तोच राजाने त्याचा उजवा हात पकडून पिरगळला, बाकीच्यांपैकी दोघांनी त्याचे पाय घट्ट पकडले, तर एकाने त्याचा गळा धरला!

यानंतर विनोदला उचलून ते सर्व दरीकडे निघाले. इतक्यात सुवर्णमूर्तीच्या दिशेने कर्णमधुर स्वर ऐकू आले!

विनोदच्या पायांवरची पकड ढिली करत एक महाज्ञानी ओरडला–"हे काय अद्भुत!"

राजा रागावून बोलला–"थांबा, अद्भुत गोष्टीबद्दल मी प्रथम बोलणार. हा नाद साखरेने बनवलेल्या लाडूसारखा गोड आहे. एक लाडू काय. शेकडो, हज्जारो लाडू!"

सुवर्णप्रतिमा आता सर्वांनाच स्पष्ट दिसू लागली. त्यामुळे विनोदला सोडून सर्वचजण तिकडे पाहू लागले. महाज्ञानींपैकी एक म्हणाला–"चण्डमार्तण्ड प्रभु, मूर्तीची तुलना इन्द्रधनुष्याशीच होऊ शकेल."

यावर विनोदचा हात सोडत राजा म्हणाला–"अरे मुला, या मूर्तीबद्दल काय बोलू! मी तुझा हात पकडला म्हणूनच मूर्ती दिसू लागली. तुझी प्रशंसा करावी तेवढी थोडीच!" असे म्हणून राजाने तरुणाला मिठी मारली.

आनंदून विनोद म्हणाला–"चण्डमार्तण्ड प्रभु, प्रतिमा पाहताच आपण किती छान, सुंदर झाला आहात, काय सांगू!"

"ओहो, असे आहे काय? माझा आरसा कुठे आहे?" असे म्हणत राजाने महाज्ञानींना आज्ञा केली. "तुमच्यापैकी एकाने राजवाड्यात जाऊन माझा आरसा आणा बरे."

पण कोणीही महाराजांकडे लक्ष देण्याच्या स्थितीत नव्हते. सर्वचजण त्या मूर्तीकडे देहभान विसरुन पहात होते!

(क्रमश:)



# पिता आणि पुत्री

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाकडे परत आला. झाडावरून प्रेत उतरवून खांद्यावर टाकून नेहमीप्रमाणे मुकाट्याने स्मशानाकडे चालू लागला. तेव्हा प्रेतात वास करणाऱ्या वेताळाने राजाला विचारले–"राजा, अर्ध्या रात्री या भयानक स्मशानांत तू जे श्रम घेत आहेस, ते पाहून मला असे वाटते की विनाकारण तुझा द्वेष करणारा एकादा माणूस तुला या कामी प्रवृत्त करीत असावा. कधी कधी मित्र व नातेवाईकांचे आपापसातील संबंध अकारण बिघडतात. उदाहरणार्थ ही गोष्ट एक–एका राजकुमारीने विनाकारण आपल्या वडिलांचा द्वेष केला. आपले परिश्रम विसरण्यासाठी ही गोष्ट मी तुला सांगत आहे.

वेताळ गोष्ट सांगू लागला–कोणे एके काळी चन्द्रगिरि राज्यावर विष्णुगोप

## वेताळाच्या गोष्टी



नावाचा राजा राज्य करीत होता. त्याचा एकुलता एक मुलगा होता. त्याचे नाव रामगोप. विष्णुगोप म्हातारा झाला. आपल्याला विश्रांति मिळावी म्हणून त्याने रामगोपचा राज्याभिषेक केला.

रामगोप सुशिक्षित, गुणवान् व स्वभावाने उदार युवक होता. एकदा शिकारीसाठी तो राजमहाल सोडून बाहेर पडला. जंगलांत दूरवर गेल्यावर तो जवळ जवळ राज्याच्या सीमेवर पोंचला. तेथील नैसर्गिक दृश्ये पाहून रामगोपाचा आनन्द गगनात मावेना. एक उंच डोंगर, त्याच्या पायथ्याशी झुळझुळ वाहणारी नदी, चारी बाजूला हिरव्यागार शेतांनी सुशोभित गाव.

रामगोपने या प्रदेशाबाबत अधिक चौकशी केली, तेव्हा त्याला समजले की हा डोंगरी मुलुख व चारी बाजूला पसरलेली गावे यांचा चन्द्रगिरि राज्यांशी संबंध नाही. तो सारा प्रदेश शेजारच्या नागपुरी राज्याचा भाग आहे. हे माहीत झाल्यावर रामगोप अमळ चिन्ता करू लागला. असा सुन्दर प्रदेश आपल्या ताब्यात नाही अशा चिन्तेत असतानाच त्याच्या मनात एक विचार आला. राजधानीत पोचता-पोचता त्याने दृढ निश्चय केला.

एक आठवड्या नंतर रामगोपने सैन्याची जमवा-जमव केली आणि नागपुरीवर आक्रमण केले. अनपेक्षितपणे राज्यावर हल्ला झाल्यामुळे नागपुरीचा राजा शक्तिपूर्वक रामगोपशी सामना करू शकला नाही.

रामगोप युद्धात विजयी होऊन आपला इष्ट प्रदेश जिंकून आनंदाने राजधानीत परत आला.

पराजित झाल्यामुळे नागपुरीचा राजा शशिनाग मानसिक रोगाने पछाडला गेला. आता भविष्यात काय करावे याबाबत त्याने आपल्या मंत्र्यांशी विचार-विनिमय केला.

मंत्र्यांनी सल्ला दिला—"प्रभु, सैन्यबलाच्या दृष्टीने पाहता चन्द्रगिरीचा राजा आपल्याहून अधिक शक्तिसपन्न आहे. आपण जर त्याच्याहून अधिक सैन्यबल जमवू शकलो तर आपण त्याच्यावर हल्ला करू शकू."

आपले सैनिक बळ वाढविण्यासाठी आवश्यक ती व्यवस्था करण्याचा आदेश शशिनागने ताबडतोब आपल्या मंत्र्यांना दिला.

काही दिवस असेच गेले. शशिनागला अवंती नावाची एक रूपवान कन्या होती. ती उपवर झाली होती. अवंती एखाद्या अप्सरेसारखी सुंदर होती. तिचे रूप पाहून लोक मंत्र-मुग्ध होऊन जात. अनेक कलात ती प्रवीण होती. ती गाऊं लागली म्हणजे ते सुरेल संगीत आसमंतात गुंजून उठे. तिने चितारलेली चित्रे राजवाड्यात सर्वत्र शोभून दिसत. वयोमानानुसार तिचे सौंदर्य दिवसें दिवस अधिकच खुलून दिसू लागले. पुरोहितांनी राजाला सुचविले की अवंतीच्या जन्मपत्रिकेनुसार त्याच वर्षी तिचा विवाह करणे अधिक श्रेयस्कर ठरेल. त्या राजवंशात राजकुमारींचा विवाह स्वयंवर-पद्धतीने करण्याची प्रथा प्रचलित होती.

शशिनागने स्वयंवरासाठी आवश्यक ती सर्व व्यवस्था केली. निमंत्रण-पत्रिका तयार होताच राज्यांतील अधिकाऱ्यांनी ती शशिनागला दाखविली.



शशिनागने निमंत्रित राजांची यादी पाहिली आणि अधिकाऱ्यांना विचारले—"यादीत चन्द्रगिरीचा राजा रामगोपचे नाव नाही. कां बरे?"

अधिकाऱ्यांना मोठे आश्चर्य वाटले आणि लगेच त्यांनी रामगोपच्या नांवे निमंत्रण-पत्रिका तयार करून पाठवून दिली.

स्वयंवराचा दिवस आला. सर्व राजकुमार आपापल्या स्थानी बसले. या स्वयंवर उत्सवात रामगोपला आलेला पाहून सर्वांना मोठे आश्चर्य वाटले.

राजकुमारी अवंती आपल्या हातात पुष्पमाला घेऊन पुढे पुढे चालू लागली.

तिच्या बरोबर तिची एक प्रमुख सखी होती. एकेक राजकुमाराचे विशेष गुण, ऐश्वर्य-संपन्नता व पराक्रम यांचा परिचय ती राजकुमारी अवंतीला देत होती.

राजकुमारी मुकाट्याने ते सर्व ऐकत होती. शेवटी ती चन्द्रगिरीचा राजकुमार रामगोपपाशी पोंचली नि तिने त्याच्या गळ्यात जयमाला घातली.

हे दृश्य पाहून सर्व उपस्थित मंडळींना फारच आश्चर्य वाटले. यावर सर्व लोक निरनिराळे तर्क-वितर्क करू लागले—राजकुमारीने असे का केले? ती वेडी तर नाही झाली? शत्रु व अतिविशाल राज्याची हाव करणाऱ्या राजकुमाराला पति म्हणून पसंत करण्यात तिचा उद्देश काय असावा?

पण शशिनाग राजाने तिकडे लक्ष दिले नाही. तो सिंहासनावरून खाली उतरला व त्याने रामगोपशी अवंतीचा विवाह संपन्न केला. यानंतर त्याने जावयाचा यथोचित सत्कार केला, मूल्यवान भेट-वस्तु दिल्या आणि जावई व मुलगी यांना रवाना केले.

अशा रीतीने पाच सहा महिने गेले. एक दिवशी शशिनागने आपल्या मंत्र्यांना बोलाविले आणि विचारले—"आता आपल्या सैन्याची जमवा-जमव उत्तम झाली आहे ना?"

"प्रभु, आता सैन्याची काय आवश्यकता आहे?"—सर्वांनी आश्चर्य-चकित होऊन विचारले.

शशिनागने उत्तर दिले—"आवश्यकता कां नाही? यापूर्वी आपला जो प्रदेश हातून गेला, तो चन्द्रगिरीच्या राजाकडून पुन्हा हस्तगत करायला नको?"

मंत्र्यांनी राजाचा प्रतिवाद न करता सैन्य जमविण्याचा प्रयत्न सुरू केला.

गुप्त हेरांकडून रामगोपला जेव्हा ही वार्ता समजली तेव्हा त्याने सासऱ्याकडे निरोप पाठविला—"मी नागपुरी राज्याचा जो भाग आपल्या ताब्यात घेतला आहे, तेथून माझ्या सैन्याला परत बोलविले आहे."

यामुळे राजा शशिनागला अत्यंत आनंद झाला. आपल्या राज्यांतील गमविलेले प्रदेश पुन: परत मिळाल्यामुळे जनता आनन्द-सागरात बुडून गेली.

ही गोष्ट सांगून वेताळाने विक्रमादित्यला विचारले—"राजा, जो राजा आपला शत्रु आहे, त्याला आपल्या मुलीच्या स्वयंवर उत्सवात आमंत्रित करण्यात शशिनागचा काय उद्देश होता? त्याला बोलविल्यामुळे शशिनागला स्वत:च अपमानित व्हावे लागले ना? अनेक राजकुमारांची उपेक्षा करून राजकुमारी अवंतीने आपल्या वडिलांच्या शत्रुशी विवाह केला. तिने आपल्या वडिलांबाबत असा द्वेषभाव का दर्शविला? जे काही झाले ते विसरून जायला हवं होतं, पण या उलट शशिनागने आपल्या जांवया विरुद्ध युद्धाची तयारी का केली? रामगोपने युद्ध न करताच पूर्वी जिंकलेला





प्रदेश परत का करून टाकला? आपल्या सासऱ्याचे सैन्यबळ पाहून त्याला भीति वाटली असे तर नाही? माहीत असूनही या माझ्या शंकांचे समाधान केले नाहीस तर तुझ्या डोक्याचे तुकडे-तुकडे होऊन जातील."

यावर विक्रमादित्याने उत्तर दिले– "कोणत्या ही राजकुमारीला आपल्याला पसंत पडेल त्या राजकुमाराशी विवाह करता यावा हीच तर स्वयंवर-पद्धतीची विशेषता आहे. म्हणून शशिनागने जर मित्र व शत्रु असा विचार करून काही लोकांनाच निमंत्रण पाठविले असते तर त्याचा अर्थ असा झाला असता की वर निवडायचा अधिकार राजकुमारीला नसून त्यालाच आहे. हे समजूनच शशिनागने रामगोपच्या नांवे निमंत्रण पाठविले स्वयंवर–प्रथेत बाधा येऊ नये म्हणून वडिलांनी जो समजूतदारपणा दाखविला तो राजकुमारी अवंतिच्या लक्षात आला. हे सर्व सोडून दिले तरी अवंतीने आपल्याला योग्य अशा वराच्या गळ्यात माळ घातली. असे करण्यात तिच्या मनात वडिलांच्या बद्दल द्वेषभावना नव्हती. आता प्रश्न असा की आपल्या राज्याचा जो भाग शशिनागच्या हातून गेला, तो परत मिळविणे हे राजा म्हणून त्याचे कर्तव्य होते. तसे जर त्याने केल नसते तर राजाने जांवयाला महत्त्व देऊन देशाची प्रतिष्ठा धुळीस मिळविली अशी लोकांनी टीका केली असती. रामगोपने आपल्या ताब्यात आलेला प्रदेश युद्ध न करता सोडून दिला याचे कारण त्याच्या मनांतील भीति नव्हे. सासऱ्याच्या पश्चात् काही झाले तरी चन्द्रगिरी व नागपुरी दोन्ही राज्यांचा राजा तो बनणारच होता. अशा परिस्थितीत दुष्टपणा करून युद्धात जनतेचा नाश करणे त्याला योग्य वाटले नाही."

एवढे बोलून राजा चुप झाला. वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुनः झाडावर जाऊन बसला. (कल्पित)





# निसर्गाची करामत

नन्दलाल एका मध्यम वर्गीय कुटुंबांतील माणूस होता. एकादं छान पुस्तक वाचायला मिळालं की आजू-बाजूचे सर्व तो विसरून जात असे. अशा स्थितीत त्याला कोणी बोलाविले तर तो चिडून जाई.

एक दिवशी सकाळी तो वाचण्यात गुंग होऊन गेला होता. त्या वेळी स्वयंपाक-घरांतून पत्नीने त्याला बोलावून म्हटले– "आहो, थोडं मुलाला संभाळता का?"

नन्दलालचा मुलगा तीन वर्षांचा होता. त्याचं नाव बाबूराव. नन्दलालने त्याच्या-समोर काही खेळणी ठेवली. मग काय, आपल्या वडिलांना त्रास न देता बाबूराव खेळू लागला. नन्दलालने आनंदाने पुस्तक वाचायला सुरुवात केली.

त्या वेळी बाहेरचं वातावरण एकदम थंड व आल्हाद-दायक होते. आकाशांत काळे ढग गर्जना करीत होते. एकदम वीज लखलखली आणि मेघ गर्जून उठले.

खेळणारा बालक ढगांचा गडगडाट ऐकून घाबरला आणि श्वास रोखून रडू लागला. त्याचे रडणे ऐकून नन्दलालची पत्नी लक्ष्मी स्वयंपाक-घरातून धावत आली व मुलाला कुरवाळू लागली, तरी पण मुलगा रडतच राहिला.

'मेघांचा कडकडाट ऐकून पोरगा घाबरला. काय हा भयंकर कडकडाट लेकाचा!' नन्दलालने गर्जनाला दोष दिला, पण हातचं पुस्तक सोडलं नाही.

लक्ष्मी मुलाला शांत करू शकली नाही. शेवटी चिडून ती नवऱ्याला म्हणाली– "सदान् कदा ती मेली पुस्तकं वाचीत बसायचं! काय मिळतं पुस्तकं वाचून कुणास ठाऊक? माझं ऐका आता– तुम्ही कृपा करून पुस्तक थोडं ठेवून द्या

नि बाबुरावला मागील अंगणात नेऊन खेळवा. हा शांत होईल, तोपर्यंत मी स्वयंपाकाचं काम पूर्ण करून टाकीन."

निरुपाय होऊन नन्दलाल मुलाला घेऊन मागच्या बाजूच्या अंगणात गेला. तिथे पोंचताच बाबूराव अचानक रडायचा थांबला आणि टाळ्या वाजवून ओरडला–"तात्या, फूल, फूल!"

मुलगा जिकडे पहात होता, नन्दलालने तिकडे आपली नजर वळवली. त्याच वेळी फुललेली सुंदर लाल कमळं पाहून मुलगा आनंदाने टाळ्या वाजवीत होता. हे सर्व नन्दलालच्या लक्षात आले.

यानंतर नन्दलालने आपल्या बायकोला बोलावून म्हटले–"हे बघ, जरा इकडे येतेस का?"

लक्ष्मी अंगणात येऊन म्हणाली–"काय हो? काय झालं? घाबरलात की काय?"

प्रफुल्ल लाल कमळांकडे बोट करून नन्दलाल म्हणाला–"आता पर्यंत जी फुलं नव्हती, ती एकदम कोठून आली याचं मला आश्चर्य वाटतंय!"

सुंदर लाल कमळांकडे पाहून लक्ष्मी म्हणाली–"वाहवा! लाल लाल कमळांची फुलं! आता ढग कडाडत होते. त्यांच्या गरजण्याने ही फुलं उमलली असावीत." असे म्हणून ती स्वयंपाकघराकडे गेली.

नन्दलाल एकदा तांबड्या कमळांकडे पहात चकित होऊन तसाच काही वेळ उभा राहिला.

वादळ, तुफान, वीज व मेघ गर्जना यांच्यासह् निसर्ग कधी जमीन व आकाश यांना थराकून सोडतो, तर कधी स्मित हास्य करून गुदगुल्या ही करतो.

छोट्या बाबूरावला ढगांच्या गर्जनेमे भीति वाटली की त्याला आनन्दित करणाऱ्या लाल कमलांना फुलवणाऱ्या निसर्गाचे कौतुक वाटले हे नन्दलालला समजले नाही. पण खरी गोष्ट ही की एकाद्या लहान मुलाप्रमाणे नन्दलाल सुन्दर फुलांकडे पाहून आनन्दित झाला!



भारतातील अद्भुत स्थळे :

## कोचीनची मंदिरे

केरळच्या कोचीन जवळच्या भागावर भारताच्या इतिहासाचा बराच प्रभाव आहे. जगातील प्राचीन यहूदी केन्द्रापैकी एक इथेच आहे. या यहूदी मंदिराला अनेक शतकांचा इतिहास आहे. निळ्या सफेत चीनी कपच्यांतून याचे छत बनविले आहे.





वास्को-ड-गामाच्या नेतृत्वाखाली सर्व-प्रथम पोर्तुगीज लोक कालिकट मार्गे इथे आले. वास्को-ड-गामा ने स्थानिक लोकांना त्रास होईल असे कार्य सुरू केले.

भारतात यूरोप-निवासियांचे पहिले चर्च 'सेंट फ्रांसिस' इथे बांधण्यात आले. हे चर्च पोर्तुगीजांच्या शासन-काळात कॅथॉलिक चर्च म्हणून, डचांच्या काळात प्रॉटेस्टंट चर्च म्हणून, तर ब्रिटिशांच्या कालात ॲंग्लिकन चर्च म्हणून प्रसिद्ध होते. सध्या हे 'चर्च ऑफ साउथ इंडिया' या स्वरूपांत कार्य करीत आहे.





सोळाव्या शतकात पोर्तुगीजांनी येथे डच-भवन स्थापून ते कोचीनच्या राज-वंशीयांना भेट-स्वरूप दिले. याच्या भिंतींवर रामायणातील काही घटना चितारलेल्या आहेत.

असं सांगतात की सालमन राजाच्या व्यापारी जहाजावर यहूदी लोक इथे प्रथम आले. येथील राजांच्या छत्र-छायेत यहूदी लोकांनी आपले जीवन सुख-समाधान पूर्वक चालविले.





यहूदींच्या प्रार्थना-मंदिराचा अंतर्भाग विशेष प्रकारे सुशोभित केलेला आहे. इस्राइल सरकार स्थापन झाल्यावर बरेचसे लोक कोचीन सोडून तिकडे गेले. तरी ही त्यांचे प्रार्थना-मंदिर अत्यंत भक्तिभावाने निष्ठापूर्वक सुरक्षित ठेवलेले आहे.

या भागांतील परंपरेनुसार येथील हिन्दू मंदिर निरनिराळ्या मूर्तींनी सुशोभित केलेले आहे. इथे यहूदी, ख्रिश्चन, हिन्दू व मुसलमान गुण्या-गोविंदाने एकत्र राहतात.





ईसवी सनाच्या पहिल्या शतकात जेव्हा सेंट थॉमस मलबार सोडून येथे आले तेव्हा एका यहूदी बालिकेने त्यांचे स्वागत केले असे सांगतात. त्या काळी भारतात. निरनिराळ्या धर्मांच्या लोकात कसले ही वैमनस्य नव्हते.

विशाल सागरांच्या पार्श्वभूमीवर येथील ऐतिहासिक इमारती फार शोभून दिसतात. एका बाजूला शांत-गंभीर वातावरण आहे, तर दुसऱ्या बाजूला आधुनिक व्यापारी संस्थांनी गजबजलेले बंदर अशान्तिने भरून गेलेले आहे.





समुद्र-किनारी सर्वप्रथम आकर्षित करणारे दृश्य कोणते असेल तर ते मासे पकडणाऱ्या चीनी जाळ्यांचे! मच्छीमारी हे येथील बऱ्याच लोकांच्या उदर-निर्वाहाचे साधन आहे. हळू हळू लोक मासे पकडण्यासाठी आधुनिक उपकरणांचा अधिक उपयोग करू लागले आहेत.



# पितृ-भक्ति

कोणे एके काळी चीन देशांत टोंग नावाचा एक मुलगा रहात होता. या मुलाची आई तो लहान असतानाच वारली. तो एकोणीस वर्षांचा असताना त्याचे वडील ही त्याला सोडून गेले. आयुष्यभर एक तांबडा पैसा ही वाचवू शकले नाहीत. म्हणून टोंग एक अनाथ मुलगा राहून गेला.

टोंगचे सर्वात पहिले कर्तव्य होते— आपल्या वडिलांची उत्तर-क्रिया करून त्यांच्यासाठी एक समाधि बनविणे. पण हातात एक कवडी नव्हती. हे सगळं कसं जमेल? पैसे मिळविण्यासाठी टोंगला एकच एक उपाय दिसत होता—तो म्हणजे गुलाम म्हणून कोणाला तरी स्वतःला विकून घेणे.

टोंगने एका पुठ्ठयावर आपली किंमत लिहिली आणि गुलाम म्हणून विक्रीच्या आपल्या शर्ती पण लिहिल्या. तो पुठ्ठा आपल्या गळ्यात अडकवून गुलामांच्या बाजारात टेकाडावर जाऊन बसला. पुठ्ठयावर लिहिलेल्या शर्ती वाचून गुलामांचे खरीददार पुढे निघून जात.

कारण असं की टोंग स्वतःला कमी किंमतीवर विकून घ्यायला तयार नव्हता. शास्त्रविहित रीतीने आपल्या वडिलांची उत्तर-क्रिया पार पाडून छानशी समाधि बांधायला जो खर्च येईल तेवढी रक्कम तरी निदान मिळवायचा त्याचा निश्चय होता.

कित्येक तास गेले, पण त्याला खरेदी करायला तयार ग्राहक दिसला नाही. त्याने आपला जो दर ठरविला होता तितकी किंमत द्यायला कदाचित् कोणी तयार होणार नाही असा मनांतल्या मनात विचार करून तो अमळ भयभीत झाला होता. इतक्यात तिकडून एक अधिकारी आला. टोंगच्या गळ्यात लटकलेल्या पुठ्ठयावरील अटी त्याने वाचल्या, मग आपल्या बरो-

एक चीनी लोककथा



वरच्या एका कर्मचाऱ्याच्या हस्ते त्याची किंमत दिली व करारपत्र लिहून घेतले.

टोंगची इच्छा पूर्ण झाली. त्याने मंत्रोच्चार सहित आपल्या वडिलांची उत्तर-क्रिया केली, शास्त्रोक्त दान-धर्म केला. वडिलां-साठी एका कुशल शिल्पकाराकडून एक सुरेख समाधि बनवून घेतली आणि आपल्याला खरेदी केलेल्या मालकाकडे जाऊन पोचला. त्याची सेवा-चाकरी करायला सुरुवात केली. राहण्यासाठी टोंगला एक झोपडी बनवून देण्यात आली.

दिवसामागून दिवस जात होते. टोंगला सुख आणि आराम जणू माहीतच नाही. या विपन्नावस्थेत ही तो आपल्या वडिलांचे श्राद्ध मोठ्या निष्ठेने करीत असे.

एक वर्षी पिके कापण्याच्या मोसमात टोंगला ताप भरून आला. तो पलंगावरून उठू शकत नव्हता. एक दिवशी रणरणत्या दुपारी टोंग तापाने फणफणत बेशुद्ध अवस्थेत पडला होता, त्यावेळी त्याला वाटलं की आपल्या शरीराला कोणाचा तरी हात थंड स्पर्श करीत आहे. त्याला असं वाटलं की आपला सारा दुबळेपणा कमी कमी होत चालला आहे. आपल्या शरीरात होत असलेल्या या बदलाकडे आश्चर्याने पहात त्याने अमळ डोळे उघडले. एक अलौकिक सुंदरी त्याच्या जवळ बसली होती. त्या सुंदरीचा परिचय करून घेण्याचे धाडस त्याच्यात नव्हते. त्याच्या डोक्यावरून आपला हात फिरवीत ती म्हणाली—"तुझा आजार बरा करून पत्नी म्हणून तुझ्याजवळ राहण्यासाठी मी आले आहे."

टोंगला वाटलं की स्त्री जणू काही त्याला आज्ञा करीत आहे. तो घाबरून पलंगावरून उठून उभा राहिला, त्याला वाटलं आपली सर्व कमजोरी नष्ट झालेली आहे. आपल्या बायकोचे पालन-पोषण करणे आपल्याला शक्य नाहीं हें सांगण्याचे धाडस ही त्याला होईना. त्याच्या मनांतील ही चिन्ता जणू आपल्याला समजली आहे अशा आवेशात





ती म्हणाली—"कुटुंब चालविण्याची जबाबदारी माझी. ती मी पाहून घेईन. तुला चिंता नको."

दोघे ही देवळात गेले. गुडघ्यांवर बसून दोघांनी पितृ-देवतांची मनोभावे पूजा केली आणि दोघे पति-पत्नी बनले.

त्यांचं लग्न एका विचित्र पद्धतीने झाले होते. त्या स्त्रीचा वंश काय नि ती कोठून तेथे आली हे ही टोंगने तिला विचारले नाही. तिने केवळ आपले नाव सांगितले—'ची'!

'ची' आल्यामुळे टोंगच्या घरांतील वातावरण पार बदलून गेले. सारं घर सजविलं गेलं, सुंदर वाटू लागलं! कामावर जाण्यापूर्वी टोंग पोटभर खाऊं लागला. शेतातील काम संपवून तो घरी परत येई, तेव्हा संध्याकाळचे जेवण तयार असे.

टोंगची बायको दिवसभर हातमागावर बसून रंगी-बेरंगी चित्रांनी युक्त रेशमी कापड विणीत असे. पाहणारांच्या दृष्टीला ती वस्त्रे आकर्षक वाटत. कारागिरीतील तिची कुशलता सर्वत्र प्रसिद्ध झाली. रोज व्यापारी लोक तिच्या घरी येत व चांगली किंमत देऊन तिने हाताने विणलेले रेशमी कापड खरेदी करीत.

'ची' ने परिवार चालविण्याची जबाबदारी स्वीकारली होती, त्याप्रमाणे ती सर्व काही करीत होती. पेटीत दिवसेंदिवस पैसे जमू लागले. एक दिवशी पेटी उघडून तिने जमविलेली अनेक चांदीची नाणी टोंगला दाखविली, नि आत असलेला एक कागद काढून त्याच्या हाती दिला. ते टोंगला मुक्त केल्याचे पत्र होते. टोंगच्या मालकाला त्याने दिलेली किंमत परत मिळाली होती. टोंगची गुलामी संपली होती, त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रू लागले.

ची म्हणाली—"दक्षिण दिशेला मी तुझ्यासाठी शेत व रेशमाच्या किड्यांसाठी बाग खरेदी केली आहे. आजपासून दुसऱ्या कोणाकडे नोकरी करण्याची आवश्यकता नाही. तू स्वतः आपली नोकरी कर."

टोंग आपल्या बायकोच्या पाया पडू लागला. तिने तसे करू दिले नाही.

त्या दिवसापासून टोंगचे भाग्य बदलले. तो जे काम हाती घेई, त्यात त्याला सफलता मिळू लागली. हाताखाली काम करणारी माणसे प्रेम व आदराने त्याच्याकडे पाहू लागली.

याच दिवसात हातमाग चालविण्याचे काम बन्द झाले. टोंगची बायको गर्भवती राहिली. योग्य वेळी एका सुंदर बालकाला तिने जन्म दिला. जे त्याला पहायला जात ते म्हणत–"हा कोणी सामान्य मुलगा नाही एका वरदानामुळे हा जन्मला आहे. हा मुलगा शतायुषी होणार."

एका वर्षी थंडीचा मौसम सुरू होणार होता. अशात एक दिवशी रात्री नवरा-बायको आपल्या मुलाबद्दल व त्याच्या भविष्याबद्दल सकाळ पर्यंत बोलत बसले. टोंगने आपल्या पत्नीच्या चेहऱ्याकडे अमळ निरखून पाहिलं, 'ची' चा चेहरा त्याला अधिकच सुन्दर वाटला.

सकाळ झाली नि ची चटकन् उठून उभी राहिली. टोंगचा हात धरून त्याला बाळाच्या पाळण्याजवळ घेऊन गेली. का कोणास ठाऊक आज टोंग चीकडे पाहून थोडा घाबरला होता. टोंग आयुष्यात पहिल्यांदाच असा घाबरला होता, सहजच त्याने डोळे मिटून चीपुढे गुडघे टेकले. डोके वर करून त्याने तिच्याकडे पाहिले. आश्चर्याची गोष्ट अशी की तिची आकृति पूर्णतः बदलून गेली होती. सर्वसाधारण स्त्रियांहून ती अधिक उंच दिसत होती. तिच्या देहातून प्रकाश बाहेर पडत होता.

ची म्हणाली-"तुला सोडून जाण्याची वेळ जवळ आली आहे. मी मानव नाही. पण तुझ्यासाठी मानवी स्त्री बनून आले. माझे स्मृति-चिन्ह म्हणून हा आपला मुलगा तुझ्या-जवळ राहील. तुझ्या पितृभक्तिवर प्रसन्न होऊन स्वर्गाच्या अधिपतीने मला तुझ्याकडे पाठविले. आता मला तिकडे परत गेलं पाहिजे. मी 'ची-नियु' नावाची अप्सरा आहे."

इतके बोलून ची हळू हळू अदृश्य झाली.






दिवसेंदिवस कृष्णाच्या खोड्या वाढतच होत्या, त्यामुळे गोकुळात गोंधळ माजला होता. गोकुळवासी केवळ निरुपाय म्हणूनच ते सर्व सहन करीत होते, चुप रहात होते. परंतु गोपिका गप्प बसल्या नाहीत, त्यांनी विचारविनिमय केला आणि यशोदेकडे जाऊन कृष्णाच्या उपद्व्यापां-बद्दल तक्रार करू लागल्या.

"अग बाई, काय तूच एका लाडक्या मुलाला जन्म दिला आहेस का? आम्हाला त्यामुळे किती त्रास होतो पहा न! तो लहान मुलगा आहे म्हणून आम्ही आजपर गय केली, पण खोड्यांनाही काही मर्यादा हवी. तुम्ही लोक श्रीमंत असाल, पण सारा दोष तुझाच आहे. तू लाडावून त्याला 'दांडोबा' केलायस आणि सगळ्या घरांना वैताग करून ठेवलायस. असं वाटतंय की, सहानुभूति, दया नावाच्या भावना तुझ्या मनाच्या कोपऱ्यातही नाहीत. नीट कान देऊन ऐक, तुझ्या लाडक्या पोराने काय काय उद्योग केलेत...." एका गोपिकेने अशी तक्रार केली, तर दुसरीने पुढे होऊन आणखी टोमणे मारायला सुरुवात केली–"अग सखे, तुझ्या मुलाने माझ्या घरात घुसून मटक्यातलं दूध, दही आणि तूप खाऊन टाकलं. किंचाळ्या मारून मडकी उलटी टाकून पळून गेला. आमचं किती नुकसान झालं, आमची किमत काय राहिली? आम्ही कसं जगावं?" इतक्यात आणखी एक गोपी पाय आपटत,



हातवारे करीत तिथे आली अन म्हणाली–"अग यशोदे, तुझा मुलगा तर राक्षस आहे राक्षस! मी दुधाच्या हंड्या आणि लोण्याची मडकी शिक्यात टांगून ठेवली होती. त्याने सगळं लोणी खाल्लं, हंड्या फोडून टाकल्या, शिकी तोडून टाकली. आता तूच सांग त्याच्या खोड्या आम्ही कशा सहन कराव्या. असं वाटतं, आम्हाला गाव सोडून जायची पाळी येणार."

आणखी एक गवळण रागाने हात हलवत, बोटे मोडत आली आणि हकीकत सांगू लागली–"घराच्या मागच्या खोलीत तुपाचे बरेच हंडे ठेवून दरवाजाला कुलूप घातलं. तुझ्या मायावी पोराने कुलुपासहीत दरवाजाच तोडून टाकला. मी घाबरून पळून गेले. मला माहीत नाही त्याने सगळं तूप खाऊन घेतलं का काय केलं! थोड्या वेळाने येऊन पहाते तर थेंबभरसुद्धा तूप शिल्लक नाही! असं अपमानित होऊन संकटाचं जिणं जगण्यापेक्षा गावाला आग लावून देऊन आपली गायीगुरं घेऊन दुसऱ्या गावात शांततेने राहू."

एक बाई मागून सर्व गोपिकांना बाजूला सारत पुढे आली आणि म्हणाली–"या सर्वांच्या गोष्टी काय ऐकतेच, जरा माझ्या घरी काय अनाचार झाला तो ऐक–तुझ्या दांडोबाने माझ्या घरात घुसून दहा मटके तूप, दूध अन् दही साऱ्या घरात सांडून दिलं. रिकाम्या मडक्यांवर हाताने, लाथांनी मारून ती फोडून टाकली, डाळ-भात-खीर सर्व काही आपल्या मित्रांना वाटून टाकलं. सगळी मडकी फोडून टाकली. वासरांच्या दोऱ्या सोडून त्यांना गायींकडे हाकललं. आमच्या मुलांना थेंबभरसुद्धा तूप, दही किंवा दूध उरलं नाही. ती रडत आहेत."

आणखी एक गोपी रुद्ध कंठाने म्हणाली–"माझ्या मुलांना व पतीला पक्वान्न खायची इच्छा झाली होती म्हणून मी दूध, आटा, साखर, लोणी मिसळून मिठाई बनवून घड्यात रचून ठेवली, तुझ्या मुलाने घडे उतरवून सर्व मिठाई फस्त केली. त्यांच्या पोटात कसलं भूत-पिशाच्च बसलंय नकळे! मी खर सांगितलं तर माझे पति त्यावर विश्वास ठेवतील का? तूच सांग?"

अशा प्रकारे सर्वजणी एकापेक्षा एक वाढत्या तक्रारी यशोदेला सांगू लागल्या. एका घरातला आटासाखर घातलेला पदार्थ खाल्ला, तर दुसऱ्या घरातला सर्व स्वयंपाकच खाऊन टाकला! हे सर्व एकादा लहान मुलगा करू शकेल? घरातली पुरुष माणसं घरात नसताना एकाद्या घरची गाईवासरं जंगलात पिटाळून लावली? ही कृत्ये अमानुष नव्हेत का?–अशा तऱ्हेच्या तक्रारी सर्वांनी केल्या व आपला शेवटचा निर्णयही सांगितला–"हे पहा, आम्ही सर्व गाव सोडून दुसरीकडे जातो. मग तू अन् तुझा लाडका मुलगा या गावावर हवं तसं राज्य करा."



सर्वांच्या तक्रारी ऐकून यशोदेने सर्वांचे सांत्वन केले आणि म्हटले–"तुमच्या घरी जे जे नुकसान झालं ते ते सर्व मी भरून देईन–काळजी करू नका. पण लक्षात ठेवा–तुमच्यावाचून आमची कामं कशी चालतील? माझ्या मुलाने अशी राक्षसी कामं कशी केली असतील कुणास ठाऊक! पण तुम्ही तरी खोटं कशाला बोलाल? ते असो, आता यापुढे मी त्याला असा ताब्यात ठेवते, तुम्ही पहात रहाल. आता मनात काही न आणता आपापल्या घरी जा!" असे समजावून त्या सर्वांना यशोदेने तेथून पाठवून दिले.

यानंतर यशोदेने कृष्णाला आपल्या मांडीवर घेतले अन् त्याला चुचकारत बोलू लागली–"बाळा, तू दुसऱ्यांच्या घरी जातोसच का? आपल्या घरी काय दूध, दही कमी आहे? मी पाजते दूध तुला. दुसरं एक शेर दूधही आईच्या दुधाच्या एका थेंबाची बरोबरी करू शकणार नाही, असं म्हणतात. आपल्या ओळखीच्या इतर लोकांशी कशाला भांडण उकरून काढतोस?"



असे म्हणून यशोदेने त्याला आपले दूध पाजले, त्याची दृष्ट काढली, त्याच्या मस्तकाचे अवघ्राण करून त्याचे चुंबन घेतले. पुन्हा म्हणाली–"ऐक बाळा, आज सकाळपासून तुझ्या तक्रारी ऐकण्यातच वेळ गेला. तू असा दांडगट आहेस की आता तुला सोडलं तर तू घरी पुन्हां भांडणं आणशील. थांब तुला आता बांधूनच ठेवते." असे म्हणून कृष्णाचा दंड पकडून यशोदेने त्याला उखळीजवळ नेले आणि एक दावे घेऊन दोरीचे एक टोक कृष्णाच्या कमरेला बांधले अन् दुसरे उखळीला. नंतर हातात छडी घेऊन ती त्याला म्हणाली–"इथून हललास तर मार मिळेल. पहाते कसा हलतोस इथून ते." अशा प्रकारे त्याला धमकी देवून यशोदा आपल्या घरकामाला निघून गेली.

थोड्या वेळाने कृष्णाने दावे पकडून उखळी प्रथम आपल्याकडे ओढून घेतली गोठ्याजवळ दोन सालवृक्ष शेजारी शेजारी उभे होते. कृष्णाने उखळी ओढून त्या वृक्षांजवळ नेली आणि स्वत: त्या दोन झाडांच्यांमधून पलिकडे गेला. नंतर सर्व शक्ती एकवटून उखळीही त्यांच्यामधून खेचू लागला. आणि काय! दोन्ही वृक्ष धडाम्कन् खाली कोसळले. आवाज ऐकून अनेक गोप-गोपी धावत तिथे पोचले. ते दृश्य पाहून काहीजण यशोदेकडे धावले. व म्हणाले–"बाई, तुमचा मुलगा कसा राक्षसी शक्तीचा आहे! मुलांना असं उखळीला कशाला बांधावे? पोर महावृक्ष अंगावर पाडून घेतो आहे अन् तुला वाटतंय आपण मोठं अकलेचं काम केलंय्. जा बघ मुलावर काही संकट न येवो!"

हे ऐकून यशोदेचं हृदय थरकापलं. ती एकदम किंचाळली. तिला आपल्या पदराचे वेणीचेही भान राहिले नाही. ती पळत सुटली.

इतक्या वेळात नन्द व आणखी काही गोपही तेथे पोचले. त्यांनी पाहिले कृष्ण त्या तुटलेल्या वृक्षांमधे असा बसला होता



की जणू काही मेघांमधे चंद्र चमकतो आहे. नन्दाने झटकन पुढे होऊन कृष्णाच्या कमरेतलं दावं सोडलं अन् त्याला उचलून घेत विचारलं–"याच्या कमरेत दाव कसं? उखळीशी याला दाव्याने कोणी बांधलं? यानें उखळ इतक्यात दूर ओढून कसं आणलं? एवढे मोठे वृक्ष कसे कोसळले? काय प्रकार आहे हा?"

यशोदेने येऊन सांगितले की तिनेच कृष्णाला दोरीने उखळाशी बांधले होते. आपल्या मुलाच्या बल-सामर्थ्यावर नंद मनोमन आश्चर्य-चकित व आनंदित झाला.

वृद्ध गोपाळांना काही समजलेच नाही. ते म्हणू लागले–"वादळी वारे नाहीत, तूफान नाही, वीज कडाडली नाही, एकादा हत्ती ही इकडे आलेला दिसला नाही. मग हे सर्व कसे! सेना इकडे आली नाही. अस काही ही घडलं नाही, मग या मुलाने हे प्रचंड वृक्ष कसे पाडले? याहून अधिक भयंकर उत्पात कोणता होऊ शकेल? अशी ही घटना पहिल्यांदाच घडली नाही ना? दुष्ट राक्षसी पूतना याच्या हातीच मारली गेली. काही कारण नाही, अन् भरभक्कम गाडीचे तुकडे-तुकडे झाले! इथं रहाणं ही धोक्याचं वाटू लागलं आहे. पण जिथे जन्मलो, लहानाचे मोठे झालो ते गाव सोडून जायचं कुठे?" असा विचार करीत सर्व लोक आपापल्या घरी निघून गेले.

दिवस जात राहिले. आता बलराम आठ वर्षांचा झाला. नि कृष्णाने आपल्या आयुष्याची सात वर्षे पूर्ण केली. दोघे आपल्या समवयस्क गोप-बालकां बरोबर खेळत, वासरांशी खेळत, मजेत दिवस घालवीत. हातांत शिळ्या भाताची शिंकी व चाबूक घेऊन बाहेर पडत, पायात पाद-त्राणे घालून चालू लागले की छोटया बटा हवेत मजेशीर उडत. तौफेर पसरलेल्या शेतात मोठ-मोठ्याने ओरडून शेळ्या-मेंढयांना पळवून लावीत. उत्साहाने गाणी गात नि झाडांवर चढत. मधाची पोळी दिसली की ती तोडून-फोडून त्यातील मध पिऊन घेत. शिळा भात खात. अशा प्रकारे या यादव बालकांना जीवन म्हणजे एक सोनेरी संधी वाटत असे.

एके दिवशी कृष्ण बलरामला म्हणाला–"दादा, आपण या वनात जन्मलो, इथेच आपले पालन-पोषण झाले. एकाच ठिकाणी अनेक वर्षे राहणे योग्य वाटत नाही. जनावरांनी कुरणातील सर्व गवत खाऊन टाकले आहे. झाडे तोडली जात आहेत. तलाव नि डबकी घाणेरडी होऊन तेथे दलदल निर्माण झाली आहे. भाजीपाला आणि जळाऊ लांकडांसाठी दूर दूर जावे लागत आहे. म्हणून आपण हा प्रदेश सोडून वृंदावनांत जाऊ या. तेथे फार सुन्दर वनश्री आहे असे लोक सांगतात. तेथे गोवर्धन नावाचा एक पर्वत आहे, या पर्वतावर भांडीर नावाचा एक महावटवृक्ष आहे. वृंदावनाच्या मध्य भागांतून कालिंदी नदी वहाते. तेथे जाऊन आरामात आपले जीवन कंठू. म्हातारी माणसे हे स्थान सोडायला सहसा तयार नसतात. त्याना भिववण्याकरता मी एक उपाय शोधला आहे. पहातच रहा आता!"

कृष्णाच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतच होते इतक्यात त्याच्या शरीरातून शेकडो-हजारोच्या संख्येने बोकडांचे कळपचे कळप



चारी बाजूस सैरा-वैरा पळू लागले. यामुळे गोपाळ भयभीत झाले, गाई घाबरून गेल्या. या बोकडांचा आकार काही असा-मान्य होता. त्यांची शिकार करणे गोपाळांना शक्य झाले नाही. वाघांशी ही सामना करणाऱ्या मस्त बैलांना या बोकडांनी मारून टाकले. गोपाळ तोंड फिरवून दूसरीकडे पाहतात तोवर या बोकडांनी वासरांना उचलून नेले. या उत्पाता बरोबरच रात्रीच्या वेळी वाघ-सिंहांचे गर्जन ऐकू येऊ लागले. मोठ-मोठी डुकरे येऊन खड्डे खणू लागली.

या सर्व घटनांनी चिंतित होऊन वयो-वृद्ध गोपाळ एका ठिकाणी जमले. यापूर्वी

पडलेल्या उत्पातांनी ते घाबरून गेले होते. तरी ही आपल्या गावाच्या मोहामुळे ते सोडून जाणें त्यांना शक्य नव्हते. आणि आता त्या सर्वांहून भयानक उत्पात होऊन राहिला होता. अशा स्थितीत यावेळी त्यांचे कर्तव्य काय?

"वृंदावन अत्यंत सुंदर आणि दिव्य आहे अशी प्रशंसा सर्वांच्या तोंडून आपण ऐकतो, पण दुसऱ्या बाजूला हे ही ऐकतो की तेथे दुर्गम प्रदेश आहेत, आणि त्यात राक्षस राहतात. कसं ही असलं तरी काही तरी केलंच पाहिजे. तावडतोब दुसऱ्या एकाद्या प्रदेशात गेलं पाहिजे, आता इथ क्षणभर राहणं शक्य नाही." वृद्ध मंडळींनी असा विचार केला.

ते लोक अशा प्रकारे विचार करीत होते, इतक्यात तेथे नारद मुनि येऊन दाखल झाले. त्यांनी नंद गोपाला बोलविले, बाजूला घेऊन जाऊन समजावले–"आपण सर्व जण वृंदावनात जाण्याचा संकल्प करीत आहात. पण तिथे राक्षस आहेत या विचाराने आपल्याला भीति ही वाटत आहे. ही गोष्ट खरी आहे ना की आपल्या पुत्राला राक्षसांपासून धोका आहे! ऐका, असे समजू नका की आपला मुलगा फक्त मानवच आहे. राक्षसांचा संहार करण्यासाठी अवतार घेतलेला तो आदि नारायण आहे. कृष्ण आणि बलराम सुद्धा नारायणाचे अंशस्वरूप आहेत. कृष्णाचा संहार करण्यासाठी राक्षसी पूतना, शकट आले पण त्याचा वध करू शकले नाहीत, उलट त्याच्या हातून मारले गेले. आपण या घटना प्रत्यक्ष पाहिल्या आहेत ना? म्हणून आपण कुठला ही संशय मनात न बाळगता खुशाल वृंदावनात जा. आपले कल्याणच होईल.

यानंतर नारदाने कृष्णाला ही हीच गोष्ट सांगितली आणि ते निघून गेले. इकडे नंद सर्व गोपाळांना सांगू लागले–आम्ही सर्व आता वृंदावनाकडे निघालो आहोत. आमचा हाच पक्का निश्चय आहे. म्हणून सर्व लोकांनी आता निघण्याची तयारी सुरू करावी.






विभ्रान्त नामक एका श्रीमंत गृहस्थाला एक भयानक आजार जडला. वैद्याच्या औषधाने ही आजार कमी न होता वाढतच गेला.

एक दिवस विभ्रान्त वैद्याला म्हणाला–"वैद्यराज, संपत्ति जोडता जोडता मी अनेक पापं केली. पुण्यकर्म एकही केलं नाही. माझी पापंच आता मला छळत आहेत. त्यामुळेच आपल्या औषधांचा काही प्रभाव पडत नाही."

वैद्याला समजून चुकले की विभ्रान्तला मानसिक व्यथाच जास्त आहे आणि त्यामुळेच औषधांचा काही उपयोग होत नाही. म्हणून त्याने विभ्रान्तला समजावले–"महाराज, आपण काळजी करू नका. मी आज आपल्या हातून पुण्यकार्य घडवायची व्यवस्था करतो. त्यामुळे तुमची सर्व पापं धुवून जातील. व मग औषधांचाही चांगला प्रभाव पडेल."

त्याच गावात प्रलोभ नावाचा एक गरीब शेतकरी रहात असे. त्याच्या कुटुंबात पत्नी व दोन मुले अशी चार माणसे होती. दरवर्षी तो खूप काबाडकष्ट करून आपल्या शेतीवाडीचे काम करी. पण शेवटी कापणीच्या वेळेपर्यंत काही न काही संकट येऊन त्याचे मोठे नुकसान होई. अनेक कारणांनी तो कर्जबाजारी झाला.

वैद्याने मनांत विचार केला की विभ्रान्तच्या हातून या प्रलोभवर काही उपकार करवावा. तो प्रलोभला विभ्रान्तकडे घेऊन जाऊन म्हणाला–"असं पहा साहेब, शंभर बिनगरजू लोकांना मदत करण्यापेक्षा एकाच गरजू माणसाला दान दिलंत तर आपल्याला अपार पुण्य लाभेल."

मग कसचं काय? विभ्रान्तने प्रलोभकडून त्याच्या सर्व अडचणींचा पाढा वदवून घेतला, त्याचं सर्व कर्ज फेडून टाकलं

संजीवनी गोखले

आणि एक वर्षभर पुरेल इतकी खाद्यसामग्री देऊन त्याला रवाना केलं.

यानतर मात्र विश्रान्तवर औषधांचा योग्य परिणाम दिसू लागला आणि आठ-वडाभरात तो खडखडीत बरा झाला.

विश्रान्त व वैद्य यांच्याकडून ही गोष्ट साऱ्या गावभर समजली.

"आम्ही सर्वजण नेहमी थोडंबहुत दान देतच असतो. पण आम्हाला कधी असला चमत्कार अनुभवास आला नाही. बहुधा या प्रलोभच्या अंगीच काही खास सामर्थ्य असले पाहिजे." गावच्या लोकात अशा प्रकारची चर्चा सुरू झाली.

ही वार्ता प्रलोभच्याही कानी आली. आता तोही आपली ही कहाणी सांगत दारोदार फिरू लागला. प्रलोभला दान देण्याने आपल्यावरच काही उपकार होईल किंवा काही चमत्कार घडेल अशा अपेक्षेने प्रत्येकजण त्याला थोडेबहुत दान देऊ लागला.

आता प्रलोभचे दिवस मोठ्या मजेत जाऊ लागले. मनात येईल तेव्हां तो आसपासच्या गावी हिंडे अन् आपली कहाणी सांगून लोकांकडून दान मिळवी.

"जरा ऐका बरं, लोभाला बळी पडून आजकाल तुम्ही भिकाऱ्यासारखे वागू लागला आहात. आता आपल्याला कशा-चीही कमतरता नाही. आपण पहिल्या प्रमाणे पुन्हा कष्ट करून जगू या"—प्रलोभच्या पत्नीने त्याला एकदा समज-वायचा प्रयत्न करीत म्हटले.

"काबाडकष्ट केले तोवर आपल्यावर नेहमी संकटेच येत गेली. उलट या धंद्यामुळे आपल्याला चांगले दिवस दिसत आहेत. मीही सुखात आहे."—प्रलोभ म्हणाला.

पण प्रलोभच्या पत्नीला हे रुचले नाही. ती म्हणू लागली—"असं पहा, आपण संकटात सापडलो होतो तेव्हा विश्रान्तने आपल्याला मदत केली, अन् म्हणूनच त्याच्या वाट्याला पुण्य आलं. आता आपल्याला कशाची आवश्यकता नाही, आपल्याला आता दान देण्याने कोणाला पुण्यप्राप्ती होणार नाही. ही गोष्ट लक्षात आल्यावर गावातल्या लोकांनी आपल्याला दान देणं बंद केलं तर आपली काय अवस्था होईल? माझं ऐका, आळशीपणा हा सर्वांत भयानक रोग आहे. एकदा हा रोग चिकटला की सुटणं कठीण!"

तरीही प्रलोभने आपल्या बायकोचं म्हणणं मनावर घेतलं नाही. तो आपल्याच पद्धतीने अर्थार्जन करीत राहिला.

काही दिवस निघून गेले आणि प्रलोभ एकदा आजारी पडला.

इकडे गावात अशी प्रथाच पडली होती की कोणी आजारी पडला की तो प्रलोभला काही दान देई अन् मगच औषधोपचार सुरू करी! आता प्रलोभला भ्रान्त पडली व त्याने वैद्याला विचारले—"वैद्यराज,





आता मीच आजारी पडलो. मी कुणाला काय दान देऊ?"

प्रलोभला सुयोग्य उत्तर देण्यासाठी विचार करीत असतानाच प्रलोभच्या पत्नीने वैद्याला खुणेने बाजूला बोलावून घेतले व म्हटले–"वैद्यमहाराज, प्रथम माझे पति मोठ्या प्रतिष्ठेने आपली काल-क्रमणा करीत असत. पण आता आपणच दान देववल्यापासून ते भिकाऱ्यांसारखे वागू लागले आहेत. मी खूप समजावले पण ते आपली सवय सोडायला तयार नाहीत. चार लोकात 'भिकाऱ्याची बायको' म्हणवून घ्यायला मला लाज वाटते. खरं म्हणजे आळशीपणामुळेच माझे पति आजारी झाले आहेत. आता आपण औषधाबरोबरच त्यांना असं पथ्य सांगा की जेणे करून त्यांचं हृदय-परिवर्त-नही होईल!

आता वैद्याला आपली चूक समजून आली! त्याने प्रलोभला म्हटले–"असं पहा, दानधर्म केल्याने आपल्याला नव्याने पुण्य मिळत नाहीं. त्याची केवल अदला-बदल होते. तू विभ्रान्त कडून दान घेतलेस म्हणून तुझं थोडंसं पुण्य त्याला मिळालं. त्यानंतर तू एकसारखं दान घेतच राहिलास. परिणामत: तुझं सर्व पुण्य हळूहळू खलास झालं आणि तू आजारी पडलास. मी ताबडतोब औषध देऊन आता तुला ठीक करीन. पण यानंतर ही तू दान घेत राहिलास तर तुला पुण्य सोडच, पाप मात्र लागेल! आणि त्यानंतर तू कोणतंही औषध घेतलंस तरी वाचू शकणार नाहीस?"

वैद्याचे हे बोलणे ऐकून प्रलोभ घाबरून गेला आणि त्याने शपथ घेतली की, "यापुडे कधीही, कोणाकडूनही, कसलेही दान घेणार नाही." नंतर वैद्यांच्या औषधाने तो लवकरच बरा झाला व पहिल्या प्रमाणे मेहनत करून जगू लागला.

यावेळी मात्र नशिबाने प्रलोभला साथ दिली, थोड्याच वर्षात तो चांगला धनवान झाला.





# अद्भुत वृक्ष

वैतरणी राज्याच्या राजा विष्णुवर्धन याला एकुलता एक पुत्र होता–राजवर्धन. विष्णुवर्धनने राजवर्धनचा यौवराज्याभिषेक-ही केला होता.

एक दिवस राजवर्धन एकांतात बसून आपल्या पूर्वजांचा इतिहास वाचत होता. त्यात एके ठिकाणी असे लिहिले होते की–वैतरणीच्या उत्तरेला एका जंगलात एक विषवृक्ष आहे. त्याच्या खाली उभे राहून कोणतीही इच्छा केली असता ती ताबडतोब पूर्ण होते. काही राजांनी या वृक्षाच्या मदतीने जनतेच्या अडचणी सोडवल्या व आपले राज्य सुसंपन्न बनवले.

हे वाचल्यानंतर राजवर्धनने दहा दिवस जंगल धुंडाळून त्या वृक्षाचा शोध लावला. तो वृक्ष आता झडून, वठून जाण्याच्या स्थितीला आला होता. त्या झाडाखाली उभे राहून राजवर्धनने सेनापती व मंत्री यांची रूपे घेण्याची इच्छा केली व तो त्या रूपात परिवर्तित झाला.

या अद्भुत परिवर्तनाने राजवर्धन चकित झाला! त्या वृक्षाच्या सामर्थ्याचा उपयोग करून आपल्या पूर्वजांप्रमाणे जनकल्याण साधून एक उत्तम व लोकप्रिय राजा बनण्याचा त्याने निश्चय केला.

दुसऱ्या दिवशी राजवर्धन उद्यानात फिरत होता. इतक्यात सेनापतीच्या पत्नीने तेथे येऊन त्याला म्हटले–"प्रभु, दोन दिवस झाले–माझी मुलं जेवली नाहीत."

सेनापती दोन दिवसांपूर्वीच सीमेवर नेमलेल्या सेनेचं निरीक्षण करण्यासाठी गेला होता. त्याच्या पत्नीचे बोलणे ऐकून राजवर्धनला एकदम जंगलातल्या त्या वृक्षाची आठवण झाली. त्याने सेना-पतीच्या पत्नीचे सांत्वन केले व तो जंगलाकडे चालू लागला.

समीर होनवाड



तिथे झाडाखाली राजवर्धनने सेनापतीचे रूप घेण्याची इच्छा केली व तो सेनापति बनून त्याच्या घरी गेला.

सेनापतिच्या रूपातल्या राजवर्धनला पाहून त्यालाच वडील समजून मुले त्याच्या पायांना बिलगली. आईने मोठ्या प्रसन्नतेने मुलांना जेवण वाढले व जवळ बसून राजवर्धन मुलांना भरवू लागला.

नेमक्या त्याच वेळी सीमाप्रान्तावर गेलेला सेनापति परत आला. आपल्या रूपातल्या दुसऱ्या प्राण्याला पाहून त्याला क्रोध आला व राजवर्धनला हातातील लाठीने पिटून काढत विचारले—"बोल दुष्टा, कोण आहेस तू?"

राजवर्धनला लाठीचा मार सहन झाला नाही. पुन्हा बरे होण्यास त्याला दहा दिवस लागले.

एक दिवस राजवर्धन जनतेची स्थिति पहाण्यासाठी वेष बदलून बाहेर पडला. एका घरातून पति-पत्नीच्या तीव्र शब्दातील वादावादीचा आवाज ऐकून भिंतीशी चिकटून त्यांच्यातील गोष्टी ऐकू लागला.

"पहा, या पोरीच्या वयाच्या सर्व मुलींची लग्नं झाली. आपल्या मुलीला काय आयुष्यभर असंच बिनलग्नाचंच रहावं लागणार काय?" अशा प्रकारे बायको नवऱ्याजवळ आपला राग प्रकट करीत होती.

"अग, जरा वाट पहा. रामदेवला येऊ दे. मग पहा, आपल्या मुलीचं लग्न कसं झटक्यात करून टाकतो ते!" नवरा म्हणत होता.

राजवर्धन तिथून निघून त्या गल्लीच्या कोपऱ्यावरून वळला, तेव्हा एका व्यापाऱ्याच्या घराजवळून जाताना त्यांचा संवाद ऐकू आला—

व्यापाऱ्याचा मुलगा आपल्या वडिलांना म्हणत होता—"रामदेव परतेपर्यंत काय आपण व्यापारधंदा बंद करून हातावर हात धरून बसून रहायचं काय?"

"त्याचं येणं अन् आपली संकटं संपणं काय शक्य आहे?" व्यापारी म्हणत होता.





हा संवाद ऐकल्यावर राजवर्धनच्या एक गोष्ट लक्षात आली—रामदेवच्या येण्याने दोन परिवारांच्या अडचणी दूर होणार आहेत. तेव्हा त्याने निश्चय केला की आपण रामदेवचे रूप घेऊन यांना मदत करावी. नंतर तो जंगलात गेला. त्या अद्‌भुत वृक्षाखाली उभे राहून त्याने रामदेवचे रूप धारण केले व तो परत आला.

खरा रामदेव थोड्याशा भांडवलातून समुद्री व्यापार करणारा एक व्यापारी होता. चन्द्रभानु नावाच्या एका माणसाने आपल्या मुलीच्या लग्नासाठी साठवून ठेवलेले दहा हजार रुपये रामदेवने व्याजाचे आमिष दाखवून त्याच्याकडून व्यापारासाठी घेतले होते. नंतर पूर्वेकडे जाणाऱ्या जहाजातून माल घेऊन जाऊन पूर्व-द्वीपांवर व्यापारात त्याने सर्व काही घालवले, तेथून परत येऊन कर्जदात्यांना आपला चेहरा दाखवणे अशक्य झाल्यामुळे त्याच द्वीपांवर मेहनतमजुरी करून तो तिथेच स्थिरावला.

इकडे रामदेवच्या वेशातला राजवर्धन प्रथम व्यापाऱ्याच्या घरी पोचला. दरवाज्यावर ठकठक केल्यावर जेव्हा त्याने दरवाजा उघडला तेव्हा तो व्यापाऱ्याला विचारू लागला—"काय, कसं काय? सर्व खुशाल आहे ना?"

रामदेवला ओळखून व्यापाऱ्याने त्याला घरात घेतले. नंतर बापलेकांनी मिळून त्याला चांगले पिटून काढले, नि म्हटले—"व्याजासहित आमची सर्व रक्कम आत्ताच्या आत्ता परत दे."

खरी गोष्ट समजल्यावर आता राजवर्धन चमकला! या अवधीत व्यापाऱ्याच्या मुलाने घरातून निघून चन्द्रभानुलाही बोलावून आणले. चन्द्रभानुनेही आत येताच राजवर्धनला चांगले बुकलून काढले. व म्हटले—"तू गोडगोड बोलून दहा हजार रुपये हडपलेस, चल राजाकडे. तिथेच याचा निकाल करू." असे म्हणत चन्द्रभानु राजवर्धनला राजवाड्यात घेऊन गेला.



तेथे मंत्र्याने चन्द्रभानुच्या तोंडून तक्रार ऐकून म्हटले—"हे बघ, आत्ता राजेसाहेबांची तब्येत ठीक नाही. युवराजही कुठे बाहेर गेले आहेत. तेव्हा आत्ता तात्पुरते मी याला तुरुंगात बन्द करून ठेवतो." असे म्हणून मंत्र्याने राजवर्धनला शिपायांच्या ताब्यात दिले.

तुरुंगात बंदिस्त झालेल्या राजवर्धनने पहाऱ्यावरच्या एका शिपायाची याचना करून मंत्र्याला बोलवून घेतले आणि त्याला सर्व हकीकत सांगून आपली सुटका करून घेतली.

काही दिवस गेले आणि राजवाड्यात विचित्र प्रकारे चोऱ्यांचे सत्र सुरू झाले. एकदा कोषागारातून मोठी रक्कम चोरीला गेली, तर आणखी काही दिवसांनी एकदा राणीच्या दागिन्यांची पेटीच गायब झाली!

चोराला कोणीच पकडू शकले नाही. आता राजवर्धन स्वतःच त्या कामाला लागला. एके दिवशी कुत्र्याचे रूप घेऊन तो राजवाड्याच्या प्रवेशद्वारी पहारा करत उभा होता, इतक्यात एक चोर मोठेसे गाठोडे घेऊन जाताना त्याला दिसला. जोरात भुंकून त्याने चोरावर हल्ला केला. पण चोराने त्या कुत्र्याला एक दगड फेकून मारला व स्वतः पळून जाऊ लागला. राजवर्धनही भुंकत भुंकत त्याचा पाठलाग करू लागला. चोर सेनापतीच्या घराकडे पळाला व तिथे पोचल्यावर त्याने चोराचे रूप टाकून सेनापतीचे रूप घेतले व घरात गेला.

राजवर्धनला खरी गोष्ट समजून चुकली. अद्‌भुत वृक्षाचे रहस्य जाणून सेनापती आता राजद्रोह करीत आहे हे त्याला कळले.

राजवर्धन लगेच कुत्र्याचे रूप टाकून युवराज बनला व त्याने शिपायांकरवी सर्व हकिकत आपल्या वडिलांच्या कानावर घातली. राजाने ऐकून राजवर्धनला म्हटले—"ऐक बेटा. तो वृक्ष अद्‌भुत सामर्थ्यवाला नसून एक निरर्थक वृक्षच असला पाहिजे. ताबडतोब तो कापून टाक."



पण ते अमान्य करीत राजवर्धन म्हणाला—"बाबा, आपल्या पूर्वजांपासून हा वृक्ष आपले रक्षण करीत आला आहे. त्या वृक्षाकडून आपल्या अहितापेक्षा अधिक हितच होण्याची शक्यता आहे. आपण असं करू—त्या वृक्षाभोवती आपण पहारा बसवू, म्हणजे कोणी त्याच्याजवळ फिरकू शकणार नाही."

दुसऱ्याच दिवसापासून त्या वृक्षाभोवती कडक पहारा बसला.

एक महिना गेला आणि एके रात्री राणीच्या डोक्यात असह्य वेदना होऊ लागल्या. राजवैद्याने तपासून म्हटले—"हा रोग हटवण्यासाठी रामसहाय नावाच्या लाकुडतोड्याच्या मदतीची आवश्यकता आहे. तो बऱ्याच दिवसांपासून कोठे दिसत नाही. त्याचा शोध घ्यायला हवा."

राजवर्धनने रामसहायचा सर्वत्र शोध करवला पण त्याचा पत्ता लागेना! शेवटी चिडून त्यानेच रामसहायचे रूप धारण केले व तो राजवैद्याकडे गेला.

वैद्याने त्याला सांगितले—"रामसहाय, तुला देवकण्हेर माहीत आहे? त्याच्या मुळांची मला फार जरूरी आहे. राणीच्या औषधासाठी मला ती हवी आहे."

राजवर्धन जंगलात गेला. पण त्याला देवकण्हेरीबद्दल काहीच माहिती नव्हती.



म्हणून तो झाडझाडोरा धुंडत राहिला. राजवर्धन कैदेत असताना मंत्र्याने त्याच्याकडून विषवृक्षाबद्दल ऐकले होते. तेव्हापासून मंत्री स्वतःच राजा बनण्यासाठी संधी शोधत होता. त्या वृक्षाच्या पहारेकऱ्यांना फितवून त्याने स्वतःच तेथे जाऊन राजाचे रूप धारण केले व त्याने असा विचार केला की आता जर तो वृक्षच कापून टाकला तर भविष्यात कोणीही रूप परिवर्तन करू शकणार नाही. त्याने तो विचार लगेच अंमलात आणला व पहारेकऱ्यांना वृक्ष कापण्याची आज्ञा दिली.

परंतु शिपायांपैकी कोणीही हे कृत्य करायला पुढे होईना. ते म्हणू लागले—

"हा अद्‌भुत वृक्ष कापणे म्हणजे आणून बुजून अनर्थ ओढवून घेणे होय. हे काम कृपा करून आमच्याकडून करवू नका."

"मग एक काम तरी करा. इथे आसपास कोणी लाकूडतोड्या दिसला, तर त्याला माझ्याकडे घेऊन या." मंत्री म्हणाला.

शिपायांनी जाऊन रामसहायच्या रूपातल्या राजवर्धनला आपणाबरोबर येण्याची विनंती केली. व त्याला ते मंत्र्याकडे घेऊन गेले. पण त्यानेही तो वृक्ष तोडायला नकार दिला.

राजाच्या रूपातल्या मंत्र्याने म्हटले– "तू माझी अशी अवज्ञा करतोस?" असे म्हणत त्याने शिपायांना त्याला चाबकाने मारायची आज्ञा दिली. शिपाई चाबूक उगारणार इतक्यात राजवर्धनने कुऱ्हाडीने त्या अद्‌भुत वृक्षाचो खांडे करून टाकली. दुसऱ्याच क्षणी रामसहायमधील राजवर्धनला निजरूप प्राप्त झाले. हे पहाताच मंत्री तिथून पळून गेला व शिपायांनी राजवर्धनच्या पायांवर लोटांगण घेऊन क्षमा मागितली.

नंतर राजवर्धन राजवाड्यात परत आला. त्याने राजाला मंत्र्याच्या द्रोहाची हकीकत सांगितली व अद्‌भुत वृक्ष कापून त्यांची राख बनल्याचा वृत्तान्तही सांगितला. हे सर्व ऐकून राजा म्हणाला–"ऐक बेटा, तो रामसहाय कुठे आहे त्याचा शोध घे आणि तुझ्या आईचं औषधपाणी करव. या साऱ्या गोंधळाचं मूळ कारण म्हणजे आपल्या वंशाच्या इतिहासाबद्दलची ती ताडपत्रच आहेत. ती आणखी कोणाच्या नजरेस पडू नयेत म्हणून कुठेतरी लपवून ठेव."

या घटनांमुळे राजवर्धनचे डोळे उघडले. आपल्या वडिलांच्या पश्चात तो राजा बनला. तो स्वतःच्या शक्तीवर आता जास्त विश्वास ठेवू लागला व मंत्र-तंत्रांच्या सामर्थ्याबद्दल त्याने कधी पुन्हा 'ब्र' म्हणून काढला नाही.






# माकडचेष्टा

एका गावात एक म्हातारा माणूस रहात असे. एक दिवस बायकोने दिलेली थालिपिठांची पिशवी घेऊन जवळच्या डोंगरावर गवत कापायला गेला. तेथे त्याने थालिपिठांची पिशवी एका झाडाला टांगून ठेवली व तो गवत कापू लागला. इतक्यात कुठूनशी एक माकडांची टोळी आली व झाडाला टांगलेली पिशवी काढून त्यातली सर्व थालिपिठे त्यांनी खाऊन टाकली.

हे सर्व दृश्य पाहूनही म्हातारा न हालता गप्प बसून राहिला. माकडांनी एक पुतळा समजून त्याच्या भोवती थोडी किचकिच केली. नंतर काही निश्चय करून ती त्याच्या अगदी जवळ गेली. त्यांनी म्हाताऱ्याला उचलले व जवळच्या एका उजाड झालेल्या मंदिरात घेऊन गेली. तेथे माकडांनी त्याला एका पायरीवर बसवले.

नंतर सर्व माकडे निघून गेली. आणि थोड्याच वेळात मुठी भरभरून नाणी घेऊन आली. ती नाणी म्हाताऱ्यासमोर पसरून टाकून ती तेथून निघून गेली.

तोपर्यंत म्हातारा डोळे बंद करून न हलता-डुलता बसून होता. बहुधा येणारे जाणारे लोक देवासमोर पैसे फेकताना माकडांनी पाहिले असावे व ते पैसे उचलून त्यांनी ते कुठे सुरक्षित लपवून ठेवले असावेत. आता तेच पैसे त्यांनी म्हाताऱ्या-समोर पसरून टाकले होते!

माकडे निघून गेल्यावर म्हातारा या माकडचेष्टांना मनातल्या मनात हसला. काही घडले असो–आज त्याचे नशीब शिकंदर होते! मोठ्या सावधपणे म्हाताऱ्याने ते पैसे वेचून घेतले. घरी परतताना त्याने स्वतः व बायकोसाठी काही कपडे खरेदी केले. उरलेले पैसे त्याने बायकोच्या हवाली

'चांदोबा' मधे २५ वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट

केले व पक्वान्न बनवून दोघे पोटभर जेवले.

हे जोडपे जेवत असतानाच त्यांची एक म्हातारी शेजारीण तेथे आली. तिने आश्चर्याने विचारले–"अरे, आज काय विशेष? तुम्ही दोघं नवे कपडे घालून ऐटीत बसून मेजवानी झोडताय?"

म्हाताऱ्याच्या बायकोने शेजारणीलाही पक्वान्न खाऊ घातले आणि माकडांची कहाणीही सांगितली.

गोष्ट ऐकून शेजारीण भराभरा आपल्या घरी गेली आणि आपल्या नवऱ्याला सर्व हकीकत सांगून म्हणाली–"तुम्हीही उद्या डोंगरावर जाऊन माकडांकडून पैसे घेऊन या."

या म्हाताऱ्याने आपल्या बायकोचे म्हणणे कबूल केले. दुसऱ्या दिवशी शेजारीण म्हातारीनेही आपल्या नवऱ्याला थालिपिठे करून दिली. थालिपिठांची पिशवी घेऊन हा म्हाताराही तिथे पोचला. झाडाच्या फांदीला पिशवी अडकवून तो एका जागी पुतळ्यासारखा बसून राहिला.

थोड्या वेळात माकडेही येऊन पोचली. थालिपिठे सफाचट करून पुतळ्यासारख्या बसलेल्या बुड्ढ्याजवळ आली. त्यांनी त्याला तिथेच खाली आपटले. त्याच्या डोक्यावर जोरात टपला मारल्या, त्याचे केस उपटले आणि नखांनी ओरबाडून त्याच्या शरीराची चाळणी केली. नंतर उड्या मारत गडबड करत ती तेथून निघून गेली.

म्हाताऱ्याच्या अंगातून रक्त येऊ लागले, वेदना होऊ लागल्या, कसा तरी विव्हळत पाय ओढत तो आपल्या घरी पोचला. मधल्या अवधीत त्याच्या म्हातारीने आपले जुने कपडे जाळून टाकले. आता आपला नवरा नवे कपडे घेऊन येईल, ते घालून आपण सर्वत्र मिरवू-असा विचार करीत ती नवऱ्याची वाट पहात बसली होती. पण आता आपल्या नवऱ्याला अशा जखमी अवस्थेत येताना पाहून, घाबरून तिची दातखीळच बसली.



## नैसर्गिक आश्चर्ये:





### लांब दात

अमेरिकेतील मॅसाच्युसेट्स् व्हेलिंग संग्रहालयात खूप लांब अशा दातांची एक जोडी आहे. व्हेल माशाच्या भकरा इंच लांबीच्या या दाताचे वजन ३.८८ कि. ग्रॅम आहे.

### धोका

घरात सर्वसाधारणतः सापडणाऱ्या माशा या जगातील अत्यंत भयानक असे आजार निर्माण करतात. कॉलरा, टायफॉईड, प्लेग यांसारखे तीस प्रकारचे भयानक रोग या माशांमुळे फैलावतात.





### 'ओपोसम्'

अमेरिकेत आढळणारा 'ओपोसम्'–एक रानमांजराच्या जातीचा प्राणी आहे. कोणी शिकारी आपला पाठलाग करीत आहे असे त्याला वाटले, तर तो मेल्याचे सोंग करून पडून रहातो!



# चांदोबा

मार्च 1988



## अनुक्रमणिका





एक प्रत : २-५०
वार्षिक वर्गणी : ३०-००




# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी

खरे पाहता कोणत्याही विद्येबद्दल जिज्ञासा असणारा कोणीही विद्यार्थी घाईघाईने एकाद्या गुरुच्या आश्रयाला जात नाही, योग्य गुरु कोणता या गोष्टीचा विचार करून मगच त्याचा शिष्य बनतो. गुरूच्या बाबतीतही हाच निर्णय लागू पडतो. ते सुद्धा शिष्य होण्यासाठी आलेल्या विद्यार्थ्यांची योग्यता पारखून पहातात. ही गोष्ट 'महान् शिष्य' या गोष्टीवरून चांगल्या प्रकारे समजून येईल.

### अमर वाणी

अश्वः शस्त्रं शास्त्रं वीणा, वाणी नरश्च नारी च ।
पुरुष विशेषं प्राप्ता, भवन्ति योग्या अयोग्याश्च ॥

[घोडा, आयुध, शास्त्र, वीणा, वाणी इत्यादींचा उपयोग व स्त्री-पुरुष यांचे प्रयोजन, त्यांचा उपयोग करणाऱ्या व्यक्तीच्या सामर्थ्यावर आधारित असते.]

वर्ष : ३७ मार्च १९८८ अंक : ९
एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००



### बुडलेल्या जहाजातील खजिना

१५ एप्रिल १९१२ ला सकाळी २-२० वाजता त्या काळचे सर्वात मोटे असलेले 'टिटॅनिक' नावाचे जहाज आपली पहिली यात्रा करत असतानाच बुडले. त्या अपघातात १,५१३ माणसे मृत्युमुखी पडली. थोड्या दिवसांपूर्वीच काही लोकांनी सात आठवडे मन लावून मेहनत करून अटलांटिक सागराच्या तळाशी सुरक्षित असलेल्या या जहाजातून शेकडो वस्तु काढून फ्रान्सच्या किनाऱ्यावर पोचवल्या !

### गेण्डा झिंदाबाद !

दिवसेंदिवस गेण्डयांची जात समाप्त होत आहे. त्यांच्या पिल्लांच्या रक्षणाचा प्रचार करण्यासाठी झिंबाबवेच्या चार्ली हेवार्ट आणि ज्यूली एडवर्डस् नावाच्या दोन मुली लंडनहून हरारेकडे सायकलवरून जात आहेत. नार्वे, स्वीडन, डेन्मार्क, पश्चिम जर्मनी, नेदरलॅण्डस्, फ्रान्स, स्वित्झरलंड, इटली, इजिप्त इत्यादी देशातून भ्रमण करून जे पैसे जमा होतील, ते त्या झिंबाब्वे नॅशनल कन्झर्व्हेशन ट्रस्टच्या हवाली करणार आहेत.





### सूर्याला वेढणारे रंगीत वलय

दोन तासपर्यंत सूर्याला वेढून राहिलेल्या इंद्रधनुषी रंगाच्या वलयाबद्दल नुकतीच माहिती मिळाली आहे. इंदूरच्या होळकर सायन्स कॉलिजचे प्रोफेसर राम श्रीवास्तव यांना सर्वात प्रथम या संबंधी शोध लागला. ३०० वर्षांपूर्वी ब्रिटिश वैज्ञानिकांनी आपल्या अभ्यासातून ही गोष्ट शोधून काढली होती की–पृथ्वीपासून १५ कि. मि. अंतरावर असणाऱ्या ढगांतील दवबिंदूतून सूर्यकिरण जाताना त्यांचे वक्रीभवन होते व त्यामुळे असे विभिन्न रंगांचे वलय तयार होते.

### हुशार मुले

ब्रिटन मध्ये नुकत्याच झालेल्या एका पाहणीत एक गोष्ट माहीत झाली–या पिढीतील मुले तत्सम वयाच्या त्यांच्या आजी-आजोबांहून अधिक बुद्धिमान आहेत. एका मानसशास्त्रज्ञाने बुद्धिमत्तेबाबत संशोधन केले. त्याने आपल्या निष्कर्षांची तुलना १९३६ सालच्या निष्कर्षांशी केली. तेव्हां त्याला वरील गोष्ट माहित झाली.



# कलावती

काशी-नरेशच्या मुलीचे नाव होते कलावती. ती अत्यंत सौंदर्यवती, गुणवती व देवभक्त होती. ती लहान असतानाच एकदा दुर्वास मुनींनी तिला पंचाक्षरी मंत्र दिला. ती अत्यंत भक्ती व श्रद्धापूर्वक तो मंत्र जपत शिवपूजा करीत असे. ती उपवर झाल्यावर मथुरेचा राजा दशार्ह याच्याशी तिचा विवाह झाला.

सुरुवातीला दशार्ह फार सुशील व सदाचारी होता. परंतु पुढे सत्ता व अधिकाराच्या गर्वाने तो अंध झाला. तो भोगविलासी बनला, पापकर्म करु लागला! या गोष्टी समजल्यावर कलावती अतिशय दुःखी झाली. परंतु अत्यंत पवित्र आचरण करणाऱ्या आपल्या पत्नीकडे मात्र डोळे उघडून पहाण्याचे धैर्य त्याच्यात नव्हते.

कलावतीने पतीला योग्य मार्गावर आणण्याचा निश्चय केला. एके दिवशी पतीसह ती महामुनी गर्ग यांच्या आश्रमात गेली व सर्व वृत्तान्त तिने मुनींना सांगितला. गर्गमुनींनी राजाला जवळच्या कालिन्दी नदीत स्नान करुन येण्याची विनन्ति केली. राजा आश्रमातील शान्त वातावरणावर अतिशय मुग्ध झाला. आपल्या गतजीवनाचे स्मरण आल्यावर त्याला पश्चात्ताप झाला व मोठ्या भक्तिपूर्वक त्याने नदीत स्नान केले. दुसऱ्याच क्षणी कावळ्याच्या रूपाने त्याची सर्व पापे उडून गेली. अतिशय निर्मळ हृदयाने राजा नदीच्या बाहेर आला व त्याने मुनींच्या चरणांना स्पर्श करुन नमस्कार केला. गर्गमुनींनी त्याला मंत्रोपदेश दिला. यानंतर राजधानीला जाऊन कलावतीबरोबर तो पवित्र जीवन चालवू लागला.





# राजा व पंडित

चित्रगिरि राज्याच्या राजांना एक विचित्र रिवाज पाळावा लागे. तो रिवाज असा होता की—दर दहा वर्षांनी राजाला स्वतःला सर्व प्रकारच्या क्षत्रीय विद्यांच्या चढाओढीत भाग घ्यावा लागे व त्या चढाओढी जिंकाव्या लागत. असे न घडता, दुसऱ्या कोणी राजाला पराजित केले तर तो जिंकणारा प्रतिस्पर्धी चित्रगिरिचा राजा म्हणून निवडला जात असे.

या रिवाजाप्रमाणे चित्रगिरीवर दहा वर्षे राज्य केलेल्या राजाला सर्व जनतेसमोर स्पर्धेत उतरावे लागले. तीन प्रतिस्पर्धी या चढाओढीसाठी आले होते. त्या तिनापैकी दोन वीरांना राजाने पराजित केले. परंतु तिसरा वीर मुनिराम याच्याकडून मात्र राजा स्वतःच पराजित झाला. मग काय अवकाश! मुनिराम आता 'मुनीन्द्रवर्मा' या नावाने चित्रगिरिचा राजा बनला. चित्रगिरिच्या दरबारात उद्दण्डभट्ट नावाचा एक प्रमुख पंडित होता. तो जितका बुद्धिमान व महापंडित होता, तितकाच रागीटही होता. इतर लोक कितीही महान् असले तरी त्यांच्यापुढे नतमस्तक होणे उद्दण्डपंडिताला मान्य नसे.

मुनीन्द्रवर्माने प्रथमच जेव्हा राजसभा बोलावली, तेव्हा तेथील प्रथेप्रमाणे उद्दण्डपंडिताने राजाची स्तुति केली—"महाराज, बलपराक्रमात आपण बलरामाप्रमाणे आहात, साहसात आपण अभिमन्यु व युद्धविद्येत प्रत्यक्ष अर्जुनच आहात."

राजाने दरबारी पंडिताची ही स्तुति ऐकून घेतली, क्षण दोन क्षण त्याच्याकडे निरखून पाहिले व तो जोरजोरात हसू लागला!

"माफी असावी महाराज. पण आपल्या या अनपेक्षित हसण्याचे कारण मला कळेल?" उद्दण्डभट्टने आश्चर्याने विचारले.

ननु अभ्यंकर



"ठीक आहे, जरूर सांगतो मी कारण. पण त्यापूर्वी मला तुमच्याबद्दल थोडी माहिती हवी. दरबारी पंडित बनण्यासाठी आपण जे जे प्रयत्न केले, त्याबद्दलची माहिती आपण या सभेसमोर सांगू शकलात तर ती ऐकायची माझी इच्छा आहे." मुनीन्द्रवर्मा म्हणाला.

राजाच्या प्रश्नाला उत्तरादाखल आपण दरबारी पंडित बनण्यासाठी केलेल्या प्रयत्नांचे वर्णन उद्दण्डभट्टाने असे केले–"राजा, माझा जन्मच एका पंडित कुटुंबात झाला, माझे वडील एक विख्यात पंडित आहेत. त्यांनी मला विद्याभ्यासासाठी नृसिंहशास्त्री नावाच्या एका गुरूकडे पाठवले. मी खूप मेहनतीने त्यांची सेवा केली. मी नृसिंहशास्त्रींजवळ राहून वेद, उपनिषदे व अनेक महान् ग्रंथांचे अध्ययन केले. अशा प्रकारे सर्व विद्यांचे अध्ययन करून वीस वर्षांनी मी गुरुकुलातून बाहेर पडलो. यानंतर माझ्या विद्येचे प्रदर्शन करून मी चित्रगिरीच्या राजाकडून मोठा सन्मान मिळवला व त्यांच्याच विनंतीवरून इथे दरबारी पंडित बनलो."

उद्दण्डभट्टाची ही सर्व हकीकत ऐकून राजा मुनीन्द्रवर्मा म्हणाला–"पंडित बनण्यासाठी निरंतर वीस वर्षे तुम्ही जे कष्ट केलेत त्याचे वर्णन ऐकून मला तुमची दयाही येते व हसूही येते. कारण राजा बनण्यासाठी मी तर केवळ तीनच वर्षे श्रम केले. मग आपणच सांगा ही गोष्ट हास्यास्पद नव्हे तर काय! आपण माझी हकीकत ऐकाल तर आश्चर्यचकितच व्हाल."

यानंतर मुनीन्द्रवर्म्याने आपला वृत्तान्त या शब्दात सांगितला–"माझा जन्म एका परीट कुटुंबात झाला. परंतु आपण दुसरा कोणता तरी व्यवसाय करावा अशी माझी लहानपणापासूनच तीव्र इच्छा होती. अशा स्थितीत एक दिवस क्षात्रविद्येत प्राविण्य मिळवलेला एक मल्ल युद्धात सर्वांचा पराभव करीत करीत माझ्या गावी येऊन पोचला. खड्गविद्येत थोडाफार





प्रवेश केलेल्या माझ्या गावच्या मल्लांशी लढून त्याने त्यांचा पार धुव्वा उडवला! त्यावेळी त्या नव्या मल्लाची कुशलता मी ओळखली व माझ्या मनात आले की आपण त्याच्या शिष्य बनून त्याच्याबरोबरच राहू. दुसऱ्याच दिवशी मी त्याची भेट घेतली व त्यानेही शिष्य म्हणून माझा स्वीकार केला! तीन वर्षे मी त्याच्याबरोबर फिरून त्याच्याजवळच्या सर्व क्षात्रविद्या शिकून घेतल्या व त्याच्यासारखाच योद्धा बनलो. त्यानंतर मी इथल्या चढाओढीत भाग घेतला व राजा बनलो."

अशा प्रकारे आपली हकीकत सांगून मुनीन्द्रवर्मा पुढे म्हणाला–"अशा प्रकारे फारच सहजपणे राजा बनलेल्या मला आत्ता हे विशाल चित्रगिरि राज्य, इथली सारी संपत्ती, हे सर्व सेवक-सैनिक प्राप्त झाले आहे, सर्व माझ्या अधीन आहे! भगीरथ प्रयत्नांनी पंडित बनलेल्या आपणालाही माझ्या संकेतानुसार, माझ्या आज्ञेत रहायची पाळी आली ना? मग आता तुम्हीच सांगा की राजा मोठा की पंडित?"

हा प्रश्न ऐकून उद्दण्डभट्ट हसून बोलला–"महाराज, वर्तमान, भूत व भविष्याचे ज्ञान लोकांना आमच्यामुळेच मिळते. तिथि, वार, नक्षत्रे यांच्या द्वारा आम्ही काळावर नियंत्रण मिळवू शकतो. आमचे बुद्धिसामर्थ्य अपार असते. वय वाढले तसतशी बुद्धि व ज्ञान वाढत जाते, तीक्ष्ण होते. परंतु आपण ज्या क्षात्रविद्यांचा उल्लेख केला त्या मात्र वाढत्या वयाबरोबर निरुपयोगी होत जातात. राज्य हे वीरानेच भोगायचे असते, म्हणूनच आपण जोपर्यंत वीर असता तोपर्यंतच आपण राजा म्हणून राज्य उपभोगू शकता. यानंतर ते राज्य इतरांच्या हातात जाते. पंडित लोक आपणासमोर हात जोडून, नतमस्तक होऊन, उभे राहतात व आपला विनय प्रदर्शित करतात, ते आपल्याकडून दया वा प्रेमाची अपेक्षा करण्याकरता नव्हे! विद्यासौरभामुळे मिळा-



लेला तो एक गुण असतो–विद्या ‘विनयेन शोभते!’ आता आपणच सांगा–पंडितच राजापेक्षा मोठा की नाही ते!"

यावर मुनीन्द्रवर्मा म्हणाला–"आपले म्हणणे मला नीटसे समजले नाही. मला फक्त इतकेच समजते की मोठ्यात मोठ्या पंडितालाही वैभवसंपन्न माणसासमोर हात जोडूनच उभे रहावे लागते! उलट संपन्न माणसाला मात्र पंडितासमोर कधीही हात जोडायची वेळ येत नाही."

उद्दण्डभट्ट यावर रागाने उत्तरला–"आपण चूक करत आहात महाराज. असेही कधी कधी काही जरूर घडू शकते. प्रत्येक वेळी पंडित हाच राजापेक्षा श्रेष्ठ ठरतो."

"केवळ तोंडाने बोलून नाही चालणार. आपल्या या म्हणण्याच्या पुष्टीसाठी पुरावाही पाहिजे. पंडित हा राजापेक्षा श्रेष्ठ आहे ही गोष्ट आपण सिद्ध करू शकलात तर मी मोठ्या आदरपूर्वक आपला सन्मान करीन. सोन्याच्या घंगाळात आपले पाय धुवून मी आपल्या पायांत सोन्याचे कडे घालीन याशिवाय आपणाला पालखीत बसवून राजधानीच्या रस्त्यावर मी त्या पालखीला खांदा देईन. पण आपण पंडिताचे श्रेष्ठत्व सिद्ध करू शकला नाहीत तर चित्रगिरिच्या दरबारातून पंडित हे पदच रद्द केले जाईल. यासाठी मी आपणाला एक महिन्याची मुदत देत आहे. तोपर्यंत मी आपणाला राजसभेतून काढून टाकत आहे." मुनीन्द्रवर्माने रागाने फर्मावले.

सभेतून काढून लावल्यावर उद्दण्डभट्ट घरी गेला. खूप विचार करूनही ‘राजापेक्षा पंडितच श्रेष्ठ’ हे कसे सिद्ध करून दाखवावे हे त्याला कळेना! या उलट सामंतावर राजाचा कसा अधिकार असतो, दुर्बलावर बलवान कशी कुरघोडी करू शकतो किंवा निर्धनावर धनवानाचा प्रभाव कसा पडतो हे दाखवून देणे सोपे आहे असे त्याला वाटले.

याच काळात कलिंग देशातून विमलवाचस्पति नावाचा एक पंडित मुनीन्द्रवर्माच्या दरबारात आला व त्याने निवेदन केले की–"महाराज, मी आपल्या शत्रुदेशातून–कलिंगहून–आलो आहे. मी अनेक राज्यात जाऊन तिथल्या पंडितांना हरवले आहे. आपल्या दरबारातला कोणी एकादा पंडित मला वादात हरवू शकला तर ठीक आहे. अन्यथा आमचा राजा अपार सैन्यबळ आणून आपल्या राज्यावर हल्ला करील. हे आव्हान देण्यासाठीच त्यांनी मला पाठवले आहे. जर आपल्याकडील पंडित मला हरवू शकला तर आमच्या देशाच्या सीमेवरील पन्नास गावे आपल्या राज्याला जोडून दिली जातील?"

मुनीन्द्रवर्माने आपल्या दरबारातील चार-पाच पंडितांना विमलवाचस्पतीशी वेदान्त चर्चा करायची आज्ञा केली. परंतु ते सर्वजण विमलवाचस्पतीच्या हातून पराजित झाले. यानंतर मुनीन्द्रवर्माने मंत्र्यांशी बोलणे केले. त्या सर्वांनी एका स्वरात सल्ला दिला–"महाराज, उद्दण्डभट्ट सोडून दुसरा कोणीही पंडित याला जिंकू शकणार नाही."

राजाने उद्दण्डभट्टला पाचारण केले, येऊन कलिंग-पंडिताशी शास्त्रार्थचर्चा सुरू केली. त्यांचे वाग्युद्ध इतर सभासदांबरोबरच राजाने ही मंत्रमुग्ध होऊन पाहिले!

थोड्याच वेळात विमलवाचस्पति उद्दण्डभट्टकडून पराजित झाला व त्याने आपली मान खाली घातली!

मुनीन्द्रवर्माला परमानन्द झाला, व तो सिंहासनावरून खाली उतरला. त्याने तावडतोब उद्दण्डभट्टाचे पाय धुवून त्यावर सोन्याचे कडे चढवले, व म्हटले–"मी अज्ञानाने आपला अपमान केला याबद्दल फार दिलगीर आहे. वैभव, ऐश्वर्य व राजत्व श्रेष्ठ मानून मी आपल्या खऱ्या विद्वतेची अवहेलना केली. परंतु या अनुभवाने माझ्या डोळ्यांत अंजन घातले!" असे म्हणून त्याने उद्दण्डभट्टला पालखीत बसवले. इतर कहारांबरोबर राजानेही पालखीला खांदा दिला. पालखी राजरस्त्यांवरून मिरवून राजाने पांडित्याला सर्वश्रेष्ठ स्थान दिले.












# महान् शिष्य

उज्जयिनी शहराजवळच्या पहाडी प्रदेशात महापंडित प्रज्ञासागर यांचा आश्रम होता. प्रज्ञासागरने केवळ वेद, वेदांग व उपनिषदांचाच नव्हे तर सर्व शास्त्रांचा अभ्यास केला होता.

प्रज्ञासागरचे शिष्यत्व प्राप्त करून सर्व विद्यांचे अध्ययन करावे या इच्छेने अनेक लोक त्यांच्याकडे येत असत. अशा लोकांना प्रज्ञासागर आपल्या आश्रमाच्या एका कोपऱ्यातील खडकाळ जमीन दाखवून आपली अट सांगत असत—या जमिनीत जो विहीर खोदून दाखवील त्यालाच मी माझा शिष्य बनण्यास योग्य व्यक्ति समजेन.

प्रज्ञासागर अशी विचित्र अट का सांगत कोणाला समजेना.

एकदा गांधार देशातील गौरांग नावाच्या पंडिताने देशाटन करता करता प्रज्ञासागर बद्दलची ही हकीकत ऐकली. त्यांनी प्रज्ञासागर यांना भेटून स्वतःला आपला शिष्य बनवून घेण्याची विनंति केली. गौरांगबरोबर त्यांचा शिष्य विद्यानिधि ही होता.

आपल्या नियमाप्रमाणे गौरांगनाही प्रज्ञासागर यांनी खडकाळ जमिनीत विहीर खोदण्याची अट सांगितली.

ही अट ऐकून गौरांगना आश्चर्य वाटले. ते म्हणाले—"मी स्वतः नालन्दा व तक्षशिला येथे शास्त्रांचे अध्ययन केले व काही काळ तेथे आचार्य म्हणून अध्यापनही केले. माझे शिष्य देशाच्या चारी कोपऱ्यात 'महापंडित' म्हणून प्रख्यात आहेत. तरीही मी स्वतःला आपणासारख्या महापंडिताचा शिष्य म्हणवून घेऊ इच्छितो. मला वाटते माझी लायकी व योग्यता आपला शिष्य बनण्याला पुरेशी आहे."

यावर थोडे हसत प्रज्ञासागर म्हणाले—"माझा शिष्य बनू इच्छिणाऱ्याला या जमिनीत विहीर खोदणे हे अनिवार्य आहे."

अपमानित झाल्यासारखा भाव चेहऱ्यावर दाखवत गौरांग म्हणाले—"आपण आपले ज्ञान शिष्यांना वाटले तर त्यांच्यातला एकादा आपणापेक्षाही महापंडित बनेल ही भीती आपल्या मनात असावी असे मला वाटत आहे. खडकाळ जमिनीत विहीर खोदणे अगदीच अशक्य नाही, पण असल्या कठीण कामात आपले डोके खपवून आपले शिष्यत्व प्राप्त करून घेण्याने माझा तादृश फायदा काय? तेव्हा कृपा करून आपण मला आज्ञा द्या, मी आपला इथून निघून जातो." असे म्हणत गौरांग तेथून निघून जाऊ लागले.

यावर त्यांचा शिष्य विद्यानिधि म्हणाला—"गुरुदेव, आपण माझ्याबद्दल गैरसमज करून घेऊ नये. प्रज्ञासागर यांचा उद्देश खरोखरीच या जमिनीत विहीर खणावी असा नक्कीच नसावा. मला असे वाटते की त्यांच्या या अटीमागे काहीतरी रहस्य लपलेले आहे."

गौरांग चिडून बोलले—"असं होय? माझ्याही लक्षात न येणारे हे रहस्य काय असावे? जरा नीट विचार करून सांग बरे!"



"माझ्या मते प्रज्ञासागर यांनी त्यांचे शिष्यत्व पत्करणारा इच्छुक त्यांच्या अपार बुद्धि सामर्थ्यावर अधिकार मिळवण्यासाठी पुरेशा सहनशीलतेने, दृढनिश्चयाने व उत्साहाने कष्ट करायला तयार आहे की नाही—ही परीक्षा घेण्यासाठीच अशी अट ठेवली असावी." विद्यानिधीने सांगितले.

विद्यानिधीच्या तोंडचे हे भाषण ऐकताच प्रज्ञासागर यांनी त्याला आपल्याजवळ बोलावले व म्हटले—"मला कळून चुकले की तुझ्यात विहीर खोदण्याइतके सामर्थ्य नक्की आहे. त्यासाठी प्रत्यक्ष विहीर खोदायची आता गरज नाही. मी आजपर्यंत तुझ्याचसारख्या शिष्याची वाट पहात होतो."

गौरांग चकित होऊन प्रज्ञासागरकडे पहातच राहिले. तेव्हा प्रज्ञासागर त्यांना








म्हणाले–"कित्येक लोकांना असा भ्रम पडला आहे की, मी केवळ स्वार्थापोटीच आपली ज्ञान-संपदा दुसऱ्यांना द्यायला संकोचत आहे. परंतु माझ्यापेक्षाही उत्तम प्रगाढ पंडित घडवण्यासाठी योग्य शिष्याचाच मी आजपर्यंत शोध घेत होतो."

"क्षमा असावी. मीही अशाच भ्रमात पडलो होतो." गौरांग म्हणाले.

प्रज्ञासागर किंचित हसत म्हणाले–"माझ्याकडून विद्या प्राप्त करून गप्प बसणारा शिष्य मला नको आहे. तो असा असावा की, जो सर्व विद्यांचे बारकावे शोधून काढण्याचा प्रयत्न करील. जरूर पडेल तेथे मला सतावून माझ्याकडून पूर्ण ज्ञान प्रकट करवण्याइतकी शक्ति त्याच्यात असावी. म्हणूनच माझ्या शिष्यत्वाची आशा धरून जे जे इथे आले, त्या सर्वांना मी सुचवले की त्यांनी या खडकाळ भागात विहीर खोदावी. पण याच्या मागे लपलेले रहस्य शोधून काढण्याचा प्रयत्न मात्र कोणीही केला नाही."

गौरांग प्रसन्न होऊन म्हणाले–"माझा शिष्य विद्यानिधीने मात्र आपला उद्देश बरोबर ओळखला, तो माझ्यापेक्षाही अधिक प्रज्ञावन्त आहे."

प्रज्ञासागर मान हलवत म्हणाले–"दगडांच्या थरांखाली असलेली जलधारा बाहेर काढण्यासाठी खूपच कष्ट करावे लागतात ही गोष्ट सर्वविदित आहे. त्याचप्रमाणे गुरुच्या मेधाशक्तीत असणारी ज्ञान-संपदा पारखून पहाण्यासाठी खूप कष्ट करावे लागतात. ज्ञानबोध करणाऱ्या गुरु बरोबरच, ते ज्ञान घेण्याची इच्छा करणाऱ्या शिष्यातही तसे विशेष गुण, लायकी असावी लागते–हे सर्व सांगण्यासाठीच मला अशी वर्तणूक करावी लागली."

विद्यानिधीला मुकाट्याने प्रज्ञासागरच्या स्वाधीन करून त्यांचा निरोप घेऊन गौरांग पंडित निघून गेले. यानंतर विद्यानिधि अनेक वर्षे प्रज्ञासागर यांच्याकडे राहिला व त्यांच्याकडून विद्या प्राप्त करून गुरुपेक्षाही महान शिष्य म्हणून तो यशस्वी झाला.






[२]

[गुहेत प्रवेश करण्यापूर्वी सुवर्ण-मूर्तीच्या रक्षणाची व्यवस्था करण्यासाठी विनोद राजाकडे गेला. सुवर्ण-प्रतिमेच्या अस्तित्वाबद्दल राजा व महाज्ञानी सर्वांनाच शंका होती. विनोदच्या सांगण्याचा पडताळा पाहण्यासाठी सर्वजण त्याच्या बरोबर गुहेकडे गेले. तेथे पोंचून ही विनोदला दिसणारी मूर्ती कोणालाच प्रथम दिसेना! पुढे वाचा–]

सोन्याची मूर्ती पाहिल्या बरोबर राजा व त्याचे अधिकारी यांचे सुंदर पुरुषांमध्ये रूपान्तर झाले. हे पाहिल्याबरोबर विनोद राजाला म्हणाला–"आपले नोकर व अधिकारीही कसे बदलून गेलेत पाहिलंत? आश्चर्यच आहे ना?"

राजाने त्यांच्याकडे नीट पाहून म्हटले–"ही मूर्ति सजीव झाल्यावर त्या स्त्रीशी मी विवाह करणार आहे. हे सर्वजण सुंदर होऊन काय उपयोग?"

गालातल्या गालात हसत विनोद म्हणाला–"चण्डमार्तण्ड महाराज, आपल्या इच्छेप्रमाणे आपणच या सुंदरीशी विवाह करावा."

"अरे, तु सुद्धा कसा भोळसट आहेस! मी विवाह करावा म्हणून ही मूर्ति सजीव होणार असंच तू म्हणाला होतास ना?" राजाने विचारले.



"महाराज, माझ्या भोळेपणाची मला लाज वाटत आहे." विनोद म्हणाला.

खदखदा हसत राजा म्हणाला—"लाज वाटेल नाहीतर काय? गुप्त व रहस्यमय गोष्टी माझ्यासारख्या बुद्धिमान राजालाही समजणं कठीण असतं."

"महाराज, मला असं वाटतंय की आपण काही इतके महान् बुद्धिमान नाही आहात!" विनोद म्हणाला.

"काय म्हणालास? मी बुद्धिमान नाही?" आपला मिश्यांवर ताव देत राजा विचारू लागला.

थोडा वेळ गप्प राहून विनोद बोलू लागला—"महाराज, आपण व आपल्या राज्यातले अधिकारी लोक जोवर या मूर्तीचे रूप व सौंदर्य कौतुकाने पहात होतात तोवर आपण सर्वजण खरोखरीच फार सुंदर दिसत होतात. पण ती मूर्ति सजीव झाल्यावरोबर तिच्याशी विवाह करण्याची भाषा मोठ्या अहंकाराने आपण बोलू लागताच आपण व आपले अधिकारी पूर्ववत् विकृत दिसू लागला आहात."

"किती गर्विष्ट आहेस तू! मला कुरूप म्हणतोस?" असे म्हणत राजाने हाताच्या मुठी आवळल्या.

"काय आम्ही सर्व कुरूप आहोत?" असे म्हणत महाज्ञानीही हुंकार भरू लागले, व विनोदला पकडण्यासाठी एकदम सर्वांनी उड्या मारल्या. पण त्यांच्या पकडीतून वाचण्यासाठी विनोद त्या डोंगर-कड्यांवरून उड्या मारीत धबधब्याकडे धावत सुटला.

राजा व त्याचे अधिकारी दोघादोघांच्या जोड्या करून एकमेकांचे हात धरून कड्यांवरून उड्या मारत विनोदच्या पाठ-लाग करू लागले. विनोद पुढे व हे लोक मागे असे बराच वेळ सर्व जण पळत राहिले. विनोदला कोणी पकडू शकले नाहीत. त्यांना अशी डोंगरपहाडांतून पळण्याची सवय नव्हती, म्हणून ते थोड्याच वेळात दमून गेले व त्याबरोबर





पाय घसरून कांहीजण खाली पडले व जखमी झाले.

या अवधीत विनोद त्या धबधब्यासमोर जाऊन उभा राहिला. राजा धापा टाकत ओरडला—"अरे वेड्या पोरा, त्या धब-धब्यात शिरायचे धाडस करू नकोस. असं करणं धोक्याचं आहे."

"अहो, महाराज चण्डमार्तण्ड, हा धबधबा, अन् तो ओलांडून गेल्यावर त्याच्या पलीकडे असणारा प्रदेश किती धोक्याचा आहे हे मला माहीत नाही. पण इतकं मात्र निश्चित माहीत आहे की यापुढे तुमच्या राज्यात रहाणं हे त्या सर्वापेक्षा अधिक धोकादायक आहे!" असे म्हणून त्याने धबधब्याकडे पाऊल उचलले.

राजा व महाज्ञानी आश्चर्याने त्याच्या-कडे पहातच राहिले. धबधब्यात प्रवेश करीत विनोद उच्च स्वरात ओरडला—"मी आता हा धबधबा ओलांडून पलिकडे जात आहे."

राजा दोन्ही हात उंचावून हलवत ओरडला—"अरे थांब. तो धबधबा पार करून जाऊ पहाणारा कोणीही माणूस आतापर्यंत परत येऊ शकला नाही. तू हे धाडस करू नकोस."

"त्या लोकांची कदाचित् परत येण्याची इच्छाच नसेल, किंवा त्यांच्यात परतण्याची शक्ति उरली नसेल. परंतु, मी मात्र ही मूर्ती सजीव करण्याचे रहस्य जाणून घेऊनच परत येईन. माझ्या अनुपस्थितीत या मूर्तीच रक्षण करण्याची जबाबदारी मी आपणावर सोपवीत आहे महाराज." विनोदने सांगितले.

विनोदच्या या बोलण्याचे प्रतिध्वनि तिथल्या गुहांतून व चारी बाजूंच्या जंगला-तून उमटले. राजा अजिबात हालचाल न करता मूर्तीवत् उभाच राहिला!

काही क्षणातच एकदम दचकून राजा भानावर आला व हात उंचावून म्हणाला—"अरे, तू चिन्ता करू नकोस. मी अगदी काळजीपूर्वक या सुवर्णमूर्तीचं रक्षण करीन.



कोणी या मूर्तीला हात लावायचं धाडस केलं तर त्याचं मस्तक धडावेगळं करून मी किल्ल्याच्या महाद्वारावर लटकावून ठेवीन. तू ते रहस्य जाणून घेऊन लवकर परत ये. मी आपल्या राज्यात कुठे ना कुठे एकादा जमिनीचा तुकडा तुला देईन. इतकेच नव्हे, तर माझ्याच सारखी सुंदर असलेली माझी एक मुलगी मी तुला देईन. थाटामाटात तुझे लग्न करून देईन."

विनोदने राजाचे हे सर्व बोलणे ऐकले की नाही कुणास ठाऊक, पण भयानक आवाज करीत वरून खाली कोसळणाऱ्या त्या धबधब्याच्या पाण्यात त्याने मोठ्या धाडसाने प्रवेश केला!

धबधबा ओलांडायला किती वेळ लागेल याची विनोदला काहीच कल्पना नव्हती. परंतु तो जसजसे एक पाऊल पुढे टाकु लागला तसतसे त्याला भासले की आपण वायुवेगाने पाणी कापत पुढे जात आहोत!

थोड्याच वेळात विनोद धबधबा ओलांडून पलिकडे पोचला. पहाडांनी वेढलेल्या त्याच्या 'सोन्याची दरी' राज्या-सारखाच भूप्रदेश त्याला येथेही दिसून आला. हा प्रदेश मोठमोठ्या घनदाट वृक्षांनी असा भरलेला होता की दिवसाही सूर्यकिरण जमिनीवर पोचणे कठीण! जवळच्याच एका छोट्या डोंगरावर चढून विनोदने पलीकडे पाहिले. छोट्याशा नदीने वेढलेले एक विशाल मैदान त्याच्या दृष्टिपथात आले!

"कोण हा युवक?" आवाज ऐकून विनोदने मागे वळून पाहिले. मागील बाजूस असलेल्या एका छोट्या टेकडीवरून एक कुबडा म्हातारा त्याच्याचकडे येत होता! कुबड्याला लांब दाढी होती आणि त्याचे डोळे सापाच्या डोळ्यांसारखे चमकत होते!

म्हाताऱ्याने विनोदच्या जवळ येत विचारले–"कोण आहेस तू? इथे काय करीत आहेस?"



"माझं नाव विनोद. मी इथे काहीच करत नाही आहे. पण तू कोण आहेस सांग!" विनोद म्हणाला.

"तुझ्या बोलण्याची पद्धत मला मुळीच आवडली नाही. मी या ज्ञानभूमीचा रक्षक अन् पुजारी आहे. तू आत्ता काही करत नाहीस हे खरं असेल, पण पुढे काय करणार आहेस?" कुबड्याने विचारले.

"मला खूप दूर जायचं आहे. मला जिथे जायचं आहे तो प्रदेश कोणत्या दिशेला आहे अन् तिथे जाण्याचा रस्ता कोणता वगैरे मला काहीच माहीत नाही. पण बहुधा मला हा प्रदेश ओलांडून जावे लागेल." विनोद म्हणाला.

"ओः, असं आहे होय? मग तू या नदीत उतरून पोहून पलिकडे जा. नंतर तुला हवं तिथे तू जाऊ शकतोस." म्हातारा म्हणाला.

म्हाताऱ्यापासून लवकर सुटका व्हावी म्हणून विनोदने तत्काळ नदीत उडी मारली. नदीचं पाणी उबदार होतं. विनोद पोहून पलिकडे पोचला. पहातो तर काय! म्हातारा समोर उभा! विनोदच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही!

"मी तर तुला नदी पार करताना पाहिलंच नाही. तू कसा इथे आलास?" विनोदने म्हाताऱ्याला विचारले.

"मी तिकडच्या किनाऱ्यावर अदृश्य झालो अन् इकडे पोचलो." म्हातारा उत्तरला.

"हे कसं शक्य आहे?" विनोदने आश्चर्याने विचारले.

"का नाही? आपण सर्वचजण म्हणजे निरनिराळ्या शक्तींच्या लहरी असतो. योग्य ज्ञान असेल तर आपण कोणत्याही शक्तीच्या रूपात व नंतर पुन्हा मनुष्याच्या रूपात परिवर्तित होऊ शकतो." कुबडा म्हणाला.

"ओह, असं आहे होय?" विनोद म्हणाला.

"मी प्रथमच तुला म्हणालो होतो की तू आता ज्ञानभूमीत प्रवेश केला आहेस.



तरीही ज्ञानाची ही शक्ति काही लोकांपुरतीच मर्यादित आहे." असे म्हणत तो कुबडा विनोदजवळ येऊ लागला.

विनोद एक पाऊल मागे सरकला. कुबडा रागावून खोचक नजरेने म्हणाला— "तू माझ्याशी गर्वाने वागू नकोस. काहीही केलंस तरी तू मला चकवू शकणार नाहीस. तुला या ज्ञानभूमीचा नागरिक बनायचं असेल तर तुला स्पर्श करून मला तुझं नामकरण करायला हवं."

"माझं हे 'विनोद' नाव काय वाईट आहे?" विनोदने विचारले.

"तुला नवीन नाव ठेवलंच पाहिजे. पण इथे पोचल्यावरही तुला तुझं पहिलं नाव कसं लक्षात राहिलं याचं मला आश्चर्य वाटत आहे." कुबडा चिडून बोलला.

"का? माझं ते नाव आहे म्हणून माझ्या लक्षात राहिलं." विनोद उत्तरला.

"तू नदीत उतरलास तेव्हाच तुझा पूर्ववृत्तान्त पूर्णपणे विसरून जायला हवा होता, पण असं घडलं नाही. तेव्हा तुला या ज्ञानभूमीचा नागरिक बनता येणार नाही." कुबडा म्हणाला.

"मी तुझ्या या ज्ञानभूमीचा नागरिक बनायला मुळीच लालचावलो नाही. मी केवळ इथून जाणारा एक प्रवासी आहे." असे म्हणत विनोद पुढे जाऊ लागला.



"तू पुन्हा गर्वाने बोलू लागलास. आणि ज्ञानभूमीचा नागरिक बनण्यातलं महत्वही तुला समजत नाही. मी खूप दिवसांपासून अनेक परदेशी लोकांना इथले नागरिक बनवत आलो आहे. तरीही मला अजून आश्चर्य वाटतंय की तू या नदीत पोहूनही आपलं गतायुष्य विसरला कसा नाहीस! पुन्हा एकदा तू नदीत पोहून दाखवतोस?" म्हाताऱ्या कुबड्याने विचारले.

"मी ते मुळीच करणार नाही." असे म्हणत विनोदने सहजच आपल्या बोटातल्या अंगठीकडे पाहिलं, अन् त्याच्या लक्षात आले की सुवर्णप्रतिमेकडून आपल्या हातात आलेल्या अंगठीचाच हा प्रभाव असला

पाहिजे. त्यामुळेच नदीचा आपल्यावर काही परिणाम होत नाही!

कुबडयाने रागाने टाळया वाजवल्या. त्या गडगडाटामुळे त्या डोंगराळ भागात विचित्रसे प्रतिध्वनी उमटले. परंतु हळूहळू प्रतिध्वनीचा आवाज कमीकमी होण्याऐवजी वाढतच गेला.

"असले मजेदार प्रतिध्वनि मी कधीच एकले नाहीत. हा सर्व एक गंमतशीर तमाशा वाटतोय मला!" विनोद म्हणाला.

"गंमतशीर तमाशा वगैरे काही नाही मुला! वैज्ञानिक दृष्टीने आम्ही जे विजय मिळवले आहेत त्यापैकीच हा एक. यामुळे प्रतिध्वनीचा आवाज आम्ही वाढवू शकतो." कुबडयाने सांगितले.

इतक्यात पहाडातून काही सैनिक त्यांच्याकडे येऊ लागले.

"या परदेशी माणसाला कैद करा." कुबडयाने आज्ञा दिली.

सैनिकांनी विनोदला घेरले. पण एकाच उसळीत विनोदने सैनिकांच्या पलिकडे असलेल्या कडयावर उडी मारली व त्यांच्या पकडीतून वाचण्यासाठी पळत सुटला. सैनिक निराशा न होता त्याचा पाठलाग करू लागले. पळता पळता शेवटी विनोद एका दरीत पोचला. त्या दरीच्या एका टोकाला एक मोठे भवन व काही घरे त्याला दिसली. सैनिकांच्या हातून स्वत:ला वाचवता येईल या आशेने विनोद त्या बाजूला वेगाने पळू लागला. पण सैनिक त्याच्यापेक्षाही अधिक वेगाने त्याच्या जवळ जाऊ लागले.

सैनिकांच्या हातून आता आपण नक्कीच पकडले जाणार या भीतीने विनोदने एकदा मागे वळून पाहिले. परंतु त्याला असे दिसले की सैनिक त्याचा पाठलाग सोडून त्यांच्या मागील बाजूस असलेल्या एका छोटया टेकडीकडे भीतीने कापत पहात उभे आहेत!

विनोदनेही त्या टेकडीकडे पाहिले व तेथील दृश्य पाहून तोही एकदम आश्चर्यचकित झाला. (क्रमश:)





## स्वामीद्रोही मित्रद्रोही

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर टाकून तो स्मशानाकडे निघाला. प्रेतात वास करणारा वेताळ म्हणू लागला–"राजा, या विशाल विश्वात स्वामीद्रोही आणि मित्रद्रोही लोकांची कमतरता नाही. माझ्या मनात शंका आहे की–अशाच प्रकारच्या काही लोकांच्या हातचे खेळणे बनल्यामुळे तर तुझ्यावर असे कष्ट करण्याची पाळी आली नसेल? असली द्रोही माणसे कशा प्रकारे फसवतात याची ओळख करून देण्याच्या हेतूने, उदाहरण म्हणून मी एक स्वामीद्रोही व मित्रद्रोही व्यक्तींची गोष्ट सांगतो. ऐक"–वेताळ सांगू लागला–

सुवर्णमुखी राज्यावर धर्मपाल नावाचा राजा राज्य करीत होता. एक महान वीर म्हणून तो प्रसिद्ध होता. त्याचा सेनापती नागभैरव हा अत्यंत कपटी होता–



एकाद्याची फसवणूक करण्यात त्याचा हात धरील असा कोणीच नव्हता! राजाबद्दल अत्यंत श्रद्धा, भक्ती असल्याचा अभिनय तो करी; पण आतून मात्र सिंहासन बळकावण्याचे कारस्थान तो करत होता.

राजा धर्मपालला मात्र त्याच्या या कारस्थानांबद्दल किंचितही कल्पना नव्हती. संधी पाहून नागभैरवने एकेका अधिकाऱ्याला वश करून घेतले व एक दिवस राजा, राणी आणि युवराज शशिसेन अशा तिघांनाही त्याने कैद केले! तिघांना त्याने तीन निरनिराळ्या तुरुंगात ठेवले, त्यांच्यावर कडक पहारा नेमून मग तो स्वतः गादीवर बसला.

परंतु राजा ज्या तुरुंगात होता त्याला एक गुप्त भुयार होते. या भुयाराबद्दल नागभैरवला काहीच माहिती नव्हती. राजा या भुयारी मार्गाने निघून एका अरण्यांत पोचला.

राजा अरण्यमार्गाने जात असताना समोरून शिखमुखी नावाचा एक डाकू घोड्यावरून त्याच वाटेने आला. त्याने राजाला थांबवून धमकी दिली—"तुझ्या अंगावरील सर्व आभूषणे अुतरवून त्या दगडावर ठेव."

धर्मपालने कोणताही प्रतिकार न दर्शवता मुकाट्याने आपली सर्व आभूषणे काढली, एका वस्त्रात ती बांधली व किंचित हसत ते गाठोडे शिखमुखीच्या हाती सोपवून तो चालू लागला.

हे पाहून शिखमुखीने त्याला थांबवून विचारले—"दिसायला तू चांगल्या खानदानी घराण्यांतला दिसतोस; शारीरिक बळही तुझ्यात भरपूर असले पाहिजे; माझ्याशी तू सहज लढू शकशील, असे असूनही अजिबात विरोध न करता तू चुपचाप आपले दागिनें कसे काढून दिलेस? कोण आहेस तू?"

धर्मपाल म्हणाला—"माझे नाव धर्मपाल. मी सुवर्णमुखी राज्याचा राजा." आणि राजाने आपल्या सेनापतीने केलेल्या स्वामीद्रोहाची हकीकत सांगून म्हटले—"तू सरळ समोर येऊन मला धमकावलेस. मला लुटायची इच्छा प्रदर्शित केलीस. पण त्याने



तर मागून पाठीत सुरा खुपसल्यासारखी वर्तणूक केली. मला धोका देऊन माझ्याशी द्रोह केला. त्यामुळे मला असं वाटलं की त्याच्या स्वामीद्रोहापेक्षा तू कितीतरी पट अधिक चांगला आहेस, म्हणूनच माझ्यात ताकत असूनही मी तुझ्याशी सामना न करता मुकाट्याने माझी आभूषणे उतरवून दिली."

हे शब्द ऐकून शिखमुखी चटकन घोड्यावरून उतरला, आभूषणांचे गाठोडे धर्मपालच्या पायांवर ठेवत तो म्हणाला—"महाराज, मला क्षमा करा. माझ्याजवळ उत्तम लढाऊ असे पंचवीस साहसी लुटारू जवान आहेत. ते सर्वचजण चांगले धनुर्धारी आहेत. आपण आज्ञा दिलीत तर आम्ही सर्व मिळून त्या नागभैरवचा संहार करू."

"तू मदतीचा हात पुढे केलास ही फारच चांगली गोष्ट आहे. मला गरज पडेल तेव्हा मी तुझ्याकडे येईन आणि त्यावेळी तू मला मदत कर." असे म्हणून धर्मपाल पुढे निघून गेला.

आणखी थोडे अंतर चालून गेल्यावर राजाला एक दृश्य दिसले—अग्निनेत्र नावाचा एक राक्षस झाडाला टेकून बसलेल्या एका जंगली डुकराला खाऊन टाकण्याच्या तयारीत होता. मोठे सुळे असलेले ते डुक्कर भयाने ओरडत-किंचाळत होते.

राजाने हे दृश्य पाहून ही न पाहिल्यासारखे करून आपली दिशा बदलली व तो चालू लागला. हे पाहून—"अरे माणसा, मला पाहूनही निर्भयतेने तू निघून जात





आहेस?" असे म्हणत राक्षस उठून उभा राहिला व त्याने राजाला आपल्या डाव्या हातात घट्ट पकडले.

परंतु यामुळे राजा जराही विचलित झाला नाही, हे पाहून राक्षसाला फारच आश्चर्य वाटले. तो म्हणाला—"प्राणांचं भय नसणारा माणूस आज मी प्रथमच पहात आहे. बोल, कोण आहेस तू?"

"मी सुवर्णमुखीचा राजा धर्मपाल."

असे उत्तर देऊन राजाने आपला सर्व वृत्तान्त राक्षसाला सांगितला व म्हणाला—"राजाने कधीही आपल्या प्राणांचे भय बाळगू नये."

राक्षसाने राजाला जमिनीवर ठेवले व तो बोलू लागला—"एका खऱ्या राजाच्या अंगात असावी अशी सर्व लक्षणे तुझ्यात आहेत, मी आता तुझ्याबरोबर येऊन त्या राजद्रोही सेनापतीचा वध करतो. चल."

"मला जरूर वाटेल तेव्हा नक्की मी तुझी मदत मागायला येईन." असे म्हणून धर्मपाल पुन्हा पुढे निघाला.

एक आठवडाभर प्रवास केल्यानंतर धर्मपाल जवळच्या वैशाली राज्यात पोचला. सुवर्णमुखी व वैशाली राज्यात पिढयान् पिढयांचे वैर होते!

तरीही धर्मपाल वैशालीचा राजा सुचरित याला भेटला व त्याने आपली सर्व हकीकत सुचरितला सांगितली आणि विचारले—"माझे सिंहासन परत मिळवून देण्यासाठी आपण मला मदत कराल?"

यावर सुचरित म्हणाला—"धर्मपाल, संकटसमयी आपली मदत मागणारा आपला जन्मांतरीचा शत्रू का असेना, त्याला मदत करणे हा आपला धर्म आहे—असा माझा विश्वास आहे. मी आपले सैन्य घेऊन आपणाबरोबर येतो."

धर्मपाल विशाल सेना घेऊन गेला व त्याने सुवर्णमुखी नगराला वेढा दिला. नागभैरव व धर्मपाल यांच्यात भयानक द्वंद्व युद्ध झाले. नागभैरव जखमी झाला व त्या युद्धात हारला. धर्मपालने त्याला तुरुंगात टाकले.





सिंहासनारूढ झाल्याबरोबर धर्मपालने अरण्यात लुटालूट करणाऱ्या शिखमुखी डाकूला बोलवून घेतले व त्याला सांगितले—"तू वाटसरूंना लुटताना प्रजाजनांचे धन व प्राणही हरण करतोस. म्हणून तू आपल्या साथीदारांसह ताबडतोब आत्मसमर्पण कर. नाहीतर तुला फार कडक शिक्षा करावी लागेल."

राजाचे बोलणे ऐकून शिखमुखी काही बोलणार तोच राजाने तीक्ष्ण स्वरात आज्ञा दिली—"तू आत्ताच्या आत्ता अरण्यात जा आणि आपल्या साथीदारांसह परत येऊन आत्मसमर्पण कर. माझी आज्ञा आहे ही."

यानंतर धर्मपाल स्वतः अरण्यात गेला व अग्निनेत्र राक्षसाला भेटून त्याला म्हणाला—"अग्निनेत्र, तू या जंगलात रहातोस म्हणून सर्व जनता या भागात यायला भिते. तू हा भाग सोडून दुसरीकडे रहायला जा."

"नाही सोडून गेलो तर?" राक्षसाने डोळे लाल करत उलटून प्रश्न विचारला.

धर्मपालने त्याच क्षणी तलवार म्यानाबाहेर उपसली. हे पाहून राक्षसाने प्रशंसापूर्वक मान हलवली व तो तिथून निघून गेला.

काही दिवसानंतर धर्मपालने वैशालीचा राजा सुचरित याच्याबरोबर युद्ध करण्याची घोषणा केली. आपला पुत्र शशिसेन याच्या नेतृत्वाखाली त्याने सैन्यही पाठवले. शशिसेन सुचरितला मोठ्या सहजपणे पराभूत करून कैद करून घेऊन आला, व सिंहासनावर बसलेल्या पित्यासमोर त्याला उभे केले.

सुचरितने मोठ्या दुःखाने धर्मपालला विचारले—"महाराज, मला असे वाटते की आपल्या दोन राज्यांत फार वर्षांपासून असलेले शत्रुत्व आपण विसरू शकला नाहीत."

धर्मपाल यावर हसून म्हणाला—"शत्रुत्व मित्रत्वात बदलणे हे तर आपल्याच हातात आहे! आपली एकुलती एक कन्या निहारिका हिचा माझा पुत्र शशिसेन याच्याशी विवाह का करून देत नाही?"

सुचरित थोडा वेळ गप्प राहिला व नंतर त्याने संमतिदर्शक मान हलवली. सुचरितच्या हातातील बेड्या काढून टाकण्याची आज्ञा धर्मपालने आपल्या सैनिकांना दिली.

वेताळाने ही गोष्ट सांगून विक्रमादित्याला विचारले—"राजा, राज्याच्या लोभाला बळी पडून आपल्याच राजाला तुरुंगात टाकणारा सेनापती नागभैरव हा स्वामीद्रोही आहे. पण राजा धर्मपालच्या बाबतीत काय ? तो राज्य घालवल्यानंतर संकटात सापडला असताना त्याला मदत करणाऱ्या डाकू व राक्षसाशीच नव्हे, तर आपले सैन्य घेऊन नागभैरवला सिंहासनावरून खाली ओढणाऱ्या राजा सुचरितशी सुद्धा त्याने मित्रद्रोह केला. नागभैरव जर स्वामीद्रोही असेल तर धर्मपाल काय मित्रद्रोही नाही ? या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझ्या मस्तकाचे शतशः तुकडे तुकडे होतील."

विक्रमादित्य म्हणाला—"धर्मपाल डाकू, राक्षस व सुचरित यांना भेटला त्यावेळी तो कोणत्याही राज्याचा राजा नव्हता, तर केवळ एक सर्वसामान्य नागरिक होता. परंतु त्यानंतर तो राजा बनल्यानंतर आपल्या प्रजेचे चोर-डाकू यांच्यापासून रक्षण करणे हे त्याचे कर्तव्यच होते. म्हणूनच त्याने डाकूला आत्मसमर्पण करण्याची आज्ञा दिली. हीच राजनीति त्याने राक्षसाच्या बाबतीतही लागू केली. यात मित्रद्रोहाचा काही प्रश्नच उपस्थित होत नाही. राहता राहिला प्रश्न त्याच्या सुचरितशी वागणुकीचा ! धर्मपालने सुचरितच्या सैन्याच्या मदतीनेच आपले राज्य पुन्हा जिंकून घेतले होते. त्यामुळे त्याची प्रजा त्याला असमर्थ किंवा भित्रा समजण्याची शक्यता होती. या अपयशाचा कलंक धुवून काढण्यासाठीच त्याने सुचरितला पराभूत करून आपले सामर्थ्य सिद्ध करून दाखवले. हाही राजनीतिचाच एक भाग मानला पाहिजे."

अशा प्रकारे राजाचे मौनभंग होताच वेताळ पुन्हा अदृश्य होऊन झाडावर जाऊन बसला.

(कल्पित)





## सासू आणि सून

एका गावात एक प्रौढ बाई रहात असे. तिचे नाव शांताबाई. तिला एक मुलगा होता. तो लग्नाच्या वयाचा झाला आणि तिने एक सुंदर मुलगी पाहून त्याचे लग्न करून दिले. नवी सून आता सासरी आली.

कोणत्याशा भाषेत एक म्हण आहे—'ज्या सुनेला सासू नसते ती फार उत्तम स्त्री होय'—म्हणजे ती स्त्री भाग्यशाली होय. त्यामुळे सुनेच्या मनात आलं-आपली सासू मरून गेली तर आपण व आपला नवरा मोठ्या सुखात राहू? लोक आपल्याला 'चांगली बायको' असं म्हणतील.

या विचाराने सून एक दिवस सासूला म्हणाली—"सासूबाई, मी या घरात आले आहे नं? हा संसार आता मी चालवीन. तुम्ही आता मरून जा ना !"

"अग, असं काय बोलतेस तू? बरं, तुझी अशीच इच्छा असेल तर मी जरूर मरेन, पण माझ्या मनात एक इच्छा आहे—तुला एक मूल झालं की ते पाहून मी आनंदाने डोळे मिटीन—कायमचे !" शांताबाई म्हणाली.

थोड्याच दिवसात सुनेला दिवस राहिले अन् योग्य वेळी तिला मुलगा झाला. नातू मांडीवर घेताना आनंदाने शांताबाईला आकाश ठेंगणं झालं.

"सासूबाई, आता नातू पाहिलात नं? आता का नाही मरून जात?" सुनेनं विचारले.

"अग, अजून जरा धीर धर. बाळाच्या खोड्या, खेळणं पाहून मला खूप आनन्द वाटेल, मग मरीन मी." सासू म्हणाली.

पाच वर्षे गेली. शांताबाईचा नातू शाळेत जाऊ लागला.

"आता तरी मरा ना सासूबाई. मुलगा शाळेतही जाऊ लागला." सुने म्हणाली.







"अग, मुलाची मुंज होऊ दे. यावेळी अगदी नक्की मरेन." सासू म्हणाली.

थोड्या दिवसांनी शांताबाईच्या नातवाचा मौंजीबंधन समारंभ पार पडला.

आता पुन्हा सून म्हणाली–"सासूबाई, मुंजही झाली, आता का नाही मरत?"

"अग, झालं ते झालं. पोराचं लग्न झाल्याशिवाय आता काही मरत नाही मी." सासू म्हणाली.

शांताबाईचा नातू लग्नायोग्य झाला. छानस घराणं पाहून त्याचं लग्न लावून दिलं गेलं.

"सासूबाई, तुम्ही आपली नातसूनही पाहिलीत. मरणाच्या बाबतीत आता का टाळाटाळ करता?" सुनेने विचारले.

"अग, आता एक छोटीशी इच्छा राहिली बघ. माझा नातू अन् त्याची बायको याचा पोपट-मैने-सारखा सुखाचा संसार पहाण्याचा आनंद मला लुटू दे." शांताबाई म्हणाली.

काही दिवसांनी नातवाची बायको ही सासरी नांदायला आली.

यानंतर एक दिवस शांताबाई आपल्या सुनेला म्हणाली–"सूनबाई, माझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या, आता माझी मरायची इच्छा आहे. पहा, तुझी सूनही संसार संभाळायला आली आहे ना? तुझी आता काय गरज? दोघीही एकदमच मरू या चल."

शांताबाईच्या सुनेच्या हृदयाचा एकदम थरकाप झाला. ती विचार करू लागली–"देवा, चागलंच संकटात टाकलंस मला तू!" अन् एकदम नरमाईने सासूला म्हणू लागली–"सासूबाई, तुमच्या तोंडून मरणाची भाषा ऐकून मला फार वाईट वाटतंय. काय कमी आहे तुम्हाला इथे? घरातलं सगळं काम माझी सून संभाळते ना? तुम्हाला कश्याची तक्रार करावी लागणार नाही. असं असताना तुम्ही काय म्हणून मरावं?"

सुनेची बोलणी ऐकून शांताबाईला हंसू आले. यानंतर आपल्या सुनेकडून आपली सेवा करून घेत शांताबाई आनंदाने कालक्रमणा करू लागली.



# अमृतसरचे सुवर्णमंदिर





शिखांचे चौथे गुरु रामदास यांच्या वेळी सुवर्णमंदिर बांधले गेले. शीख धर्माचे लोक हे सुवर्णमंदिर अत्यंत पवित्र मानतात. मंदिराच्या चारही बाजूंना असणारी चार द्वारे भक्तांचे मोठ्या प्रेमाने स्वागत करीत असतात.











सम्राट अकबराने हा प्रदेश चौथे शीख गुरु रामदास यांना बक्षिस दिला होता. गुरुने १५७९ मध्ये तेथे एक तलाव बांधला व 'अमृतसर' असे त्याचे नामकरण केले. या तलावाच्या चारी बाजूंना जे शहर वसले त्यालाही हेच नाव प्राप्त झाले.

पाचवे गुरु अर्जुनदेव यांनी तलावाच्या मध्यभागी एक मंदिर बांधण्याचा प्रारंभ केला. शीखधर्म हा कोणत्याही एका विशेष वर्गासाठी मर्यादित ठेवलेला नाही ही गोष्ट सिद्ध करण्यासाठी या मंदिराची पायाभरणी मियासमीर नावाच्या एका मुस्लिम धर्मगुरुच्या हातून करवली होती.





इसवी सन १८०३ मध्ये महाराज रणजीतसिंह यांनी मंदिराच्या खालच्या अर्ध्या भागाच्या भिंतींना संगमरवरी फरश्या बसवल्या, छत तांब्याच्या पत्र्याने मढवले व त्यावर ४०० कि. ग्रॅ. सोन्याचा लेप चढवला.

सुवर्णमंदिरात मागच्या बाजूला शिखांचे गुरुपीठ अकालतख्त' किंवा 'अमर-सिंहासन' आहे. सहावे शीखगुरु हरि-गोविन्दजी यांनी या तख्ताची स्थापना केली होती. सर्व गुरुंनी उपयोगात आणलेली शस्त्रे इथे सुरक्षित ठेवलेली आहेत.





सुवर्णमंदिरात अखंड मंत्रपठण व संगीत चालू असते. मंदिर पहाण्या-साठी-दर्शन घेण्यासाठी भक्तांच्या झुंडी येतच असतात. या मंदिराचे प्रांगण ऐतिहासिक दृष्टीने फार महत्वाचे आहे.

बाबा अटल गुरुद्वार हे अमृतसरमधील आणखी एक मुख्य धार्मिक संस्थान आहे. अनेक महान व्यक्तींनी उपयोगात आणलेल्या वस्तूंचा संग्रह इथे व्यवस्थित ठेवलेला आहे. धार्मिक कृत्यांच्या व्याव-तीतही हे संस्थान सदैव सक्रिय असते.





शीख धर्मासंबंधीच्या घटना चित्रित करून ठेवलेले अनेक धातूंचे पत्रे या बाबा अटल गुरुद्वारमधे आहेत. हरगोविन्दजींचे पुत्र बाबा अटल राय यांचे स्मरण देत रहाणारे हे नऊ मजल्यांचे भवन सुवर्णमंदिराजवळच आहे.

सुवर्णमंदिराच्या दक्षिणेला अत्यंत विशाल अशी 'गुरुची बाग' आहे. ३० एकर क्षेत्रफळ असणाऱ्या या बागेचे वातावरण गंभीर आहे. येथे डाळिंब, संत्री इ. अनेक फळांचे वृक्ष आहेत. तलाव व छोटया छोटया मंडपांनी ही बाग सुशोभित केलेली आहे.





सुवर्णमंदिराजवळच 'जालियनवाला बाग' आहे. १३ एप्रिल १९१९ रोजी या ठिकाणी एका दुष्ट इंग्रज अधिकाऱ्याच्या आज्ञेवरून स्त्रिया-मुले यांच्यासकट २००० लोकांची निर्घृण हत्या केली गेली. हुतात्म्यांची स्मृति म्हणून इथे एक राष्ट्रीय स्मारक बांधले गेले आहे.




# खोडकर भुतं

वीरगाव नावाच्या एका खेडयात मोतीलाल नावाचा एक मजूर रहात असे. दुसऱ्यांचा माल वाहून नेऊन, हमाली करून, तो आपल्या कुटुंबाची गुजराण करीत असे. त्याला बायको व चार मुले होती. चन्द्रमुखी नदीच्या किनाऱ्यावर येणाऱ्या-जाणाऱ्या प्रवाश्यांचे सामान वाहून त्याला रोज बऱ्यापैकी मजुरी मिळत असे. याप्रकारे आपल्या मुलांचे योग्य तऱ्हेने पालनपोषण तो करी.

एके दिवशी अचानक मोतीलालच्या मनात एक कल्पना आली. त्याला रोज कमाई करण्याचा कंटाळा आला! एकदम अचानक काही संपत्ती हाती लागली तर आपल्याला उरलेलं जीवन आरामात बसून काढता येईल - असे त्याच्या मनाने घेतले.

मोतीलालने अनेकांच्या तोंडून ऐकले होते की वीरगावच्या दक्षिणेला दौलतपूरच्या जंगलात खूपशी भुते रहातात! मोतीलालने ठरवले की आपण काहीही करून या भुतांशी मैत्री करावी व त्यांच्या मदतीने एकदम करोडपति बनावे!

एक दिवस मोतीलाल भल्या पहाटेच उठला व दौलतपूरच्या जंगलाकडे चालू लागला. जंगलात थोडे आत शिरल्यावर त्याला पारंब्या लोंबत असलेले एक भले मोठे वडाचे झाड दिसले. त्याने पाहिले की एक भूत त्या पारंब्या पकडून लोंबकळत आहे, झोके घेत आहे!

मोतीलाल धाडस करून त्या वडाखाली गेला. भुताला आपण पाहिलेच नाही असे ढोंग करत तेथे बसून मोठ-मोठयाने रडू लागला.

थोडया वेळाने पारंब्या सोडून भुताने एकदम मोतीलालच्या समोर उडी मारली. त्याच्या खांद्यावर थापटी मारत त्याने

प्रसाद बर्वे



त्याला विचारले–" तुझ्यावर कसलं संकट आलंय? लवकर सांग."

मोतीलाल अधिकच जोरात रडत म्हणाला–"काय सांगू मी! माझं कुटुंब खूपच मोठं आहे. माझ्या हातात तर एक तांब्याचं नाणं सुद्धा नाही. माझी बायका-पोरं भुकेने तडफडत आहेत."

"अरेरे, असं आहे होय? काळजी करू नकोस! असे म्हणत भुताने हवेत आपला हात फिरवला आणि त्याच्या हातात एक सुवर्णपात्र आले. ते पात्र सोन्याच्या मोहोरांनी भरून त्याने मोतीलालच्या हातात दिले आणि म्हटले–"हे पात्र घेऊन तू सरळ पूर्वेकडे निघून जा. तुला पुन्हा कधी पैशांची गरज भासली तर संकोच न करता या वडाखाली ये."

मोठ्या खुशीने ते पात्र घेऊन मोतीलाल पूर्वेकडे चालू लागला. थोडे पुढे जाताच दोन भुते त्याच्या समोर उभी ठाकली! मोतीलालच्या हातून सुवर्णपात्र हिसकून घेत विकट हसत ती म्हणाली–"अरे, कोणी सुखी दिसलं तर ते आम्हाला सहन होत नाही. ही संपत्ती घेऊन गेल्यावर तुझे कष्ट संपतील, तू आरामात, आनंदात राहशील. छे, छे, आम्ही थोडा उशीर केला तर आम्हालाच धोका आहे."

मग कसचं काय, अन् काय! दुसऱ्याच क्षणी मोतीलालच्या हातातलं सुवर्णपात्र मातीच्या पात्रात रूपांतरित झालं व त्यांतल्या सोन्याच्या मोहोरांचे खडे बनले.

हे परिवर्तन पाहून मोतीलाल खूपच चिडला. त्याने मातीचे भांडे जमिनीवर आपटले. दोन्ही भुते त्याच्या भोवती थोडा वेळ नाचली, गायली आणि हसत राहिली. नंतर पाहता पाहता अदृश्य झाली.

मोतीलाल दु:खी होऊन घरी गेला. पण दुसऱ्या दिवशी मजुरीला न जाता तो पुन्हा दौलतपूरच्या जंगलाकडे चालू लागला. त्याला दुरूनच दिसले की आपल्यावर उपकार करणारे भुत पारंब्यांवर झोके घेत बसले आहे.



त्याने भुताला आपली सारी कहाणी सांगितली. ते सर्व ऐकून भुत म्हणाले–"हे बघ, तू काळजी करू नकोस. कोणी दु:खीकष्टी असलेलं मला पाहवत नाही. अशा लोकांना मदत करण्यात मला फार आनन्द होतो." असे म्हणत भुताने पुन्हा सुवर्णमुद्रा निर्माण केल्या आणि ते सर्व मोतिलालला देत ते भुत म्हटले–"ऐक, यावेळी तू दक्षिण दिशेकडे निघून जा."

मोतीलाल सुवर्णपात्र घेऊन दक्षिणेकडे निघाला. थोडा पुढे जातो तोच 'दुसऱ्याचे सुख न पाहवणारी' ती दोन भुते त्याच्या-जवळ आली आणि म्हणाली–"अरेरे, तुझं नशीब फळफळलेलं दिसतंय. वा, काय सुंदर घुबड दिसतंय हे!"

आणि काय! दुसऱ्याच क्षणी मोती-लालच्या हातातलं सुवर्णपात्र अदृश्य झालं आणि त्या जागी एक घुबड दिसू लागलं! ते पाहताच मोतीलालच्या अंगावर काटा उभा राहिला. त्याने घुबड दूर फेकून दिले आणि दोन्ही भुतं अदृश्य झाली.

मोतीलाल आजही दु:खी मनाने अन् रिकाम्या हातांनी घरी परतला. दुसऱ्या दिवशीही तो कामाला गेला नाही. यावेळी आपल्याला मिळणारं धन काळजीपूर्वक परत आणण्याचा विचार करत करत तो वडाजवळ पोचला.

वडाजवळ जाऊन पुन्हा तीच हकीकत त्याने भुताला ऐकवली. भुताने त्याला सहानुभूति दाखवत म्हटले–"तुझ्यासारख्या



दीन दुःखी लोकांना मदत करणं हे माझं कामच आहे." असे म्हणत पुन्हा सुवर्णपात्र अन् सुवर्णमुद्रा देत त्याला भुताने यावेळी ईशान्य दिशेला जायला सुचवलं.

मोतीलाल भुताकडे रागाने पहात म्हणाला–"दरवेळी तू म्हणालास त्या दिशेनेच मी जात राहिलो, अन् माझं नुकसानच नुकसान झालं. म्हणून यावेळी मी सरळ माझ्या गावच्या दिशेने जाणार."

यावर भुत क्रोधाने म्हणाले–"हे पहा, संकटात सापडलेल्या लोकांना मदत करणं ही जशी माझी आवड, तशीच तुला माझे जे मित्र भेटले त्यांना आवड आहे–माझ्याकडून मदत मिळवलेल्यांना रडवणं! मी ज्या दिशेने जायला सांगत आहे त्या दिशेने तू न गेलास तर त्यांना दुःख होणार नाही? त्यांना दुःखी झालेलं मला कसं पाहवेल? आम्ही तिघंही जानी दोस्त आहोत. तू जर ईशान्य दिशेने जाणार नसलास तर मी त्यांना आताच बोलावून घेतो." असे म्हणत विचित्र रूप धारण करीत ते भूत तिथून अदृश्य झाले. आणि त्याच क्षणी ती दोन खोडकर भुतं तिथे अवतरली. त्यांनी यावेळी सुवर्णपात्र अन् सुवर्णमुद्रांची राख करून टाकली. ओरडत आरडत ती भुतं उड्या मारून वडावर चढून बसली.

या घटनेने आता मोतीलालच्या डोक्यात स्वच्छ प्रकाश पडला, भुतांचे सर्व नाटक त्याला समजून चुकले! एक भूत सोनं देण्याचा अभिनय करतं अन् दुसरी भुतं ते अदृश्य करण्याचा अभिनय करून स्वतःची करमणूक करून घेतात! त्याला एक म्हण आठवली–'हावरटपणा ही वाईट गोष्ट आहे, आणि लोभ हा दुःखाचे कारण आहे.' आतापर्यंत त्याची तीन दिवसांची मजुरी गेली होती आणि उलट शारीरिक कष्टही फार झाले होते.

या अनुभवानंतर मोतीलाल पुन्हा कधीही हावरटपणा व लोभाला बळी पडला नाही. मजुरी करून समाधानपूर्वक तो आपले आयुष्य चालवू लागला.






सार्‍या गोकुळात एकाच वेळी हालचाल सुरू झाली. सर्वजण यात्रेच्या तयारीत गढून गेले. सर्व सामान गाड्यांवर लादले गेले. दुधा-दह्याच्या हंड्या सुरक्षित ठेवल्या गेल्या, पोत्यांतून धान्य, तांदूळ वगैरे व्यवस्थित बांधले गेले. तऱ्हेतऱ्हेच्या दोऱ्या, दावणी, रव्या, खुरपी, कोयते, सुऱ्या, भाले, घंटा वगैरे अवजारं नीट ठेवली गेली. घरगुती भांडी-कुंडी एकान्त एक ठेवून पोत्यात भरली गेली. बैलगाड्या रांगेत उभ्या केल्या गेल्या–आणि यात्रेची तयारी पूर्ण झाली.

चांगले बलवान धट्टेकट्टे लोक गुरांना हाकत पुढे निघाले. या कळपांमागे गाड्या निघाल्या व त्यांच्यामागे इतर माणसे चालू लागली. तरुण स्त्रिया आपली निराळी टोळी करून हसत-खेळत, गप्पा मारत, आपले मनोरंजन करीत चालत राहिल्या. लुळ्या-पांगळ्या व म्हाताऱ्या लोकांना मदतीचा हात देत तरूण चालू लागले. अधून मधून झाडांची सावली पाहून लोक विश्रान्तीसाठी थांबत, पाणी पीत. लहान मुले-बाळे काही बाही खात. तगडे व जबाबदार लोक कोणी फार पुढे जाऊ नये व कोणी मागेही राहू नये याची काळजी घेत होते. एके ठिकाणी भरपूर सावली व पिण्यासारखे पाणी पाहून लोकांनी जेवण केले व थोडी विश्रान्ती घेऊन पुन्हा सर्वजण पुढे चालू लागले. अशा प्रकारे सर्व गोकुळ वृन्दावनात

५. विष वृक्षाचे निर्मूलन



पोचले! गवळी व अनुभवी मोठ्या माणसांनी घरे उभारण्यासाठी जागेची निवड केली. सर्व गाड्या एकाच ओळीत अर्धचन्द्राकार करून उभ्या राहिल्या. काही लोकांनी तात्पुरत्या निवासासाठी लतामंडपांचा आश्रय घेतला. काहींनी झाडांखाली आपापला संसार थाटला. कित्येकांनी काटेरी झाडे तोडून आणून न्हाणीघरे बनवली. पुऱ्या एका दिवसातच लोकांनी वृन्दावन वसवले. दिवस जात राहिले. सजल्या सवरलेल्या गोपिका, कामाच्या गडबडीत इकडून तिकडे धावपळ करणारे गोप व गायींच्या खिल्लारांनी वृन्दावनाला अपूर्व शोभा आली. मुलांचे खेळ व आरडेओरडे यामुळे वृन्दावन नेहमी गजबजलेले वाटे.

दिवसेंदिवस गोपाळांची संपत्ति वाढू लागली, गायीबैलांची खिल्लारे विस्तारली व एकूण वृन्दावनातले आयुष्यच मजेने जाऊ लागले. आता कृष्ण तेरा वर्षांचा झाला. सकाळीच सर्व गोपबालक एकमेकांना हाका मारत शेवटी कृष्णाच्या घरापुढे गोळा होत. सर्व मिळून गायी-गुरे घेऊन यमुनेकाठी जात. गुरांना चरावयास सोडून ते सर्वजण तऱ्हेतऱ्हेचे खेळ खेळत. नदीत आंघोळी करत. दुपारी झाडाखाली बसून जेवण करत व संध्याकाळी गायी-गुरे एकत्र करून त्यांना हाकत आपाआपल्या घरी घेऊन जात. मुलांचे दिवसही अशा प्रकारे मजेत चालले होते.

ग्रीष्मऋतुचे आगमन झाले व अचानक गायींमधे निनिराळ्या रोगांचा फैलाव सुरू झाला! गायींची शरीरे कापू लागली, जागेवर उभे राहणेही त्यांना कठीण होऊ लागले, तोंडातून फेस गळू लागला, त्यांच्या जिभाही बाहेर लटकू लागल्या! खूर फाटून त्यात किडे वळवळू लागले!

गायींचा आजार घालवण्यासाठी गोपाल काष्टौषधी–पाळंमुळं यांचा उपयोग करू लागले पण त्यांचा काही उपयोग होईना. काय करावे हेच त्यांना समजेना! हे आजार



यमुना किनाऱ्यावरील जंगलांतील इतर जनावरे, जीव-जंतु यांच्यातही फैलावले–इतकेच नव्हे–गोपही आजारी पडू लागले!

नंद-यशोदा, रोहिणी अस्वस्थ होऊन गेले. कृष्णाला वाटले की ही जागा सोडली तरच तरणोपाय आहे! मग कृष्णाने हे बलरामला सांगितले. काही कळप हाकलून त्यांनी कोसभर दूर नेऊन ठेवले. काही इतर गोपांनीही त्यांचे अनुकरण केले. अशा प्रकारे ज्यांनी जागा हलवली ते लोक रोगांना बळी पडले नाहीत.

परंतु नंदाला हे गाव सोडणे पसंत पडेना. तो म्हणू लागला, "हेच आमचे ठिकाण आहे. इथे जी काही संकटे येतील त्यांना आपण तोंड दिले पाहिजे, सर्व नातेवाईकांना घेऊन आता आपण कुठे जायचे? नंद, यशोदा व रोहिणी आजारी पडूनही गाव सोडायला तयार होईनात, हे पाहून आता काय करावे हे कृष्णाला कळेना!

गोकुळात विदेह देशाहून आलेला एक म्हातारा गोप होता, त्याने गोपप्रमुखाला सुचवले–"असं पहा बाळ, आपल्या उपजीविकेचा आधार म्हणजे आपले पशुधन! शिवशंकर हा पशुपति! तेव्हा भगवान शंकराची आराधना केली तरच आपलं हे संकट दूर होईल. असं हताश बसून काही



उपयोग नाही. शास्त्री-पुरोहित बोलावून शिवाची आराधना करवा."

या अनुभवी वृद्धाच्या सूचनेवर विश्वास ठेवून सर्व गोपांनी विद्यापारंगत ब्राह्मणांना बोलावून शिवाच्या अर्चनेसाठी योग्य व्यवस्था केली. एक आठवडाभर रात्रंदिवस शिवपूजा, अभिषेक, नैवेद्य वगैरे यथासांग निर्विघ्नपणे झाले. सातव्या दिवशी एका चांगल्या ब्राह्मणाच्या अंगात संचार झाला. तो आवेशाने विकृत हसू लागला, घुमू लागला, नाचू लागला, आणि म्हणाला–

"परम-शिवाने मला कैलास पर्वतावरून पाठवलं आहे. त्यांनी मला म्हटलं–'अरे शंखकर्णा. कालिन्दीच्या तटावरील रोग-



पीडित जनावराना मदत कर, जा.' तुम्ही शिवाची पूजा केलीत, त्यामुळे ते फार प्रसन्न झालेत. तुम्ही अशा प्रकारच्या आजाराला का बळी पडलात माहित आहे? द्वापरयुगाच्या शेवटी भूलोकावरील लोकांना त्रास देण्यासाठी राक्षसांनी अनेक रूपे धारण केली, त्यावेळी विरोचनचा पुत्र-काळकलि नावाचा राक्षस–हा यमुनेच्या दक्षिण किनाऱ्यावर एका विषारी खैराच्या झाडाच्या रूपात अवतीर्ण झाला. या वृक्षाच्या चारी बाजूंना त्याचे अनुचर विषवृक्ष व काटेरी झाडांच्या रूपात अवतरले. त्या विषारी खैराच्या झाडाची हवा लागून तुमची जनावरे रोगग्रस्त झाली, तिथले पाणीही दूषित झाले. हा विषवृक्ष समूळ उपटून फेकण्याची क्षमता केवळ नंदाचा मुलगा कृष्ण व बलराम यांच्यातच आहे. ते सहमत झाले तर आपणा सर्व लोकांचे रक्षण होईल. ही वार्ता कळवण्यासाठीच त्यांनी मला पाठवलं आहे. आता मला आज्ञा व्हावी. मी निघतो आता."

ही वार्ता संपल्यावर ब्राह्मणाच्या अंगात आलेल्या संचाराचा प्रभाव हळूहळू कमी झाला. बाकी सर्व ब्रह्मवृन्द प्रसन्न झाला व आरंभिलेल्या शिवपूजा सप्ताहाची त्यांनी सांगता केली. नंतर काही गोपबालकांना तावडतोब बलराम व कृष्ण यांना बोलावण्यासाठी पाठवले केले. त्यांनी जाऊन त्या दोघांना सर्व वृत्तान्त सांगितला. सर्व हकीकत ऐकल्यावर दोघेही भाऊ म्हणाले– "ईश्वराची आज्ञा झाली आहे. तेव्हा आमचे मातापिता व आपल्या जातीच्या लोकांना वाचवण्यासारखे दुसरे पुण्य कोणते? आम्ही अवश्य त्या विषारी खैरवृक्षाचा नायनाट करू."

कृष्णाने व बलरामाने ब्राह्मणांना व शंकरांना साष्टांग प्रणाम केला, शिव मंदिराला प्रदक्षिणा घातली व लगेच हातात कुऱ्हाडी घेऊन तो विषवृक्ष उपटण्यासाठी जंगलाकडे निघाले.



शिवाची आराधना सुरू केल्यापासून बरेचसे गोप बरे झाले होते. ते सर्व इतर गोपबालकही त्यांना मदत करण्यासाठी सिंहनाद करीत त्यांच्या मागे निघाले.

विषवृक्ष शोधून काढायला त्यांना मुळीच त्रास झाला नाही. कारण जंगलात शिरतानाच त्यांना एक प्रकारचा दुर्गंध जाणवू लागला. त्या दिशेने ते जसजसे पुढे जाऊ लागले तसतसा तो दुर्गंध असह्य होऊ लागला. लवकरच भयानक आकाराचा, आकाशाला भिडू पाहणारा, तो राक्षसी अक्राळविक्राळ वृक्ष त्यांना समोर दिसला. त्याच्या चोहों बाजूंना काटेरी झाडे-झुडुपे उभी होती. कृष्ण-बलरामांनी भोवतालची काटेरी झाडे तोडून त्या विषवृक्षापर्यंतचा रस्ता मोकळा केला. आणि ते सर्व त्या वृक्षाजवळ पोचले.

त्या विषारी खैरवृक्षाचे खोड तीस पुरुष इतके उंच होते. त्याची फळे हत्तीच्या मस्तका—एवढी मोठी होती, त्याच्या फांद्या चारी दिशांना खूप लांबवर फैलावल्या होत्या. त्याच्या फळांनाच तो घाणेरडा वास येत होता! म्हणून कृष्णाने प्रथम ती फळेच नाहीशी करण्याचा निर्णय घेतला.

यानंतर कृष्ण व बलराम त्या झाडाची कच्ची पक्की सर्व फळे तोडून टाकू लागले. फांद्यांना लागलेली फळे लाठ्या-काठ्यांनी व दगडांनी ते पाडू लागले.

सर्व गोपाळही आरोळ्या ठोकत त्यांना या कार्यात मदत करू लागले. फांद्याही ते तोडू लागले.

एकीकडे कृष्ण-बलरामांनी अशा प्रकारे त्या विषवृक्षाचा विध्वंस आरंभला, तर तिकडे दुसरीकडे त्या भागात फिरणाऱ्या गायी वासरांनी गोपाळांवर हल्ला चढवला! ती सामान्य गायी-वासरे नव्हती—तर तिथे झाडांच्या रूपाने उभे असणाऱ्या राक्षसांची बायकामुले होती ती! ती सर्व तिथेच आसपास संचार करीत असत.

कृष्णाने आता या पशूंकडे मोर्चा वळवला. झाडा-झुडुपांच्या रूपातले राक्षस खाली





पडताना रक्त ओकत स्वतःच्या नैसर्गिक रूपातच मरून पडत होते. ते पाहून त्यांच्या गायींच्या रूपातल्या बायका क्रोधाने शिंगे रोखून कृष्णावर धावून जाऊ लागल्या. कृष्णाने त्यांना अगदी सहजपणे तिथून पळवून लावले. नंतर थोड्याच वेळांत त्यांनी तो वृक्ष मुळासकट उपटून टाकला.

नंतर गोपाळांनी ते झाडाचे तुकडे, भोवतालची पाडलेली काटेरी झाडे व त्या राक्षसांची प्रेते यांचा एक मोठा थोरला ढीग रचला; अन् त्या ढिगाला आग लावून दिली. पाहतां पाहतां त्या आगीच्या ज्वाला आकाशाला भिडल्या. अग्निदेवानेही ती झाडे झुडपे व राक्षसांची प्रेते मोठ्या प्रेमाने आपल्या कवेत घेतली. थोड्याच वेळात तिथे फक्त चिता-भस्मच बाकी उरले!

गोपाळांची शरीरे घामाने भिजली होती. त्यावर थोडी राखही चिकटली. श्रमाने ते खूप दमले होते, पण त्यांचा उत्साह अदम्य होता! ते सर्वजण तसेच आरडाओरडा करीत यमुनेवर आले. पाण्यांत उड्या टाकून त्यांनी मनसोक्त स्नान केले, एकमेकांवर पाणी उडवले, पाण्यावर जोर-जोराने हात मारून त्यांनी गाणी गायली. अशा प्रकारे खूपशी जलक्रीडा करून ते पाण्याबाहेर आले. या अवधीत बायका खाणे घेऊन यमुनाकिनारी पोचल्या होत्या. सर्वांनीच आनंदाने भोजन केले व नंतर नाचत-गात, आरडा-ओरडा करीत, मोठ-मोठ्याने घोषणा देत ते सर्व आपापल्या घरी गेले.

काही दिवस लोटले. जनावरे व गोप लोकांचा आजार नाहीसा झाला. ग्रीष्म उलटला. वर्षाकाळचे मेघ आकाशात संचार करू लागले. ढगांचा गडगडाट ऐकून सर्वत्र आनंदीआनंद पसरला. लवकरच पहिला गारांचा पाऊस झाला. सारी पृथ्वी हिरवीगार झाली. झरे खळखळत वाहू लागले.

विदेह देशात मात्र अशा आनंदात विरजण पडले! या प्रांतातील कुंभक याचे गोधन सर्वात अधिक होते. तो धार्मिक व दानशूर म्हणून प्रसिद्ध होता. त्याच्या वा त्याच्या पत्नीकडून काही दान मिळाल्या-शिवाय याचक कधी विन्मुख होत नसे. कुंभक हा यशोदेचा भाऊ होता. त्याला श्रीधाम नावाचा एक मुलगा व नीला नावाची मुलगी होती. सुखी कुटुंब होते ते!

प्राचीन काळी विष्णुने जेव्हा तारकासुराशी युद्ध केले, तेव्हा या कुंभकाने कालनेमीच्या सात पुत्रांचा वध केला होता. आता कुंभकाचा सूड घेण्यासाठी त्याच्या गावात—गोव्रजात—त्यांनी बैलांच्या रूपात जन्म घेतला होता. त्यांच्या अत्याचारांना सीमा नव्हती. जनावरांच्या कळपात घुसून जे गायी-बैल दिसतील त्यांना ते मारून टाकत. गोपाळांना शिंगांनी, खुरांनी मारून खाली पाडत, गोठ्यात बांधून ठेवलेल्या जनावरांवरही ते हल्ला करीत असत.

कुंभकाने त्या बैलांना पकडण्याचे अनेक प्रयत्न केले. अनेक वीर व मल्ल त्यांना मारायला गेले आणि स्वतःच जखमी होऊन परतले. अशा प्रकारे कुंभकाच्या व्रजभूमीत नष्ट करायला काहीच उरले नाही, तेव्हा त्यांनी विदेह राज्यात घुसून तिथली जनावरे व माणसे यांचा विध्वंस आरंभला!

या अत्याचारांनी पिडलेली प्रजा मिथिला नगरीच्या राजाकडे गेली व विनंति करू लागली—"महाराज, कुंभकाच्या गायींच्या खिल्लारात जन्मलेले सात बैल आमच्या खिल्लारांची आणि हिरण्यागार शेतांची नासाडी करीत आहेत. त्यांच्या अत्याचाराला काही सीमा राहिली नाही. त्यांचा वध करून आपण आमचे रक्षण केलं नाहीत, तर आम्हाला आपले राज्य सोडून दुसऱ्या राजाच्या आश्रयाला जायची पाळी येईल. आमचे रक्षण करा. आम्ही तर आपली प्रजा—आपण आमचं रक्षण नाही करणार तर दुसरं कोण?"





## साहसी कार्य

कोणे एके काळी हिमगिरी गावावर लुटारुंचे हल्ले नेहमी वाढतच राहिले. संख्येने हे लुटारू केवळ दहाच होते, परंतु ते अचानक हल्ला करीत. यामुळे गावातील लोक भयाने जीव मुठीत धरून कशीतरी कालक्रमणा करीत होते.

शेवटी अशा प्रकारच्या जीवनाला कंटाळून, गाव सोडून दुसरीकडे कोठेतरी जाऊन रहाण्याचा निर्णय त्यांनी घेतला. वस्तीसाठी योग्य स्थान पाहून काढण्यासाठी वीरसेन नावाच्या एका तरुणाला पाठवले.

वीरसेन प्रथम आपल्या शेजारच्या गावी पोचला. गावच्या अधिकाऱ्याला भेटून त्याने सर्व वृत्तान्त सांगितला.

अधिकाऱ्याने त्याचे सर्व बोलणे ऐकून घेऊन म्हटले—"पहा बाबा, तुमच्या गावातले लोक एकाद्या नव्या ठिकाणी जाऊन तिथे ते स्थिरस्थावर झाले, तरी तेथेही लुटारू तुम्हाला सतावणार नाहीत याचा काय भरंवसा? तुमच्या गावच्या लोकांची कमजोरी ओळखूनच ते नेहमी तुमच्यावर हल्ला करतात, पण आमच्या गावच्या हद्दीशी सुद्धा फिरकायला ते घाबरतात!"

"महाराज, आमच्या गावच्या लोकांना एका सूत्रात बांधणे ही काही आमच्या हातची गोष्ट नाही." वीरसेन म्हणाला.

अधिकाऱ्याने थोडा विचार केला व तो म्हणाला—"आमच्या गावात प्रबोधानन्द नावाचे एक योगी आहेत. तू आपल्या गावची समस्या त्यांच्यापुढे मांडलीस तर ते काही न काही उपाय तुला जरूर सांगतील."

वीरसेनने योगी प्रबोधानन्दांना भेटून आपल्या गावची समस्या त्यांना निवेदन केली. योगी म्हणाले—"मी तुमच्या गावी येतो व लुटारूंना तोंड देण्याची शक्ति तुमच्या गाववाल्यांच्या शरीरात भरतो."



यानंतर वीरसेन व योगी हिमगिरी गावात आले.

वीरसेन कुणा योग्याला घेऊन आला आहे, व या योग्याला विशेष शक्ति प्राप्त आहेत असा प्रचार गावात झाला. मग काय हवे! गावचे सर्व लोक एकत्र आले व त्यांनी योग्याचे स्वागत केले. योग्याने त्यांना समजावून सांगितले की हिम्मत बांधली तर न साधता येण्यासारखे कोणतेच काम नाही.

गाववाले योग्याला म्हणाले–"आपण म्हणता ती गोष्ट आम्ही सर्वजण जाणतो. पण खरी गोष्ट अशी की, आमच्या गाव-वाल्यांपैकी कोणालाच लाठी फिरवता येत नाही की तलवार चालवता येत नाही! अशा स्थितीत आम्ही लुटारूंशी लढावे कसे?"

"हिम्मत आणि योग्य उपाय यांच्या साह्याने साधारण माणूसही धाडसी कृत्य करू शकतो. मी तुम्हा सर्वांना हिम्मतवान बनवीन, लुटारूंना तोंड देण्याचा उपायही सांगेन. परंतु एक अट आहे–मी रोज तुम्हाला सल्ला देईन, तो तुम्ही ऐकला पाहिजे." प्रबोधानन्द म्हणाले.

"आपण आम्हाला लाठी-तलवार चाल-वायला शिकवा, किंवा एखादी अद्‌भुत शक्ति वा काम शिकवा. पण केवळ पोकळ भाषणांनी आमचा वेळ खाऊ नका." गावप्रमुख मोठ्या विनयाने म्हणाला.

"मी स्वतः अद्‌भुत शक्ती अन् कामांनी लुटारूंना पळवून लावू शकत नाही. तुम्ही लोक माझे बोलणे ऐका. माझ्या बोलण्या-वर तुमचा विश्वास नसेल तर माझी परीक्षा घेण्यासाठी आपल्यापैकी कोणीही पुढे यावे. त्याच्याकरवी मी एकाच दिवसात साहसी-कार्य घडवून दाखवतो." योगी म्हणाला.

गाववाल्यांनी आपसात सल्लामसलत केली व योग्याची परीक्षा घेण्यासाठी दुर्बल नावाच्या एका माणसाची निवड केली. खरे म्हणजे त्याचे खरे नाव कोणालाच माहीत नव्हते, सर्वजण त्याला 'दुर्बल' च म्हणत



असत. तो दुबळा व कमजोर दिसे, त्याच्या बायकोचे बोलणे त्याला वेदवाक्य असे. तिच्या सांगण्यावरूनच तो आपल्या आई वडिलांना सोडून आला होता व त्याने निराळा संसार मांडला होता. मांजर, उंदीर यांना घाबरत असे, मुंगी-पाल यांना पाहून तो दचके–इतका तो भित्रा होता! बायकोने सांगितल्यावाचून तो पाणीसुद्धा पीत नसे!

"ऐक, एकाच दिवसात मी तुझ्याकडून साहसी काम करवून घेईन. ये माझ्या-जवळ." प्रबोधानन्द दुर्बलला म्हणाले.

दुर्बल पुढे पाऊल टाकणार, इतक्यात त्याच्या बायकोने त्याला अडवले व म्हणाली–"ठीक आहे, जा, पण योगी जे, सांगतील ते मोठ्या निष्ठेने ऐकून घ्या आणि नंतर माझ्याकडे या. पण नीट कान उघडून ऐका, तुम्ही कोणते साहसी कृत्य करू पहाल तर मी चुप बसणार नाही."

यानंतर दुर्बल प्रबोधानन्द जवळ गेला. योगी त्याच्या कानात म्हणाले–"ऐक, मी जे धाडसी कृत्य तुला सांगणार आहे, ते केल्याने तुला काहीही अपाय होणार नाही, धोका होणार नाही. मी माझ्यात असलेल्या शक्तींच्या सहाय्याने तुझे रक्षण करत जाईन. यामुळे तुझ्या हाती अपार संपत्ती येईल. तुझी कीर्ति पसरेल. आत्ता तुझी



पत्नी मान्यता देत नसली तरी नंतर मात्र ती जरूर खुश होईल. तू नीट विचार कर. हे ही लक्षात ठेव की आयुष्यात तुझ्याकडून काही धाडसी काम होणार असेल तर ते माझ्याच मदतीने होईल; अन्यथा तुझ्या हातून काही होणार नाही. तुझ्या हाती नामी संधी आली आहे, ती सोडू नकोस."

दुर्बलने योग्याचे हे म्हणणे मुकाट्याने ऐकून घेतले. योग्याने त्याला याच गोष्टी तीन वेळा ऐकवल्या आणि म्हटले–"आता तू जा. उद्या सर्व लोक इथे जमतील, तेव्हां मी तुझ्या हातून धाडसी काम करून घेणार आहे. म्हणून उद्या जरा लवकरच तू माझ्याकडे ये."



यानंतर योग्याने तेथे उपस्थित असलेल्या लोकांना दुसऱ्या दिवशी अवश्य हजर रहायला सांगितले.

दुर्बलच्या बायकोने सर्व हकीकत ऐकून घेतली व ती रागाने म्हणाली–"मला असं वाटतंय की तुम्ही सर्वजण माझ्या नवऱ्याला माझ्यापासून तोडायचे कारस्थान करीत आहात. पण याद राखा मी तुमचं कारस्थान पार पडू देणार नाही. मी आपल्या नवऱ्याला साहसी काम वगैरे काही करू देणार नाही." असे म्हणून नवऱ्याला बरोबर घेऊन ती निघून गेली.

दुसऱ्या दिवशी सर्व लोक त्याच जागी जमले. दुर्बलकडे पहात योगी म्हणाला–"दुर्बल, मला असं वाटलं होतं, की कालच्या सभेनंतर तू एकदा एकटा मला येऊन भेटशील. पण तू काही आला नाहीस. साहसी काम करण्याची तुझी इच्छा नाही का?"

"स्वामी, निर्णय घ्यायला उशीर झाला खरा, क्षमा असावी. माझ्या मनात ते काम करायची इच्छा आहे." असे म्हणत दुर्बल पुढे झाला व त्याने योग्याचे पाय धरून नमस्कार केला.

"आपण सर्वजण पहात आहात ना? मी जे बोललो होतो ते मी करून दाखवले." योगी त्या ग्रामवासींना म्हणाला.

प्रमुखाने विचारले–"स्वामी, आपण तर म्हणाला होता की एकाच दिवसात दुर्बल-कडून कांही साहसी काम करवून दाखवीन. पण साहसी काम करायचे की नाही हे ठरवायलाच त्याला एक दिवस लागला. अशा स्थितीत तो साहसी काम काय करणार कपाळ? तुम्ही आपलं वचन खरं करू शकला नाहीत."

यावर सर्व गाववाले योग्याकडे पाहून उपरोधाने हसू लागले.

दुसऱ्याच क्षणी वीरसेन म्हणाला–"आपण उगीचच का हसता आहात? या योगीमहाराजांच्या सल्ल्यामुळेच आपल्या शेजारच्या गावचे लोक स्वतःला लुटारू लोकांपासून वाचवू शकले आहेत. म्हणून मला वाटते की यांचे बोलणे नीट ऐकून घ्या."

योगी थोडा वेळ गप्प राहिला व पुन्हा गंभीर आवाजात म्हणाला–"तुम्ही लोक स्वतःच म्हणत होतात की आपल्या बायकोला विरोध करून दुर्बल कोणतेही काम करू शकणार नाही. याच्या पत्नीने कालच सर्वांसमोर सांगितलं होतं की ती त्याला कोणतंही धाडसी काम करू देणार नाही. अन् तरीही आत्ता दुर्बल असं काम करायला तयार झाला आहे. याचं तात्पर्य असं की दुर्बलने आपल्या बायकोला विरोध केला आहे, म्हणजेच त्याने बायकोचं बोलणं न ऐकण्याचं धाडसी काम केलं आहे!"

हे ऐकून तिथे जमलेल्यांपैकी काहीजण हसू लागले. यावर योगी म्हणाला–"दुर्बलला हसायची तुमची लायकी नाही. तो आपल्या बायकोला घाबरतो, तर तुम्ही चोरांना घाबरता. चोरांना मारून पिटाळून लावणाऱ्या शेजारच्या गावच्या लोकांनाच फक्त दुर्बलला हसायला अधिकार आहे. त्यांच्यात ती योग्यता आहे."

यावर गावच्या लोकांना स्वतःच्या असमर्थतेची लाज वाटली, सर्वांनी आपल्या माना खाली घातल्या. गावचा प्रमुख योग्याला नमस्कार करून म्हणाला–"स्वामी, आपल्या बायकोलाच काय, पण साध्या उंदरा मांजराला घाबरणाऱ्या दुर्बल मधे आपण साहस उत्पन्न करून आमच्या गावच्या लोकांच्या डोळ्यात चांगलेच अंजन घातलेत! आता पुन्हा जेव्हा लुटारू आमच्या गावावर हल्ला करतील, तेव्हा आम्ही सर्वजण एक होऊन, प्राणपणाला लावून त्यांना तोंड देऊ, त्यांना पळवून लावू."

यावर प्रबोधानन्द फार खुश झाले–आणि वीरसेन व गाववाल्यांना आशीर्वाद देऊन तेथून निघून गेले. यानंतर एके दिवशी गावावर हल्ला करणाऱ्या चोरांना पळवून लावण्यात गाववाले यशस्वी झाले.










# न पूर्व, न अष्टमी

एका गावात चार दुष्ट तरुण चोर म्हणून प्रसिद्ध होते. एकदा त्यांनी एका गरीब शेतकऱ्याची बकरी चोरली. बकरी घेऊन ते गावाबाहेरील तलावाच्या काठी गेले, वडाच्या झाडाखाली तिला मारले आणि शिजवून त्यांनी शेळी फस्त केली.

शेतकऱ्याला ही वार्ता समजली. त्याला वाटलं या गावात काही त्याला न्याय मिळू शकणार नाही. तो सरळ राजधानीच्या गावी गेला आणि राजाकडे त्याने तक्रार केली. राजाला न्यायाची मागणी केली.

राजाने चारी तरुणांना पकडून आणविले आणि दोन्ही बाजूचे म्हणणे ऐकायला सुरुवात केली.

चार चोरांपैकी रामू नावाचा एक चोर हिम्मत करून म्हणाला–"महाराज, या गरीब शेतकऱ्या जवळ खरं म्हणजे बकरीच नव्हती. असं असेल तर चोरीचा प्रश्नच कुठे येतो?"

हे ऐकून शेतकऱ्याला खूप राग आला. तो म्हणाला–"रामू, तलावाच्या बांधावर वडाच्या झाडाखाली तुम्ही लोकांनी जी बकरी मारून खाल्ली ती कोणाची होती बरं?"

चारां पैकी एक चोर हसून म्हणाला–"महाराज, आमच्या गावात तलावच नाही, वडाचे झाड ही नाही!"

गरीब शेतकऱ्याने निवेदन केले–"हा तर शुद्ध अन्याय आहे, महाराज. गावात तलाव आहे, तलावाच्या पूर्वेला अष्टमीच्या दिवशी या लोकांनी माझी बकरी मारून खाल्ली!"

हे ऐकून आणखी एका चोराने सांगितले–"महाराज, आमच्या गावाला पूर्व दिशाच नाही. आमच्या गावी अष्टमी तिथि पण आली नाही. असं असता अष्टमीच्या दिवशी बकरी कशी मारून खाता येईल. खोटं, हा सगळं साफ खोटं बोलतो आहे!"

राजाला खरी गोष्ट समजून चुकली. राजाने गरीब शेतकऱ्याला नुकसान भरपाई दिली, नि चारी चोरांना कडक शिक्षा फर्मावली!





# ज्योतिषी

पर्शियामधे एक गरीब माणूस रहात होता. त्याचे नाव होते युसूफ. तो शहरातील गल्ल्यांमधे हिंडून काही फुटकर वस्तु विकून आपली गुजराण करीत असे.

ऐके दिवशी युसूफची बायको आंघोळी-साठी हमामखान्यात–स्नानागारात–गेली. त्याच वेळी तिथे आणखी एक बाई आली व तिने तिथल्या पहारेकऱ्याला सांगितले–"मला आत्ता स्नान करायचे आहे. आत्ताच्या आत्ता आतील सर्वांना बाहेर काढून मला स्नानागार रिकामे करून दे." पहारेकऱ्याने आतील सर्व स्त्रियांना ताबडतोब हमाम-खान्या बाहेर निघायची आज्ञा दिली.

ही आज्ञा ऐकून युसूफच्या बायकोला, फातिमाला फार राग आला. तिने व्यंगाने पहारेकऱ्याला विचारले–"ही कोण मोठी महाराणी लागून गेली? तिच्यासाठी आम्हाला का बाहेर काढलं?"

"तुला माहिती नाही ही कोण आहे ते? ही तर राजाच्या मुख्य ज्योतिष्याची बायको!" पहारेकरी म्हणाला.

हे ऐकून फातिमा चिडूनच घरी पोचली. आणि आपल्या नवऱ्याला म्हणाली–"तुम्ही तर अगदी कुचकामाचे आहात, अगदीच नालायक! कमीत कमी एक ज्योतिषी व्हायचे, लोकांनी माझा जरा तरी मान ठेवला असता!"

"जन्मकुंडल्या बनवू शकत नाही, ग्रह-नक्षत्रांचा हिशोब वगैरे मला काही माहीत नाही तेव्हा ज्योतिषी–बितिषी बनणं आपल्याला काही जमणार नाही बाबा!" युसूफने साफ सांगून टाकले.

"ते मला काही चालणार नाही. तुम्ही ज्योतिषी बनला नाहीत तर मी तलाक घेऊन माहेरी निघून जाईन." फातिमाने धमकी दिली.



बिचारा युसूफ नाइलाजाने हातीं पंचांग व फासे घेऊन स्नानागाराच्या बाहेर ज्योतिष सांगण्यासाठी बसला.

त्या वेळी राजकुमारी हमामखान्यात स्नान करत होती. स्नान सुरू करण्यापूर्वी तिने आपल्या हातातील अंगठी काढून एका दासीच्या हाती दिली अन म्हणाली– "हे बघ, ही नीट संभाळून ठेव, स्नान झाल्यावर मी ही तुझ्याकडून मागून घेईन."

अंगठी कुठे ठेवावी हे दासीला कळेना. इतक्यात तिथल्या संगमरवरी भिंतीत तिला एक भोक दिसले. दासीने हातातली अंगठी त्या भोकात ठेवली व खुणेसाठी तिने त्या भोकात थोडेसे केस कोंबून ठेवले.

राजकुमारी स्नान करून आली, तिने दासीला विचारले–"कुठे आहे माझी अंगठी?" आपण अंगठी ठेवली हे आता दासीला काही केल्या स्मरेना.

हिला घाबरलेली पाहून राजकुमारी तिच्यावर फारच रागावली–"तू आत्ताच्या आत्ता अंगठी हजर केली नाहीस तर आज मी तुझा जीवच घेईन." असे म्हणत ती दासीला मारायला धावली.

दासी घाबरून हमामखान्याबाहेर पळून आली. तिथे तिला ज्योतिषी दिसला.

"महाराज, सांगा बरं राजकुमारीची अंगठी कुठे असेल? नाही तर आज माझी काही खैर नाही." दासीने युसूफला विचारले.

आता काय करावे हे ज्योतिषाला समजेना! त्याने एकदा दासीकडे पाहिले, एकदा पंचांग उलटून-पालटून पाहिले, अन् एकदा फासे फेकून ते निरखून पाहिले.

दासीने आपल्या डोक्यावरून जो साडीचा पदर घेतला होता, त्याला कुठेतरी एक भोक होते व त्यातून तिचे केस बाहेर डोकवत होते, ते पाहून ज्योतिषाने काही विचार न करता बोलायला सुरुवात केली– "पहा, मला एक भोक दिसत आहे आणि त्यांतून काही केस बाहेर दिसत आहेत." मग काय अवकाश! दासीला एकदम अंगठी ठेवलेली जागा आठवली. ती धावतच पुन्हा स्नानागारात शिरली, अंगठी काढून घेऊन तिने राजकुमारीच्या हातावर ठेवली आणि सांगितले की–"आज त्या बाहेर बसलेल्या ज्योतिषाने माझी लाज राखली."

दासीच्या गोष्टी ऐकून राजकुमारीला फार आश्चर्य वाटले आणि राजवाड्यात पोचल्याबरोबर तिने ही हकीकत आपल्या वडिलांच्या कानावर घातली.

राजाने या नव्या ज्योतिषाला बोलवून घेतले व त्याच्या अंगावर शाल घालून दरबारात त्याची नेमणूक केली.

परंतु लवकरच ज्योतिषावर कसोटीची वेळ आली. चोरांनी राजाचा खजिना लुटला होता. अनेक अनमोल वस्तूंची चोरी झाली होती. चोरांचा पत्ता सांगण्यासाठी राजाने ज्योतिषाला पाचारण केले.

आता मात्र ज्योतिषी चक्रावला. पण आपल्या बचावाचा उपाय शोधावा म्हणून त्याने राजाकडून चाळीस दिवसांची मुदत मागून घेतली. राजाने ती मुदत मान्य केली.

युसूफ तणतणतच घरी आला आणि फातिमाला म्हणाला–"घे आता, मी मेल्यातच जमा आहे आता. ज्योतिषी नवरा हवा होता ना तुला? राजाच्या खजिन्यात चोरी झाली आणि चोरांना शोधून काढण्याचं काम माझ्याकडे आलं.





कशीबशी चाळीस दिवसांची मुदत मिळवली मी. मुदत संपल्यावर पळून जाण्याशिवाय गत्यंतर नाही आपल्याला." चाळीस दिवसांचा हिशोब ठेवण्यासाठी फातिमाने चाळीस खजूर मोजून एका बरणीत ठेवले व ती युसूफला सांगू लागली– "हे पहा, घाबरू नका. मी रोज संध्याकाळी तुम्हाला एक एक खजूर खायला देत जाईन. ज्या दिवशी बरणी रिकामी होईल, त्या दिवशी रात्री आपण इथून पळून जाऊ."

राजाचा खजिना लुटणाऱ्या चोरांच्या टोळीत बरोबर चाळीस चोर होते. चोरांनाही समजले की आपल्याला पकडण्यासाठी राजाने एका ज्योतिषाला नियुक्त केले आहे. म्हणून त्यांनी आपल्या टोळीपैकी एकाला त्याच संध्याकाळी ज्योतिषाच्या घरी पाठवून आतले बोलणे ऐकून येण्यास सांगितले.

चोर ज्योतिषाच्या घराच्या वळचणीला अंधारात उभा राहून आतले बोलणे ऐकू लागला. ज्योतिषाची बायको खजुराची बरणी घेऊन आली आणि आपल्या नवऱ्याच्या हातावर एक खजूर ठेवत म्हणाली–"हा एक, आता एकोणचाळीस राहिले."

हे बोलणे ऐकून चोर घाबरला व व आपल्या टोळीत परत आला आणि म्हणाला–"ज्योतिषाला नक्कीच आपला पत्ता लागला आहे. मी लपून बसून ऐकत होतो, तरीही त्यांना कळले आणि त्याने म्हटले–"हा एक, बाकी एकोणचाळीस राहिले." पण चोरांचा यावर विश्वास बसेना. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी त्यांनी आणखी एकाला ज्योतिषाच्या घरी पाठवले. तोही दुसऱ्या दिवशी लपून ऐकत बसला. त्याला शब्द ऐकू आले–"दोन, आता अडतीस राहिले."

अशा प्रकारे एकोणचाळीस दिवस एकोणचाळीस चोरांनी हिशोब ऐकला. आता ज्योतिषाला आपला पत्ता लागल्याबद्दल त्यांना काही संशय राहिला नाही. आपल्याबद्दल ज्योतिषाला सर्व काही कळल्याबद्दल त्यांची खात्री झाली. चाळिसाव्या दिवशी चोरांचा नायक स्वतःच जाऊन ज्योतिषाच्या घराशी लपून राहिला.

घराच्या आतील भागात युसूफच्या हातावर शेवटचा खजूर ठेवत फातिमा म्हणाली–"हा शेवटचा, पहाताय ना? बाकी सर्वांपेक्षा हाच मोठा आहे."

आता काय? चोरांच्या नायकाला घाम फुटला. त्याच्या हातापायांना कंप सुटला. झटकन तो घरात शिरला, ज्योतिषाच्या पायांवर लोटांगण घालत तो म्हणाला– "महाराज, आपण आम्हाला राजाच्या हाती सोपवू नका, चोरीचा सगळा माल आणून मी आपल्या हाती देतो. आमच्या विषयी राजाला काही सांगू नका. आमची डोकीच उडवली जातील."

"ठीक आहे, असेच कर." ज्योतिषी मोठ्या आत्मविश्वासाने म्हणाला.

त्याच रात्री चोरांनी खजिन्यातून चोरलेला माल ज्योतिषाच्या हाती सोपवला आणि लाच म्हणून त्याला भरपूर धन दिले.

ज्योतिषाच्या जिवात जीव आला. दुसऱ्याच दिवशी त्याने राजाकडे सर्व माल नेऊन पोचवला. आपल्या दरबारी ज्योतिषाचे सामर्थ्य पाहून राजा फार चकित झाला व त्याने ज्योतिषाचा मोठा सत्कार केला.





आता पुढे काय? त्याला एक नामी युक्ति सुचली. यातून सुटण्याकरता ज्योतिष्यान वेडयाचे सोंग पांघरले स्नानगृहात अंघोळ करीत असता ज्योतिषी अंगावरच्या आल्या कपडयांनिशी राजमहालाकडे धावत सुटला! राजा मंत्रणागृहात बसून मंत्र्यांशी काही मसलत करीत होता. ज्योतिषी राजवाडयात पोचल्यावर थेट मंत्रणागृहात घुसला. त्याने राजाच्या हाताला धरून त्याच्या आसनावरून उठवले आणि त्याला धरून तो बाहेर धावू लागला.

आणि काय आश्चर्य! दुसऱ्याच क्षणी भयानक आवाज करीत मंत्रणागृहाची एक तुळई कोसळून नेमकी राजा ज्या आसनावर बसला होता, त्यावर पडली, आसन छिन्न-भिन्न झाले!

राजा ज्योतिषाच्या वर्तणुकीबद्दल प्रथम त्याच्यावर चिडला होता, पण हे दृश्य पाहून तो ज्योतिषाला म्हणाला–"वा, वा! आपण ज्योतिषी नव्हे, अगदी त्रिकाळज्ञानी आहात. माझ्यावर येणारी आपत्ति आगाऊच ओळखून आपण आपले स्नानही अर्धवट सोडून ओलेत्याने धावत आलात! धन्य आहे आपली! आपले उपकार मी कसे फेडू?"

राजाशी सल्लामसलत करीत असलेले सर्व मंत्रीही आता ज्योतिष्याच्या पाया पडू लागले.

राजाने ज्योतिषाचा अपूर्व असा सत्कार केला. त्याला असंख्य उपहार दिले व जुन्या प्रधान ज्योतिषाला त्या पदावरून काढून यूसूफला ते स्थान दिले.

दुसऱ्या दिवशी––

नव्या प्रधान ज्योतिषाची बायको–फातिमा–स्नानासाठी हमामखान्यात गेली. त्यावेळी जुन्या प्रधान ज्योतिषाची बायको तेथे अगोदरच स्नान करत होती.

फातिमाने स्नानागाराच्या पहारेकऱ्याला आज्ञा केली–"त्या बाईला बाहेर घालव, मला स्नान करायचे आहे."

पहारेकऱ्याने ताबडतोब म्हटले–"जशी आज्ञा बाईसाहेब, आत्तां बाहेर घालवतो."



## लांब किडा

इंडोनेशियातील जंगलात सापडणारा एक लांब किडा हा जगातील सर्वात जास्त लांबी असणारा किडा मानला जातो. डोक्यापासून शेपटीपर्यंत त्याची लांबी जवळजवळ ९ इंच असते!

## विष फेकणारा साप

संकटात सापडलेला विषारी साप आपल्या तोंडातून दोन विषज्वाला बाहेर फेकतो. त्याला सतावणाऱ्या लोकांच्या डोळ्यांकडे त्याने आपल्या दाढांनी फेकलेल्या विष-ज्वाळांची लांबी जवळजवळ ८ फूट असते!





## खोदाईमध्ये कुशल

युरोप व आशियातील मिश्र जातीचा जंगली उंदीर, जगातील जनावरांत सर्वात अधिक वेगाने जमिनीत बीळ करतो. तो वीस मिनिटांच्या अवधीत आपल्या वजनाच्या पन्नास पट वजनाची माती उकरून बाहेर फेकतो!



# चांदोबा

एप्रिल 1988



## अनुक्रमणिका





एक प्रत : २-५०

वार्षिक वर्गणी : ३०-००

## 'चांदोबा' यशस्वी स्पर्धकांचे अभिनंदन करीत आहे

# महान भारतीय परंपरेसंबंधी स्पर्धा

२



















**प्रसाद शंकर निलवे**
पोस्ट - नरेवाडी, ता. गडहिंग्लज
(जि. - कल्हापूर)
महाराष्ट्र

**शैलेश चिन्तामण करंदीकर**
देवआळी, फणसेवाडा
आगाशी, भाटीबंदर
महाराष्ट्र

**अजयकुमार किसनराव पाटील**
ब्राह्मण-आळी
सासवड (जि. पुणे)
महाराष्ट्र


# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी


या महिन्याची वेताळकथा "राक्षसराजाची थट्टा" ही 'वसुंधरे'च्या एका गोष्टीवर आधारलेली आहे. समाजातील प्रत्येक माणूस हा स्वतःच्या शक्तिबलाने आपले जीवन व्यतीत करीत असतो. अलौकिक शक्तींच्या आधाराने हे केल्यास काय परिणाम होतो, हे "स्वप्नांचा व्यापार" या कथेवरून समजून येईल.

### अमर वाणी

मृद्घट इव सुखभेद्यो, दुःसंधानश्च दुर्जनो भवति ।
सुजनस्तु कनकघटवद्, दुर्भेद्यश्चाशुसंधेयः ।।

[मातीच्या घडा सहज फुटू शकतो आणि तो एकदा फुटला की पुन्हा जोडणे अशक्य असते. परंतु सोन्याचे भांडे सहज तुटू शकत नाही आणि ते तुटले तरी सहजपणे पुन्हा जोडता येते. त्याप्रमाणेंच दुर्जनांतील भांडणांचा अंत होत नाहीं. परंतु सज्जनात भांडणे झाल्यास संपून जातात.


वर्ष : ३८ एप्रिल १९८८ अंक : १०

एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००





### अंतराळातील नवा विक्रम

४२ वर्षांच्या रोमानेन्को या रशियन अंतराळ-प्रवाशाने जवळ जवळ २३७ दिवस अंतराळात राहून नवीन विक्रम प्रस्थापित केला आहे. या काळात त्याने अंतराळात काही नवीन शोध लावले आहेत.

### भूगर्भात दडलेली द्वारका



पुराणात असे वर्णन आढळते की श्रीकृष्णाने निर्मिलेली द्वारका त्याच्या निर्वाणानंतर समुद्रात बुडाली. नुकताच असा शोध लागला आहे की सौराष्ट्रातील समुद्रतटावरील एक शहर ४०० वर्षांपूर्वी समुद्रात बुडाले. त्याचे काही अवशेष समुद्रात सापडत आहेत.



### आर्यांनी आक्रमण केले नाही

अशी एक गोष्ट सर्वत्र प्रसृत आहे की आर्यांच्या आक्रमणामुळे तत्पूर्वी प्राचीन भारतात असणारे हडप्पा हे शहर नष्ट झाले. परंतु अनेक आधारांच्या साह्याने सुप्रसिद्ध इतिहासतज्ञ डॉ भगवान सिंह यांनी ही गोष्ट खरी नसल्याचे सिद्ध केले आहे. अत्यंत दृढतापूर्वक त्यांनी असे सांगितले आहे की आर्य-संस्कृति व हडप्पा-संस्कृति या दोन्ही समकालीन आहेत.

### अत्यंत छोटे कुराण

२.० × २.७ सें.मी. आकाराची कुराणाची हस्तलिखित प्रत महम्मद कमाल हुसेन याच्या परिवारातील लोक काही दिवसांपूर्वीपर्यंत ताईताच्या स्वरूपात गळयात धारण करीत असत. ही प्रत 'जगातील सर्वात छोटी कुराणाची प्रत' मानली जाते. दोन मिलियन डॉलर इतके मूल्य असलेली ही प्रत सध्या दुबई मध्ये सुरक्षित ठेवलेली आहे.














# हंसक व डिभक

शाल्व देशचा राजा ब्रह्मदत्त याला बरीच वर्षेपर्यंत मूलबाळ झाले नाही. तेव्हा त्यांच्या घराण्याच्या कुलगुरुने एक दिवस म्हटले–"राजा, प्रत्येक राजाला आपली प्रजा ही आपल्या संतानासारखीच असते. मला असं वाटतं की एकाद्या योग्य व्यक्तीची निवड करून त्यालाच आपला मुलगा मानून राज्याचा वारस बनवावे, हे उचित होईल."

परंतु राजाला ही सूचना मानवेना. त्याने शंकराकडून संतान प्राप्तीचा वर मिळवला. थोड्याच दिवसांनी राजाला हंसक व डिभक या नावाचे दोन पुत्र झाले. ते दोघे थोडे मोठे झाल्यावर गुरुने राजाला सल्ला दिला–"राजेसाहेब, आता या राजकुमारांना मोठ्या जागरुकतेने निरनिराळ्या विद्या शिकवून त्यांना चारित्रवान बनवावे, न्याय्य मार्गाने त्यांचे पालनपोषण करावे." परंतु फार दिवस वाट पाहिल्यानंतर झालेली मुले म्हणून राजाने या बाबतीत दुर्लक्षच केले. त्याने मुलांना जरा अधिकच लाडाकोडाने वाढवले. परंतु यामुळे हंसक व डिभक दोघेही फार उद्धट बनले, ते कोणालाही जुमानेनासे झाले. त्यांनी जरासंधाशी मैत्री केली. नंतर त्यांनी तपस्या करून ब्रह्मदेवाकडून असा वर मिळवला की, 'त्यांना युद्धांत कोणीही पराजित करू शकणार नाही.'

श्रीकृष्ण त्यांच्या अत्याचारांबद्दल ऐकून होताच ! त्यांचा संहार करण्याची एक निराळीच योजना कृष्णाने आखली. त्याने गुप्त रूपाने, कोणालाही पत्ता न लागू देता हंसकला कैद करून डांबून ठेवले व अशी अफवा पसरवून दिली की–हंसक मरून गेला ! हंसकाचा वियोग सहन न होऊन डिभकाने यमुना नदीत उडी मारून जीव दिला ! डिभकाच्या मृत्यूमुळे दुःखी झालेल्या हंसकानेही आत्महत्या केली !

या घटनेनंतर काही दिवसांनी कुलगुरुने राजाला भेटून समजावले–"राजा, केवळ संतानप्राप्तीमुळेच खूश होऊन चालणार नाही. त्यांना चांगले शिक्षण देऊन त्यांच्यावर योग्य संस्कार घडवण्याची जबाबदारीही त्यांच्या मातापित्यांना विसरून चालणार नाही.

आपण योग्य सावधगिरी न घेतल्याबद्दल ब्रह्मदत्तला आता पश्चात्ताप झाला !





# स्वप्नांचा व्यापार

अवन्तिपुर राज्यातल्या एका गावात एक तरुण रहात असे. अगदीच सुमार बुद्धि असल्यामुळे तो काही विद्याभ्यास करू शकला नाही. त्याला काहीच येत नव्हते म्हणून सर्वजण त्याला 'अयोग्य' या नावाने हाक मारीत असत.

त्या गावात एक शिवमंदिर होते. या मंदिरात दूर-दूरच्या ठिकाणाहून साधू-बैरागी पूजाअर्चा करण्यासाठी येत असत. आपण काही अद्‌भुत शक्ति मिळवाव्या असे अयोग्यला बालपणापासूनच वाटे, म्हणून त्या आशेने तो या साधू-बैराग्यांची मनापासून सेवा-चाकरी करी.

एकदा हिमालयीन प्रांतात राहणारा एक हठयोगी तीर्थाटन करीत करीत अयोग्यच्या गावी येऊन पोचला. हा हठयोगी म्हातारा व आजारी होता. अयोग्य त्याची सेवा करू लागला. त्याची सेवावृत्ति पाहून हठयोगी बाबांची त्यांच्यावर फार मर्जी बसली.

असेच कांही दिवस गेल्यावर आपला मरणकाल जवळ आल्याचे बाबांनी ओळखले. अयोग्यला बोलावून ते म्हणाले–"बेटा, कोणता हेतु मनात बाळगून आहेस ते मी ओळखले आहे. ऐक बेटा, आजपासून तुला एक दैवी शक्ति प्राप्त झाली आहे–तू जे स्वप्न पाहशील ते खरे होईल. परंतु या शक्तीमुळे तुझे हित किंवा अहित होणे हे तुझ्या नशिबावर अवलंबून आहे."

थोड्याच दिवसात हठयोगी वैकुंठवासी झाला. अयोग्यने त्याच्या अंत्येष्टि-क्रिया व्यवस्थित पार पाडल्या. व नंतर तो आपल्या नशिबाची परीक्षा पाहण्यासाठी तेथली राजधानी अवन्तिपुर या नगराकडे चालू लागला. तेथे पोचल्यावर नगरसीमेवरील एका धर्मशाळेत त्याने मुक्काम केला.



राजा त्या वृद्धामागोमाग चालू लागला. शेवटी ते एका मोडकळीस आलेल्या घरात पोचले. राजा इकडे तिकडे नजर फिरवीत आहे, तोंच तो वृद्ध एकदम अदृश्य झाला! आणि तिथे एकाएकी चक्री वावटळ आली. त्यात सापडून राजा ताडाच्या झाडा इतका उंच उडाला व दूर फेकला गेला. केवळ नशीबच म्हणून तो एका तलावात पडला व त्यामुळे त्याचे प्राण वाचले.

दुसऱ्या दिवशी सकाळीच उठून अयोग्य शिवशर्मा महाराजांच्या दर्शनाला गेला. आपला परिचय देऊन त्याने आपल्याला पडलेल्या स्वप्नाचा वृत्तान्त राजाला सांगितला.

राजाने अयोग्यचे बोलणे लक्षपूर्वक ऐकले व तो हसून म्हणाला—"भल्या माणसा, आपलं पोट भरण्यासाठी उगीच असल्या भाकडकथा कशाला सांगतोस?" असे म्हणून दहा नाणी देववून राजाने त्याला रवाना केले.

निराश होऊन अयोग्य धर्मशाळेकडे परत फिरला. दुसऱ्या दिवशी त्याला राजाकडून बोलावणे आले. प्रेमाने त्याच्या खांद्यावर थोपटत राजा म्हणाला—"अरे, काल तू जे बोललास ते खरेच झाले! आता तू मागून घे, माझ्या दरबारात कशा प्रकारचं काम करायला आवडेल तुला?"

धर्मशाळेत इतरही पुष्कळ प्रवासी तळ देऊन होते—ते सर्व तिथला राजा शिवशर्मा याची तोंड भरून स्तुति करत होते.

हे संवाद ऐकून अयोग्यच्या मनात विचार आला—या राजाचा आश्रय जर आपल्याला मिळाला तर आपल्या आयुष्याचे कल्याण होईल. सर्व आयुष्य आरामात जाईल आपले! असे विचार करीत करीतच त्याला झोप लागली. झोपेत त्याला एक स्वप्न पडले....मध्यरात्रीच्या वेळी राजा शिवशर्मा हातात खड्ग घेऊन एकटाच रस्त्यावरून जात होता. इतक्यात एका वृद्ध माणसाने त्याला आपल्या जवळ बोलावले.



आपल्याला घोडेस्वारीची फार आवड आहे असे अयोग्यने सांगितले. मग कशाचा अवकाश! राजाने त्याची 'घोड्यांच्या पागेचा अधिकारी' म्हणून नेमणूक केली.

असेच थोडे दिवस गेल्यानंतर पुन्हा एकदा अयोग्य राजाकडे गेला व सांगू लागला—"महाराज, काल रात्री मला एक फार वाईट स्वप्न पडले."

अयोग्य आपलं स्वप्न सांगू लागला—"महाराज, आपण राजसभेत बसलेले असताना एक तपस्वी आपल्याला भेटायला आला. त्याने आपल्याला म्हटले—राजा, मी कोण हे तू आत्ता ओळखू शकणार नाहीस. एका काळीं तू माझा प्रिय शिष्य होतास. तुझा त्यावेळी भोगविलासाकडे असलेला कल पाहून मीच तुला दहा वर्षांच्या मुदतीने हे सर्व वैभव बहाल केले. आता आजपासून माझ्या त्या अनुग्रहाची मुदत संपत आहे. तेव्हा आत्ता या क्षणीं या सर्व सुखोपभोगांचा व राज्याचा त्याग करून तू माझ्याबरोबर चल—असे म्हणून त्या तपस्व्याने आपणावर मंतरलेले पाणी शिंपडले व आपणाला आपल्या पूर्वजीवनाचा एक संक्षिप्त चित्रपट दाखवला."

अयोग्य पुढे बोलू लागला—"महाराज, त्याच क्षणी आपण मागल्या बाजूला पाहिलेत आणि तेथे मला उभा असलेले पाहून आपण आपला मुकुट काढून माझ्या डोक्यावर ठेवलात व माझ्या बोटांत आपली राजमुद्रिकाही चढवलीत, आणि





आपण म्हणालात—आजपासून माझी ही जबाबदारी मी तुम्च्यावर सोपवत आहे. राज्य व प्रजा तुझ्या हाती देत आहे."

अयोग्यच्या स्वप्नाची ही बातमी ऐकून राजा शिवशर्मा आश्चर्यचकित झाला. थोडा वेळ मस्तक खाली झुकवून तो गप्प उभा राहिला व नंतर अंत:पुरात निघून गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळी अयोग्यच्या स्वप्नाप्रमाणे सर्व घटना घडून आल्या. राजदरबारात आलेल्या तपस्व्याबरोबर निघायला राजा तयार झाला व त्याने आपला राजमुकुट अयोग्यला अर्पण केला.

त्याच वेळी एक दूत दरबारात येऊन पोचला आणि अयोग्यला संबोधून म्हणाला—"महाराज, या शुभवेळी एक वाईट खबर घेऊन आल्याबद्दल मला क्षमा करावी. आपला जुना शत्रु राजा अनन्तसेन याने पुन्हा आपल्यावर आक्रमण केले आहे. आपली सर्व सेना तयार होऊन आपल्या नेतृत्वाच्या प्रतीक्षेत खडी आहे."

ही बातमी ऐकून अयोग्य एकदम थरकापला. त्याने मंत्र्याला बोलवून म्हटले—"मंत्री महाशय, अनन्तसेन पुन्हा आपणावर आक्रमण करू घजत आहे याचा अर्थच असा की यावेळी तो खूप तयारीने येत असला पाहिजे, त्याच्याजवळ विशाल सैन्य असले पाहिजे. उलट आपण मात्र त्या तयारीत नाही आहोत. तेव्हा राजा अनन्तसेन तहाला तयार आहे का पहा. यावेळी तेच योग्य होईल असे मला वाटते." असे म्हणून अयोग्य राजसभेतून उठून गेला.

चांगला मऊ बिछाना असूनही त्या रात्री अयोग्यला झोप येईना. त्याला स्वप्न पडले—'त्याने पाहिले की तो राजवाडा सोडून दूर पळून जात होता. त्याच्या पाठलाग करून त्याला कोणीतरी पकडले' आणि त्याचे स्वप्न भंगले.

अयोग्य घाबरूनच ओरडून एकदम जागा झाला व स्वप्नात पाहिल्याप्रमाणे राजवाडा सोडून तो पळू लागला. ते पाहून त्याच्या शयनकक्षाच्या दाराशी पहारेकऱ्याच्या वेषात उभ्या असलेल्या राजा शिवशर्माने त्याला पकडले.

शिपायाच्या वेषांतल्या राजाला ओळखून अयोग्य भीतीने आपादमस्तक शहारून गेला. शिवशर्मा अयोग्यच्या पाठीवर थोपटत समजाऊ लागला—"मला वाटलं होतं की तू स्वप्नांवरून भविष्य सांगणारा ज्योतिषशास्त्री आहेस. परंतु ज्या शक्तीने तुझा कबजा घेतला आहे, त्या शक्तीत ते स्वप्न खरं करायचं सामर्थ्यही आहे. तू प्रथम जे स्वप्न पाहिलंस ते माझ्या हिताच्या इच्छेने प्रेरित होऊन पाहिलं होतंस. म्हणूनच माझे प्राण वाचवणारं स्वप्न तुला दिसलं! माझ्या दानशूरतेबद्दल तू बरंच काही ऐकलं होतंस. खरं आहे नं माझं म्हणणं?"

राजा शिवशर्मा हसून पुढे बोलू लागला—"त्यानंतर माझ्या आश्रयाला तू आलास आणि तुझा स्वार्थ वाढला! तरीही माझा प्राण घेण्याचा विचार तुझ्या मनात आला नाहीच. राजपदाचा मोह तुझ्या मनात उत्पन्न झाला आणि तू दुसरं स्वप्न पाहिलंस. आता तुझ्या मनात भीतीने घर केलं आहे, म्हणून तू हे तिसरं स्वप्न पाहिलंस. खरं पाहता या सर्व तुझ्या मनातल्या स्वत:च्याच कल्पना आहेत. ही स्वप्न तुला मिळालेल्या सिद्धीमुळे खरी झालीच पाहिजेत. तुझं खरं स्वरूप कळावं म्हणून तुझं दुसरं स्वप्न खरंच घडावं यासाठी मी काही नाटक रचलं. मी राजसंन्यास घेऊन त्या गुरुबरोबर निघून जाणं अन् शेजारच्या राजाचं आक्रमण वगैरे सर्व माझीच कल्पना!"

अयोग्यचे डोळे भरून आले. त्याने राजाच्या पायांवर लोटांगण घातले. राजाने त्याला उठवले व म्हटले—"तुझ्यासारख्या चंचल मनाच्या माणसाला माझ्या दरबारात ठेवणे हितकर नाही. इकडे पहा, त्या आसनावर असलेल्या बटव्यात एक हजार सुवर्णमुद्रा आहेत, त्या घे आणि आपल्या लायकीचा काही उद्योगधंदा कर."

अयोग्यने नतमस्तक होऊन राजाला प्रणाम केला आणि सुवर्णमुद्रांचा बटवा घेऊन त्याच क्षणी तेथून निघून गेला.





# पहिली चोरी

गोपाल व चन्द्रभानु नावाचे दोन मित्र होते. आपल्या गावात त्यांना उपजीविकेचे काहीही साधन न मिळाल्यामुळे त्यांनी ठरवले की शहरातच कुठे तरी चोरी करून ते धन घेऊन आपल्या गावी पळून यायचे.

दिवसभर ते शहरातल्या गल्ल्या धुंडाळत राहिले. संध्याकाळच्या वेळी कुलूप लावून ठेवलेले एक घर त्यांनी पसंत केले. नकली किल्ली चालवून कुलूप उघडायची कला गोपालला थोडीबहुत अवगत होती. आता त्या दोघांनी एक योजना बनवली—गोपालने प्रथम कुलूप उघडायचे, चन्द्रभानुने आत प्रवेश करून चोरीचा माल घेऊन मागील दाराने बाहेर पडायचे. गोपालने त्या वेळात बाहेर पहारा करायचा.

ठरल्याप्रमाणे गोपालने कुलूप उघडल्यावर चन्द्रभानु घरात घुसला. इकडे तिकडे शोधूनही एकादी मूल्यवान वस्तु त्याला सापडेना. स्वयंपाकघरात तांब्यापितळेची भांडीच फक्त होती. दुसऱ्या एका खोलीत एक तिजोरी होती. चन्द्रभानुला वाटले की पैसे, दागिने वगैरे या तिजोरीतच असले पाहिजे. मग तो मागल्या दाराने बाहेर पडला आणि ही बातमी त्याने गोपालला सांगितली. दोघांनी मिळून त्या घरमालकाची माहिती काढली. ते घर नीलकंठ नावाच्या जव्हेऱ्याचे होते. त्याची बायकामुले जवळच्या गावी गेली होती.

गोपाल चन्द्रभानुला म्हणाला—"दोस्त, तू पुन्हा घरात घुसून घराच्या गच्चीवर लपून बैस. नीलकंठ घरात येऊन झोपला की तू त्याच्या किल्ल्या घेऊन तिजोरीतली धनदौलत घेऊन मागील दाराने बाहेर पड."

"आणि नीलकंठ जागा झाला तर?" चन्द्रभानुने शंका प्रदर्शित केली.

"त्यासाठी माझ्याजवळ एक औषध आहे." असे म्हणत गोपालने चन्द्रभानुच्या हातात एक बाटली दिली.

गोपालने पुन्हा कुलूप काढल्यावर चन्द्रभानु आत घुसला व गच्चीवर जाऊन लपून बसला. गोपालने पुन्हा कुलूप लावले.

बरीच रात्र झाल्यावर नीलकंठ घरी परत आला. स्नान-भोजन केल्यावर थोडा वेळ त्याने हिशोब वगैरे पाहिला. इकडे गच्चीवर बसलेल्या चन्द्रभानुचे डोळे पेंगू लागले. थोड्या वेळाने नीलकंठ हिशोबाच्या वह्या बंद करून झोपण्यासाठी बिछाना झाडू लागला. इतक्यात कोणीतरी त्याचा दरवाजा खटखटवला.

नीलकंठने विचारले—"कोण आहे?"

"हुजूर, मी रामापुरहून आलो आहे. आपल्या सासऱ्यांनी मला पाठवले आहे. आपल्या मुलाला साप चावला आहे." दरवाजा ठोठावणाऱ्याने उत्तर दिले.

त्यांचा संवाद ऐकून गच्चीवर बसलेल्या चंद्रभानुची झोप उडाली व तो, सावधपणे चाहूल घेऊ लागला. इकडे नीलकंठने घाबरून दरवाजा उघडताच बाहेरील माणूस एकदम आत घुसला व त्याने आपल्यामागील दरवाजा खटकन बंद केला. हातात सुरा घेऊन त्याने नीलकंठला धमकी दिली—"ओरडलास तर प्राणच घेईन."



"तू...तू...क...क....कोण आहेस?" नीलकंठची बोबडी वळली.

"माहीत नाही? मी जग्गा डाकू! मुकाट्याने तिजोरी उघडून सगळा माल काढून दे. नाहीतर..." चोर म्हणाला.

नीलकंठ चावी द्यायला तयार नव्हता. इतक्यात चोराने त्याचे मानगूट धरले आणि त्याने सुरा उगारला! दुसऱ्याच क्षणी, हा प्रकार पाहून खाली आलेल्या चन्द्रभानुने, झेप घेऊन चोराच्या हातावर जोरदार प्रहार केला.

काय घडलं हे क्षणभर चोराला समजलेच नाही! पण झटकन सावध होऊन तो चन्द्रभानुवर प्रतिहल्ला करणार तोच नील-

विजया आठवले

कंठ व चन्द्रभानुने मिळून त्याला घट्ट धरले व दोरीने बांधून टाकले.

यानंतर नीलकंठ घरातून बाहेर पडला व थोड्याच वेळात दोन राजसेवकांना घेऊन आला. व त्याने चोराला त्यांच्या ताब्यात दिले.

आता भानावर आलेला चन्द्रभानु आपल्या कृत्याबद्दल आश्चर्यचकित होऊन इकडे तिकडे पहात असताना नीलकंठने त्याला विचारले–"तू कोण आहेत बाबा? माझ्या घराच्या गच्चीत तू कसा आलास?"

चन्द्रभानु कापत कापत म्हणाला–"महाराज, मला क्षमा करा." आणि त्याने शहरात आल्यापासून त्याच्या घरात घुसण्यापर्यंतची सर्व हकीकत सांगून टाकली आणि म्हटले–"आमच्या योजने प्रमाणे आम्ही काही करण्यापूर्वीच हा चोर आपल्या घरात घुसला."

नीलकंठ थोडा वेळ गप्प राहिला अन् त्याने पुन्हा विचारले–"ही तुझी पहिलीच चोरी ना?"

"होय." चन्द्रभानु उत्तरला.

"तू जर पक्का, जुना चोर असतास तर माझे रक्षण केले नसतेस. चोराने मला मारून टाकल्यावर त्याला धमकी देऊन तू त्याच्याकडून धनाचा अर्धा वाटा मिळवला असतास." नीलकंठ म्हणाला.

"हुजूर, कदाचित असंच झालं असतं की काय मला माहीत नाही. माझाही असा विचार होता की आपण मला प्रतिकार केलात तर आपल्याला मारून टाकायचे! पण तो चोर आपल्याला मारू पहात असताना मला रहावेना!" चन्द्रभानुने आपल्या विपरीत वागणुकीबद्दल आश्चर्य प्रकट केले.

नीलकंठ हसून म्हणाला–"यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीच नाही. अगदी भयानक दुष्ट माणसाच्या हृदयातही कुठे ना कुठे मानवतेचा थोडा अंश लपलेला असतोच.

यानंतर नीलकंठने गोपाल व चन्द्रभानु या दोघांनाही आपल्या पेढीवर नोकरी दिली. ते दोघेही मोठ्या विश्वासूपणे नोकरी करत त्या शहरातच स्थायिक झाले.






## [४]

[प्राचीन अवशेषांमधे सापडलेल्या स्त्रीच्या पुतळ्याच्या रक्षणाची सुयोग्य व्यवस्था करून विनोद धबधबा पार करून ज्ञानभूमीत पोचला. तेथील पुजाऱ्याच्या तावडीतून सुटून पळणाऱ्या विनोदचा सैनिकांनी पाठलाग केला. थोडे पुढे गेल्यावर ते सर्व एका छोट्या टेकडीकडे पहात राहिले. विनोदने ही आपली दृष्टी तिकडे वळवली. पुढे वाचा......]

त्या टेकडीवर राजपुत्रासारखे मौल्यवान कपडे घातलेला एक पाच-सहा वर्षांचा सुंदरसा मुलगा अगदी निश्चल उभा होता. एक भयंकर व क्रूर असा प्राणी त्याच्या दिशेने पुढे सरकत होता!

अरे! हा तर युवराज, प्राणी त्यालाच खायला जात आहे!......सैनिकांनी हेरले.

विनोदने एकदम आपल्या कमरेची कटयार काढली व तो म्हणाला–"तो प्राणी युवराजांना खायला जात आहे हे पाहूनसुद्धा तुम्ही नुसते शुंभासारखे उभे राहून तमाशा पहात आहात?"

सैनिकही आश्चर्याने विनोदकडे वेड्यासारखे पहातच राहिले!

इतक्यात तेथे एक रथ येऊन पोचला. दोन लठ्ठ, बलिष्ठ व्यक्ति तो रथ वायुवेगाने ओढत होत्या, हे पाहून विनोदला मोठे आश्चर्य वाटले!



"महाराजांचा विजय असो" असे म्हणत रथात आरूढ झालेल्या महाराजांना सर्व सैनिकांनी मुजरा केला.

परंतु तिकडे लक्षही न देता स्फुंदतत्र मुलाकडे असहायतेने पहात महाराज म्हणाले – "बाळा, तू मला सोडून चाललास ?"

विनोदला आता रहावेना. त्याने राजाला विनवले–"महाराज, या प्राण्याचा संहार करून युवराजांचे रक्षण करण्याची आज्ञा आपल्या सैनिकांना द्या ना!"

राजाने क्षणभर मोठ्या विस्मयाने विनोदकडे पाहिले व पुन्हा मोठ्या दुःखाने तो आपल्या पुत्राकडे पाहू लागला.

या अवधीत तो विशाळ प्राणी सरपटत युवराजाच्या अगदी जवळ पोचला व त्याला गिळण्यासाठी त्या प्राण्याने आपली अग्नि-ज्वाळेसारखी जीभ बाहेर काढली. ती जीभ युवराजाला वेढणार, इतक्यात विनोदने आपली तलवार बाहेर खेचली व विजेच्या चपळाईने वार करून त्या प्राण्याचे शीर कापून धडावेगळे केले. त्याबरोबर ते शीर गडगडत राजाच्या रथाच्या बाजूला जाऊन थांबले. शेवटी त्याच्या नाकपुडीतून जी ज्वाळा बाहेर आली तिच्यामुळे, नुकत्याच तिथे पोचलेल्या कुबडयाची दाढी थोडीशी जळाली.

"अरे, तू काय केलंस हे ?" कुबडयाने रागानेच विनोदला विचारले.

"युवराजाला गिळू पहाणाऱ्या भयानक प्राण्याला मारून टाकलं! कामाचं बक्षिस म्हणून राजकुमारीशी माझा विवाह करून देऊन मला अर्धे राज्य आंदण म्हणून दिले तरी ते कमीच होईल! पण तरीही माझी काहीच अपेक्षा नाही." विनोदने उत्तर दिले.

"या दुष्टाला पकडून कैद करा." कुबडयाने सैनिकांना आज्ञा दिली.

इतक्यात युवराज टेकडीवरून उतरून खाली आला व कृतज्ञतेने विनोदकडे पाहू लागला. सैनिकांचे एक दल विनोदला



पकडून, कैदी म्हणून त्याला कारागाराकडे नेऊ लागले.

त्या प्राण्याच्या प्रेताचे दफन कुठे करावे व त्यावर स्मारक कसे बांधावे या गोष्टी-बद्दल विचारविनिमय करत तो कुबडा व राजा दोघेही विनोदच्या मागे चालू लागले. त्यांचे बोलणे विनोदला ऐकू येत होते.

विनोदला तुरुंगात डांबण्यात आले. अर्धी रात्र संपली तरी त्याला झोप येईना! राहून राहून त्याच्या मनात येत होते—त्या भयानक प्राण्याच्या मृत्युने राजाला व कुबड्याला इतके दुःख का होत आहे? त्याला मारून टाकल्याबद्दल बक्षिस देऊन गौरव करण्याऐवजी मला उलट तुरुंगात का टाकलं असावं?

त्या दिवशी बरोबर अर्ध्या रात्री तुरुंगाचे फाटक अचानक उघडले गेले व स्वतः राजा कोणाही अंगरक्षका विना एकटाच तुरुंगात आला. "तू माझ्या मुलाचे प्राणरक्षण केलेस म्हणून मी अतिशय कृतज्ञ आहे. तुला प्राणदण्ड देणं मला अजिबात आवडणार नाही." राजा विनोदला म्हणाला.

"महाराज, आपली माझ्यावर कृपा-दृष्टी आहे, याबद्दल मी कृतज्ञ आहे. पण माझ्या मरणाची इच्छा कोणी व का करावी?" विनोदने विचारले.

"ही ज्ञानभूमी आहे, हे तुला बहुतेक माहितच असेल? ज्ञानसंपादनासाठी शिस्तीची अतिशय गरज असते. इथे त्या प्राण्यालाच 'शिस्तीची अधिष्ठात्री देवता' असे मानले जाते. त्याला आम्ही एक 'अत्यंत पवित्र प्राणी' मानतो. तो रोज केवळ एकाच व्यक्तीला खात असे. त्याची इच्छापूर्ती करणे हा ही इथल्या शिस्तीचाच एक भाग आहे. राजा झालो म्हणून काही मी शिस्तभंग करू शकत नाही ना?" राजाने विनोदची समजूत घालत म्हटले.

"महाराज, तो अक्राळविक्राळ, भयंकर प्राणी 'शिस्तीची अधिष्ठात्री देवता' कसा होऊ शकतो?" विनोदने विचारले.





"मी तुला एक रहस्य सांगतो. खरं म्हणजे तो प्राणी हा एक राक्षसी आकाराचा सामान्य प्राणीच. परंतु शिस्तीची एक अधिदेवता आहे—हे भय जर प्रजेच्या मनात नसेल तर ते नीटपणे शिस्तपालन करणार नाहीत. त्याबरोबरच ही गोष्ट लक्षात घे की शिस्तीचा अधिष्ठाता जितका अधिक भयानक, तितक्याच जास्त भयाने प्रजा शिस्तपालन अधिक काटेकोरपणे करील." राजा म्हणाला.

"महाराज, आपलं ज्ञान काय घोड्यांच्या बदली रथाला माणसं जोडायला सांगतं?" विनोदने आणखी एक शंका विचारली.

विनोदच्या पाठीवर थोपटत राजा म्हणाला—"तुला जे प्राणी 'माणूस' म्हणून दिसले, ते खरे तर घोडेच आहेत. आम्ही त्या घोड्यांना मानवाकृती दिली आहे. अशा प्रकारे आम्ही मनात आणलं तर माणसांनाही घोडे बनवू शकतो. या आधारे आता तुला कळू शकेल की—आम्ही विज्ञानात कितीतरी प्रगति केली आहे!"

"हो, हो! छान कळलं की महाराज." विनोदने हसून म्हटले.

"काय कळलं?" राजाने शंका येऊन विचारले.

"निरुपयोगी ज्ञानाबद्दल लोभ बाळ-गणाऱ्या आपणासारख्यांना त्या क्रूर राक्षसी प्राण्यासारखी अधिदेवता ठीकच आहे." विनोदने उत्तर दिले.

राजा थोडा वेळ गप्प राहिला, नंतर म्हणाला—"या ज्ञानभूमीत आम्ही ज्या अद्भुत गोष्टी साध्य करून घेत आहोत ते पहायचं असेल तर माझ्याबरोबर चल." असे म्हणत राजा पुढे झाला.

विनोद राजाच्या मागेमागे चालू लागला. वाकड्यातिकड्या, गोल पायऱ्या चढून ते दोघे राजमहालाच्या वरच्या मजल्यावर पोचले. तेथे एका कोपऱ्यात एक घुमटा-सारखा पांढरा चकचकीत बुरुज दिसला. त्याच्या मध्यावर एक लाल रंगाचा गोल डाग होता. राजाने आपल्या हाताने त्या



लाल डागावर तीनदा टकटक केले. त्याबरोबर तो लाल डाग नाहीसा होऊन त्याजागी एक द्वार दिसू लागले. त्यात प्रवेश करीत राजा म्हणाला–"हा एक विशिष्ट प्रकारचा बुरुज आहे. ज्ञानभूमीत कोणत्या ठिकाणी काय चालले आहे हे इथून स्पष्ट दिसते. त्याबरोबरच सर्व काही ऐकूही येते. त्यामुळे कोठेही घडणारी कोणतीही घटना इथेच, आपल्या डोळ्या-समोर घडत आहे असे वाटते." असे म्हणत राजाने विनोदला भिंतीत आरसा जडवल्या-सारखे दिसणारे एक स्थान दाखवले.

विनोदने त्यात डोकावून पाहिले. त्यात निरनिराळ्या भागात विभाजित झालेले एक नगर त्याला दिसले. डोळे दिपवणाऱ्या प्रकाशात बायकापुरुष अनेक कामांत मग्न असलेले त्याला दिसले.

त्याने विचारले–"राजेसाहेब, हे लोक काय करत आहेत?"

"एकच नव्हे तर शेकडो कामे ते करत आहेत. आमच्या अनेक योजना आहेत. पहा, डावीकडे बघ. तिथे काही गणितज्ञ आमच्या संपूर्ण राज्यातल्या वाळूच्या कणांची संख्या निश्चित करण्याचे सूत्र शोधण्याचा प्रयत्न करत आहेत." राजाने म्हटले.

"महाराज, या सूत्रामुळे मानवजातीचे कोणते उद्दिष्ट साध्य होईल?" विनोदने विचारले.

"हूं! उद्दिष्ट? तुला हे कळत नाही का, की ज्ञान हे सर्वांत शक्तिवान् असते? कोणते ज्ञान केव्हा उपयोगी पडेल हे कसे सांगता येईल? म्हणूनच आम्ही ज्ञानाच्या सर्व शास्त्रांचं ज्ञान संपादन करून ते सुरक्षित ठेवतो. ते बघ, समोर दिसतोय तो चकचकीत मिनार- पाहिलास? तिथे काम करणाऱ्या माणसांचा कसलातरी महान् प्रकल्प पूर्ण होत आला आहे. तो पूर्ण झाला म्हणजे आम्ही लावलेल्या निरनिराळ्या शोधांच्या पगडीत शिरपेच खोचल्यासारखं होईल." राजाने सांगितले.





"इतका महान् हा कोणता शोध महाराज?" विनोदने उत्साहाने विचारले.

"हां, असे प्रश्न विचार. मी मोठ्या खुशीने तुला माहिती सांगेन. ऐक, भविष्यात आम्हाला वाटलं तर आम्ही इथूनच वाटेल त्या नक्षत्राचे तुकडे करू शकू. त्यासाठीच हा शोध इथे चालू आहे." राजाने मोठ्या गर्वाने म्हटले.

"हा तर शुद्ध मूर्खपणा होईल, भयानक क्रूरता आहे ही!" विनोद म्हणाला.

"हा काय तुझा अहंकार? असं कसं बोलू धजतोस तू?" राजाने गरजतच विचारले.

"नाहीतर काय? भोळ्या मुलांसारख टिमटिम करणाऱ्या या ताऱ्यांनी तुमचं काय वाकडं केलंय महाराज?" विनोदने विचारले.

"तू म्हणतोस तितकी निरुपद्रवी व लहान नाहीत ती नक्षत्रं! आपल्या पृथ्वी-पेक्षाही किती पटींनी मोठी आहेत. आपल्याकडल्यापेक्षा अधिक शक्तिशाली मानवही असतील यांपैकी कितीकांवर! कोणत्याही क्षणी ते आपणावर आक्रमण करू शकतील की नाही? म्हणूनच आपल्या रक्षणाची व्यवस्था करून ठेवण्यात चूक कसली?" राजाने विचारले.

"निरर्थक शंका उपस्थित करून आपण अत्यंत अनुपम अशा मानवशक्तीचा अपव्यय करीत आहात. महाराज, आपण म्हणता तसे इतर नक्षत्रमंडळांवरून मानव या पृथ्वीवर आलेच तरी ते प्रेमाचा शांतीचा संदेश घेऊन कशावरून येणार नाहीत? तेव्हा आपल्या संशोधनाचा आधार भय हाच का असावा?" विनोदने विचारले.

"एकाद्या गोष्टीबद्दल भय बाळगण्यात गैर काय आहे? भयामुळे ही मानवसमाज एकसूत्र होऊ शकेल की नाही?" राजा म्हणाला.

"चोरांच्या भीतीमुळेही कधीकधी लोक तात्कालिक रूपाने एकत्र होतात. पण ही असली एकता योग्य आहे का? हां,

आणखी एक सांगा. आत्ता या मध्यरात्रीच्या वेळी आपली प्रजा झोपत कां नाही?" विनोदने विचारले.

"झोप? हुं:, झोप विसरण्यासाठी आवश्यक असा उपाय आम्ही शोधून काढला आहे. जी माणसे दहा वर्षे न झोपता काढू शकतात अशांना आम्ही 'महान् प्राणी पदक' देऊन त्यांचा गौरव करतो." राजा म्हणाला.

"न झोपणें हे स्वास्थ्यालां हानिकारक आहे ना?" विनोदने विचारले.

"निद्रेच्या अभावी येणाऱ्या अस्वास्थ्या पासून वाचण्याचा उपायही आम्ही शोधून काढला आहे." असे म्हणत राजाने एक प्रदेश दाखवला व म्हटले-"तो मंडप पहा. आमच्या पुजाऱ्याने तेथे विलाप-समारंभ आयोजित केला आहे."

विनोदने त्या दिशेने पाहिले, एका विशाल मंडपाच्या मध्यभागी भिंतीवर त्या भयंकर प्राण्याचे चित्र काढलेले होते. त्या मांडवात चिंतेने चेहरे खाली झुकलेली माणसे बसली होती. पुजारी एका वेदीवर उभा राहून म्हणत होता-"आपणां सर्वांना माहितच आहे की आपल्या अत्यंत पूजनीय अशा प्राण्याची हत्या झाली आहे. आपल्या ज्ञानभूमीत आगंतुकपणे प्रवेश करून त्या महान् प्राण्याचा संहार करणारा माणूस काही सामान्य नाही. आपल्या एकाद्या अज्ञात शत्रूनेच त्याला चेतवून आमची हानि करण्यासाठी पाठवले असले पाहिजे. महान् प्राणी जेव्हा युवराजाला मिळणार होता, तेव्हाच संधी साधून त्याने त्याचा संहार केला व अशा प्रकारे त्याने महाराजांची सहानुभूति प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न केला. तरीही आम्ही त्याला कैद केले आहे."

"महाराज, हा खोटारडा जे बडबडतो आहे त्यावर आपला विश्वास आहे?" पुजाऱ्याचा क्रोध येऊन विनोदने राजाला विचारले.

राजाने काहीच उत्तर दिले नाही, परंतु शंकित नजरेने तो विनोदकडे पाहू लागला. (क्रमशः)



# राक्षसराजाची थट्टा

दृढ मनाचा राजा विक्रमादित्य त्या झाडाजवळ परत आला. त्याने प्रेत झाडावरून उतरवून खांद्यावर टाकले व नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाकडे चालू लागला. त्या प्रेतात वास करणाऱ्या वेताळाने विचारले-"राजा, तू कदाचित एक म्हण ऐकली असशील-'आपल्या शक्तीबाहेरील काम अनर्थकारी सिद्ध होते!' तू कोणाशी तरी वचनबद्ध आहेस, अन् म्हणूनच का मध्यरात्रीच्या वेळी तू इतकी मेहनत करीत आहेस असा मला संशय येतो आहे. आपल्या जातीचे अहित होईल हे माहीत असूनही एक राक्षसराजा केवळ दिलेले वचन मोडूनच थांबला नाही, तर त्याने शक्तिशाली राजाची थट्टाही केली. मी तुला ही गोष्ट सांगतो. त्यामुळे तुला तुझ्या श्रमांचा थोडा विसरही पडेल, ऐक.

## वेताळाच्या गोष्टी



वेताळ गोष्ट सांगू लागला. मगध देशाचा राजा माधवसेन याने एकदा तो वेष पालटून नगरात हिंडत असताना एक विचित्र दृश्य पाहिले.

एका मोठया वृक्षाखाली एक खूप मोठी घूस आरामात झोपली होती. इतक्यात कुत्र्याने पाठलाग केल्यामुळे घाबरून गेलेली एक मांजरी धावतधावत त्या झाडावर चढण्यासाठी तेथे आली. पण त्या घुशीला पाहून आणखीनच घाबरून ती तिथूनही पळून गेली!

त्या घुशीला पाहून माधवसेनच्या मनात विचार आला–अरेच्चा, माझ्या राज्यात मांजरांनी घाबरून जावे अशा मोठमोठया घुशी वावरतात हे काही चांगलं नाही. असल्या प्राण्यांना जिवन्त ठेवून उपयोग नाही." हा विचार मनात येताच त्याने आपली तलवार म्यानाबाहेर उपसली.

परंतु रणक्षेत्रावर मोठमोठया वीर योद्धयांचे प्राण घेणाऱ्या तलवारीने एका यःकश्चित घुशीला मारणे राजाला उचित वाटेना. त्यामुळे राजाने तलवार पुन्हा म्यानात घातली आणि जवळच पडलेला एक धोंडा घुशीच्या डोक्यात घालण्यासाठी त्याने उचलला. पण त्याच्या राजवंशाचा एक असा नियम होता की कोणत्याही प्राण्याचा–तो झोपेत असताना वध करायचा नाही. या नियमाची आठवण झाल्याबरोबर राजाने त्या घुशीला जागे करण्यासाठी हळूच पाय लावला.

अन् काय? घुशीच्या जागी एकदम एक माणूस अवतरला!

माधवसेनने आश्चर्याने त्याला विचारले–"अरे, तू कोण आहेस? इथे घुशीच्या रूपात का पडून राहिला होतास?"

"मी राक्षसांचा राजा आहे. माझे नांव प्रचण्ड. एका विशेष कामासाठी मी पृथ्वीवर आलो आहे. माझं खरं रूप पाहून सर्वजण घाबरतील म्हणून मी मनुष्यरूपात इथे वावरत आहे. मी असं पाहिलं की झोपलेल्या अन्य प्राण्यांना इथे जितकी सुरक्षितता



आहे तितकी मानवांना मात्र नाही! म्हणूनच मी इथे घुशीच्या रूपात झोपलो होतो. हे झालं आपल्या प्रश्नाचं उत्तर, पण आपण कोण?" त्या माणसाने विचारले.

माधवसेन फारच विस्मयचकित झाला. आणि तो बोलला–"मानवांना इथे सुरक्षितता नाही असं तू का म्हणालास? माझ्या ऐवजी दुसऱ्या कोणी तुला घुशीच्या रूपात इथे पाहिले असते तर तुझे प्राण केव्हाच गेले असते!" असे म्हणून राजाने त्याला स्वतःबद्दलची माहिती सांगितली.

"तू आमच्या राज्यात कशासाठी आला आहेस?" माधवसेनने विचारले.

"नुकतेच आमच्या राज्यांतले काही राक्षस नागरिक इथे पृथ्वीवर आले होते. आणि ते नरमांस भक्षण करून परत आले. तसे तर राक्षसांना नर-भक्षण निषिद्ध नाही. पण हल्ली काही काळासाठी आम्हा राक्षसांना काही कडक नियम लागू केले गेले आहेत. त्या नियमांप्रमाणे सध्या कोणीही राक्षस मनुष्य-वध करू शकत नाही–अगदी आत्मरक्षणासाठीही!" राक्षसाने माहिती दिली.

"मग असे असूनसुद्धा पृथ्वीवर आलेल्या तुमच्यापैकी काही राक्षसांनी नर-भक्षण कसे काय केले?" राजाने विचारले.



"तेच तर मी तुला सांगत आहे. ही गोष्ट तर खरीच की त्या राक्षसांनी नरमांसभक्षण केलं आहे. पण त्यांचं म्हणणं असं की यासाठी त्यांनी कोणत्याही नियमाचं उल्लंघन केलेलं नाही–सर्व काही नियमात राहूनच केलं आहे. पृथ्वीवर जाती-धर्माच्या निमित्ताने किंवा लुटालुटीच्या धंद्याच्या निमित्ताने माणसंच दुसऱ्या माणसांचा वध करतात. अशा प्रकारे जी माणसं मेली–त्यांनाच आमच्या राक्षसांनी खाल्लं. त्यांच्या या समर्थनात किती तथ्य आहे हे पहाण्यासाठी मी स्वतः पृथ्वीवर आलो आहे. राक्षसराजाने आपल्या संशोधनाची माहिती पुरवली.



"पृथ्वीवरील सर्वच राजांच्या अंगी थोडयाबहुत प्रमाणात प्राचीनकाळच्या राक्षसांचा अंश विद्यमान आहे. ते लोक स्वार्थी, क्रूर, अयोग्य आणि निर्बळ आहेत." राक्षसाने बेधडक सांगून टाकले.

राक्षसाचे हे बोलणे ऐकून माधवसेनच्या अंगाचा तिळपापड झाला. पण क्रोध न दाखवता तो म्हणाला–"मी स्वतः स्वार्थी आणि क्रूर नाही याचा पुरावा आत्ताच देऊ शकत नाही. पण आत्ताच्या आत्ता मी इतके मात्र जरूर शाबित करू शकतो की मी निर्बळ किंवा असमर्थ मात्र नक्कीच नाही."

या आव्हानाला राक्षसराजाने उत्तर दिले–"राक्षस रूपात मला कोणी मानव पराजित करूच शकणार नाही. माझी शक्ती अपार आहे. तुझ्यात हिम्मत असेल तर या रूपातच तू मला हरवून दाखव." राक्षसाने प्रति-आव्हान दिले.

परंतु माधवसेनने त्याचे म्हणणे मानले नाही. तो म्हणाला–"मी कोणी साधा-सुधा नागरिक नव्हे, मगध देशाचा राजा आहे. म्हणूनच कोणा सामान्य माणसावर तलवार चालवणे मला उचित नाही."

"मग ऐक तर. मी मगाशी तुला सर्वच माहिती दिली नाही. माणसं माणसांना मारतात तेव्हाच माझ्या राक्षसप्रजेला नरभक्षणाची संधि मिळते. त्या संधीपासून ते वंचित होऊ नयेत म्हणून मीच खूपदा इथे येऊन माणसांना एकमेकांशी लढायला प्रवृत्त करीत असतो, त्यांच्यात भांडणे लावून देतो. आता या परिस्थितीत माझ्यासारख्या माणसाला सोडून देणं तुला धोक्याचे आहे की नाही? उपस आता तुझी तलवार. तू मला हरवलंस तर मी तुझ्या आज्ञा पाळीन." राक्षसाने अटही सांगितली.

"मग तर, आता पहाच माझा पराक्रम!" असे म्हणत माधवसेनने तलवार उपसली.

राक्षसानेही आपली तलवार काढली व तो माधवसेनशी भिडला. थोडयाच वेळात राक्षसराजाची तलवार गळून दूर जाऊन पडली.

यानंतर राक्षस व माधवसेन यांनी द्वंद्व युद्ध केले. आपणाहून बलशाली असलेल्या राक्षसराजाला माधवसेनने काही पेच घालून उंच उचलले आणि गरगर फिरवून त्याला जमिनीवर आपटले. राक्षसराजा चारी मुंडया चीत झाला. त्याच्या डोळया-पुढे थोडा अंधार पसरला. थोडया वेळाने कसातरी तो स्वतःला सावरून उभा राहिला आणि म्हणाला–"राजा, तुझी शक्ति आणि युक्ति खरोखरच अपूर्व आहे. मी नक्कीच तुला मदत करीन. बोल, तुला माझ्याकडून काय हवे?" असे म्हणत तो एका भयंकर राक्षसाच्या रूपात प्रकट झाला.

"तू मला युद्धात मदत करायचीस. मी सर्व पृथ्वीचा चक्रवर्ती राजा बनून सर्वत्र शांती पसरवू इच्छितो."

राजाचे बोलणे ऐकून विकट हास्य करीत राक्षस म्हणाला–"माफ कर राजा, मी जे वचन दिलं त्याचं पालन करू शकत नाही. कारण माझ्याकडून मदत मिळावी इतकी तुझी योग्यताच नाही. तुझ्या अंगात शक्ति आहे पण बुद्धि मात्र मुळीच नाही!" असे म्हणून राक्षस अदृश्य झाला.

कहाणी संपवून वेताळाने विचारले–"राजा, राक्षसराजाने वचनभंग का केला? राजा माधवसेनने सर्व राज्ये जिंकून शांति प्रस्थापित केली तर राक्षसांना नरमांस



भक्षणाची संधि मिळणार नाही–हेच कारण ना? राक्षसराजाने केवळ वचनभंगच केला नाही तर उलट माधवसेनला त्याने 'तुझ्यात शक्ति आहे पण बुद्धि नाही' असे म्हटले–यात त्याचीच बुद्धिहीनता दिसून येत नाही काय? या प्रश्नाचे उत्तर माहीत असून ही तू सांगितले नाहीस तर तुझे मस्तक फुटून त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होतील."

यावर विक्रमादित्य म्हणाला–"तसे मुळीच नाही. राक्षसराजा अतिशय बुद्धिमान आणि उदार आहे. आपल्या जातीच्या लोकांकडून मानवमात्रांची हानि होऊ नये म्हणूनच त्याने आपल्या राज्यात 'नरमांसभक्षणाला बंदी' वगैरे कडक नियम केले, व मानवजातीची हानि टाळायचा प्रयत्न केला. परंतु पृथ्वीवर आल्यावर त्याला व्यवस्थित झोपण्यासाठी मानवरूप धोक्याचे वाटू लागले. म्हणजे याचे तात्पर्य असे की माधवसेनच्या राज्यात माणसांना सुरक्षिततेने रहाता येत नाही. ही जबाबदारी खरी कुणाची? राज्यशासन करणाऱ्या माधवसेनचीच ना? म्हणूनच राक्षसराजाने त्याला 'असमर्थ' म्हटले. पण त्यामुळे रागावून माधवसेनने राक्षसाचा पराजय करून आपल्या सामर्थ्याचा पुरावा द्यायचा प्रयत्न केला. परंतु जो आपल्याच राज्यातल्या अराजकतेवर काबू मिळवू शकला नाही. तो माधवसेन सर्व विश्व जिंकून शांति प्रस्थापित करायची इच्छा प्रदर्शित करतो आहे! त्यासाठी युद्ध करावे लागणार. युद्धात लाखो लोक व सैनिक उगीचच आपले प्राण गमावणार. आणि त्यामुळे राक्षसांना फायदाच होईल. झोपलेल्या पशुचा प्राण घ्यायला मागेपुढे करणारा राजा माधवसेन युद्ध सुरू करून लाखो लोकांचे प्राण पणाला लावणार, म्हणूनच राक्षसाने माधवसेनच्याच बुद्धीची थट्टा आरंभली."

अशा प्रकारे मौनभंग झाल्याबरोबर वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन झाडाला लटकू लागला. (कल्पित)





## जमीनदाराचे काव्य

रत्नपुरचे जमीनदार धर्मराज यांच्या कचेरीत अनेक कारकून व नोकर कामाला ठेवलेले होते. पण वेळच्यावेळी त्यांना योग्य सल्ला देऊन त्यांच्यावर देखरेख करू शकेल असा कोणी माणूस नव्हता.

ही कमतरता दूर व्हावी म्हणून एकादा बुद्धिमान सल्लागार नेमावा असे जमीनदाराच्या मनात आले.

ही बातमी कळल्यावर सहा तरुणांनी या जागेसाठी आपले अर्ज पाठवले.

सहाही युवक ठरलेल्या दिवशी जमीनदाराला भेटायला आले. प्रत्येकाची थोडीफार चौकशी करून जमीनदार त्यांना म्हणाला–"तुम्हा सर्वांना बहुधा माहितच असेल की मला काव्य आणि इतर ललितकलांची अतिशय आवड आहे. मी आत्ताच एक छोटेसे गीत लिहिले आहे. मी ते तुम्हाला ऐकवतो. ऐका हं!" असे म्हणून धर्मराजने त्यांना सहा चरण गाऊन दाखवले. नंतर त्यांना उद्देशून धर्मराज म्हणाला–"येत्या गुरुवारी तुम्ही सर्वजण पुन्हा याच वेळी इथे या. तेव्हा आपण हे निवड करण्याचे काम संपवू."

ते सर्व तरुण अर्जदार त्या दिवशी जमीनदाराचा निरोप घेऊन निघून गेले. आणि पुढच्या गुरुवारी पुन्हा ठरलेल्या वेळी जमीनदाराकडे हजर झाले. सुरुवातीलाच जमीनदाराने त्यांना प्रश्न टाकला–"मागच्या वेळी तुम्ही इथे आलात, त्यावेळी मी तुम्हाला एक पद गाऊन दाखवले होते. तुमच्यापैकी कुणाला या ओळी आठवत आहेत का?"

यावर सहाहीजण एकमेकांच्या तोंडाकडे पाहू लागले. पण त्यांच्यातला रामकीर्तन नावाचा एक तरुण जमीनदाराला म्हणाला–"महाराज, ते गीत माझ्या छान आठवणीत आहे." असे म्हणून त्याने ते सर्व सहाचे-

सहा चरण अस्खलितपणे म्हणून दाखवले. रामकीर्तनची स्मरणशक्ती पाहून बाकीचे पाच युवक आश्चर्यचकित होऊन त्याच्याकडे पहात राहिले!

जमीनदार त्याच्या स्मरणशक्तीचे कौतुक करत म्हणू लागला–"रामकीर्तन, तुझी स्मरणशक्ती खरोखरच अजब म्हटली पाहिजे! मी स्वत: रचलेले गीत मला आठवत नव्हते, पण तू मात्र सर्वच्या सर्व ओळी अगदी बरोबर लक्षात ठेवल्यास!"

यावर रामकीर्तन मोठ्या विनयाने बोलू लागला–"महाराज, आपण मला अभय देत असाल, क्षमा करणार असाल तर मी एक निवेदन करू इच्छितो."

"बोल, काय म्हणायचंय तुला?" जमीनदाराने आश्चर्याने विचारले.

"हुजूर, हे गीत आपण रचलेलं नाही." रामकीर्तनने सांगून टाकले.

"मी लिहिलेलं नाही? मग सांग बर कोणी लिहीलंय हे गीत?" जमीनदाराने विचारले.

"माझ्या लहानपणी मी हे गाणं माझ्या आजीच्या तोंडून ऐकलंय. ती हे गाणं म्हणत असे." रामकीर्तनने सांगितले.

जमीनदार गडगडून हसू लागला व म्हणाला–"रामकीर्तन, तुझी स्मरणशक्ती अद्‌भुत आहे. हे गीत मी रचलेलं नाही ही गोष्ट बरोबर आहे. मी केवळ तुम्हा लोकांची स्मरणशक्तीची परीक्षा घेण्यासाठी हे नाटक केलं. तू चार-पाच वर्षांचा असताना ऐकलेलं गाणं अजून लक्षात ठेवलंस यावरून तुझी बुद्धिमत्ताही दिसून येते. मला ज्या माणसाची गरज आहे, त्याच्यात बुद्धिमत्ता व स्मरणशक्ती हे दोन्हीही गुण असण्याची आवश्यकता आहे. माझी खोटीखोटीच स्तुति करून 'मी फारच सुंदर गीत रचलं आहे' असं तू म्हणाला नाहीस, उलट मोठ्या धाडसाने 'गीत तुम्ही रचलेलं नाही' असं सांगितलंस." तेव्हा मी तुझी माझ्या कचेरीत सल्लागार म्हणून निवड करीत आहे.



महाकाव्य कथा :

# शकुन्तला–१



महर्षि कण्व एक दिवस आपली प्रात:कर्मे आटोपून आश्रमाकडे परतत होते. वाटेत त्यांनी पाहिले की काही शकुन्त पक्षी एका बालिकेचे रक्षण करीत आहेत! हे दृश्य पाहून त्यांना फारच आश्चर्य वाटले. त्यांनी मोठ्या प्रेमाने त्या बालिकेला उचलून आश्रमात आणले. त्यांनी समाधी अवस्थेत अंतर्ज्ञानाने जाणले की ही मेनका व महातपस्वी विश्वामित्र यांची कन्या होय.





हस्तिनापुरचे महाराज दुष्यंत शिकारीसाठी एकदा जंगलात गेलेले असताना त्यांना कळले की कण्वमहर्षींचा आश्रम जवळच आहे. मुनींचे दर्शन घेऊन त्यांचा आशिर्वाद घ्यावा, त्यांचे कुशल विचारावे व थोडा विश्रामही करावा अशा विचाराने महाराजांनी आपला मोर्चा आश्रमाकडे वळवला. अंगरक्षक व इतर सर्वांनाच बाहेर सोडून दुष्यंत राजाने एकट्यानेच आश्रमात प्रवेश केला.

कण्वमुनि त्यावेळी आश्रमात नव्हते. शकुंतला आपल्या सखी मुनि-कन्यांसह तेथे खेळत होती. इतक्यांत एक भुंगा गुं गुं आवाज करीत तिच्या भोवती फेऱ्या मारू लागला. त्यामुळे वासून त्याला हाकलायचा प्रयत्न करीत तिने आपल्या सख्यांना मदतीसाठी बोलावले. एक सखी तिची थट्टा करीत म्हणाली– "अग, दुष्यंत-महाराजांकडे याच्या चावटपणाबद्दल तक्रार करू हे या भुंग्याला माहीत नाही असं दिसतंय."





तिचे हे बोलणे संपता-संपताच दुष्यंत तेथे पोचला. राजा अचानक तेथे आलेला पाहून त्या सर्वजणी एकदम आश्चर्यचकित झाल्या. कण्वमुनि आश्रमात नसल्यामुळे त्यांनाच स्वतः राजाचा अतिथि-सत्कार करावा लागला.

सर्व मुनि-कन्यांनी मोठ्या श्रद्धा व भक्तीने राजाला फळे व फुले दिली, व त्याला आश्रमात आराम करायची विनंती केली. शकुंतलेचे सौंदर्य व विनयशीलता पाहून राजा मोहून गेला.





राजाला जेव्हा समजले की काही वन्य पशु आश्रमात गडबड-गोंधळ करून तेथील शांतीचा भंग करतात, तेव्हां त्याने स्वतः जातीने जाऊन तेथील हत्तींचे व रानरेड्यांचे कळप दूर पळवून लावले व थकून तो आश्रमात परत आला. शकुंतलेने अतिशय निष्ठेने त्याची सेवा करून त्याचा श्रमपरिहार केला.

काही दिवस असेच निघून गेले. या काळांत दुष्यंत व शकुन्तला एकमेकांवर अनुरक्त झाले. शकुंतलेला पितृस्थानी असलेले कण्वमुनि आश्रमात नसल्यामुळे त्यांच्या अनुपस्थितीत राजाशी विवाह करायला शकुन्तला तयार होईना. दुष्यंताने खूप समजावून सांगितल्यावर तिने संमति दिली व त्यांचा गांधर्वविवाह झाला. धर्मात्मा दुष्यंताने शकुंतलेशी विवाह केल्याने सर्व मुनिकन्या आनंदित झाल्या.





दुष्यंताला आता विश्राम संपवून राजधानीत जाऊन राज्यकारभार पहाणे आवश्यक होते. कण्व मुनि परत आल्यावर त्यांचा आशिर्वाद घेतल्यानंतर मी तुला राजधानीत बोलवून घेऊन जाईन—असे दुष्यंताने शकुन्तलेला सांगितले. आपल्या हातातली अंगठी काढून ती शकुन्तलेला उपहार व आपली आठवण म्हणून भेट देऊन, तिचा निरोप घेऊन दुष्यंत आपल्या राजधानीला निघाला.

निघताना दुष्यंतमहाराजांनी सर्व आश्रमवासीयांचा निरोप घेतला. शकुन्तलेने मोठ्या कष्टी मनाने त्यांना निरोप दिला. महाराजही व्याकुळ मनाने हस्तिनापुरला निघून गेले.





काही दिवसांनी कण्वमुनि आश्रमात परत आले. दुष्यंताशी झालेल्या विवाहाबद्दल कळले की ते काय म्हणतील याबद्दल शकुन्तलेला मनांतून धाकधूक वाटत होती. भीतीने ती मनांतून कापत होती. अशा अवस्थेत तिने महर्षींच्या पायांवर मस्तक ठेवले.

(क्रमशः)



# तीन सूत्रे

एका गुरुकुलात एक गरीब विद्यार्थी रहात होता. आचार्यांनी अन्य विद्यार्थ्यांबरोबर त्याला ही शिकविले. पण दुर्भाग्याने हा गरीब विद्यार्थी शिक्षणाच्या बाबतीत एकदम कच्चा ठरला. सर्व विद्यार्थी शिक्षण पूर्ण करून घरी जायला निघाले तेव्हां आचार्य त्या गरीब शिष्याला म्हणाले—" वत्स, तुझ्या बरोबर जे विद्यार्थी शिक्षण घेत होते, ते सर्व पंडित होऊन गेले. पण का कुणास ठाऊक, दुर्भाग्य तुझे की माझे, तू विद्यार्जनात एकदम कच्चा निघालास. आता मी तुला तीन सूत्रे सांगतो. तुझं नशीब शिकन्दर असलं तर या तीन सूत्रांच्या आधारे तुझी प्रगति होऊ शकेल." असं म्हणून आचार्यांनी त्याला तीन सूत्रे ऐकवली. ती अशी—

जो चालत राहील तो पोंचेल!

जो विचारीत राहील त्याला माहीत होईल!!

जो जागत राहील त्याला मरणाचे भय नाही!!!

आचार्यांनी सांगितलेली तीन सूत्रे चांगल्या प्रकारे मनात ठेवून गरीब शिष्य घराकडे जायला निघाला. घरच्या वाटेवर असताना त्याला वेदवती नगर पाहण्याची उत्कट इच्छा झाली. नगराचा मार्ग विचारीत चालू लागला.

ते शहर किती दूर होत हे शिष्याला माहीत नव्हतं. तसं शहर बरंच दूर होतं. भाडयाची गाडी करायला त्याच्याजवळ पैसे नव्हते. काही महिने सतत चालत राहिल्यावर तो गरीब विद्यार्थी वेदवती नगरांत पोंचला. आचार्यांनी सांगितलेले पहिलें सूत्र 'चालत राहील तो पोंचेल' त्याच्या बाबतीत खरं ठरलं.

वेदवती खूपच मोठं शहर होतं. त्यावेळी गरीब शिष्याच्या मनात असा विचार आला

२५ वर्षांपूर्वीच्या चांदोबातील गोष्ट



की इतके जिवापाड कष्ट करून इतक्या दूर आलोच आहे, तर एकादी छोटी-मोठी नोकरी मिळवून काही दिवस इथं घालवावेत, म्हणजे केलेले श्रम कारणी लागतील. तसा निश्चय करून त्याने थोड्या पगाराची एक छान नोकरी मिळवली. त्याला सोपविलेले काम तो काळजीपूर्वक करू लागला. नियमितपणे कामावर जाई व मनापासून काम करी. त्याची ही वृत्ति मालकाला खूप आवडली. त्याचा पगार वाढत गेला. आवश्यक तो खर्च करून तो पैसे शिल्लक टाकू लागला. आता त्याला जीवनात चिंता राहिली नाही. तो वेदवती नगरीतील एक प्रतिष्ठित नागरिक बनला. फावल्या वेळात शहरात सर्वत्र हिंडून तेथील विशेष गोष्टींची माहिती त्याने मिळवली. 'जो विचारील राहील त्याला माहीत होईल.' हे आचार्यांचे दुसरे सूत्र ही त्याच्या बाबतीत खरं ठरलं!

शहरातील अनेक लोकांशी बोलल्यावर त्या गरीब शिष्याला नगरी बद्दल एक खास गोष्ट समजली. ती ही की या शहरावर राजा राज्य करीत नाही. एक राणी सर्व राज्यकारभार चालविते. तसे पांच-सहा वेळा तिचे लग्न झाले होते, पण ती सदैव लग्नाला तयार असे. त्याचं कारण अस की, तिच्याशी जो युवक लग्न करी तो एका विचित्र प्रकारे मृत्यु-मुखी पडे. अशा रीतीने एका पाठोपाठ एक पांच-सहा युवक मेल्यानंतर तिच्याशी लग्न करण्याचे साहस करायला कोणी युवक तयार होत नव्हता. यामुळे राणी नेहमी दुःखी-कष्टी असे. इतके विवाह करून ही पति-सुख तिच्या नशिबी नव्हते. तिने अनेक नवस-सायास केले पण व्यर्थ!

गरीब शिष्याला जेव्हा ही वार्ता समजली, तेव्हा त्याला आचार्यांनी सांगितलेले तिसरे सूत्र आठवले—'जो जागत राहील त्याला मरणाचे भय नाही!' आचार्यांच्या वचनावर त्याचा दृढ विश्वास होता. म्हणून गरीब शिष्याने राणीशी लग्न करण्याचा निश्चय केला.



एक दिवशी गरीब शिष्य तडक राजमहालात गेला आणि राणीशी लग्न करण्याचा आपला विचार त्याने मंत्र्यांना सांगितला. मंत्र्यांना फार आनन्द झाला नि त्यांनी लग्नाचा मुहूर्त निश्चित केला.

विवाहाच्या दिवशी गरीब शिष्याने मोठ्या थाटा-माटाने राजोचित वस्त्रें परिधान केली आणि वैभवपूर्वक लग्न-सोहळा पार पडला.

त्या दिवशी रात्री शयन-गृहात प्रवेश करण्यापूर्वी गरीब शिष्याने आपले कपडे काढून एका बाजूला ठेवून दिले, आपली तलवार भिंतीला टेकवून ठेवली. शयन-गृहाच्या बाहेर शोभेसाठी केळीचे खुंट लावलेले होते, त्याची पाने काढून खोड बिछान्यावर ठेवले नि त्यावर चादर पांघरली. यानंतर तलवार हातात घेऊन तो खांबाच्या आडोशाला उभा राहिला. ज्याला मृत्यूचे भय आहे त्याला जागणे आवश्यक आहे. म्हणून तो जागत राहिला.

थोड्या वेळात शयन-गृहातील छतांतून एक काळा नाग बिछान्याच्या बाजूच्या खांबावरून जलद गतीने सरपटत आला, बिछान्यावर ठेवलेल्या केळीच्या खोडाला मनुष्य समजून त्याला जोरात चावला. त्याच वेळी शिष्याने चपळाईने पुढे होऊन आपल्या तलवारीचा वार नागावर केला. सापाचे डोके उडून दूर जाऊन पडले. यानंतर तो मेलेला साप व केळीचे खोड फेंकून देऊन तो निश्चिन्तपणे झोपला.

दुसऱ्या दिवशी सकाळी मंत्री आले आणि पाहतात तो वर जिवन्त आहे! त्यांच्या आश्चर्याला पारावर राहिला नाही. त्याच दिवशी मंत्र्यांनी गरीब शिष्याला राज्याभिषेक केला. गुरुकुलातील शिक्षणात कच्चा असला तरी आचार्यांच्या वचनावर अपार भक्ति व श्रद्धा असल्यामुळे गरीब विद्यार्थी वेदवती शहराचा राजा झाला नि त्याने अनेक वर्षे सुखाने राज्य केले.



# लाच

शिवपुरी राज्यात शत्रूचा उपद्रव फार वाढला. त्यामुळे तेथील राजाने आपल्या राजधानीच्या रक्षणासाठी नगराच्या चारी बाजूंना दगडांचा एक उंच व भक्कम असा तट बांधला व प्रवेशद्वारावर लोखंडी दरवाजे बसवले.

यानंतर त्या दगडाच्या भिंतीची मजबुती व लोखंडी दरवाजाच्या शक्तीची परीक्षा घेण्यासाठी त्याने भिंतीवर व दारांवर हत्तींच्या टकरा देवबल्या आणि तोफाही डागून पाहिल्या. परंतु त्यांच्यावर काहीही परिणाम झाला नाही, भिंती व दरवाजे तुटले नाहीत.

हे पाहून अत्यंत प्रसन्न होऊन राजा आपल्या मंत्र्यांना व सेनापतीला उद्देशून म्हणाला– "हा तट व हे दरवाजे दुर्भेद्य आहेत. आता आपल्या नगरात कोण प्रवेश करणार?"

राजाचे हे बोलणे ऐकून त्याचा प्रधानमंत्री गालात हसून गप्प राहिला.

थोड्या दिवसांनी राजा व मंत्री वेष पालटून नगराच्या परिसरात फिरत होते. रात्री प्रवेश-द्वारापाशी येऊन पहारेकऱ्याला दरवाजा उघडण्याची विनंती केली.

सरदार म्हणाला–"सूर्यास्तानंतर सेनापतीच्या लेखी परवानगीशिवाय कोणालाही नगरात प्रवेश करायला मनाई आहे."

यावर मंत्र्याने त्याला खुणेने जरा बाजूला बोलावून घेतले आणि त्याच्या हातावर सोन्याची वीस नाणी ठेवत म्हटले–"आमचे नगरात फार महत्त्वाचे काम आहे."

यानंतर मात्र पहारेकऱ्यांच्या त्या सरदाराने शिपायांना दरवाजा उघडण्याची आज्ञा दिली.

हा सर्व प्रकार पाहून राजाला फार आश्चर्य वाटले. मंत्री म्हणाला–"पाहिलेत महाराज! हत्तींच्या टकरा व तोफांच्या गोळ्यांपेक्षा अधिक शक्तिशाली काही असेल तर ते म्हणजे 'लाच' समजले आपणाला?"

राजा यावर काय बोलणार?






कुंभकच्या गोठ्यात जन्मलेले राक्षसी बैल व त्यांच्या अत्याचारांबद्दल जनतेने मिथिलेच्या राजाकडे तक्रार केली. राजाने कुंभकला बोलावून घेतले व त्याला सुनावले– "तुझे बैल जनतेच्या प्राणांवर उठले आहेत यावद्दल माझ्याकडे तक्रारी आल्या आहेत. तू एका चांगल्या संपन्न घराण्यातला माणूस आहेस, सामान्य माणूस नाहीस तू. तुझ्या-जवळ पुरेसं माणूसबळ आहे. दहा पंधरा जणांच्या मदतीने त्या बैलांना वठणीवर आण किंवा बडव. इतके करून ही ते त्रास देऊ लागले तर त्यांना जंगलात पिटाळून लाव."

त्या बैलांना कसे काबूत आणावे हे कुंभकला कळेना. त्याने दवंडी पिटवली की, 'जो कोणी त्या दुष्ट बैलांना नमवून दाखवील त्याच्याशी मी आपल्या मुलीचा विवाह करून देईन.'

ही दवंडी ऐकून चारी दिशांनी गोप युवक गोळा होऊ लागले. त्यांना असे वाटले की–आपण तर गवळ्यांची पोरे! गुरांना ताब्यात ठेवण्यातच आपला जन्म गेलेला! तेव्हां या बैलांना वठणीवर आणणे काय कठीण!

असे उद्दिष्ट ठेऊन जमा झालेले गोप आपापल्या परीने बढाया मारू लागले. एकजण म्हणाला–"मी बैलांची शिंगे पकडून ठेऊन त्यांना वठणीवर आणीन." तर दुसरा म्हणतो–"मी त्यांना खाली पाडून त्यांच्या नाकात वेसण घालीन."

६. नीला व कृष्ण यांचा विवाह



अशा निरनिराळ्या प्रकारांची शेखी मिरवत त्या गोपाळांनी आपल्या उत्साहाचे खूप प्रदर्शन केले.

दवंडीबद्दल हकीकत कळली तेव्हां नंदाने विचार केला की, आपण स्वतःच तिथे जाऊन कुंभकाला काही मदत करता आली तर पहावे. नंदाने कृष्ण-बलराम यांच्याशी विचारविनिमय केला आणि नन्द-यशोदा व कृष्ण-बलराम असे सर्वच विदेह देशाकडे जायला निघाले.

ते सर्वजण कुंभकाच्या गावी पोचले तेव्हा त्याने पुढे होऊन आपल्या बहिणीचे व मेव्हण्याचे स्वागत केले. कुंभकांची पत्नी धर्मदा हिने यशोदेला कुशल विचारले. कुंभकाच मुलगा श्रीधाम याने कृष्ण-बलराम यांना प्रेमाने मिठी मारली व स्वतः आसन आणून त्यांना त्यावर बसवले.

कृष्ण, बलराम यांच्या आगमनाची वार्ता त्या सात राक्षसी बैलांनी कशी ओळखली कोण जाणे! पण ते एका-एकीच अस्वस्थ झाले. गाभण गायींना त्यांनी शिंगे मारली आणि नंतर कुंभकाच्या आवारात शिरून जोराने हंबरत त्यांनी शिंगांनी जमीन उकरायला सुरुवात केली. नंतर त्यांनी तेथे रचून ठेवलेली मातीची भांडी व मडकी फोडून टाकली, जवळपास असलेल्या गाड्या मोडून टाकल्या, मांडव मोडले, दारे मोडून टाकली आणि अशा प्रकारे तेथे सर्वत्र दाणादाण उडवली! अशा प्रकारे काही वेळ आपला प्रताप दाखवून बैल तेथून किंचाळत, ओरडत निघून गेले. त्यांची खोड मोडण्यासाठी आलेली, बढाया मारणारी गवळ्यांची तरूण पोरे, त्यांचा हा अवतार पाहून भिऊन लपून बसली!

सकाळ झाल्यावर कुंभकाने सर्व गवळ्यांना एकत्र केले. आपल्या मुलीला अलंकार लेववून, तिचा साजशृंगार करवून तिला त्यांच्या समोर उभे केले व म्हटले—"गोपाळांनो, तुम्ही काल पाहिलेत ना, बैल कसे दिग्गजांसारखे बलदंड आहेत! आपण यांना वठणीवर आणले नाही तर राजा आपल्याला शिक्षा देईल. यासाठीच आपणा सर्व बलवान व पराक्रमी लोकांना मी पाचारण केलं आहे. तुमच्यापैकी जो कोणी या बैलांना वठणीवर आणू शकेल त्याच्याशी मी या माझ्या कन्येचा विवाह करून देईन."

कुंभकाचे बोलणें ऐकून गोपाळांना प्रथम स्वतःची लाज वाटली. नीलाला पाहून त्यांच्यात वीरश्री संचरू लागली. पण पुन्हा बैलांच्या रौद्रभीषण स्वरूपाची आठवण होऊन त्यांचा उत्साह थंड पडू लागला. त्यामुळे कोणीही नीट निर्णय घेऊ शकेना.

अशातच नन्दाच्या जातिबांधवांपैकी घोषवन्त नावाच्या एका गोपाळाने म्हटले—"या लेकाच्या बैलांना मी मारून टाकलं नाही तर माझ्या बळ व पराक्रमाचा काय उपयोग?" असे म्हणून दंड ठोकून तो त्या बैलांच्या रोखाने निघाला.

घोषवन्तने एका बैलाच्या मस्तकावर जोरात मुष्टिप्रहार केला. ते पाहून लोकांनी हर्षनाद केला. पण हाय! दुसऱ्याच क्षणी सातही बैलांनी एकदम त्याला घेरले. परंतु घोषवन्ताच्या अवास्तव साहसाबद्दल कृष्णाला मात्र वाईट वाटले. त्याच्या मनात आले—"याने उगीचच नीट विचार



न करता बैलांवर हल्ला करायचा निर्णय घेतला. हे बैल आता कसले याला जिवन्त सोडतात?" इतक्यात एका बैलाने त्याला आपल्या शिंगावर घेऊन दूर खाली पाडले व आपल्या खुरांनी दूर लाथाडून दिले! अशा प्रकारे घोषवन्ताची खोडकी जिरवल्यावर ते शिंगे उगारत, खुरांनी मारत गोपाळांच्या समूहावर धावून गेले व त्यांनी सर्वांना सैरावरा पळवून लावले!

याच वेळी बलरामाला कृष्ण म्हणाला—"हे बैल 'सामान्य बैल' दिसत नाहीत. बैलांच्यात इतके साहस व इतकी सुडबुद्धी असणे शक्य नाही. मीच आता स्वतः कुंभकाच्या मदतीला जातो." असे म्हणत



कृष्ण त्या मारक्या बैलांच्या दिशेने पुढे सरसावला. नंद-यशोदा तसे न करण्याबद्दल ओरडून त्याला सांगू लागले.

परंतु तिकडे लक्ष न देता अत्यंत रागाने आपली मूठ उगारून कृष्ण पुढे जाऊ लागला. ते पाहून ते सख्खे भाऊ असलेले सातही बैल आपले जुने वैर आठवून कृष्णावर अतिशय रागावले व क्रोधाने सर्वांनी मिळूनच कृष्णावर हल्ला चढवला! परंतु जसजसा एकेक बैल जवळ येई तसतसे कृष्णाने त्या त्या बैलाच्या माथ्यावर आपल्या हाताने प्रहार केला आणि एका बैलाची शिंगे पकडून त्याला दुसऱ्या बैलावर ढकलून दिले. हे दृश्य पाहून प्रेक्षक आश्चर्यचकित झाले. हे युद्ध म्हणजे कृष्णाला खेळासारखेच वाटले, प्रेक्षकातच उभी राहून नीलाही हे दृश्य आश्चर्यविमूढ होऊन पहात होती. नीला लाजून कृष्णाकडेच पहात होती. तिलाही असे पहाताना अत्यन्त आनन्द वाटला.

शेवटी कृष्णाने आपला बैलांशी चाललेला खेळ थांबवायचे ठरवले. त्याने पुन्हा एकेका बैलाच्या मस्तकावर मुष्टिप्रहार करून त्यांची डोकी फोडून टाकली. त्यांच्या नाकातोंडातून रक्त वाहू लागले. शेवटी हातपाय झाडत, जिभा हासडून त्यांनी प्राण सोडले. अशा प्रकारे कृष्णाने कालनेमीच्या सातही पुत्रांचा संहार केला.

नंद-यशोदेने धावत जाऊन कृष्णाला गळामिठी घातली. नीलाचा हात पकडून कुंभक तिला घेऊन कृष्णाजवळ आला. तिचा हात कृष्णाच्या हातात देत तो म्हणाला–"तुझ्या पराक्रमाचे बक्षिस म्हणून ही माझी कन्या मी तुला अर्पण करीत आहे. तू हिचे पाणिग्रहण कर."

कुंभकाने मग कृष्णाला वस्त्रे व आभूषणे दान दिली. नंद-यशोदा यांना वस्त्रे दिली व इतर गोपाळांनाही निरनिराळे उपहार दिले. नंदाला तो म्हणाला–"महाराज, आपला पुत्र अत्यंत साहसी अन् पराक्रमी आहे. त्याच्यामुळे आम्ही एका मोठ्या



संकटातून मुक्त झालो आहोत आता आम्ही आमचं जीवन सुखाने व शान्तीने घालवू शकू. मी नीलाला पाठवणी म्हणून माझ्या हजारो गायी देत आहे. कृपा करून नाही म्हणू नकोस, या गायी तू ग्रहण कर. केवळ माझ्या मनाची प्रसन्नता म्हणून मी हे सर्व देत आहे."

"वेड्या, अरे माझ्याजवळ अपार गोधन आहे. कृष्णाच्या जन्मापासून माझ्या गायींच्या कळपांची संख्याही आश्चर्यकारक वेगाने वाढत आहे. अपरिमित दुधाची प्राप्ती मला होत आहे व त्यापासून अमाप तूपही मला मिळत असते. आम्ही सर्वजण अतिशय सुखात आहोत." नन्द कुम्भकाला समजावत म्हणाला.

त्यानंतरचा एक दिवस सर्वांनी महोत्सवासारखा साजरा केला. दुसऱ्या दिवशी नन्द यशोदा नीला यांच्यासह श्रीधामलाही बरोबर घेऊन कृष्ण व अन्य सर्वजण वृंदावनाकडे निघून गेले. तेथे गेल्यावर सर्वजण सुखपूर्वक कालक्रमणा करू लागले.

एक दिवस आपल्या गायी चारत चारत कृष्ण व बलराम यमुनेच्या तीरावरील मोठ्या वटवृक्षापाशी पोचले. वृक्षाभोवती गायी चरू लागल्या व त्यांच्यावर लक्ष ठेवीत ते दोघे वडाच्या सावलीत विसावले.

त्याचवेळी वामदेव व भारद्वाज नावाचे दोन महामुनि तेथे येऊन पोचले. तीर्थाटन करीत करीतच ते तेथे आले होते. त्यांनी वटवृक्षाला प्रदक्षिणा घालून वंदन केले. त्यांनी खेळत असलेल्या मुलांना विचारले– "बाळांनो, साप, मगरी यांचा उपद्रव नसलेला व स्नान करण्यास योग्य असेल असा एकादा घाट जवळपास कुठे बरं असेल?"

पोरेच ती! त्यांना थट्टा करायची लहर आली व ती एकमेकांच्या तोंडाकडे पहात, डोळ्यांनी खुणावत एकमेकांकडे बोटं दाखवत एकेकजण म्हणू लागली–"मला नाही माहीत. त्याला विचारून पहा बरं!" हे पाहून कृष्णाने त्यांचा हेतु ओळखला व पोरे खोड्या करीत आहेत हे जाणून स्वतःच उठून तो त्या मुनींकडे गेला व



म्हणाला–"मुनिवर, या लोकांना घाटाबिटांच्या बाबतीत काही माहिती नाही. या, मी तुम्हाला छानसा घाट दाखवतो. आपण आपली धर्मकृत्ये उरकून इथेच परत या. आम्ही साय व दही घातलेल्या शिळ्या भाताची शिकाळी बरोबर आणली आहेत. साखर घालून केलेली खीरही आमच्या जवळ आहे. आपण खुशीने आमचे हे पदार्थ ग्रहण करा. हे नको असेल तर आम्ही गायीची धार काढून धारोष्ण दूध आपणाला प्यायला देऊ. मी नन्दपुत्र कृष्ण आणि हा माझा मोठा भाऊ बलराम."

आपल्याशी बोलणाऱ्या मुलाच्या तोंडावरील तेज पाहून मुनींच्या मनात आले, "सामान्य गवळ्याच्या घरात असा मुलगा कसा बरं जन्माला आला असेल? ते जरा आश्चर्यातच पडले. थोडा वेळ डोळे बंद करून त्या मुनींनी समाधी लावली व समाधी-द्वाराच खरी गोष्ट ओळखली. ते कृष्णाला म्हणाले–"वत्सा, आमचे केवढे अहोभाग्य! प्रत्यक्ष ब्रह्मादि देवतांना प्रयत्न करूनही ज्यांचे दर्शन दुर्लभ, असे महान् आपण आहात. आम्हाला मात्र आपले दर्शन विनासायास घडले, आमच्या जन्माचे सार्थक झाले! पुत्ररूपात ज्यांना आपला लाभ झाला, ते आपले मातापिता धन्य होत!" अशा अनेक प्रकारे कृष्णाची स्तुति



करून ते दोघे मार्गस्थ झाले. यानंतर बलराम व इतर गोपाळांबरोबर गायींच्या खिल्लारांमागे फिरत कृष्ण मोठ्या सुखाने व आनंदाने आपले दिवस घालवू लागला.

एक दिवस यमुनेच्या किनाऱ्या-किनाऱ्याने चालत-चालत कृष्ण बराच दूर गेला. एका ठिकाणी त्याला एक भयानक तलाव दिसला! तलाव अत्यन्त विशाल होता. त्याच्या पाण्यात समुद्रासारख्या लाटा उसळत होत्या. त्यावर दाट असा वाफेचा थर पसरला होता. त्याच्या किनाऱ्यावरील झाडे-झुडपे व लतावेली कोळपून गेल्या होत्या. असं भासत होतं की त्या प्रदेशात कोणत्याही पक्ष्यांचे किंवा सजीव प्राण्यांचे

वास्तव्य नसावे, कोणी जवळपास आले तरी त्यांचे प्राण वाचत नसावेत!

एका तलावात कालिया नावाचा मोठा नाग रहातो, त्याच्या मुखातून अग्निज्वाला बाहेर पडतात. हा कालिया गरुडालाही भीत नाही–वगैरे गोष्टी कृष्णाने पूर्वीच ऐकल्या होत्या! आता हा तलाव पाहिल्याबरोबर कृष्णाने ओळखले की कालियाचे वास्तव्य असणारा हाच तो तलाव असला पाहिजे! आपण ऐकलेल्या या सर्व गोष्टी खऱ्याच तर! हे सर्व विचार मनात आल्यावर कृष्णाने ठरवले की या सापाचे गर्वहरण करून हा तलाव आपल्या जनावरांना उतरण्यायोग्य करायला हवा. यामुळे आणखीही एक कार्य साधून जाईल– ते म्हणजे–या कालियाच्या परिवाराशी संबंधित इतर असंख्य साप वनात संचार करून वृन्दावनाचा काही भाग व्यापून राहिले आहेत, त्यांच्यामुळे तो भाग संकट-ग्रस्त झाला आहे. जर योग्य तऱ्हेने कालिया-मर्दन घडवता आले तर या लहान मोठ्या सापांचा उपद्रवही नाहीसा होईल–'एका दगडात दोन पक्षी मारल्याचे पुण्य पदरी पडेल!' तेव्हा काहीही करून हे काम साधलेच पाहिजे. मग आता उशीर कशाला? 'शुभस्य शीघ्रम्!'–असा विचार करून कृष्णाने त्या डोहाच्या किनाऱ्यालगत असलेला एक मोठा कदंब वृक्ष पाहिला. त्याच्या फांद्या तलावाच्या पाण्यावर लोंबत होत्या. याच झाडावर चढून डोहात उडी मारायचा कृष्णाने निश्चय केला. त्याने या बाबतीत कोणाशीही विचार-विनिमय केला नाही. आपल्या जवळच्या दोऱ्या त्याने तिथेच कुठेतरी टाकल्या, गळ्यांतला डंका व मुरली एका मुलाच्या हातात दिली. डोक्यावरील मोरपंखांचा तुरा काढून केसांची गाठ मारली. कमरेभोव-तीचे वस्त्र नीट घट्ट बांधून घेतले. पादत्राणे काढून तो कदंबवृक्षावर चढला. मोठ्याने आव्हान करून त्याने डोहात उडी घेतली. ज्या जागी त्याची उडी पडली, तिथले पाणी कितीतरी उंच वर उसळले.





# कोल्ह्याचा उपकार

प्राचीन काळी चीन देशातील एका प्रदेशात अंटाक नावाचा एक गरीब माणूस रहात असे. संपत्तीच्या नावावर त्याच्या जवळ फक्त एक डाळिंबाचं झाड होतं. त्या झाडाचं पोषण आणि त्याची निगा राखण्यात अंटाकचा सारा वेळ जाई.

खोडकर मुलं कधी मागच्या बाजूने डोकावून पहात तेव्हा अंटाक रागाने लाल होऊन त्यांना शिव्या देत असे. कधी हाती लागली तर त्यांना पिटून काढीत असे.

एका वर्षी डाळिंबाच्या झाडाला खूप फळं लागली. फळं पिकायला सुरुवात झाली, तेव्हा अंटाक रात्र-दिवस पूर्ण वेळ झाडाजवळ घालवीत असे. एक दिवशी रात्री त्याला चांगली गाढ झोप लागली. थोड्या वेळाने जागा झाल्यावर त्याच्या लक्षात आलं की काही फळं नाहीशी झालेली आहेत. अशाच रीतीने दुसऱ्या दिवशी ही आणखी काही फळं अदृश्य झाली.

तिसऱ्या दिवशी चोराला पकडण्याचा निश्चय करून अंटाकने झोपण्याचे सोंग केले. त्यावेळी भिंत ओलांडून एक कोल्हा आत प्रवेश करीत असताना दिसला. कोल्हा जेव्हा झाडावर उडी मारू लागला, तेव्हा अंटाकने झपाट्याने त्याची शेपूट पकडली. कोल्ह्याने शिताफीने स्वतःचा बचाव करून तेथून पळ काढला.

यानंतर अंटाकने कोल्ह्याला पकडण्या-साठी एक युक्ति केली. कोल्हा जिथून भिंत ओलांडून येत असे, त्या जागेवर अंटाकने खूप डिंक लावून ठेवला. कोल्हा त्या जागी असा चिकटून राहिला की त्याला तेथून हलता येईना. अंटाक लाठीने त्याला मारू लागला.

कोल्हा म्हणाला–"थांब, जरा ऐक. तू जर मला मुक्त केलेस तर मी तुझ्यावर

एक चीनी लोककथा



उपकार करीन. तुझी इच्छा असेल तर राजकुमारीशी तुझे लग्न लावून देईन."

"काय माझी थट्टा करीत आहेस! मी जन्मल्यापासून दरिद्री माणूस." अंटाक कोल्ह्याला म्हणाला.

पण कोल्ह्याने जोरदार शब्दात पुनः पुनः सांगितले की मी राजकुमारीशी तुझा विवाह निश्चितपणे घडवून आणीन. ते ऐकून अंटाकने दयाळू होऊन कोल्ह्याला सोडून दिले.

कोल्हा तडक नदी पार करून राजाच्या महालात पोंचला, नि त्याने राजाला विचारले–"महाराज, आपल्या जवळ रत्ने चाळण्याची चाळणी आहे असं ऐकलं. आमच्या राजाने थोडा वेळ ती चाळणी घेऊन यायला मला सांगितलं आहे. टोपल्या भरभरुन रत्ने आली आहेत."

राजाने कोल्ह्याला चाळणी द्यायला सांगितली. कोल्हा चाळणी घेऊन निघून गेला. चाळणीच्या छिद्रांत जिकडे-तिकडे माणिक, लाल इत्यादि रत्नांचे तुकडे चिकटवून दिले. आणि ती चाळणी कोल्हा राजाकडे घेऊन आला–"महाराज, ही आपली चालणी परत!" असे म्हणत कोल्ह्याने चाळणी जमिनीवर आपटली. त्यासरशी रंगी-बेरंगी रत्नांचे तुकडे इतस्ततः विखुरले, राजकन्या रत्ने गोळा करण्यासाठी तुटून पडल्या!

कोल्हा म्हणाला–"तुम्हाला रत्न पाहीजेत हे अगोदरच मला सांगितलं असतं तर आमच्या राजाला सांगून चार उंटावर लादून मी रत्नांचा खजिना आणला असता!"

अंटाकला आपला जावई बनविण्याचा लोभ राजाच्या मनात उत्पन्न झाला. तो कोल्ह्याला म्हणाला–"रत्नांची गोष्ट सोडून दे. माझ्या तीन राजकुमारीं पैकी जी तुझ्या राजाला पसंत पडेल, तिच्याशी त्याचे लग्न करून द्यायला मी तयार असल्याचे त्याला कळव."

नंतर कोल्हा अंटाक कडे आला आणि त्याला म्हणाला–"ऐक, तुझं नशीब उघडलं. आपल्या मुलीच लग्न तुझ्याशी लावून द्यायला राजा तयार आहे. चल. लग्नासाठी तयार हो."

अंटाकला मोठे आश्चर्य वाटले. चिन्तायुक्त स्वरात म्हणाला–"लग्नासाठी तर गाठीला भरपूर द्रव्य असलं पाहिजे."

"युक्तीने केली तर अनेक काम करता येतात. तू या कपड्यांनिशी चल, बाकी सगळं मी पाहून घेईन. तू काळजी करू नकोस." कोल्ह्याने समजावलं.

दोघे जण निघाले नि नदीच्या जवळ पोंचले. कोल्ह्याने अंटाकला गळ्यापर्यंत पाण्यात उभं रहायला सांगितलं आणि स्वतः तो नदीच्या पलीकडे जाऊन सरळ राजमहालात पोंचला. राजाला म्हणाला–"महाराज, चाळीस उंटांवर नव-रत्नांचे ढीग लादून आमचे राजेसाहेब लग्नासाठी निघाले, अचानक नदीला पूर आला नि सारे उंट वाहून गेले. त्यांचा सारा परिवार वाहून गेला. आमच्या राजाची सगळी वस्त्रं नदीत वाहून गेली. अशा परिस्थितीत काय करावं हेच मला समजत नाही. आपण काय सल्ला द्याल?"

"व्हायचे ते होणारच? त्याला कोण काय करणार? तू काळजी करू नकोस." असं म्हणून राजा चांगली वस्त्रे घेऊन आपल्या भावी जावयास सामोरा गेला.



आपल्या कुटुंबीय मंडळीसह राजा नदीच्या किनाऱ्यावर पोंचला.

आपल्या होणाऱ्या सासऱ्याने आणलेली वस्त्रं परिधान करून अंटाक राजासह विवाह-मंडपात आला.

यानंतर अंटाक आणि राजाची तिसरी मुलगी यांचा विवाह थाटामाटात साजरा झाला.

काही दिवस जावयाचे आतिथ्य केल्यावर एकदा राजाने शुभ मुहूर्त पाहून आपली मुलगी व जावई यांना स्वगृही रवाना करण्याची व्यवस्था केली.

प्रथम कोल्हा धावत-पळत पुढे गेला. रस्त्यांत त्याला उंटांचे व्यापारी दिसले.



कोल्ह्याने त्यांतील प्रमुख व्यापाऱ्याकडे जाऊन सांगितले–"महाराज, दरोडेखोरांची टोळी मागून येत आहे. आज आपण घरातून जेव्हा बाहेर पडला, ती शुभवेळ नव्हती. दरोडेखोर आपली सर्व संपत्ती आता लुटून घेऊन जाणार!"

कोल्हा ज्या दिशेने आला तिकडे व्यापारी-दलाच्या प्रमुखाने पाहिले, त्याला हवेत धूळ उडताना दिसली. घाबरून तो म्हणाला–"मग मी आता काय करू? आमचे प्राण वाचविण्यासाठी काही युक्ति सांगशील?"

कोल्हा समजाऊन सांगत म्हणाला–"तर मग आपण एक काम करा. ते लोक आल्यावर आपल्याला विचारतील–"हा तांडा कुणाचा आहे?" तुम्ही सांगा–"हा तर अंटाक महाराजांचा आहे!" असं सांगितल्यावर ते तुम्हाला काही अपाय करणार नाहीत.

कोल्हा आपल्या वाटेने पुढे निघून गेला. इकडे राजाचा परिवार उंटांच्या व्यापाऱ्यांपर्यंत पोचला. राजकुमारीच्या परिवारातील लोकांनी व्यापाऱ्यांच्या प्रमुखाला विचारले–"मंडळी, हा तांडा कुणाचा?" त्याने फटकन् उत्तर दिले–"हा तांडा तर अंटाक महाराजांचा! तुम्हाला माहित नाही?"

राजकुमारीच्या वऱ्हाडातील लोकांना हे ऐकून फार आनन्द झाला.

इकडे कोल्ह्याने त्याच रस्त्याने येणाऱ्या घोड्यांच्या मालकाला नि मेंढ्यांच्या कळपाच्या मालकाला पण अशाच प्रकारे बोलायला शिकवलं. राजकुमारीच्या बाजूच्या लोकांनी विचारलं–"या घोड्यांचा मालक कोण? या मेंढ्यांच्या कळपाचा मालक कोण?" यावर घोडे व मेंढ्यांच्या मालकांनी उत्तर दिले–"हे घोडे नि हा मेंढ्यांच्या कळप अंटाक महाराजांचा आहे."

शेवटी कोल्हा एका राक्षसाच्या किल्ल्याकडे गेला. राक्षसराजाने कोल्ह्याला विचारले–"तू असा धापा टाकीत का येत आहेस?"

"काय सांगू? मोठंच संकट आलं आहे. दरोडेखोर पाठलाग करीत आहेत, मीच काय सर्व लोक पळत आहेत. स्वतःचे प्राण तरी निदान वाचव." कोल्ह्याने उपदेश दिला.

घाबरून राक्षस-राजाने विचारले–"मी यावेळी कुठं जाऊं? आपले प्राण कसे वाचवूं?"

कोल्ह्याने युक्ति सुचवली–"या चुलीच्या आंतील बाजूस एक खड्डा आहे. तू तेथे पडून रहा. मी वरून लाकडं लावून तुला झांकून टाकतो. दरोडेखोर येथून निघून गेले की तुला बाहेर यायला हरकत नाही."

राक्षसराजाला कोल्ह्याची युक्ति पसंत पडली. तो चुलीच्या आंतील खड्ड्यात लपून बसला. वरून लाकडे रचून लबाड कोल्ह्याने त्याला आग लावून दिली. राक्षसराजा जळून भस्म झाला. कोल्हा राजकुमारीच्या परिवारापाशी गेला आणि त्यांना मार्गदर्शन करीत राक्षसाच्या किल्ल्यात घेऊन आला.

हा किल्ला पाहून राजकुमारी नवरी आणि तिच्या बरोबरचे लोक खुश झाले. अंटाक महाराजांचा किल्ला पाहून त्यांचा आनंद गगनात मावेना.

यानंतर अंटाक आपल्या पत्नीसह सुखाने आपले जीवन जगू लागला. कोल्हा ही त्यांच्यांतच राहू लागला.

एक दिवशी कोल्ह्याने अंटाक जवळ जाऊन त्याला विचारले–"मी तुझ्यावर केवढा उपकार केला! मी जर मेलो तर तू काय करशील?"

अंटाकने उत्तर दिले–"मी तुला माझ्या डोक्यावर घेईन!"

यानंतर काही दिवसांनी कोल्हा मेला. अंटाकने कोल्ह्याला दिलेल्या वचनानुसार त्याच्या चामड्याची टोपी बनवून ती आपल्या डोक्यावर घालायला सुरुवात केली. त्या प्रदेशात आज ही ही प्रथा चालू आहे. तेथील लोक कोल्ह्याच्या चामड्याच्या टोप्या आपल्या डोक्यावर परिधान करतात.





# राज-सम्मान

रामशास्त्री नावाचा एक कवि एक दिवशी सौदा करण्यासाठी किराणा मालाच्या एका दुकानात गेला. दुकानच्या मालकाचं नाव होतं रमापति. रमापति आपल्या ओळखीच्या एका गृहस्थांबरोबर बोलत असता, काही नीतिवचन त्याला ऐकवीत होता. ती वचन ऐकून रामशास्त्री फार प्रसन्न झाला.

त्या दिवशी रात्री रामशास्त्री शांतपणे आपल्या घरात बसला नि रमापति कडून ऐकलेली सर्व नीति-वचने त्याने पद्यबद्ध केली. सुप्रभाती ती सर्व काव्ये घेऊन तो गावच्या जमीनदाराकडे गेला आणि त्याला ती काव्ये ऐकवली.

जमीनदाराने खुश होऊन रामशास्त्रीची खूप प्रशंसा केली आणि बक्षिस म्हणून पन्नास सुवर्ण-मुद्रांनी भरलेली एक थैली त्याच्या स्वाधीन केली.

यानंतर रामशास्त्री ही बक्षिसाची थैली घेऊन तडक रमापतीच्या किराणा-मालाच्या दुकानावर गेला. रामशास्त्री रमापतीला म्हणाला—"हे पहा, जमीनदाराने माझ्या पांडित्यावर प्रसन्न होऊन मला मोठ्या प्रेमाने हे बक्षिस दिलं!" रामशास्त्रीनी आपल्याला मिळालेली स्वर्ण-मुद्रांची थैली रमापतीला दाखवली.

"वा:, असं झालं हो!" अस म्हणत रमापतिने आश्चर्य प्रकट केलं.

रामशास्त्रीने हंसत हंसत निवेदन केले—"तुमच्या नीती-वचनांच्या आधारेच मी माझी पद्ये रचली होती."

रामशास्त्रीचे प्रशंसायुक्त बोलणे ऐकून रमापति म्हणाला—"शास्त्रीजी, आपण प्रेम-पूर्वक कविता करायला तयार असाल तर माझ्याजवळ अनेक अद्भुत गोष्टींचे भांडार आहे. सर्व तुमच्या पुढे मोकळे करीन."

प्रमोद देव

तेव्हा पासून रामशास्त्री रोज नियमितपणे रमापतीच्या दुकानी जाऊ लागला. थोडा वेळ बसे नि जे पदरी पडेल ते घेऊन घरी येई.

एके दिवशी रमापतीने रामशास्त्रीला पक्षी नि त्यांची मूक भाषा यावर अनेक मनोरंजक गोष्टी सांगितल्या. त्या सर्वांचे सारग्रहण करून रमापतीने काही कविता रचल्या आणि शेजारच्या गावच्या जमीनदाराकडे जाऊन त्याला त्या ऐकवल्या. जमीनदाराला त्या कविता खूप आवडल्या. त्याने प्रसन्न होऊन रामशास्त्रीला शंभर सुवर्ण-मुद्रा अभिनन्दनपूर्वक दान दिल्या.

ही वार्ता रमापतीला समजली. तेव्हा त्याला वाटलं राखेत दडलेल्या निखाऱ्याप्रमाणे आपल्या ठायी प्रखर प्रतिभा आहे. असा विचार येताच त्याचे मन अहंकाराने भरून गेले.

एके दिवशी आपल्या देशाच्या शासन-पद्धती बद्दल रमापतीने अनेक गोष्टी रामशास्त्रीला ऐकवल्या. रामशास्त्रीने परिश्रमपूर्वक त्यांचे सार-ग्रहण केले. अमळ चिंतन केले आणि काही काव्य-रचना केली. यावेळी रचना फार बहारदार झाली.

रामशास्त्रीच्या मनात एक असा विचार आला की राजधानीत जाऊन राजा समोर या कवितांचा पाठ करावा. दुसऱ्या दिवशी सकाळी रामशास्त्री राजधानीच्या वाटेला लागला. राजासमोर त्याने आपल्या नवीन कवितांचे गायन केले. राजाने पुन: पुन:



या कवितांचे श्रवण केले आणि अत्यन्त प्रसन्न झाला.

शेवटी राजाने रामशास्त्रीला प्रार्थना केली–"कविवर, आपण चार दिवस माझ्या अतिथि-गृहात राहण्याची कृपा करावी."

पाचव्या दिवशी राजाने राज-सभेत आपल्या कविता गाण्याबाबत रामशास्त्रीला विनंती केली. रामशास्त्रीने आपल्या कोकिल कंठाने काव्य-गायन केले. सगळी राजसभा हर्ष-गद्गद झाली.

राजानें रामशास्त्रीच्या पांडित्याची तोंड भरून स्तुति केली, आणि त्याच्या गळयात पुष्पमाला घालून गौरव केला. शेवटी राजाने त्याला एक हजार स्वर्ण-मुद्रा समर्पित केल्या. समारंभात उपस्थित असलेल्या रमापतीच्या मनात मात्र रामशास्त्री विषयी अपार ईर्ष्या निर्माण झाली.

तो उठून म्हणाला–"महाराज, आपण आज रामशास्त्रीचा अपूर्व सत्कार केला व त्याला एक हजार सुवर्ण-मुद्रा सन्मान-प्रतीक म्हणून दिल्या याबद्दल मला आनंदच आहे, पण खरं म्हणजे त्यांतील अर्धा हिस्सा मला मिळाला पाहिजे. शास्त्रीजी माझ्याच गावचे रहिवासी आहेत." असं सांगून रमापतीने सुरुवातीपासूनची सारी कथा राजाला निवेदन केली.

सर्व काही ऐकून राजाने मंद-स्मित केले. एका शिपायाकडून एक ऊस आणविला आणि तो रमापतीच्या हाती देत राजाने विचारले–"या उसात किती गूळ आहे हे तू सांगू शकशील ?"

"महाराज, हा ऊस चरकात घालून त्याचा रस काढल्यावरच हे सांगता येईल की त्यातून किती गूळ बनेल ?" रमापतीने राजाला समजावले.

यावर राजा रमापतीला म्हणाला–"पाहिलंस, तू रामशास्त्रीला ज्या गोष्टी सांगितल्यास त्या या उसासारख्या आहेत. रामशास्त्रीने आपल्या पांडित्याच्या आधारे तुझ्या गोष्टींना उत्कृष्ठ काव्य बनविले !"

रमापतीने घरची वाट धरली.



# धोका टळला

नीलमणी नावाचा एक परीट राजवाड्यातले कपडे धुण्याचे काम करीत असे. रात्रीच्या वेळी वेष पालटून नगरात फिरायची त्याला भारी हौस ! तऱ्हेतऱ्हेचे कपडे त्याच्याकडे अनायसे धुवायला येत, त्यांचा वेष पालटायला छान उपयोग होई त्याला ! राज्यकारभार जास्त चांगला करता यावा म्हणून तिथला राजाही असाच वेष पालटून आपल्या राज्यात भ्रमण करीत असे.

एकदा मुनिवेष धारण केलेला राजा नीलमणीला दिसला. त्याला सामान्य साधु-बैरागी समजून नीलमणीने गर्जून विचारले–"अशा मध्यरात्रीच्या वेळी कुठे चालला आहेस तू ?"

"बच्चा, मी धर्मशाळेकडेच जात आहे." साधू म्हणाला. "धर्मशाळेकडेच जात आहेस की कुठे चोरी करायला ? म्हणूनच मी असा रात्री संचार करीत असतो." नीलमणी म्हणाला.

"माफ करा, मी आपणाला ओळखले नाही ?" साधू बोलला. यावर आपल्या मिशांवर ताव देत परीट म्हणतो–"मी या देशाचा राजा आहे."

त्या बैराग्याची चाल पाहून नीलमणीने ताडले की हा कोणी साधासुधा माणूस नसून खुद्द राजाच आहे ! आता मात्र त्याचं धाबं दणाणलं. परंतु लगेच त्याच्या डोक्यांत एक उपाय चमकला.

नीलमणीने मोठ्या नम्रतेने म्हटले–"स्वामीजी, क्षमा असावी ! मी केवळ आपल्या तपस्या-शक्तीची परीक्षा घेण्यासाठी असे बोललो. खरं म्हणजे मी इथल्या राजाचा परीट आहे, आणि आपणही आपल्या दिव्यदृष्टीने ही गोष्ट ओळखली आहे, या मूर्खाला आपण क्षमा करावी." आणि त्याने राजाच्या पायावर लोटांगण घातले.

नीलमणीची समयसूचकता पाहून राजाचा क्रोध कुठच्या कुठे पळून गेला. उलट हंसून त्याने नीलमणीला क्षमा केली व तो पुढे निघून गेला. नीलमणीनेही वेष पालटून फिरायचे सोडून दिले.





# ...तो शब्दाचा मार

**गो**विन्दपुरच्या जमीनदाराचे नाव होते ज्वालाप्रसाद. एके दिवशी संध्याकाळी गावाबाहेरपर्यंत फिरून परत येत असताना त्यांना आंब्यांनी लवून गेलेली एक आमराई दिसली.

जमीनदार आश्चर्याने त्या सुंदर आमराईकडे पाहातच राहिले! त्यांची ही स्थिति पाहून त्यांचा दिवाकर नावाचा दिवाण म्हणाला–"सरकार, मला असं वाटतं की आपण या बाजूला कधी फिरकालाच नाहीत. खरं म्हणजे ही आमराई तर आपलीच आहे!"

"ओहो, असं होय?" असे म्हणून मान हलवत ज्वालाप्रसादनी विचारले–"हल्लीच्या दिवसात पहारेकरी असूनही बागातून चोऱ्या होतात, अन् इथे तर कोणीच दिसत नाही? तुम्ही इथे कोणी पहारेकरी का नेमला नाही?" त्यांना दिवाणाच्या हलगर्जीपणाचा रागच आला होता.

परंतु दिवाकरने मोठ्या नम्रतेने म्हटले–"महाराज, पहारेकरी मी केव्हाच नेमला आहे. दामोदर नावाचा इथला पहारेकरी आहे, तो फारच चांगला माणूस आहे."

इतक्यांत झाडाच्या सावलीत बसलेली एक म्हातारी दिसली, तिच्याकडे बोट दाखवत दिवाण जमीनदाराला सांगू लागला–"ही म्हातारी बाई दामोदरची आई आहे. ही म्हातारी जोपर्यंत या राईत वावरत असेल तोपर्यंत कुणाची हिम्मत आहे की कोणी एका फळाला हात लावेल!"

जमीनदाराने मोठ्या विस्मयाने विचारले–"अरे, या म्हातारीत तर स्वतः उठून उभं रहायचीही ताकत नाही. अशा स्थितीत ही काय आमराईची राखण करणार कपाळ? एकादा चोर समजा शिरलाच तर तर ही काय करील त्याला?

यावर दिवाण म्हणाला–"सरकार, चोर-डाकू किंवा खोडकर माणसांना पळवून लावायला दर वेळी शरीरबळच उपयोगी पडतं, हातानेच मारावं लागतं असं नाही! तर कधी कधी शब्दांचा मारही अधिक प्रभावी ठरू शकतो. गावातले लोक म्हणतात की ही म्हातारी बोलण्यात भारी चतुर अन् मोठी भांडकुदळ आहे! तिने शब्दांच्या माराने अनेकांची घाबरगुंडी उडवली आहे.

हे ऐकून जमीनदाराला आणखीच आश्चर्य वाटले. ते म्हणाले–"तर चला, आपण राईत घुसून आंबे तोडायचा प्रयत्न करू अन् पाहू ही म्हातारी आपल्याला काय करते."

नंतर जमीनदार व दिवाण दोघेही आमराईत शिरून एका झाडाखाली उभे राहिले. म्हातारीने ओळखले की कोणी नवीच माणसे बागेत घुसली आहेत. ती हळूहळू पाय ओढत त्यांच्याजवळ पोचली.

जमीनदार आपल्या जवळच्या एका झाडाचा आंबा तोडायच्या प्रयत्नात होते, तोच त्यांना तिथे चरणारी दोन मोठी वासरे दिसली. ज्वालाप्रसाद जरा दचकून तिथेच उभे राहिले, ते पुढे सरकूच शकले नाहीत. त्यांनीं म्हातारीला विचारले–"आजीबाई, ही वासरे मारकुटी नाहीत ना?" तसं तर म्हाताऱ्या माणसांची दृष्टि

रतना बाई



जरा अधू असतेच आणि या म्हातारीने जमीनदारांना पाहून बराच काळ लोटला होता, त्यामुळे ती त्यांना ओळखू शकली नाही. मोठ्या रागाने त्यांच्याकडे पहात तिने उत्तर दिले–"तुम्ही इथे का आला आहात हे मी बरोबर ओळखलं आहे. वासरं शिंगं मारतील की नाही हे मला काही माहीत नाही, पण इतकं मात्र नक्की माहीत आहे की ती फक्त आपल्याच जमिनीत चरतात, आपल्या नसलेल्या दुसऱ्या कुठल्या शेतांत ती कधीच तोंड घालत नाहीत."

म्हातारीच्या या व्यंग्यभरल्या शब्दांनी जमीनदाराच्या मनावर चांगलेच कोरडे ओढले. ते झटकन दिशा बदलून आमराई बाहेर जायला निघाले. दिवाकर ही मोठ्या प्रसन्नतेने मान हलवून त्यांच्या पाठोपाठ निघाला.

म्हातारी त्यांच्याकडे थोडावेळ पहात तिथेच उभी राहिली आणि मग पुन्हा झाडाजवळ जाऊन सावलीत बसली.

आमराईतून बाहेर पडल्यावर दिवाण जमीनदाराला म्हणू लागला–"पाहिलंत ना सरकार? शहाण्याला शब्दांचा मार कसा पुरेसा होतो ते?" दिवाकरचे बोलणे मान्य आहे हे दाखवण्यासाठी जमीनदाराने मान हलवून स्वीकृति दिली.

दोघेही आमराईतून बाहेर पडून पाउलवाटेशी पोचतात तोच गांवातून परतत असणारा दामोदर समोरून त्यांना दिसला. त्याने जवळ येऊन दोघांना प्रणाम केला.

ज्वालाप्रसादने दिवाकरला विचारले–"हाच का आपला पहारेकरी दामोदर?"

दिवाण उत्तरला–"हां, महाराज."

जमीनदार दामोदरकडे प्रसन्नतेने पाहून मान हलवत म्हणाले–"अरे दामोदर, तुझ्या हातातल्या लाठीपेक्षा तुझ्या आईच्या शब्दांचा मारच जास्त परिणामकारक असतो बरं का! हे घे, हे रुपये माझ्यातर्फे तुझ्या आईला बक्षिस म्हणून दे." असे म्हणत खिशातून दहाची नोट काढून त्यांनी दामोदरच्या हातावर ठेवली.







## उंच फडया निवडुंग

फडया निवडुंगाच्या जातीत सर्वात उंच वाढू शकणारा शाग्वोरो जातीचा एक निवडुंग आहे. हा निवडुंग २०० वर्षांच्या अवधीत ४०-५० फूट उंचीपर्यंत वाढतो. याचे वजन जवळजवळ दहा टन इतके असते. परंतु त्यात १/४ इतके पाणी असते.

## ज्वालामुखीच्या विवरात आणखी एक ज्वालामुखी

अमेरिकेतील ओरिगान ज्वालामुखीचा अंश हा प्रागैतिहासिक काळातील ज्वालामुखीचाच अवशेष आहे. दहा कि.मि. रुंदीच्या या ज्वालामुखीच्या विवराच्या मध्यभागी आणखी एक ज्वालामुखी आहे.



## जीव घेणारी कुत्र्याची छत्री (मश्रूम)



सामान्य कुत्र्याच्या छत्रीप्रमाणे दिसणारी डेथ कॅप (अमानिटा फलाइड्स) नावाची एक प्रकारची कुत्र्याची छत्री अतिशय विषारी असते. ती खाणारी माणसे कॉलरा आदि व्याधींना बळी पडतात.



# चांदोबा


संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी


मागील अंकात 'राक्षस राजाची थट्टा' हा मथळा छापताना काही अंकांतून 'राक्षस जाची थट्टा' असे छापले गेले. क्षमस्व.

माणसामाणसांवरील संस्कारातील फरक आणि स्वार्थपरायणता माणसाला चुकीच्या मार्गाला नेते. "करावे तसे भरावे" ही गोष्ट याचे उत्तम उदाहरण आहे.

## अमर वाणी

आरंभगुर्वी क्षयिणी क्रमेण, लघ्वीपुरा वृद्धिमति च पश्चात् ।
दिनस्य पूर्वार्द्धपरार्द्धभिन्ना, छायेवमैत्री खलसज्जनानाम् ।

[दुर्जनां बरोबरचे मैत्री संबंध प्रातःकालीन छायेप्रमाणे सुरुवातीला विशाल असून क्रमाक्रमाने क्षीण होत जातात. परंतु, सज्जनांबरोबरची मैत्री मात्र मध्यान्ह्यानंतरच्या छाये प्रमाणे थोडया प्रमाणात सुरु होऊन क्रमशः वृद्धिगत होत जाते.]


वर्ष : ३८ मे १९८८ अंक : ११

एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००



### बर्फाचे विशाल टेकाड

४० कि.मी. रुंद व २५८ कि.मी. लांब असे हे बर्फाचे टेकाड, अंटार्क्टिका हिमखण्डापासून वेगळे होऊन रॉस समुद्रात तरंगत आहे. असे म्हटले जाते की – हे टेकाड लॉस एंजेल्स पर्यंत ढकलता आले तर ६७५ वर्षेपर्यंत तिथे पाण्याची समस्या रहाणार नाही !

### एकाकी समुद्रयात्रा

न्यू जर्सीची रहिवासी टानिया येबी या २१ वर्षांच्या युवतीने आपल्या वडिलांकडून मिळालेल्या एका छोटयाश्या नावेने दोन वर्षांपूर्वी समुद्रयात्रेला सुरुवात केली. जमैका, पनामा, ऑस्ट्रेलिया, श्रीलंका इत्यादि देशांच्या बंदरांना भेटी देऊन ती आपल्या गावी सुरक्षित पोचली !






### आपण खरेदी करू इच्छिता ?

ब्रॅम स्टोकरने लिहिलेल्या प्रसिद्ध कादंबरीचे नाव आहे 'ड्रॅक्युला'. त्यातील ड्रॅक्युला हे पात्र रुमानियाच्या व्लॉड नावाच्या राजतंत्रीय राजाच्या जीवनावर आधारून निर्मिलेले आहे. त्याने ज्या महालात आपले जीवन व्यतीत केले, तो महाल विक्रीसाठी खुला आहे.

### 'चारमिनार' ची घटत जाणारी शोभा

हैद्राबाद मधील चारमीनार ही इमारत फार विख्यात आहे. ४०० वर्षांपूर्वी निर्मिली गेलेली ही अद्भुत इमारत वायुप्रदूषण व ध्वनिप्रदूषणामुळे निकट भविष्यात आपली शोभा घालवून बसेल !



# आळशी

रामराव एक वयोवृद्ध अनुभवी गृहस्थ होते. एकदा ते रस्त्याने जात असताना त्यांना झाडाखाली काही कामधंदा न करता आळशासारखा बसलेला शंकर दिसला. रामराव म्हणाले–"काय रे शंकर, रिकामटेकडा बसून काय राहिला आहेस? कामधंदा तरी करशील?"

"काम करण्याने काय होईल?" आळशी शंकरने उलट प्रश्न विचारला.

"अरे, पगार मिळेल." रामराव म्हणाले.

"बरं, पैसे मिळाले की काय होईल?" शंकर पुन्हा विचारता झाला.

"कोणी एकादा आपल्या मुलीचे तुझ्याशी लग्न लावून देईल." रामराव म्हणाले.

"लग्नानंतर?"

"मुलं होतील, त्यांच्याशी तुला हसता-खेळता येईल, मन रमवता येईल."

"त्यानंतर?" शंकरने ओरडून विचारले.

"मुलं जरा मोठी झाली की त्यांना शिक्षण देऊन उत्तम नागरिक बनवायचे."

"त्यानंतर?" आळशाचे 'नंतर-नंतर' काही संपेना.

"नंतर ती मुलं कमवायला लागतील. मग तू निश्चिन्तपणे आराम करू शकशील." मोठ्या सहनशीलतेने रामराव म्हणाले.

"मग मी आत्ता निराळं काय करत आहे?" शंकर म्हणाला.

या मूर्खाला शिकवण्यात कांही अर्थ नाहीं हे लक्षात घेऊन बिचारे रामराव आपल्या वाटेने निघून गेले.





# चेटकिणीची सूडबुद्धी

गौड देशचा राजा गौरीनाथ कडक स्वभावाचा शासक होता. त्याला लावण्या नावाची मुलगी होती. ती आपल्या नावाप्रमाणेच लावण्यवती होती.

लावण्याच्या सौंदर्याची ख्याती ऐकून अनेक देशच्या राजकुमारांच्या मनात तिच्याशी विवाह करण्याची लालसा उत्पन्न झाली. परंतु गौरीनाथच्या स्वभावाच्या भीतीने कोणीही विवाहाचा प्रस्ताव मांडायला धजेना! मांजराच्या गळ्यात घंटा बांधायची कोणी?

गौड देशच्या उत्तरेला एक दाट जंगल होते. त्या जंगलात क्षुद्रशक्तीची सिद्धि मिळवलेली एक चेटकीण रहात असे. तिला एक मुलगा होता. तो दिसायला अगदीच कुरूप होता, पण एका अत्यंत रूपवती मुलीशी लग्न करावे अशी इच्छा त्याच्या मनात आली आणि तो उद्योगाला लागला. त्याने एका जादूच्या आरशात पाहून आपल्या देशात सर्वांत सुंदर मुलगी कोण याचा शोध घेतला, त्याला आरशात लावण्या दिसली! तो तसाच ताबडतोब गौरीनाथकडे गेला अन् त्याने सरळ लावण्याला मागणी घातली!

राजा अगोदरच तापट अन् तशात लावण्याला प्रथमच मागणी घालणाऱ्याचे रूप हे असे! गौरीनाथ एकदम खवळला आणि त्याने चेटकिणीच्या मुलाला फाशीची शिक्षा दिली!

मुलगा बरेच दिवस परत आला नाही. त्याची काही खबरही नाही, तेव्हां चेटकिणीने आपल्या क्षुद्रशक्तींच्या द्वारे खरी गोष्ट जाणून घेतली. मुलगा फारशी काही चूक नसतानाच फाशी दिला गेल्याचे कळल्यावर तिचा क्रोध अनावर झाला. मध्यरात्री युवराज्ञीच्या महालात प्रवेश

संजीवनी आपटे



करून गाढ झोपेत असणाऱ्या राजकुमारीला तिने पळवून नेले!

आता चेटकिणीने राजाचा सूड घ्यायचे ठरवले. आपल्या शक्तींच्या जोरावर तिने राजकुमारीवर जादू घातली. जंगलात एका जागी तिने मंतरलेल्या रांगोळीने एक रेघ ओढली. नंतर लावण्याला तिथेच सोडून चेटकिण जंगलाच्या दुसऱ्या भागात रहाणाऱ्या आपल्या धाकट्या बहिणीकडे निघून गेली.

राजकुमारी नाहीशी झालेली पाहून राजाने आपले गुप्त हेर तिच्या शोधासाठी चारी दिशांना पाठवले.

उत्तर दिशेला गेलेले गुप्तहेर जखमी अवस्थेत परतले व सांगू लागले–"महाराज, आम्हाला राजकुमारी एका जंगलात दिसली. आम्हाला पाहिल्याबरोबर तिने अक्राळ-विक्राळ रूप धारण केले आणि आम्हाला मारपीट करून तिने जखमी केले."

ही बातमी ऐकून राजाला फारच आश्चर्य वाटले. तो स्वतःच जंगलात गेला. त्याने ही तेथे लावण्याला पाहिले. पण पित्याला पाहून जवळ येण्याऐवजी लावण्या मागे मागे सरकू लागली. ती जसजशी मागे गेली तसतसा राजा पुढे पुढे जाऊ लागला. पण थोडे दूर गेल्यानंतर लावण्याने जेव्हां मंतरलेल्या रांगोळीची रेघ ओलांडली तेव्हा लगेच ती अक्राळविक्राळ रूप घेऊन राजाच्या दिशेने पुढे पुढे येऊ लागली. हा भयानक प्रकार पाहून राजाने तेथून काढता पाय घेतला व तो राजधानीला आला.

राजा सुखरूप परत तर आला पण त्याला आता युवराज्ञीच्या चिंतेने घेरले. राज्यकारभारही त्याला सुचेना. शेवटी मंत्र्यांचा सल्ला घेऊन राज्यांत दवंडी पिटवली–जो कोणी राजकुमारी लावण्याचे रक्षण करून तिला परत आणील, त्याच्याशी तिचा विवाह करून देण्यात येईल!

दवंडी ऐकून, आधीपासूनच तिच्याशी विवाहासाठी इच्छुक असणारे बरेच तरुण तिला सोडवून आणण्यासाठी जंगलात गेले. परंतु, ते सर्वच्या सर्व लावण्याच्या



हातून मार खाऊन परत आले! राजधानीच्या शहरातच विजयवर्मा नावाचा एक तरूण रहात असे. त्याची आई लयानपणीच त्याला सोडून देवाघरी गेली होती. त्याच्या वडिलांनी दुसरा विवाह केला होता. सावत्र आईच्या वागण्यामुळे विजयला जीवनाचा उबग आला! आपल्या जगण्यामरण्याचा प्रश्न राजकुमारीवरच सोडायचा–असे ठरवून तो खरोखरीच जंगलात गेला. विजयला पाहून लावण्या थोडे अंतर मागे गेली, आणि तेथून महाकाय विक्राळ रूप धारण करून ती पुढे सरकू लागली.



हे पाहून प्रथम विजय मागे परतला, अन् घरी गेला. पण, त्याच रात्री तो जंगलात परत गेला. चांदणी रात्र होती ती! त्याने प्रथम राजकुमारीला जेथे पाहिले होते तेथे जाऊन चांदण्याच्याच प्रकाशात त्याने ती जागा बारकाईने तपासली. तेथे त्याला रांगोळीने काढलेली ती रेघ दिसली. त्याने ओळखले की त्या रेघेचा अन् लावण्याच्या अक्राळविक्राळ रूप धारण करण्याचा नक्कीच काहीतरी दाट संबंध आहे.

विजयने जवळच्या झऱ्यावरून द्रोणाने पाणी आणून तीन तीनदा ती रेघ धुऊन काढायचा प्रयत्न केला, पण व्यर्थ! कितीही पाणी टाका, रेघ पुन्हा जशीच्या तशीच! त्याच्या मनांत पुन्हा विचार येऊ लागले–मंत्र घालून ही रेघ काढणारी व्यक्ति तिथेच कुठे आसपास असली पाहिजे. तो आसपास चारी दिशांना शोध घेऊ लागला.

एका ठिकाणी विजयला एक ओसाड पडल्यासारखी वाटणारी झोपडी दिसली. झोपडीसमोरच्या दगडावर एक म्हातारी बसली होती. विजयला वाटले की हीच ती मंत्र घालणारी बाई असावी. आणि तो तिच्या दिशेने चालू लागला.

आपल्याकडे येणाऱ्या तरुणाला पाहून म्हातारीने विचारले–"कोण आहेस मुला तू?"



"आजीबाई, मी या देशाचा राजा नव्हे, की कोणी करोडपती व्यापारीही नव्हे. मी बिचारा आपला एक साधासुधा माणूस आहे. आजी, तू अगोदर ती मंतरलेली रेघ पुसून टाक पाहू! आपल्या मुलीची अवस्था पाहून आमचा बिचारा राजा अंथरुणाला खिळला आहे!" विजय म्हणाला.

"ओ! असं होय? माझी बहीणही अशीच चिंतेने झिजून झिजून मेली! राजाने तिच्या मुलाला फाशी दिल्यामुळे तिने अन्नपाणीही घेण्याचे सोडून दिले होते. म्हातारीने दुःखभरल्या आवाजात सांगितले.

हे उत्तर ऐकून विजयला फार आश्चर्य वाटले. तो म्हणाला—"म्हणजे, याचा अर्थ असा की लावण्यावर क्षुद्रशक्तींचा प्रयोग करून या जंगलात तिला आणणारी चेटकीण तू नव्हेस?"

"हां बाळा! मी नव्हे ती. माझ्यावर विश्वास ठेव तू! माझ्या बहिणीने क्षुद्र-शक्तीची उपासना केली होती अन् त्याच्या बळावरच तिने युवराज्ञीला अशा यातनामय अवस्थेत ठेवले. पण आपल्या या करणी-बद्दल आपल्या अखेरच्या दिवसात तिला फार पश्चात्ताप झाला!" म्हातारी सांगू लागली.

"उगीच पश्चात्ताप करून काय उपयोग! तिने राजकुमारीला आपल्या दुष्ट मंत्राच्या प्रभावातून सोडवले असते तर किती चांगले झाले असते!" विजय म्हणाला.

"यासाठी माझ्या बहिणीने उपाय सांगितला होता. जरा थांब मी आत्ता सांगते तुला!" म्हातारी आपल्या मनाशीच काहीतरी पुटपुटू लागली अन् म्हणाली—"बाळा, अरे या मंत्र-तंत्र जाणणाऱ्या लोकांच्या गोष्टींचा अर्थ समजणे माझ्या-सारखीच्या आवाक्याबाहेरच आहे. खरं तर, राजकुमारीला मंत्र प्रभावातून मुक्त करण्याची जबाबदारी ती माझ्यावर टाकून गेली होती. राजकुमारीला मुक्त करण्याचं रहस्य या शब्दात तिने सांगितलं होतं! दोन सवतीपैकी डोक्यावर बसलेल्या स्त्रीकडे याचना कर, म्हणजे रांगोळीची रेघ आपोआप नाहीशी होईल. किती दिवसां-पासून मी विचार करीत आहे, पण ताईच्या बोलण्याचा अर्थ अजूनही माझ्या ध्यानात येत नाही."

विजय थोडा वेळ खाली मान घालून विचार करत राहिला आणि एकदम उत्साहाने बोलू लागला—"आजीबाई, तुझ्या ताईच्या म्हणण्याचा अर्थ माझ्या लक्षात आला. आपल्या राज्यातून गंगा नदी वहाते ना—तीच तर दोन सवतींपैकी डोक्यावर बसलेली स्त्री! गंगा इथून दहा कोसांपेक्षा अधिक दूर नाही! तुझ्याकडे काही भांडीकुंडी आहेत का?"

"अरे बाळा, भांड्यांना काय रे कमी? पितळी, तांब्यांची, काश्याची—कोणती हवीत तुला?" असे विचारत म्हातारी दगडा-वरून उठली.

विजय तिच्यापाठोपाठ झोपडीत गेला. एक झाकणवाला लोटा घेऊन तो ताबडतोब गंगा नदीच्या दिशेने चालू लागला.

दुसऱ्या दिवशी सूर्योदयाचे वेळी विजय गंगाजल घेऊन लावण्याच्या जागी पोचला. त्याला पाहिल्याबरोबर लावण्या मंतरलेली रांगोळी ओलांडून पलीकडे गेली व तेथून महाकाय रूप घेऊन ओरडत-आरडत ती विजयच्या अंगावर धावून येऊ लागली!

परंतु इतक्यात विजयने गंगाजल रांगोळीवर शिंपडले. दुसऱ्याच क्षणीं सगळी रांगोळी धुळीप्रमाणे उडून हवेत विरून गेली. अन् त्याच क्षणी लावण्याही आपल्या पूर्व-रूपात रूपांतरित झाली! विजयकडे ती आश्चर्यचकित दृष्टीने पाहू लागली.

विजयने आता लावण्याजवळ जाऊन तिला सर्व हकीकत थोडक्यात सांगितली. नंतर तिला घेऊन तो राजा गौरीनाथकडे गेला.

आपल्या मुलीला सुखरूप आणणाऱ्या विजयची राजाने खूप तारीफ केली. दवंडीच्या अटीप्रमाणे राजाने लावण्याचा विवाह विजयशी मोठ्या थाटामाटाने लावून दिला.





# शंका समाधान

धवलगिरी राज्यावर राजा नागदत्त राज्य करीत होता. तो एक धर्मात्मा होता. त्याच्या राज्यात प्रजा सुखी, समाधानी अन् संपन्न होती. तो मनन-चिंतन ही करी. एकदा नागदत्ताच्या मनात एक शंका उत्पन्न झाली की—उत्तम माणसाची पारख कशी करावी? अशा माणसाची चालचलणूक अन् वागणूक कशी असेल?

दुसऱ्या दिवशी राजाने सभा बोलवली आणि आपले मंत्री व इतर दरबारी सभासदांसमोर आपली समस्या मांडली, अन् त्यांच्याकडे याचे उत्तर मागितले. सर्वांनी आपापल्या परीने याचे उत्तर दिले, पण कुणाच्याच उत्तराने राजाचे पूर्ण समाधान झाले नाही.

काही दिवसांनी नागदत्त आपला मुख्य मंत्री आणि काही शिपाई यांच्यासह जंगलात शिकारीला गेला. तेथे पोचल्यावर जंगली डुकरे आणि हरणे यांचा पाठलाग करता करता सर्वजण निरनिराळ्या दिशेला पांगले.

दुपार झाली तेव्हा आता सर्वजण एकत्र येऊन राजधानीला परतावे अशा विचाराने शिकार बन्द करून एकमेकांना शोधत निघाले.

त्यावेळी एका शिपायाने वडाखाली डोळे मिटून ईश्वरचिंतनात मग्न असलेल्या एका साधूला पाहिले.

घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकून त्या साधूने डोळे तर उघडले, पण उलट दिशेला पहात विचारले—"कोण आहे?"

शिपायाच्या लक्षात आले की—साधुबाबा आंधळे आहेत. त्याने जरा धमकावण्याच्या सुरातच विचारले—"ए आंधळ्या, इथून कुणाच्या जाण्याची चाहूल लागली का तुला?"

मुनीने शांत स्वरात उत्तर दिले—"हे शिपाई बाबा, इथून कोणीही गेले नाही."

मग तो शिपाई तेथून दुसरीकडे निघून गेला. त्यानंतर थोड्या वेळाने मंत्री तेथे आला. त्याने ओळखले की मुनि आंधळे आहेत. त्याने विचारले—"आपण तर आंधळे आहात असे वाटते. त्यामुळे आपण कोणा प्राण्याला पाहू शकणार नाही. तरीही आवाजाच्या आधारे आपण इतके तर नक्की सांगू शकाल ना, की थोड्या वेळापूर्वी इथून कोणी माणूस गेला किंवा काय! आपण असा एकादा आवाज ऐकलात काय?"

"मंत्री महाराज, आत्ताच थोड्या वेळापूर्वी इथून एक शिपाई गेला." मुनीने उत्तर दिले.

यावर मंत्री आपला घोडा घेऊन तेथून निघून गेला.

यानंतर आणखी थोड्या वेळाने खुद्द राजा नागदत्त तेथे येऊन पोचला. त्याने ही मुनीला पहाताच तो आंधळा असल्याचे ओळखले. राजा घोड्यावरून उतरला. आणि मुनिजवळ जाऊन त्याने त्याला प्रणाम केला व विचारले—"मुनिवर, मी काही लोकां बरोबर इथे शिकारीला आलो अन् त्यांच्यापासून बाजूला पडलो. त्यांच्यापैकी कोणी इकडून गेल्याची चाहूल कळली आपणाला?"

यावर मुनि म्हणाला—"महाराज, आत्ताच थोड्या वेळापूर्वी आपला एक शिपाई आणि मंत्री इथे येऊन गेले"



राहुल डिके

"ते कोणत्या दिशेने गेले हे सांगू शकाल का आपण?" राजाने विचारले.

मुनीने ते दोघे गेल्याच्या दिशेने हात उचलून दाखवले.

राजाही त्याच दिशेने निघून गेला. पुढे गेल्यावर त्याला मंत्री व शिपाई भेटले. त्यावेळी मुनीने शिपाई व मंत्री यांना ओळखून अगदी बरोबर कसे संबोधले याबद्दल राजाला मोठे आश्चर्य वाटले. मुनीने शिपायाला 'शिपाई' म्हणून, मंत्र्याला 'मंत्री' म्हणून, व राजाला 'राजा' म्हणून कसे काय ओळखले? हे कसे काय शक्य आहे?

आपल्या या शंकेचे समाधान करून घेण्यासाठी राजा पुन्हा मुनीकडे गेला. शिपाई, मंत्री व राजा यांना मुनीने कसे ओळखले याबद्दल त्याने पृच्छा केली.

यावर हंसत मुनि म्हणाले-"महाराज, आपल्या शिपायाने मला, 'ए आंधळ्या' असे पुकारले. या संबोधनावरूनच मी ओळखले की हा नक्की राजाचा शिपाई असला पाहिजे. आता राहिले मंत्रीमहाशय- त्यांनी प्रथम माझ्या आंधळेपणाचा उल्लेख करून एक प्रकारच्या अधिकारी स्वरात प्रश्न विचारला, तेव्हा मला वाटले की हा मंत्री असावा. नंतर आपण आलात महाराज, आपण माझ्या आंधळेपणाकडे लक्षही न देता बरोबर मुद्याची गोष्ट बोलून विचारले- "इथे कोणी आल्याची चाहूल आपणाला कळली का?" अन् मी ताबडतोब ओळखले की आपण खुद्द राजाच! म्हणजेच आपण तिघांनी मला ज्या प्रकारे हाक मारली, त्यावरून मी समजू शकलो कोणती व्यक्ति प्रत्यक्षात कोणत्या हुद्यावर आहे.

मुनिचे बोलणे ऐकून राजाला आपल्या शंकेचे बरोबर उत्तर कळून चुकले! मनुष्य दुसऱ्या व्यक्तीला कसे संबोधतो किंवा दुसऱ्या व्यक्तीशी तो कसा वागतो यावरूनच कोण व्यक्ति श्रेष्ठ किंवा कोण व्यक्ति उत्तम हे ओळखता येते-ही गोष्ट राजाला समजली. त्याचे योग्य शंका-समाधान झाले.






[५]

[युवराजाला गिळायला आलेल्या प्राण्याचा विनोदने मधे येऊन वध केला. पुजाऱ्याच्या आज्ञेने राजसेवकांनी त्याला तुरुंगात टाकले. मध्यरात्री राजा एकट्याने येऊन विनोदला घेऊन आपल्या राजवाड्याच्या वरील भागात असलेल्या बुरुजात घेऊन गेला. तेथून तो ज्ञानभूमीत कोणकोणत्या प्रकारची कामे चालतात हे विनोदला दाखवू लागला....]

विलाप- समारंभात भाग घेण्यासाठी आलेल्या नागरिकांना संबोधून पुजारी म्हणाला-"आपल्या मारल्या गेलेल्या पवित्र प्राण्याच्या जागी आम्ही लवकरच एक दुसरा प्राणी आणून त्याची स्थापना करणार आहोत."

"आपला असलेला प्राणी तर मारला गेला. आता तसल्याच दुसऱ्या प्राण्याची पुन्हा गरज आहे का? त्याच्याशिवाय आपलं चालू शकणार नाही का?" एका नागरिकाने उठून विचारले.

"तुझ्यावाचून ही कोणतं काम अडणार नाही इथे." असे म्हणून पुजाऱ्याने टाळ्या वाजवल्या. ताबडतोब दोन सेवक येऊन त्या नागरिकाला मृत्युदंड देण्यासाठी घेऊन गेले.

पुजारी पुढे बोलू लागला-"नागरिक हो, आपल्या पवित्र प्राण्याचा संहार करणाऱ्या ज्या दुष्ट माणसाला आपण

मनोज दास



पकडून ठेवलं आहे त्याचा लवकरच वध केला जाईल. आणि त्या आनंदाप्रीत्यर्थ आपण उत्सव साजरा करणार आहोत."

विनोद दचकून राजाकडे पाहू लागला. राजा त्याला आश्वासन देत म्हणाला–"घाबरू नको, असे कधीही घडणार नाही."

"मी आपला कृतज्ञ आहे महाराज. पण आपण राजा आहात. असे असताना आपला विचार ही न घेता हा पुजारी माझ्या वधाबद्दलची घोषणा कशी काय करू शकतो?" असे म्हणून विनोदने पुन्हा पुजाऱ्याच्या हालचालींवर आपले लक्ष केन्द्रित केले.

"आता आपण सर्व आपली दिनचर्या सुरू करू." असे म्हणून पुजारी तीन सेकंद स्तब्ध उभा राहिला, आणि त्याने एकदम उच्च स्वरात विलाप करायला सुरुवात केली. त्याबरोबरच जवळ जवळ शंभर कंठातून विव्हळत, ओरडत, रुदन स्वर बाहेर पडून त्यांनी पुजाऱ्याचे अनुकरण केले. एका मिनिटाच्या अवधीत संपूर्ण मंडप त्यांच्या रडण्याच्या आवाजाने निनादून उठला!

ते विषाद-दृश्य पाहणे आता विनोदला असह्य होऊ लागले–हे जाणून राजाने ते दृश्य बंद केले व म्हटले–"झोपेच्या अभावी येणाऱ्या आजारापासून आमचे नागरिक याप्रकारे स्वतःचा बचाव करतात."

"महाराज आपले हे सर्व प्रयास निरर्थक आहेत असे मला वाटते. मी म्हणतो, जनतेला हसवलं पाहिजे." विनोद उत्तरला.

"हसवलं पाहिजे? हे 'हसणं' म्हणजे काय प्रकार आहे?"

"जरा नीट सांग ना! 'हसणे' या शब्दाचा काय अर्थ? कसं हसायचं असतं?" राजा विचारू लागला.

"हाय देवा, खरंच आपाल्याला हसण्याचा अर्थ माहीत नाही?" विनोदने आश्चर्याने विचारले.

हा प्रश्न ऐकून राजा आणखीच बुचकळ्यात पडला. वास्तवतः ज्ञानभूमीच्या



नागरिकांना हसण्याचा अर्थच माहीत नव्हता. ते कधी हसलेच नव्हते!

"महाराज, आपण व आपल्या या ज्ञानभूमीतल्या लोकांनी कितीही प्रगति साध्य केली असली तरी ती सर्व निरर्थक आहे! एक प्रकारे आपण सर्वचजण अभागी आहात. ज्ञानभूमीला हा एक शापच असल्यासारखा आहे. मी राजा असतो तर, नक्षत्रे नाहीशी करण्याची शक्ति किंवा इतर अनेक अद्भुत शक्ति प्राप्त करून घेण्याचा अट्टाहास न करता, केवळ माझ्या प्रजेला मुक्तपणे हसण्याची शक्ती प्राप्त करून घेण्यासाठी इथल्या शास्त्रज्ञांची बुद्धि राबवली असती.

विनोदच्या बोलण्यातली आत्मीयता राजाला जाणवली व तो विनोदवर फारच खूष झाला. इतक्यात अचानक एका गोपुरावरील पिवळ्या रंगाचा दिवा प्रकाशित झाला व त्याबरोबर घंटानादही ऐकू आला.

"ओहो, याचा अर्थ म्हणजे एकादे शोधकार्य सफल झालेले आहे! बहुधा मनोदर्पणच!" राजा विनोदला म्हणाला.

यानंतर विनोद व राजा दोघेही बुरुजाबाहेर आले.

इतक्यात जिन्याच्या पायऱ्यांवरून कोणीतरी येत असल्याची चाहूल लागली



आणि राजाने हात उचलून विनोदला आडोश्याला लपून राहण्याची खूण केली.

"महाराजांचा जयजयकार असो! महाराज, आपला मनोदर्पण तयार झाला." असे म्हणत दोन पंडित तेथे हजर झाले. वस्त्राने झाकलेला दर्पण राजाच्या हातात देत ते म्हणाले–"महाराज, कोणाचेही स्मरण करून त्या व्यक्तीचे तीन वेळा नाव घेत आपण या आरशावरून आपला हात फिरवा. ती व्यक्ती आपल्याबद्दल मनात कोणते विचार बाळगून आहे ताबडतोब आपणाला आरशात स्पष्ट दिसून येईल."

"तुम्हा लोकांचे प्रयत्न सफल झाल्याबद्दल मी तुमचे अभिनन्दन करतो. आता



सर्वांत अगोदर आपला हितचिंतक जो पुजारी आहे, त्याचेच मनोव्यापार मला या आरशात पहायचे आहेत." असे म्हणत राजा त्या आरश्यावरले वस्त्र दूर करणार, इतक्यात–

"थांबा, थांबा!" असे ओरडत स्वतः पुजारीच तेथे येऊन पोचला. "या मनोदर्पणाचा उपयोग सर्वात अगोदर मीच करणार आणि ही वस्तु नेहमी माझ्याच ताब्यात राहील." असे तो म्हणाला.

"महाराज, आपण राजे आहात. या दर्पणाचा उपयोग करायचा पहिला अधिकार राजा म्हणून आपलाच आहे ही गोष्ट विसरू नका. पुजाऱ्याचे मन कसे आहे हे आपण या क्षणीच आरशात जरूर पाहू शकता." विनोद आपल्या लपलेल्या स्थानापासून बाहेर येत म्हणाला.

"असे कधीच घडू शकणार नाही, कधीच नाही." असे म्हणत पुजारी राजाच्या हातून आरसा हिसकावून घेणार, इतक्यात एकाच उडीत त्या दोघांच्या मधे येत विनोदने पुजाऱ्याला अडवले.

या अवधीत राजाने आरशावरील वस्त्र बाजूला करत तीन वेळा पुजाऱ्याचे नमोच्चारण करून आरशावरून आपला हात फिरवला व तो आरशात डोकावून पाहू लागला. 'बापरे!' आरशातले दृश्य पाहून राजा दचकलाच. आरसा खाली टाकून त्याने म्यानातून आपली तलवार बाहेर उपसली आणि एकाच वारात पुजाऱ्याचे शीर धडावेगळे केले!

"काय केलेत हे महाराज!" आश्चर्याने विनोदने विचारले.

"हां, खरोखरच त्या क्षणिक आवेगात काय केले मी हे?" राजा भानावर येत म्हणाला. थोडे थांबून राजा सांगू लागला–"मी आरशात डोकावून पहातो तो काय! पुजारी दात-ओठ खात हातात तलवार उगारत पुढे माझ्याकडे येत होता! हे केवळ आरशातले बिम्ब आहे, ही गोष्ट विसरून–मी स्वतःचे रक्षण करण्याच्या



"हेतूनें–खरोखरच मारून टाकले हो!" पुजाऱ्याच्या मृत देहाकडे व्यथित अंतःकरणाने पहात राजा हे बोलला.

"महाराज, आपण व्यथित का होता? याचा अर्थ असा की खरोखरीच हा पुजारी आपला वध करण्याचा संकल्प आपल्या मनात बाळगून असला पाहिजे." पंडितही आश्चर्याने म्हणाले.

"मी आरशात पाहिले तसा खरच का हा पुजारी माझा शत्रु होता?" राजाने विचारले.

"यात शंका घेण्याचे कारणच नाही महाराज. वाटल्यास आपण पुन्हा एकदा या आरशाची परीक्षा घेऊ शकता." मनोदर्पण निर्माण करणारे पंडित एका स्वरात राजाला म्हणाले.

"हं, हा सल्ला मोठा छान आहे." असे म्हणत राजा विनोदकडे पाहू लागला आणि म्हणाला–"हा पुजारी नेहमी म्हणत असे की तू मानवरूपी राक्षस आहेस आणि आमचं काही नुकसान करण्यासाठीच तू इथे आला आहेस–ही गोष्ट कितपत सत्य आहे हे मी आत्ताच या आरशात तपासून पाहतो." असे म्हणून राजाने क्षणभर आपले डोळे मिटून घेतले. तीन वेळा विनोदचे नाव घेऊन आरशावरून हात फिरवल्यावर राजा समोरचं दृश्य पाहू लागला.

राजाला प्रथम आश्चर्य वाटले. नंतर अतिशय प्रसन्न होत विनोदकडे वळून राजा बोलू लागला–"तू एक महान् कार्य साध्य करून घेण्यासाठी आमच्या या ज्ञानभूमीत आला आहेस. आपला प्रवास सोपा व्हावा यासाठी आमच्याकडून काही सहाय्याची तुझी अपेक्षा आहे. बास! याशिवाय तुझ्या मनात आमच्याबद्दल काही शत्रुता किंवा काही काळाबेरा विचार नाहीं. उलट आमच्याबद्दल तुझ्या मनात शुभेच्छाच आहेत."

हे ऐकताएकता विनोदच्या डोळयातून आनंदाश्रू झरू लागले! त्याने म्हटले–"महाराज, मी आपणाशी जे बोलू इच्छित



होतो, ते आपण स्वतःच मला सांगत आहात यापरती आनंदाची गोष्ट कोणती? एक वर प्राप्त करून घेण्यासाठी मला ही तुमची ज्ञानभूमी ओलांडून जायचे आहे. यासाठी आपल्या मदतीची मला नितांत आवश्यकता आहे."

राजा थोडा वेळ मौन राहिला. नंतर त्याने तेथे असलेल्या पंडितांना तेथून निघून जाण्याचा संकेत केला. ते गेल्यावर राजा विनोदला सांगू लागला–"या ज्ञानभूमीच्या पलिकडे असलेल्या प्रदेशात आमच्या ज्ञानभूमीतला कोणीही नागरिक कधीही गेलेला नाही. तो प्रदेश व आमची ज्ञानभूमी यांच्या मधील भागात विषारी वायु पसरवणाऱ्या डोंगराच्या रांगा आहेत. त्या विषारी वायूपासून स्वतःला वाचवून कोणीही पलिकडे जाऊ शकत नाही."

"पण महाराज, त्या विषारी वायूंपासून माझे रक्षण करून पलिकडे पोचवण्याचे काम केवळ आपणच करू शकता." विनोद म्हणाला.

"बोल, मी कशी काय ही मदत तुला करू शकेन?" राजाने आश्चर्याने विचारले.

"महाराज, एका जागी ध्वनितरंगाच्या रूपात परिवर्तित होऊन अदृश्य व्हावयाचे व दुसऱ्या जागी जाऊन पुन्हा स्वतःच्या रूपात प्रकट होण्याचे रहस्य आपण मला



सांगावयाचे–हीच ती मदत!" विनोद म्हणाला.

विनोदच्या या मागणीमुळे राजा पुन्हा जरा विचारात पडला.

विनोद पुढे म्हणू लागला–"महाराज, आपल्या मदतीने मी ही यात्रा सफल करू शकलो तर मी आपणा सर्वांसाठी तेथून 'हसण्याचे' वरदान घेऊन येईन. मग आपण सर्वजण मुक्तपणे हसू शकाल."

"हसण्याचे वरदान! हा काय प्रकार आहे? मला अजून नीट समजत नाही. पण काहीही असो, मला असे वाटत आहे की ती एक महान् चीज असावी. परंतु तू जे रहस्य जाणून घेऊ इच्छित आहेस ते

परम रहस्य या ज्ञानभूमीमधे फक्त मला आणि पुजाऱ्यालाच माहीत आहे. पण पुजारी तर आता मरून गेला–मला एकट्यालाच आता ते माहीत आहे." राजा म्हणाला.

"पण महाराज, या रहस्याचा शोध लावणाऱ्या पंडितांना ही ते माहीत असेलच की!" विनोदने शंका प्रदर्शित केली.

"हां, ही गोष्ट खरीच! पण पुजाऱ्यानें या गोष्टीचाही असा बंदोबस्त करून टाकला आहे कि त्यांना या रहस्याचा उपयोग करण्याची संधीच मिळणार नाही." राजा म्हणाला.

"ओहो. म्हणजे रहस्याचा शोध करणाऱ्या पंडितांचा पुजाऱ्याने वध करवला?" विनोदने विचारले.

राजाने होकारात्मक मान हलवली व तो म्हणाला–"ठीक आहे, मी या संबंधात मागाहून तुझ्याशी सविस्तर बोलेन."

"ठीक आहे." विनोद म्हणाला.

राजाला निर्णय घेण्यास एक आठवडा लागला. या अवधीत विनोद व युवराजांची चांगलीच गट्टी जमली.

एके दिवशी विनोद युवराजाला दु:खानें म्हणाला–"युवराज, आपण किती सुंदर आहात! पण आपण हसू शकत नाही ही किती दुर्दैवाची गोष्ट आहे!"

विनोदची युवराजाच्या बाबतीतली ही आत्मीयता पाहून राजा हेलावला. त्याने विनोदला रहस्य सांगण्याचा निर्णय घेतला व तो युवराज व विनोद यांना घेऊन ज्ञान-भूमीच्या सीमेवर गेला. तेथे त्याने विनोदला अदृश्य होण्याचे रहस्य समजाऊन सांगितले, व तो म्हणाला–"ऐक बेटा, एकदा अदृश्य झाल्यानंतर त्या स्थितीत फार वेळ रहाणेही धोक्याचे आहे. विषारी वायु पसरवणाऱ्या पर्वतरांगा ओलांडल्याबरोबर तुला पुन्हा मानवस्वरूपात ताबडतोब प्रकट व्हावयास हवे-ही गोष्ट नीट लक्षात ठेव, विसरू नकोस."

अदृश्य होण्यापूर्वी विनोदने राजा व युवराज यांचा निरोप घेतला. (क्रमश:)



# विनीलची गोष्ट

दृढव्रती विक्रमादित्य झाडाकडे परत आला. त्याने प्रेत झाडावरून काढून खांद्यावर घेतले व नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाकडे चालू लागला. तेव्हा प्रेतात रहाणारा वेताळ त्याला विचारू लागला–"राजा, आपले कार्य साध्य करण्यासाठी असलेला तुझा दृढविश्वास प्रशंसनीयच आहे. परंतु एक शंका वारंवार माझे मन सतावत आहे–तुझे इच्छित कार्य सफल झाल्यावर एकूण परिस्थिती काय रूप धारण करील? कारण कधीकधी केवळ कामातील असफलताच नव्हे, तर सफलताही चांगल्या बुद्धिमान व्यक्तींना कशी बुचकळ्यात टाकते, याचे उदाहरण म्हणून मी तुला एक महान् पंडित व कवि विनील याची गोष्ट सांगतो. ऐक. यामुळे तुझा श्रमपरिहारही होईल.

वेताळ कहाणी सांगू लागला–

## वेताळाच्या गोष्टी



प्राचीन काळीं ज्ञानसागर नावाचा एक पंडित रहात असे. त्याला ललिता नावाची एकुलती एक मुलगी होती. एकदा विनील नावाचा एक तरूण ज्ञानसागरकडे विद्यार्जन करण्यासाठी आला. ज्ञानसागरने त्याची परीक्षा घेतली व त्याच्या बुद्धिमत्तेवर खूष होऊन त्याला आपला शिष्य म्हणून स्वीकारले. मुळातच विनील बुद्धिमान होता.

विद्याभ्यास संपल्यावर राजाश्रय प्राप्त करून घेण्याचे विनीलने ठरवले, पण तत्पूर्वी ज्ञानसागरला गुरुदक्षिणा देऊन त्याची अनुमति घेणेही आवश्यक वाटल्याने त्याने प्रथम गुरुजींना आपला विचार सांगितला.

त्याचे बोलणे ऐकून ज्ञानसागर प्रथम काही वेळ गप्पच राहिला, नंतर त्याने विचारले–"विनील, गुरुदक्षिणा म्हणून मी जे मागेन ते तू मला देशील?"

"गुरुदेव, माझ्या शक्तिबाहेरची नसेल अशी आपण मागाल ती गुरुदक्षिणा मी आपणाला देईन." विनील अत्यंत नम्रपणे उत्तरला.

विनीलच्या उत्तराने ज्ञानसागर फारच आनंदित झाला व तो म्हणाला–"विनील, माझ्या अन्य काहीही इच्छा नाहीत. तू विद्येत बृहस्पतिसारखा हुशार बनलास. आता माझी एकच इच्छा आहे–ती ही की, तू माझ्या ललितेशी विवाह करावास."

ज्ञानसागरची इच्छा जाणून विनीलचे हृदय व्याकुळ झाले! तो म्हणाला–"गुरुदेव, आपण तर माझी अग्निपरीक्षाच आरंभलीत! मी आपणाला पित्यासमान मानतो व आपली कन्या ललिता ही तर माझी बहीण! अशा परिस्थितीत हा प्रस्ताव न्यायसंगत ठरेल का गुरुजी?"

विनीलच्या उत्तरामुळे ज्ञानसागर खिन्न झाला व म्हणाला–"वत्सा, गुरुपुत्रीशी विवाह करू नये, असा काही नियम नाही." असे सांगून व त्याच्या पुष्टयर्थं अनेक उदाहरणे देऊन ज्ञानसागरने विनीलला समजावण्याचा प्रयत्न केला.

तरीसुद्धा विनीलला ललितेशी विवाह करणे रुचेना. गुरुगृहात असतानाचा सर्व काळ त्याने तिच्याकडे बहीण म्हणूनच पाहिले होते. परंतु विनीलच्या नकारामुळे ज्ञानसागर मात्र फारच संतप्त झाला.

संतापाच्या भरात ज्ञानसागने कमंडलूतले पाणी हातावर घेऊन विनीलला शाप दिला–"तुझ्या अंगात इतका अहंकार आहे हे माझ्या आजपर्यंत लक्षात आले नाही. माझी गुरुदक्षिणा चुकवू शकत नाहीस म्हणून तू पापाचा भागीदार आहेस. परिणामतः तू आपल्या सर्व विद्या विसरून जाऊन एक सामान्य व्यक्ति म्हणूनच जीवन व्यतीत करशील."

गुरुजीचा हा शाप ऐकून विनील शोकात बुडून गेला. डोळ्यात पाणी आणून त्याने ज्ञानसागरला वंदन केले व तो म्हणाला–"ज्या स्त्रीला मी बहीण मानत आलो, तिच्याशी कुठल्याही परिस्थितीत मी विवाह करणार नाही." असे म्हणून विनील तेथून बाहेर पडला.

यानंतर विनील वेड्यासारखा देशभर फिरत राहिला. शेवटी एक दिवस अत्यंत दुर्बल झालेल्या परिस्थितीत तो श्रीरंगपट्टणला पोचला. आणि रंगनाथस्वामीच्या देवळासमोरच बेशुद्ध होऊन खाली पडला!

त्याच वेळी कृष्णाचार्य नावाचा पंडित श्रीरंगनाथाच्या दर्शनाला आला होता. त्याने शिष्यांच्या मदतीने विनीलला उचलून आपल्या घरी पाठवले व त्याच्यावर उपचार करवले.





विनील कृष्णाचार्यांच्या घरी थोड्या वेळाने शुद्धीवर आला. त्याने डोळे उघडून पाहिले, तो घराच्या अंगणात कृष्णस्वामींचे शिष्य श्रीरंगनाथाचे स्तोत्र म्हणत होते. त्या भक्तिरसपूर्ण वातावरणाच्या प्रभावामुळे विनीलच्या तोंडून श्रीरंगनाथाच्या स्तुतिपर श्लोक स्फुरू लागले व ते श्लोक गातच तो उठून उभा राहिला.

त्या आवेशात शीघ्रकाव्य रूपात विनील एक तासभर श्लोक गात राहिला! व यानंतर थोड्याच वेळात पुन्हा बेहोश होऊन तो कृष्णाचार्यांच्या चरणांवर खाली कोसळला!

विनीलची काव्यप्रतिभा, पदलालित्य व शब्दसौष्ठव या गोष्टींचे कृष्णाचार्य व त्यांचे शिष्य या सर्वांना फार आश्चर्य वाटले!

हाताचा आधार देऊन कृष्णाचार्यांनी त्याला उठवले. विनीलने त्यांना प्रणाम करून विचारले–"महाराज, आपण कोण? मी इथे कसा आलो?"

कृष्णाचार्यांनी त्याला सर्व वृत्तान्त कथन केला व विचारले–"तू कोण आहेत बाळा? तू उत्स्फूर्तपणे रंगनाथावद्दलची स्तोत्रे गायलीस ती ऐकून मला असे वाटले की माझा जन्म धन्य झाला! तू तर सरस्वतीचा वरदपुत्रच आहेस. मग तू असा हीन-दीन अवस्थेत का?"

"स्वामी, आपण म्हणता ते खरं आहे? खरंच का मी श्रीरंगनाथावर आशुकाव्य रचलं?"

कृष्णाचार्य हसत म्हणाले–"तू सुरुवातीला जे तीन श्लोक गायलास ते ऐकून मी चकित झालो होतो. त्यानंतर तुझ्या तोंडून निघणारा शब्द न् शब्द मी आपल्या शिष्यांकरवी लिहून ठेवला आहे. हे पहा ना!" असे म्हणून त्याने आपल्या शिष्यांकडून ताडपत्र घेऊन विनीलच्या हाती दिले.

विनीलने जे शीघ्रकाव्य केले होते ते वाचून त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रु झरू लागले. श्लोक खरोखरच अद्भुत होते! आता त्याच्या लक्षात आले की आपले गुरु ज्ञानसागर यांनी दिलेला शाप खरा झाला नाही!

"अरे, पण तू अजून मला स्वतःची ओळख करून दिली नाहीस?" कृष्णाचार्यांनी विचारले.

विनीलने आपली सर्व हकीकत कृष्णाचार्यांना सांगितली. त्यावर ते म्हणाले–"ठीक आहे. वत्सा, तू थोडे दिवस माझ्याच घरी रहा. चल आता, स्नान उरकून जेवण कर."

हे बोलत असताना कृष्णाचार्यांच्या चेहऱ्यावर पहिल्याइतकी प्रसन्नता दिसत नाही हे विनीलने ताडले. परंतु त्याने तिकडे विशेष लक्षही दिले नाही.

भोजनानंतर कृष्णाचार्यांजवळ परत येऊन विनीलने विचारले–"स्वामीजी, या नगराचा राजा कोण? हा राजा कवींना आश्रय देतो का? त्याला काव्याबद्दल रुचि आहे का? त्यांच्या दरबारात प्रतिभावन्त पंडित आहेत का?" याबरोबरच आणखी काही प्रश्न तो विचारणार इतक्यात कृष्णाचार्यांनी त्याला मधेच थांबवले.

ते म्हणाले–"वेळ आली की मीच तुला सर्व काही सांगेन, उतावीळ होऊ नकोस. आता जरा वेळ विश्रान्ती घे."

दुसऱ्या दिवसापासून विनील कोणत्या ना कोणत्या विषयावर शीघ्रकाव्य रचून ऐकवू लागला. परंतु आश्चर्य म्हणजे त्याच्या कवितेतील माधुर्य आणि त्याचे पांडित्य दिवसेंदिवस कमी कमी होऊ लागले! पुढे पुढे तर त्याच्या कवितेत रसनिष्पत्ती





सोडाच पण काही काही शब्दही विकृत अर्थाने येऊ लागले. त्याच्या कविता ऐकणाऱ्या कृष्णाचार्यांच्या शिष्यांच्या चेहऱ्यावर तिरस्कार उमटू लागला! काही प्रमाणात विनीलच्याही ही गोष्ट लक्षात आली.

अशातच एक दिवस कृष्णाचार्यांच्या दोन शिष्यांमधील हा वार्तालाप विनीलच्या कानी आला.

एक शिष्य म्हणत होता—"अरे पाहिलंस, या विनीलच्या काव्यात अहंकार किती भरलाय?"

"होय ना रे, प्रथम रंगनाथस्वामींची कृपादृष्टि याच्यावर कशी काय पडली कुणास ठाऊक! प्रथम याने अगदी अमृत-रसाने भरलेली कविता रचली, अन् आता पहा, याच्या श्लोकात केवळ शुष्क शब्दच भरलेले असतात." दुसऱ्याने पहिल्याला पुष्टि देत म्हटले—"आणि तरी सुद्धा अजून याचे डोळे कसे उघडत नाहीत कुणास ठाऊक!"

"माहित आहे परवा गुरुदेव काय म्हणत होते? ते म्हणाले—विनील स्वतःला मोठा विद्वान समजत आहे. पण बेटा, अजून त्याच्यात आत्मज्ञान जागृत झालेले नाही." पहिला शिष्य म्हणाला.

त्यांचे हे बोलणे ऐकून विनीलच्या मनात विचारांची खळबळ माजली.

शेवटी कृष्णाचार्यांकडे जाऊन त्यांना प्रणाम करून तो म्हणाला—"गुरुदेव, मला धर्माचे सूक्ष्म रूप अजून समजलेच नाही! आपल्या कृपेने माझे डोळे उघडले. मला आशिर्वाद द्या. मी पुन्हा एकदा माझ्या गुरुजींना भेटून परत येतो."

एवढी गोष्ट ऐकवल्यावर वेताळ राजाला विचारू लागला—"राजा, इतके मधुर काव्य आशुरूपात प्रसवल्यामुळे विनीलच्या मनात गर्वाने घर केले—ही गोष्ट खरीही असेल. पण त्याची काव्य-प्रतिभा एकाएकी लुप्त होण्याचे कारण काय? आणि ज्ञानसागरने विनीलला दिलेला शाप खोटा का व्हावा? पुन्हा ज्ञानसागरकडे जाण्याची इच्छा विनीलने का प्रकट केली? राजा, या प्रश्नांची योग्य उत्तरे माहित असूनही तू दिली नाहीस तर तुला माहीतच आहे—तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होऊन पडतील."

विक्रमादित्याने उत्तर दिले—"विनील स्वतःला महान् कवि समजू लागला. त्याच्यात अशाकरता अहंकार जागृत झाला कि आपण कोणी फार मोठी व्यक्ति आहोत अन् त्यामुळेच गुरुचा शापही व्यर्थ झाला अशी त्याची समजूत झाली. परंतु शाप व्यर्थ होण्यामागील सत्य त्याला कळलेच नव्हते. खरे म्हणजे ज्ञानसागरचा शाप खोटा ठरण्याचे कारण 'ज्ञानसागरची दुर्बलता' हेच होते, त्यात विनीलच्या मोठेपणाचा काहीच भाग नव्हता! विनीलने आपल्या मुलीशी विवाह करावा ही इच्छा सर्वसामान्य माणसाप्रमाणे प्रकट न करता, ज्ञानसागरने ही मागणी गुरुदक्षिणेच्या रूपात केली. या मागणीत एक प्रकारची सक्ती करणे व आज्ञा देणे अशी लक्षणे आहेत. विनीलचे उत्तर ऐकल्यानंतर खरे म्हणजे एक गुरु किंवा पितृतुल्य माणूस म्हणून त्याने आशिर्वादच द्यायला पाहिजे होता. परंतु उलट त्याने रागाने विनीलला शाप दिला व तो स्वतःच दोषास पात्र झाला. आणि त्यामुळेच त्याने दिलेला शापही असफल झाला. परंतु विनीलने हे सत्य समजून घेतले नाही. तो समजून चालला, की आपण इतके मोठे धर्मात्मा आहोत की गुरुने दिलेला शापही खोटा पडला! यामुळे त्याच्या मनात गुरुबद्दल घृणा व स्वतःबद्दल अहंकार उत्पन्न झाला! अन् यामुळेच तो स्वतःच्या काव्यप्रतिभेलाही वंचित झाला! शेवटी त्याला सत्य उमगले आणि आपले गुरु ज्ञानसागर यांच्याजवळ क्षमा मागून आपला अहंकार व दर्प वगैरे दुर्गुण धुवून काढायची इच्छा त्याने प्रकट केली."

अशाप्रकारे राजाचे मौन भंग झाल्यामुळे प्रेतातील वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडाला लटकू लागला. (कल्पित)



# खरी चूक

एक लाचखाऊ ग्रामाधिकारी, जो लाच म्हणून जास्त पैसे देईल त्याच्या बाजूने न्याय देत असे. इकडे बाप अशा अन्यायपूर्वक मार्गाने पैसा मिळवत असे; तर तिकडे त्याच्या एकुलत्या एका मुलाला निराळ्याच प्रकारच्या वाईट सवयी लागत होत्या!

एके दिवशी ग्रामाधिकारी झोपला असताना त्याच्या शर्टाच्या खिशातून पैसे चोरताना त्याचा मुलगा मुद्देमालासह पकडला गेला!

आपल्या घरात आपला मुलगाच आपल्या खिशातून पैसे चोरतो या गोष्टीचे त्या अधिकाऱ्याला फार आश्चर्य वाटले!

त्याने ओरडून मुलाला विचारले–"एक ग्रामाधिकारी म्हणून तुझ्या या अपराधासाठी काय शिक्षा करीन माहीत आहे तुला?"

"परंतु आपल्यासारख्या अधिकाऱ्याला कोणकोणत्या अपराधाबद्दल किती लाच द्यावी लागते हे मलाही माहित आहे बाबा!" असे म्हणून बापाच्या हातावर दोन रुपये ठेवून मुलगा तेथून चालता झाला!

ग्रामाधिकाऱ्याला आता कळून चुकले की चूक तर आपली स्वत:चीत आहे आणी त्यामुळेच आपला मुलगा असा वागत आहे!

त्या दिवसापासून ग्रामाधिकाऱ्याने लाच खाणे सोडून दिले.



महाकाव्य कथा :

# शकुन्तला–२



कण्वमुनींच्या मनात धर्मात्मा राजा दुष्यन्ताबद्दल फार आदर होता. म्हणून शकुन्तला व दुष्यन्त यांच्या विवाहाची वार्ता जाणून ते फारच प्रसन्न झाले. नंतर त्यांनी राजाच्या अंत:पुरात कसे वागावे व एक राणी म्हणून तिची काय कर्तव्ये आहेत याबद्दल शकुन्तलेला उपदेश केला.

एके दिवशी कण्व मुनि बाहेर गेलेले असताना शकुन्तलाही एकान्तात बसून दुष्यन्ताच्या आठवणीत मग्न झालेली होती. त्यावेळीं दुर्वास मुनि तेथे आले व त्यांनी कण्वमुनींबद्दल चौकशी केली. परंतु आपल्याच विचारात मग्न असल्याने तिचे त्यांच्याकडे लक्ष गेले नाही. तापट स्वभावाच्या दुर्वास मुनींनी लगेच रागाने शकुन्तलेला शाप दिला–"ज्याच्या आठवणीत बुडाल्यामुळे तू माझी उपेक्षा केलीस, तो तुला विसरून जाईल."





अजून आपल्यातच मग्न असलेल्या शकुन्तलेच्या कानांना हा शापही ऐकू आला नाही? परंतु काही आश्रमवासी मुनिकन्यांनी मात्र हा शाप ऐकून तिच्या वतीने दुर्वासमुनींची क्षमा मागितली. मुनींचेही मन द्रवले व 'या शापाचा प्रभाव तात्पुरताच राहील' असे म्हणून ते तेथून निघून गेले.



काही दिवस गेले आणि कण्वमुनींनी शकुन्तलेला दुष्यन्ताकडे पाठवण्याची तयारी केली. आपल्या बालमैत्रिणींचा निरोप घेऊन, आपल्या पालनकर्त्या पित्याला व इतर वडील माणसांना नमस्कार करून शकुन्तला हस्तिनापुरला जायला निघाली. कण्वमुनींचा एक मुनीकुमार शिष्य तिला सोबत म्हणून बरोबर निघाला.

आपले जन्म व निवास स्थान आणि आपले लालनपालन केलेल्या पित्याला सोडून जाताना शकुन्तलेला एकीकडे दुःख वाटत होते तर दुसरीकडे पतिगृही जाण्याचा आनन्द होता. तिची नौकायात्रा सुखरूप पार पडली.





हस्तिनापुरला पोचल्यावर अत्यन्त उत्साहाने शकुन्तलेने दुष्यन्ताच्या राजसभेत प्रवेश केला. तिला दरबारात प्रवेश करताना दुष्यन्ताने पाहिले, पण राजाने तिला पाहूनही तिच्या आगमनाची विशेष दखल घेतली नाही, याचे शकुन्तलेला फार आश्चर्य वाटले. तिच्या बरोबर आलेल्या मुनिकुमाराने राजाला निवेदन केले–"महाराज, ही तरुणी म्हणजे कण्वमुनींची मानसकन्या

"ओहो, असे होय ? माझ्याकडून काही मदतीसाठी विनंति करायला आला आहात काय तुम्ही ?" दुष्यन्ताने मोठ्या नम्रतेने विचारले. हे ऐकून शकुन्तला आश्चर्यचकित झाली ! मुनिकुमाराने राजाला स्मरण देण्यासाठी पुन्हा म्हटले–"महाराज, आपण शकुन्तलेला विसरलात काय ? कण्वाश्रमात आपण हिच्याशी विवाह केलात ना ?"





"देवा, हे लोक तर माझ्यावर दोष लादू पहात आहेत ?" या विचाराने व्याकुळ होऊन दुष्यन्त म्हणाला–"माझ्यावर असला दोष लादायची तुमची हिम्मतच कशी होते ? तुम्ही मुकाट्याने इथून चालते व्हा, नाहीतर तुम्हाला कठोर शिक्षा दिली जाईल."

विवाहाच्या वेळी राजाने दिलेली अंगठी पाहून तरी राजाची स्मृति जागृत होईल या विचाराने शकुन्तलेने आपल्या हाताकडे नजर वळवली. पण हाय ! बोटातली अंगठीही नाहिशी झालेली होती ! तिच्या मनात आले–आपण नावेतून येताना नदीच्या पाण्यात हात घालून खेळत होतो. त्याचवेळी बहुधा अंगठी बोटातून निसटून गेली !





यानंतर मात्र शकुन्तला काहीही न बोलता त्या मुनिकुमारासह दरबार सोडून निघून गेली. दुर्वास मुनींच्या शापाच्या प्रभावाने दुष्यन्त शकुन्तलेला पुर्णत: विसरून गेला होता! परंतु राजाच्या मनात मात्र तिच्याबद्दल क्रोधाऐवजी करुणाभावच जास्त होता!

आपल्या मुलीचा झालेला अपमान व तिचे दु:ख जाणून मेनका त्याचवेळी स्वर्गातून पृथ्वीवर आली, तिने मोठ्या प्रेमाने आपल्या मुलीला—शकुन्तलेला—मिठीत घेतले आणि नंतर तिला एका सुरक्षित आश्रमात पोचवले.



शकुन्तलेने तेथे एका सुन्दर मुलाला जन्म दिला. तिने मुलाचे नाव भरत असे ठेवले व मोठ्या कौडकौतुकाने ती त्याला आश्रमातच वाढवू लागली. आपली असाधारण बुद्धिमत्ता, अपूर्व साहस व अमर्याद पराक्रम या गुणांनी बालभरत सर्वांचे मन आकर्षित करून घेऊ लागला.



# करावे तसे भरावे

कान्तिपुर गावाच्या जवळील एका जंगलात मध्यरात्रींच्या वेळी एक भूत एका झाडाच्या फांदीवर बसून घोरत होते. अचानक झाडाखाली काही आवाज झाला. म्हणून त्या भुताने डोळे उघडले. पहातो तो एक तरूण त्या दाट झाडीतून वाट काढत पुढे येत होता.

भुताची झोपमोड झाल्याबद्दल रागावून ते म्हणाले—"का रे, कोण आहेस तू? आम्ही भुतं यावेळी झकासपैकी झोपेत असतो—यावेळी तुझं जंगलात काय काम?"

पण भुताची ही धमकी ऐकून तो तरूण जरासुद्धा विचलित न होता म्हणाला—"बरं झालं बाबा! माझीही तीच तर इच्छा आहे! तू माझा जीव घेतला नाहीस, तरी एकादं जंगली जनावर नक्कीच जीव घेईल माझा!!"

हे उत्तर ऐकून भुताला त्या तरुणाची दया आली. ते म्हणाले—"कारे बाबा! तुझं वय तर माझ्या एक सहस्रांश इतकं ही दिसत नाही! मग इतक्या लहान वयातच जिवाला का कंटाळलास?"

यावर त्या तरुणाने आपली हकिकत सांगितली—त्याचं नाव मुरारी. दिसायला तो अगदीच कुरूप! समोरच्या घरात राहणाऱ्या विमलावर त्याचं प्रेम बसलं.

अलिकडे विमलासाठी बरीच स्थळं सांगून येत होती! हे ऐकून एक दिवस संध्याकाळी मुरारी आपण होऊनच विमलाकडे गेला.

मुरारी विमलाजवळ जाऊन म्हणाला—"विमला, माझं तुझ्यावर फार प्रेम आहे. तुझ्याशी लग्न करून मी तुला खूप सुखात ठेवीन."

मुरारीचे बोलणे ऐकून विमला खो खो हसू लागली. नंतर तिने त्याला आपल्या

राम भाऊ आपटे










घरात नेऊन पुरुषभर उंचीच्या आरशा समोर उभे केले, आणि विचारले–"हे काय आहे?"

"हा तर आरसा आहे." मुरारी म्हणाला.

"तू कधी आरशात आपला चेहरा पाहिला आहेस का? माझ्या सौंदर्यापुढे तुझं कुरूप ध्यान काय पण दिसतंय!" विमलाने त्याला रागावून हाकलून दिले.

मुरारीला हा अपमान सहन होईना! 'आपलं जगणंच यापुढे व्यर्थ आहे!' जंगलात एकादं रानटी जनावर आपल्याला मारून खाईल तर बरं–अशा विचाराने तो जंगलाची वाट चालू लागला होता.

मुरारीची ही रामकहाणी ऐकून ते भूत खदाखदा हसू लागले. नंतर त्याने मुरारीच्या अंगावर बर्फापेक्षाही थंड अशा हवेची फुंकर घातली. चांदण्याच्या उजेडात मुरारीला असे दिसून आले की आपल्या अंगचा काळेपणा जाऊन आपले शरीर एकदम स्वच्छ गोरे झाले आहे! आता काय! मोठ्या कृतज्ञतेने त्याने भुताला नमस्कार केला व त्याने आपले पाय घराकडे वळवले.

पण दुसऱ्या दिवशी व्याकुळतेने एक एक पाऊल टाकत येणाऱ्या मुरारीला भुताने पुन्हा पाहिले!

त्याला पाहून भूत म्हणाले–"वा, वा! आज तू बरोबर अशा वेळेला आलास की मला नुकतीच झोप यायला लागली होती! बोल, काय झालं, पुन्हा का परत आलास बाबा?" असे म्हणत भूत झाडावरून खाली उतरले–"तू असा उदास का?"

"नुसत्या सौंदर्याने काही पोट भरत नसतं. ऐश्वर्यही त्याच्याबरोबर का नाही घेऊन आलास? असे म्हणून विमलाने मला धुडकावलं!"

"म्हणजे माझ्या बाबतीत तू विमला जवळ बोललास. खरं ना?" भुताने विचारले.

"ते कसं काय मी लपवू शकलो असतो? अन् लपवायचं कारणच काय?" मुरारीने विचारले.

"असं आहे काय? बरं ठीक आहे. मी माझं ऐश्वर्यही तुला देतो. ते सर्व घेऊन विमलाला नेऊन दे." असे म्हणून भूत झाडावर चढले, त्याने वर चढल्यावर एक थैलीभर सुवर्णमुद्रा खाली टाकल्या.

मुरारी त्या मोहरा थैलीत भरून घेऊन व भुताला धन्यवाद देऊन आपल्या गावाकडे निघून गेला.

तिसऱ्या दिवशीही पुन्हा उदासवाण्या चेहऱ्याने येणाऱ्या मुरारीला भुताने दुरूनच पाहिले व ओरडून विचारले–"अरे बाबा, तुझ्या लग्नाची गोष्ट लांबच राहिली अन् तू असा रोज काय माझी झोपमोड करतो आहेस? पुन्हा कसली अडचण आली? विमलाला तेवढ धन पुरेसं वाटलं नाही की काय?"

मुरारी बिचारा झाडाखालीच कोलमडून पडला, आणि म्हणाला–"माहित आहे विमला आता काय म्हणाली? ती म्हणाली–सौंदर्य अन् संपत्ति असली म्हणून काय झालं? हे ऐश्वर्य संभाळायची अक्कल तर हवी ना? तिचाच तर तुझ्यात अभाव आहे! जा, भुताकडून बुद्धि पण मागून आण."

"अरेरे, बिच्चारी विमला! फारच मूर्ख दिसतेय ही बाई!" असे म्हणून भूत गडगडून हसले. त्याने झाडावर जाऊन झाड गदागदा हलवले.

थोड्याच वेळात मुरारी झाडावरून गळलेल्या पानांनी झाकून गेला. पाने झटकत











तो उठून उभा राहिला अन् भुताला म्हणाला–"मी तुझे उपकार मरेपर्यंत विसरणार नाही. आता पुन्हा कधीही येऊन मी तुझ्या झोपेत बाधा आणणार नाही." असे म्हणून मुरारीने आपल्या घराची वाट धरली.

चौथ्या दिवशी रात्री झाडाकडे येणारी आकृति पाहून भूत म्हणाले–"ये विमला, ये! तुझीच वाट पहात होतो मी! तू येणार हे माहीतच होतं मला!"

डोळयात पाणी आणून विमला म्हणाली–"तू मुरारीवर काय जादू घातलीस कुणास ठाऊक! तो तर एकदम बदलून गेलाय्! आज तो माझ्याशी बोलायला आला नाही. एवढंच नव्हे-तर त्याने माझ्याकडे ढुंकून पाहिलं सुद्धा नाही! काही लोकांना तो म्हणत होता की, तो आता शहरात जाऊन काही व्यापार वगैरे सुरू करणार आहे! तू काही करून मुरारीला समजावून सांगून आमचं लग्न करवून दे ना." असे म्हणून विमलाने भुतासमोर हात जोडले.

खदखदून हसत भूत म्हणाले–"आता तो पूर्वीचा मुरारी राहिला नाही–पार बदलून गेलाय् तो! स्वतःचं बरं–वाईट त्याला आता चांगलं कळू लागलंय्! सौंदर्य अन् संपत्तिबरोबरच त्याच्यात आता विवेकही आला आहे. कदाचित त्याला आता असं वाटत असेल की, तू त्याच्या योग्य बायको होऊ शकणार नाहीस. तुझ्याहूनही सुंदर अन् संपन्न परिवारातली मुलगी आता त्याला सहज मिळू शकेल. तुझ्यावर मनापासून प्रेम करणाऱ्या मुरारीचा तू तिरस्कार केलास–अपमान केलास त्याचा! आता त्याच्याजवळ सर्व काही आहे–अशा परिस्थितीत त्याला जर आता तुझ्याशी लग्न करायची इच्छा राहिली नसेल तर त्यात आश्चर्य ते काय? हे तर सर्व तुझ्याच करणीचे फळ! करावे तसे भरावे!"

भुताच्या म्हणण्यातले तथ्य ओळखून, खाली मान घालून विमला तेथून निघून गेली.






क्षीरसागरात मंदार पर्वत कोसळल्यावर उंचउंच लाटा उसळून जशी खळबळ माजली होती, तशाच उंच लाटा कृष्णाने कालियाच्या डोहात उडी मारल्याबरोबर उसळल्या. डोहात माजलेली खळबळ रसातळापर्यंत पोचली. यामुळे कालिया अतिशय चिडला. त्याने आपल्या पाचही फणा उभारून रागाने आपला जबडा पूर्ण उघडला! त्याच्या भयानक दाढा स्पष्ट दिसू लागल्या, नंतर त्याने आपल्या तोंडातून विषज्वाला बाहेर फेकायला सुरुवात केली, आपले नागमोडी शरीर नदीभर पसरून त्याने कृष्णाच्या शरीरावर जमेल तिथे तिथे चावे घेतले. नंतर त्याने कृष्णाच्या शरीराभोवती आपल्या शेपटीचे वळसे घालून त्याचे शरीर आवळायला सुरुवात केली. त्यामुळे कृष्ण बेशुद्ध झाला. ते पाहून कालियाचे बंधु, त्याच्या बायका मुले वगैरे मोठमोठे सर्प कृष्णाला घेरून त्याला चावू लागले.

किनाऱ्यावर असलेले गोपाळ हे दृश्य पाहून घाबरून गेले व तेथून दक्षिणेला एका कोसावर असलेल्या गोकुळाकडे ही वार्ता देण्यासाठी पळत सुटले. गोकुळातल्या रहिवाश्यांना त्यांनी सांगितले की–खेळता खेळता कृष्ण एकटाच कुणाला न सांगता भयानक साप रहात असलेल्या डोहाकडे गेला, अन् त्याने डोहात उडीही मारली! आता तिथल्या सर्वात मोठ्या सापाने त्याला आवळून धरले आहे आणि बाकी सर्व सापही



त्याला वेढून चावत आहेत! बिचारा कृष्ण! त्याचे वडील कुठे आहेत सांगा, आणि त्याला सोडवायला चला हो!

ही बातमी ऐकून गोकुळातल्या लोकांच्या डोक्यावर जणू वीज कोसळल्यासारखे झाले! नंद आश्चर्य व दुःखातिशयाने व्याकुळ होऊन विचारू लागला–"कुठे आहे माझा कन्हैया, कुठे आहे माझा लाला?" आणि असे विचारत विचारत नंदही त्या मुलांमागे पळू लागला.

गोकुळातले बलिष्ठ तरूण आपापली हत्यारे उचलून नंदाच्या पुढे पळत सुटले. यशोदा शोकात बुडून गेली, तिला कशाचीच शुद्धबुद्ध राहिली नाही! गोपस्त्रिया तिला आधार देऊन चालवत यमुनेकडे घेऊन निघाल्या.

धावता धावता सर्वजण यमुनाकिनारी पोचले. कृष्णाची अवस्था पाहून ते सर्व हताश झाले. त्याच्या मदतीला जावे तरी कसे? सर्वत्र ते दुष्ट सर्प त्याला घेरून भोवताली फिरत होते! सापाच्या विळख्यातला कृष्ण अत्यंत दयनीय दिसत होता. काय करावे कोणालाच सुचेना. नंद यशोदा तर बेशुद्धच पडले! इतर लोकांनी पाणी वगैरे शिंपून त्यांना शुद्धीवर आणले, कोणी त्याचे सांत्वन करू लागले.

नन्द आपल्या गाववाल्या लोकांना म्हणू लागला–"पूर्वजन्मी मी कोणते पाप केले कुणास ठाऊक! त्याची शिक्षा म्हणूनच माझा लाडका बाळ आत्ता सापांच्या तावडीत सापडला आहे."

इकडे यशोदा बोलू लागली–"बाळा, तू लोणी चोरल्याबद्दल या गोपिकांनी तुझी कागाळी माझ्याकडे केली, अन् मी वेडीने रागावून तुला उखळीला बांधून ठेवले, त्याबद्दल का तू मला असा सतावत आहेस?"

बलराम मात्र एकटाच बाजूला उभा राहून चुपचाप हा सर्व तमाशा पहात होता! शेवटी तो कृष्णाला म्हणाला–"कृष्णा, आत्ता तू मानवी अवस्थेत असल्यामुळे लोकहिताची गोष्ट विसरून गेला आहेस



असे दिसते. या यःकश्चित सापाच्या विळख्यात काय पण असहाय्य बनून राहिला आहेस! अरे, तुला दिसत नाही का, कि हे सर्व तुझे प्रिजजन कसे हीनदीन होऊन गेले आहेत? आता पुरे झाले सोंग! त्या विषारी किडयाला चांगली शिक्षा देऊन किनाऱ्यावर ये कसा! आणि या सर्वांना प्रसन्न कर."

बलरामाचे बोलणे ऐकून कृष्ण जसा काही एकदम भानावर आला. त्याने एकदम कालियाला बाजूला ढकलून हवेत उडी मारली व तो थेट कालियाच्या फणीवरच उतरला! नंतर त्याने त्या सापाची शेपटी एका हातात पकडली व तो त्याच्या पाचही फणांवर आलटून पालटून उसळ्या मारमारून नाचू लागला, त्याचे मर्दन करू लागला! ते नृत्य पाहून यमुनेचें पाणी लाल होऊ लागले. तो नाच पाहून त्याच तालावर किनाऱ्यावरील गोपाळही हर्षनाद करू लागले. हा हर्षनाद संगीतमय करून कालीयाच्या पाचही शिरांवर कृष्णाचे जणू महानाटय चालले होते! आकाशात देवदेवताही हे नाटय पाहू लागले!

क्रमाक्रमाने कालियाची शिरे सोलपटू लागली, त्याच्या नाकपुडयांतून रक्ताच्या धारा वाहू लागल्या, त्याच्या दाढा उपटल्या गेल्या आणि त्याच्या मुखातील ज्वाळांवाटे त्याचे सर्व जहर बाहेर पडू लागले.



सुकलेल्या कमळाला प्रमाणे हळूहळू तो मरगळू लागला–गलितगात्र झाला! अर्धमेला होऊन आता तो अगदी दीनस्वराने म्हणू लागला–"देवा, मी अज्ञानाने तुझा महिमा ओळखू शकलो नाही. तू तर सर्वेश्वर आहेस! मी पाप्याने रागात येऊन तुझ्या पवित्र शरीरावर दंश केले! तू माझ्या गर्वाचे, माझ्या अहंकाराचे दमन केले आहेस, आता माझ्यावर कृपा करून मला क्षमा कर. माझे सारे विष उतरून गेले आहे आणि आता माझी बुद्धीही ठिकाणावर आली आहे. मी आता तुझा दास आहे, तुझी कोणतीही आज्ञा मी पाळीन. तुझ्या चरणस्पर्शाने मी आता पवित्र झालो



आहे. तुझा क्रोध मला अनुग्रहच ठरला आहे."

कालियाचे हे अंतःकरणापासून केलेले निवेदन ऐकून कृष्णाच्या मनात त्याच्याबद्दल दया उत्पन्न झाली. त्याने कालियाला उद्देशून म्हटले–"ऐक कालिया. यापुढे तुला यमुना नदीत रहाता येणार नाही. तू आपल्या परिवारासह आत्ताच्या आत्ता समुद्रात निघून जा. तुझ्या विषामुळे यमुनेचे पाणी कलुषित झाले आहे. ते सर्व आता जेव्हां वाहून जाईल तेव्हा ही नदी निर्मल होईल आणि तिचे पाणी जनतेला व गुराढोरांनाही उपयुक्त होईल. तुझ्या शिरावर माझ्या पायांनी उमटलेले चिन्ह पाहून गरुड कधीही तुझ्या वाटेस जाणार नाही–हा वर मी तुला देत आहे."

मग काय? कालिया ताबडतोब आपल्या परिवारासह समुद्राकडे जाण्यास निघाला. यानंतर कृष्ण यमुनेच्या पाण्याबाहेर आला. त्याच्या आईवडिलांनी त्याला हृदयाशी धरून अनेक आशिर्वाद दिले. कृष्णाने त्यांना वंदन केले. इतर सर्व गोपाळांनी कृष्णाला घेरून त्याची तोंड भरून स्तुति केली आणि त्याच्या या अद्भुत कार्याबद्दल आश्चर्य प्रकट केले.

गोपाळांच्या प्रमुख व्यक्तींना तो देवासारखाच दिसला. व तेही त्याची स्तुति करू लागले–"असे बल, साहस व पराक्रम अन्यत्र दुर्लभच. कृष्णा, तुझा महिमा सर्व जगात स्तुति-योग्य आहे. आमच्या खिल्लारांचा व आमचाही तूच रक्षक आहेस. तुझ्या कृपेमुळेच गायी सर्वत्र मुक्तसंचार करू शकतात. आता त्या नदीत उतरून स्नान करायला ऋषिमुनींना कोणताही धोका, कोणताही प्रत्यवाय रहाणार नाही. तुझे हे वैशिष्ट्य आजपर्यंत आमच्या लक्षातच आले नाही." असे म्हणून त्या सर्वांनी कृष्णाला प्रदक्षिणा घातली.

कृष्णानेही सर्वांचा यथोचित परामर्श घेतला. नंतर तो अन्य सर्व लोकांबरोबर गोकुळात परतला.

थोडे दिवस व्यतीत झाले. आता आसपासच्या जनावरांना चरण्यायोग्य चारा संपून गेला. राने उजाड झाली. कृष्णाने इतर गोपाळांशी याबाबत चर्चा केली. त्यावेळी एक अनुभवी वृद्धाने एक उपयुक्त बातमी दिली.

गोवर्धन पर्वताच्या उत्तर बाजूला कालिन्दी नदीजवळ एक अत्यन्त विशाल असे तालवृक्षांचे वन आहे. त्यात हिरवे गवत विपुल आहे. परंतु त्या वनात धेनुक नावाचा एक राक्षस गाढवाच्या रूपात रहातो. त्यामुळे त्या वनात जायला कोणी धजत नाही.

ही बातमी ऐकून बलराम व कृष्ण यांच्यात एकदम उत्साह संचरला! त्या दोघांनी काही साहसी गोप सवंगड्यांना म्हटले–"आपल्या जनावरांना चांगला भरपूर चारा मिळणार असेल तर त्या राक्षसाची 'ऐसी की तैसी!' आपण काय त्याला भिऊन गप्प बसायचे? चला निघू या तिकडेच!" झाले! सर्वजण गायींना हाकत त्या तालवनाकडे निघाले. तालवनात सर्वत्र हिरवेगार गवत डुलत होते, हरळीची हिरवळही पसरली होती! ते लुसलुशीत गवत पाहून गायी घाईघाईने त्यावर तुटून पडल्या! कृष्ण-बलराम व इतर गोपही त्या गवतात आनंदाने विहार करू लागले.



त्या वनाची शोभा पाहून कृष्ण अत्यंत प्रसन्न झाला. जणू काही पाताळातून निघून आकाशाशी स्पर्धा करणारे ते श्यामवर्णाचे तालवृक्ष त्यांच्या नागफण्यांसारख्या दिसणाऱ्या माथ्यांमुळे आपली फणा पसरून डोलणाऱ्या नागांसारखे दिसत होते. त्यामुळे दर्शकांचे मन त्यांच्याकडे आपोआपच आकृष्ट होत होते. त्यांच्या लाल-काळ्या फळांचा सुगंध आसमंतात दरवळत होता. त्या झाडांकडे पहात कृष्ण बलरामाला म्हणू लागला–"दादा, तू झाडांवर चढून फळे काढ ना! मला ती फळे खायची फार इच्छा झाली आहे. आपल्या गायींनाही आपण ही फळे खायला घालू."



"कृष्णा, झाडांवर चढून फळें काढायला फार वेळ लागेल. असे कर, मी झाडांची खोडे धरून झाडे हलवतो. खूप खूप फळे खाली पडतील. तुम्ही लोक ती वेचून घ्या. ठीक आहे?" असे म्हणून एकेका झाडाजवळ जाऊन बलराम झाडे हलवू लागला अन् 'टपाटप' आवाज करीत फळे खाली पडू लागली.

फळे पडण्याचा हा आवाज ऐकून धेनुकासुर खवळला. गाढवाच्या रूपात वावरणारा तो भयानक राक्षस आपल्या-सारखेच असणारे एक हजार अनुचर बरोबर घेऊन कृष्ण-बलरामांच्या दिशेने चाल करून आला! हा प्रकार पाहून त्यांच्या बरोबर आलेले गोप आपादमस्तक थरकापून गेले!

एकाच वेळी इतक्या मोठ्या संख्येने धावणाऱ्या गाढवांच्या पायांमुळे जी धूळ उडाली, तिच्यामुळे आकाश कोंदून अंधार पसरला! त्यांच्या रेकण्याच्या आवाजाने आसमंत निनादून उठला! त्या गर्दभ-सेनेच्या आघाडीला धेनुकासुर छाती फुगवून मस्त चालीने येत होता! रिकाम्या हातां-नीच बलराम त्याची वाट अडवून उभा राहिला. सर्वजण श्वास रोखून पुढे काय घडते हे पहात उभे राहिले, धेनुक बलरामाच्या जवळ पोचल्याबरोबर त्यानें एकदम उलट फिरून मागच्या खुरांनी बलरामाच्या छातीवर लाथ मारण्यासाठी पाय उडवले, तोच बलरामाने हवेतल्या हवेतच त्याचे दोन्ही पाय घट्ट पकडून त्याला तसाच उचलून उंच फेकून दिले! त्याच्या शरीराची ताडवृक्षाशी टक्कर होऊन त्याची हाडे ठिकठिकाणी मोडली व इतक्या उंचीवरून धाडकन खाली कोसळून धेनुका-सुर मरून पडला! त्या धक्क्याने अनेक फळेही जमिनीवर पडली!

एवढ्याने बलरामाचे समाधान झाले नाही. त्याने इतर राक्षसी गाढवेही उचलून फेकण्याचा सपाटा लावला. आता कृष्णही त्या खेळात सामिल झाला. बलरामाचे

अनुकरण करीत त्यानेही अनेक गाढवांचे मागचे पाय धरून त्यांना हवेत भिरकावून द्यायला सुरुवात केली. ते राक्षस भराभर मरू लागले. मग काय! सारे ताडवन राक्षसांच्या प्रेतांनी आणि ताडफळांनी भरून गेले! इतका वेळ हा संहार आश्चर्याने पहात उभ्या असलेल्या गोपाळांनी आता त्या दोघांना घेरले व ते त्यांच्या पौरुषाची स्तुति करू लागले. राक्षसांच्या मृत्युमुळे ते तालवन आता निरापद झाले.

आणखी एक वेळची घटना आहे–एकदा गोपाळ भांडीर वटवृक्ष-प्रदेशात आपल्या गायी चारत होते. त्यावेळी प्रलंब नावाचा एक राक्षसही गोपाळाचे रूप घेऊन त्यांच्यात सामील झाला. सर्व गोपाळांनी हरीण-क्रीडा नावाचा खेळ खेळायचे ठरवून मुलांच्या जोड्या-जोड्या केल्या. कृष्ण व त्याचा मामेभाऊ यांची एक जोडी झाली, तर प्रलंब व बलराम यांची एक जोडी झाली. या सर्व जोड्या फोडून गोपाळांचे दोन गट तयार झाले–अर्धे गडी कृष्णाच्या बाजूला तर अर्धे श्रीधामाच्या बाजूला. खेळ असा होता–भांडीर वटवृक्ष ही सीमा धरून हरणासारखे उड्या मारत तेथपर्यंत सर्वांनी पळायचे. हरलेल्या पक्षातील गड्यांनी नंतर जिंकलेल्या पक्षातल्या आपल्या जोडीदाराला आपल्या पाठीवर उचलून घेऊन सीमेपर्यंत चालण्याची शिक्षा भोगायची. या खेळात कृष्णाचा पक्ष जिंकला.

आता शिक्षा भोगायची म्हणून प्रलंबाने बलरामाला पाठीवर घेतले. पण ठरलेली दिशा सोडून तो बलरामाला दुसरीकडेच घेऊन गेला. त्याने ओरडून कृष्णाला आपली परिस्थिति सांगितली. कृष्णाने त्याला सांगितले–"दादा, अरे पहातोस काय! मार त्याला ठोसा, अन् पाठव यमसदनाला!" दुसऱ्याच क्षणी बलरामाने आपली मूठ आवळून एकच जबरदस्त मुष्टिप्रहार प्रलंबाच्या मस्तकावर केला. त्या प्रहाराने मस्तक फुटून राक्षस जमिनीवर मरून पडला. प्रलंबाच्या वधानंतर बलरामाला 'बलदेव' हे नाव मिळाले.





# एक रुपया

घनश्याम नावाचा एक माणूस होता.

कित्ती मेहनत केली तरी त्याचं डोकं कधी अडचणीतून वर येतच नसे! एका श्रीमंत माणसाने त्याचे पैसे हडप केले. त्याने मग दुसऱ्या एका श्रीमंत माणसाकडून पैसे कर्जाऊ घेतले तर त्याची बायकोच आजारी पडली! कर्जाऊ घेतलेली रक्कम औषधपाण्यातच खर्च झाली!

परिणामतः घनश्याम खूपच कर्जबाजारी झाला. त्याला जगण्याचा कंटाळा आला. एक दिवस बायकोला न सांगताच तो घराबाहेर पडला. गावाबाहेरील तलावात उडी मारून जीव द्यायचे ठरवले त्याने.

जाता जाता रस्त्यात त्याला एक संन्यासी बाबा भेटला. त्याने घनश्यामला पहाताच म्हटले–"इकडे ये रे बाबा, जरा माझे पाय दाबतोस का? तू मागशील ते देईन मी!"

घनश्यामच्या मनात पहिल्यापासूनच साधुसंन्याशांबद्दल आदर होता, म्हणून त्याने ठरवले की या संन्याशाची सेवा करून मगच जीव द्यायला जावे. तो म्हणाला–"स्वामीमहाराज, मी आपली सेवा जरूर करीन."

नंतर संन्यासी आराम करण्याकरता रस्त्याच्या कडेला एका झाडाखाली आडवा झाला. घनश्यामने थोडा वेळ त्याची चरणसेवा केली. संन्याशाने संतुष्ट होऊन त्याला म्हटले–"तू काहीही माग. मी नक्की देईन तुला."

"महाराज, मी थोड्या वेळाने मरणार आहे, माझ्या मनात कसली इच्छा असणार?"

संन्याशाने त्याची सर्व हकीकत विचारून घेतली व म्हणाला–"एवढ्याश्या गोष्टीवरून तू मरायला निघालास? मी तुझी

"वसुंधरा"



"गरीबी दूर करतो. हे घे." असे म्हणून त्याने आपल्या झोळीतून थोडेसे भस्म काढून घनश्यामला दिले.

"महाराज, मोठमोठ्या श्रीमंतांनी दिलेल्या पैशांनीही माझे दारिद्र्य फिटले नाही–इतक्याश्या भस्माने काय होणार माझे?" घनश्यामने निराशेने म्हटले.

संन्यासी हसून त्याला म्हणाला–"तुझ्या-वर लक्ष्मीचा वरदहस्त नसल्यामुळे तुझ्या हातात पैसा टिकत नाही. तू दहा दिवस लक्ष्मीच्या तसबिरीची पूजा कर म्हणजे तुझे कष्ट संपतील."

घनश्यामला खूप आनन्द झाला, पण त्याच बरोबर त्याच्या मनात एक शंकाही आली–संन्याशाने जे मूठभर भस्म दिले आहे, त्याने दहा दिवस पूजा कशी करता येईल? ते तर एका दिवसाच्या पूजेतच संपून जाईल!

त्याची अडचण ओळखून हसत संन्यासी म्हणाला–"मी तुला जे भस्म दिलं आहे ते साधंसुधं भस्म नव्हे. ते एक खास पवित्र भस्म आहे. पूजे साठी याचा जितका वापर करशील, तितके हे कमी नाही होणार, वापर करूनही नेहमी तुझ्याजवळ पुन्हा तितकेच भस्म शिल्लक राहील–अक्षय भस्म आहे हे! दरिद्र्यामुळे पिडलेल्या कोणाला तू हे भस्म दिलेस तर त्याचे दारिद्र्य नाहीसे होईल! पण एक गोष्ट लक्षात ठेव–पैशाच्या लोभात पडून जर कोणी याचा पूजेसाठी उपयोग केला तर त्याला धन मिळायची गोष्ट दूरच, पण त्याच्या जवळ असलेलं धनही नाहीसं होईल. अन् त्याच्याजवळ केवळ भस्मच उरेल!"

संन्याशाला प्रसन्नतापूर्वक नमस्कार करून ते भस्म घेऊन घनश्याम घरी आला. त्याने आपल्या बायकोला सर्व कहाणी सांगितली. ती ऐकून घनश्यामची पत्नी खुश झाली. तिने एका तांब्याच्या भांड्यात ते भस्म नीट जपून ठेवले. पण पूजा करण्यासाठी त्यांच्या घरात लक्ष्मीची तसबीर नव्हती. त्यांच्या घरासमोर एक श्रीमंत माणूस रहात असे. तसबीर मागायला घनश्याम त्याच्याकडे गेला.

तसबीर कशासाठी हवी हे विचारून त्या माणसाने–श्यामलालने–घरात जाऊन त्याला तसबीर आणून दिली आणि म्हटले–"हे बघ घनश्याम, या तसबिरीची काच एक वर्षापूर्वी फुटली. भस्माने जर तू हिची पूजा करणार असलास तर ती खराब होईल अशी मला भीती वाटते. तसे झाले तर मला नवी तसबीर द्यावी लागेल तुला. कबूल?"

श्यामलालची अट कबूल करून तसबीर घेऊन घनश्याम घरी परत आला. श्यामलालची अट कळल्यावर घनश्यामची पत्नी म्हणाली–"आपल्याला कदाचित् पुन्हा अशी नवीन तसबीर बाजारात मिळायची नाही. शिवाय इतकी सुंदर तसबीर भस्म टाकून खराब कशाला करायची? त्यापेक्षा आपण तिला काच बसवून आणू."

बायकोच्या सांगण्यावरून घनश्याम तसबीर घेऊन फ्रेम-मेकर कडे गेला. त्याने म्हटले–"काच बसवण्याचा मी एक रुपया घेईन. तुझ्याकडे पैसे नसले तर माझ्याकडे ओळीने दहा दिवस काम कर, तरच मी या तसबिरीला काच बसवून देईन."

दुकानदाराची अट ऐकून घनश्यामने त्याच्याकडे काम करायचे कबूल केले, कारण काच बसवण्यासाठी लागणारा एक रुपया सुद्धा घनश्यामजवळ नव्हता! दुकानदाराने पाच दिवस घनश्यामकडून काम करून घेतले. नंतर तो म्हणाला–





"हे बघ, सध्या माझ्याजवळ तुझ्याकडून करून घेण्यासारखे काम नाही, तेव्हां तू दोन दिवसांनी पुन्हा कामाला ये."

परंतु दोन दिवसांनी तो पुन्हा जेव्हा कामाला गेला, तेव्हा दुकानदार त्याला म्हणाला—"माझी अट लक्षात आहे ना? तू माझ्याकडे लागोपाठ दहा दिवस काम करायला हवेस. पण पाच दिवस काम झाल्यावर पुढले दोन दिवस काही तू काम केलेले नाहीस. तेव्हा आजपासून पुन्हा दहा दिवस लागोपाठ काम करायला हवे तुला, काय?"

घनश्यामने ओळखले की फ्रेम-मेकरच्या अटीप्रमाणे त्याच्याकडे काम पुरे करणे या जन्मात काही शक्य होणार नाही! त्यामुळे त्याचा नाद सोडून एक रुपया मिळवण्या-साठी तो दुसऱ्या एकाकडे गेला.

तो माणूस म्हणाला—"माझ्या घरामागे एक वारूळ आहे, त्यांत साप भरलेले आहेत. ते वारूळ फोडून सर्व साप तू मारून टाकलेस तर मी तुला एक रुपया देईन."

"हे काम नाही मला जमणार. तुम्ही एकाद्या गारुड्याला बोलवा त्यासाठी." घनश्याम म्हणाला.

"मग मी हा रुपया त्या गारुड्यालाच देईन." त्या माणसाने म्हटले.

"हा तर फारच अन्याय आहे." घनश्याम म्हणाला.

"तुझ्या घरासमोरचा श्यामलाल तर चांगला धनवान आहे. पण तो सुद्धा एक रुपया खर्च करून वर्षभरात तसबिरीला काच घालू शकला नाही. मी काही तितका श्रीमंत नाही. गरीबच आहे मी ही, फुकटच रुपया कसा देऊ तुला?" तो माणूस म्हणाला.

शेवटी निरुपाय होऊन घनश्याम साव-काराकडे गेला.

माणिकराम सावकार महादुष्ट होता. घनश्यामाची कहाणी ऐकून त्याने आपली नवी अट ऐकवली—"मी तुला एक रुपया देऊन तुला मदत करीन, पण माझी अट ऐक—एक महिन्याच्या आत तू मला मुद्दल परत करायचेस अन् व्याज म्हणून रुपयाला रुपया द्यायचा. अट पूर्ण न केलीस तर तू अन् तुझी बायको—दोघांनाही जन्मभर माझ्या घरी गुलाम म्हणून रहावे लागेल, कबूल आहे?"

ही अट घनश्यामला अन्यायकारक वाटली म्हणून त्याने घरी जाऊन बायकोला सर्व हकीकत सांगितली.

बायको धीर देत घनश्यामला म्हणाली—"आपल्याला आता कोणी माणूस यातून वाचवू शकणार नाही हे तर नक्कीच झाले—आता केवळ देवच आपला पाठी-राखा! संन्याशाचे म्हणणे खरे असेल तर दहा दिवसात आपली गरिबी नाहीशी होईल. तेव्हा तुम्ही जा अन् माणिकरामची अट मान्य करा."

नंतर घनश्यामने माणिकरामकडून एक रुपया घेऊन तो फ्रेम-मेकरला दिला. त्याने ताबडतोब काचही बसवून दिली. नंतर दहा दिवस पर्यंत घनश्यामने त्या तसबिरीची भस्माने पूजा केली. शेवटच्या दिवशी घरामागे झाडाला आळे खोदत असताना कुदळ कशावर तरी आपटून 'खणखण' असा आवाज आला! तेथे नीट खोदून पाहिले तेव्हा घनश्यामला सोन्याच्या नाण्यांनी भरलेले दोन हंडे त्या खड्यातून मिळाले.

मग काय, घनश्यामचे दारिद्र्य नाहीसे झाले! त्याने आपली सर्व कर्जे चुकवली.










नंतर समोर रहाणाऱ्या श्यामलालला ती तसबीर काच काढून घेऊन त्याने परत नेऊन दिली.

ते पाहून चकित होऊन श्यामलालने विचारले–"कायरे, काचेसह ही तसबीर मला दिली असतीस तर तुझी संपत्ति काय घटली असती होय? वाटलं नव्हतं की तू इतका स्वार्थी असशील?"

यावर घनश्याम नम्रतेने बोलू लागला–"श्यामलाल, तुम्ही तुमच्या पैशांनी हिला काच घालून पूजा केलीत तर तुम्हाला त्याचे पूर्ण फळ मिळेल. पूजा सुरू करण्या-पूर्वी तुम्ही मला कळवलंत तर मी तुम्हाला ते सामर्थ्यवान् भस्मही देईन."

हे ऐकून चिडून श्यामलाल म्हणाला–"तुला माहीत आहे ना, की ज्यांना जरूर नाही अशांनी पूजा केली तर त्याची असलेली सर्व संपत्तीही नाहीशी होते? माझी संपत्ति नाहीशी व्हावी अशी इच्छा आहे काय तुझी? तुला तसबीर दिली याचे चांगले पांग फेडतो आहेस की!"

घनश्याम भोळेपणाने म्हणाला–"महा-राज, तसबिरीची काच फुटली तर वर्षभर काही आपण नवी काच बसवली नाही तिला! मी ती उसनी मागितली तरी आपण काही तिला काच घालून दिली नाही! त्यामुळे मला वाटले की आपणही गरीबीच्या परिस्थितीत आहात."

हे ऐकून श्यामलालला वाटले की आपले डोकेच कुणी उडवून टाकले आहे! केवळ एक रुपया मिळवण्यासाठी घनश्यामला किती कष्ट झेलावे लागले याबद्दल त्याने ऐकले होते!

या अनुभवानंतर मात्र श्यामलाल एक गोष्ट शिकला की कोणाला मदत केली तर ती अशी करावी की मदत घेणाराला तिचा ताबडतोब उपयोग व्हावा!

गरजेच्या वेळी एका रुपयासाठीही एकादा माणूस दुसऱ्याला कसा त्रास देतो याचा अनुभव असल्यामुळे दुसऱ्यांना यथा-शक्ति मदत करीत घनश्यामने ही आपले आयुष्य सुखाने व्यतीत केले.






# 'सप्रेम भेट'

काश्मीर मधे एक खानदानी पंडित होता. त्याचे नाव शिवदास. त्याची आर्थिक स्थिती अगदी बेताची.

या पंडिताला अतिशय सुंदर अशी मुलगी होती. वैशाली तिचे नाव. वैशाली साठी कित्येक स्थळे सांगून आली, पण शिवदास तिचा विवाह योग्य तऱ्हेने करून देण्याच्या परिस्थितीत नव्हता.

काही भ्रामक समजुतीमुळे शिवदास व सुंदर यांच्यात वितुष्ट आले होते. हे दोघे प्रथम एकमेकांचे फारच चांगले मित्र होते. एकदा सुंदरने शिवदासकडे एक मोठी रक्कम उधार मागितली. मोठ्या खुबीने आपली निर्धनता–आपली खरी परिस्थिती मित्राला सांगून पैसे देऊ शकत नसल्याबद्दल शिवदासने सुंदरजवळ माफी मागितली. परंतु 'शिवदासने खोटे सांगून आपला अपमान केला' अशी सुंदरची समजूत झाली आणि सुंदरने याबद्दल शिवदासचा सूड उगवण्याची एक योजना बनवली.

त्याने एका चोराशी–मंगलसिंह डाकूशी दोस्ती जमवली. नंतर त्याने पंडित शिव-दासची सर्व संपत्ति लुटायचा सल्ला मंगलसिंहला दिला. त्याने आनन्दाने या गोष्टीला मान्यता दिली.

एके दिवशी रात्री पंडित झोपण्याच्या प्रयत्नात असताना त्याच्या पत्नीने त्याला म्हटले–"अहो, वैशालीसाठी कित्ती स्थळे सांगून येत आहेत, अन् तुम्ही आपले ढिम्म बसून आहात! आपल्या योग्य अशा एकाद्या स्थळाशी बोलणी का नाही करत तुम्ही? मला तर काही कळत नाही–तुम्ही का चालढकल करीत अहात या बाबतीत ते!" खरे म्हणजे शिवदासच्या बायकोलाही आपल्या खऱ्या परिस्थितीची काहीच कल्पना नव्हती.









"तुझं म्हणणं ठीक आहे ग! पण खरी गोष्ट अशी की वैशालीच्या लग्नासाठी खर्चायला मजजवळ पैसेच नाहीत. बाहेर आपला आब कायम रहावा म्हणून खोटचा प्रतिष्ठेच्या मागे लागून मी आतापर्यंत आपल्या ऐपतीबाहेर खर्च करीत राहिलो. आता अशी परिस्थिती आहे की आपला संसाराचा गाडा रेटायला सुद्धा मला कुठून तरी कर्ज काढायला हवे! आता तूच सांग की वैशालीच्या लग्नाची सोय मी कशी करूं?" पंडिताने प्रथमतःच बायकोला खऱ्या परिस्थितीची कल्पना दिली.

"अरेरे! काय ही दुर्दशा झाली आपली! इतकी वर्षे डामडौलानें राहिलो अन् आत्ताच ही पाळी यावी?" .असे म्हणत शिवदासची बायको रडू लागली, तिचे रडणे पाहून त्यालाही आपला शोक आवरेनासा झाला!

पतिपत्नींमधला हा संवाद मंगलसिंहने एका खांबा–आड उभा राहून ऐकला. तो नेमका त्याच रात्री शिवदासचे घर लुटायला आला होता. मुख्य दरवाजा बंद होण्यापूर्वीच तो वाड्यात घुसून लपून बसला होता. शिवदासच्या संपत्तिबद्दल सुंदरने खोटेच सांगितले हे त्याच्या लक्षात आले! त्याला सुंदरचा .फारच राग आला. शिवदास व त्याची बायको झोपेपर्यंत तो बाहेर पडू शकत नव्हता. नंतर मात्र मंगलसिंह हळूच पळून गेला.

दुसऱ्या दिवशी सुंदरने मंगलसिंह डाकूची बराच वेळ वाट पाहिली, पण तो आलाच नाही! उलट त्याच्या असे लक्षात आले की रात्री त्याचेच घर कोणीतरी लुटले होते! घरातले सर्व दागिने अदृश्य झाले होते!

इकडे त्या दिवशी सकाळी शिवदास व त्याच्या पत्नीला जाग आली, तेव्हां त्यांनी पाहिले की आपल्या डोक्याशी दागिन्यांनी भरलेली एक थैली पडलेली आहे! त्यांना खूपसे दागिने आणि चांदीची नाणी भरलेली आढळली! त्याबरोबरच त्यांना एक चिट्ठी ही मिळाली. त्या कागदाच्या तुकड्यावर लिहिले होते–'आपल्या कन्येच्या विवाहासाठी सप्रेम भेट....चोराकडून!'





# वधू

एका गावात मोहनलाल नावाचा जहागीरदार रहात होता. त्याचा महाल खूप मोठा होता, सोन्या-चांदीची भांडी-दागिने त्याच्याकडे खूप होते. जमीन-जुमलाही अफाट होता. कमतरता फक्त एकाच गोष्टीची होती–त्याची बायको स्वर्गवासी झाली होती–विधुर होता तो!

एके दिवशी शेजारी रहाणाऱ्या विठू शेतकऱ्याची मुलगी यशोदा त्याच्याकडे घरकामाला आली. यशोदा तरुण अन् सुंदर होती. जहागीरदारचं मन तिच्याकडे आकृष्ट झालं.

त्याने विठू शेतकऱ्याला बोलावणे पाठवले. तो आल्या वर जहागीरदार त्याला म्हणाला–"हे पहा विठू, तुझी मुलगी माझ्या मनात भरलीय. तू तिला माझ्याशी लग्नाला तयार कर. मी तुझं सगळं कर्ज माफ करीन. इतकंच काय, पण तुझ्या शेताला लागून असलेली माझी जमीनही मी तुला देईन."

"माझी मुलगी अडाणी आहे. तिला आपलं हित-अहित अजून कळत नाही. मी तिचं मन वळवीन." असं वचन जहागीरदाराला देऊन विठू आपल्या घरी निघून गेला. पण साम-दाम-दण्ड हे सर्व उपाय करूनही विठू आपल्या मुलीला जहागीर–दाराशी लग्न करायला तयार करू शकला नाही. यशोदेने साफ सांगून टाकलं–"जहागीरदाराने माझ्या वजनाच्या बरोबरीने सोनं दिलं तरीही मी मुळीच त्याच्या बरोबर लग्न करणार नाही."

असेच दिवस जात राहिले. विठू कडून काही उत्तराची अपेक्षा करता करता मोहनलाल कंटाळून गेला. त्याने शेतकऱ्याला पुन्हा बोलावून घेऊन विचारले–"मुलीला लग्नासाठी तयार करायचं वचन



दिलं होतंस ना? काय झालं त्याचं? मी किती दिवस वाट पाहाणर? लवकर काहीं तरी निर्णय घे. नाहीतर मीही माझा काय तो निर्णय घेईन."

विठूला बिचाऱ्याला काय करावे सुचेना. शेवटी एक पक्का विचार करून तो म्हणाला—"माझ्याकडून काही उशीर नाही. तुम्ही लवकरच आपली तयारी करा."

"म्हणजे? कबूल झाली यशोदा?" जहागीरदाराला तर आता आनन्दाच्या उकळ्या फुटू लागल्या.

"तिच्या कबूल होण्या न होण्याचा काय प्रश्न? तुम्ही मुहूर्त ठरवून मला कळवा. काही महत्वाचं काम आहे असं सांगून मी तिला तुमच्याकडे पाठवून देईन आणि तुम्ही चटकन तिच्या गळ्यात मंगळसूत्र अडकवून मोकळे व्हा!" विठूने उपाय सांगितला.

जहागीरदारालाही हा उपाय रुचला. त्याने लग्नाची जोरात तयारी सुरू केली. नातेवाईक व मित्रांना निमंत्रण केलं. पुरोहितांसुद्धा सर्वजण लग्नाच्या दिवशी वेळेवर हजर झाले. जहागीरदाराने आपल्या एका नोकराला बोलावून सांगितले—"हे बघ, इथे जवळ तो विठू शेतकरी रहातो ना, त्याच्याकडे जा. त्याने काहीतरी पाठवायचं कबूल केलं होतं. त्याला विचारून घेऊन ये ते."

नोकर विठूकडे जाऊन म्हणाला—"विठूबाबा, नमस्कार. तुम्ही आमच्या साहेबांकडे काही पाठवण्याबद्दल म्हणाला होता ना? आत्ता ते घेऊन जाण्यासाठी आलो आहे मी."

"हे बघ ती समोर ओसाड जमीन आहे बघ, तिथे आहे ते. घेऊन जा तू." शेतकरी म्हणाला.

नोकर आता त्या जमिनीकडे पळत सुटला. गवत कापत असलेली यशोदा त्याला दिसली. तिला तो म्हणाला—"आमच्या जहागीरदार–साहेबांकडे तुझ्या वडिलांनी काही पाठवायचं सांगितलं आहे.





मी आत्ता बरोबर न्यायला आलो आहे."

ही काही तरी बनवाबनवी आहे हे यशोदेने ताडलं. नक्कीच आपल्या वडिलांनी अन् जहागीरदाराने काही कारस्थान रचलं असावं! पण चेहऱ्यावर काही दिसू न देता ती नोकराला म्हणाली—"ओहो, बहुतेक त्या काळ्या घोडीच्या तट्टाबद्दल असेल, ते बघ, तिथे बांधांजवळ बांधून ठेवलंय तिला! दोरी सोड अन् जा घेऊन!"

नोकर बांधाजवळ गेला, तिथे बांधलेलं तट्टू सोडून तो त्याच्यावर स्वार झाला अन् तिला वेगाने पळवत जहागीरदाराच्या घरी घेऊन गेला. नोकराला पहाताच उतावळ्या मोहनलालने त्याला विचारलं—"अरे आणलंस का तिला?"

"होऽ! दरवाज्याशी उभी आहे." नोकर म्हणाला.

"अरे, मग वरच्या मजल्यावर घेऊन जा तिला." जहागीरदाराने आज्ञा दिली.

"काय म्हणलात? माडीवर घेऊन जाऊ? हे कसं माझ्याच्याने होईल?" नोकराने आश्चर्याने विचारलं.

मोहनलालला वाटलं वधू हट्ट करत असेल, म्हणून मदतीला आणखी कुणाला पाठवणं ठीक होईल. असं वाटून तो नोकराला म्हणाला—"अरे तुला एकट्याने नसेल जमत तर आणखी कुणाला मदतीला घे, पण लौकर आटप बाबा."












मग काय झालं, नोकर व आणखी काहीजणांनी मिळून त्या तट्टाला-छोट्या घोडीला—मागून ढकलून अन् पुढून खेचून कसंबसं माडीवर नेलं.

"माडीवर पोचवलं बरं का! फारच त्रास झाला बुवा!" नोकराने जाऊन सांगितलं.

"आता काही बायकांना तिला सजवायला सांगा-नाहीतर तुमची इतकी मेहनत फुकट जाईल." जहागीरदाराने पुढची आज्ञा सोडली.

"काय सांगता मालक?" नोकराला आश्चर्य वाटले.

"अरे, आता आणखी काही बोलू नको. सांगितलं तसं कर पाहू! तिला साडी नेसवून दागिने वगैरे चढवून सजवा लौकर. हार अन् मंगळसूत्र विसरू नका हं!" जहागीरदार म्हणाला.

नोकराने दासींना जाऊन सांगितलं—"तुम्ही सर्वांनी मिळून या तट्टाला नवरीसारखं सजवा. मालकांची आज्ञा आहे. तिला पहाणाऱ्या सर्वांची पोटं हसून हसून दुखून गेली पाहिजेत."

दासींनी त्या तट्टाला छानपैकी 'नवरी' बनवलं. नोकराने खाली जाऊन मालकाला सांगितलं—"हुजूर, सर्व जय्यत तयार आहे."

"वा, वा, शाबास! मग आता पाहता काय? तिला लवकर खाली आणा ना!" उत्साहाने जहागीरदार म्हणाला.

जिन्याच्या पायऱ्यांवर घोड्याच्या टापांचा आवाज झाला. घोडी जिना उतरून मांडवात आली अन् सर्व निमंत्रित पाहुणे अन् नातेवाईक मंडळी गडगडून हसू लागली! सगळीकडे एकच गोंधळ माजला. ती घोडीही एकूण सर्व प्रकाराने बिथरून उधळली अन् मांडवातून सुसाट पळून गेली!

अशा प्रकारे जहागीरदाराचा दुसरा विवाह सुरू होण्यापूर्वीच मोडला.

लग्नाला जमलेली मंडळी चट्टामस्करी करत आपापल्या ठिकाणी निघून गेली.

एवढ्या फजितीनंतर जहागीरदाराने दुसऱ्या लग्नाचे कधी नावही काढले नाही!





## लहान तोंडी मोठा घास



रॉबिन पक्षी दररोज १४ इंच (४.२६ सें.मी.) लांबीचे किडे खातो. बारा तासांच्या अवधीत तो आपल्या शरिराच्या वजनाच्या ४१ टक्के अधिक इतके अन्न खातो!

## उंच पर्वतरांगा



जगातील सर्वात उंच अशा वीस पर्वतरांगांपैकी १३ पर्वतरांगा हिमालयात अन् बाकी ७ काराकोरम जवळच्या पर्वतात आहेत.

## उंच उडणारे कावळे

लाल पाय असणारे काही कावळे समुद्रसपाटीपासून ५,२०० मी. (२६,९०२ फूट) इतक्या उंचीवर रहातात. खूपदा हे कावळे एव्हरेस्ट शिखर गाठू पहाणाऱ्या पर्वतारोही टोळ्यांना साथ देत उडताना दिसतात.

## स्पॉंज



स्पॉंज नावाचे एक समुद्री शेवाळे म्हणजे खरे पाहता शेकडो सूक्ष्म अशा समुद्री प्राण्यांचा समूहच असतो. समुद्राच्या तळाशी किंवा खडकांवर हे प्राणी कळप करून रहातात. यांची लांबी अनेकदा १ मि.मी. पासून १ मीटर पर्यंत आढळते.

## 'चांदोबा' यशस्वी स्पर्धकांचे अभिनन्दन करीत आहे

### महान भारतीय परंपरेसंबंधी स्पर्धा

**३**



















| | | |
|---|---|---|
| **नंदलाल भावराव खेर**<br>पोस्ट - ब्राह्मणगांव<br>जि. नासिक | **वीणा मुकुन्द डिके**<br>दव बिंदु सोसायटी<br>१७/१२, एरंडवणे | **भूषण अरुण गांवकर**<br>रामेश्वरनगर<br>खारेपाटण |





# व्यापाराची कला

शोभाकान्त नावाच्या एका चित्रकाराला एकदा तातडीने काही पैसे हवे होते. त्याने यासाठी आपले एक सुंदर चित्र विकायचे ठरवले. परंतु चार-पाच मुद्रांइतक्या किंमतीलाही कोणी ते चित्र विकत घ्यायला तयार नव्हते.

ही बातमी कळताच चित्रकाराचा गोविन्द नावाचा एक मित्र त्याच्याकडे आला आणि ते चित्र घेऊन गेला. लोकांचे जातायेता सहज लक्ष जाईल अशा जागीं त्याने ते टांगून ठेवले.

कोणी ते चित्र विकत घेण्याची इच्छा व्यक्त केली तर तो चिडून बोले–"मला हे चित्र विकायचेच नाही मुळी!" कोणा एका गावच्या जमीनदाराला हे वृत्त समजले तेव्हा गोविन्दकडे येऊन जबरदस्तीने त्याच्या हाती दोनशे मुद्रांची थैली अडकवून चित्र घेऊन गेला.

नंतर गोविन्द शोभाकान्तकडे जाऊन ती थैली शोभाकान्तला देऊ लागला; तेव्हा आश्चर्याने शोभाकान्तने विचारले–"मला हे पैसे तू का देत आहेस?"

"अरे, हे तर तुझ्याच चित्राचे पैसे." गोविन्द म्हणाला.

शोभाकान्तचा यावर विश्वास बसेना. त्याने आणखीच आश्चर्याने विचारले–"म्हणजे? माझ्या चित्राची इतकी खूप किंमत आली?"

गोविन्दने सारी हकिगत सांगून त्याला म्हटले–"अरे बाबा, नुसतं चित्र काढणं हीच फक्त कला आहे असं नव्हे,ते विकून दाखवणं ही सुद्धा एक कलाच आहे बरं का!"





# एका राणीची गोष्ट

कोणे एके काळी फ्रान्स देशात एक महाराणी राज्य करीत होती. तिचा महाल सुंदर संगमरवरी दगडांनी बांधलेला होता. महालाचे छत आतून बाहेरून चांदीने मढवलेले होते आणि महालातली प्रत्येक वस्तु सोन्याची होती. आणि त्यावर रंगीबेरंगी नवरत्ने सजवलेली होती. खरे पाहता ती राणी एक जादुगारीण होती. तिला आवश्यक त्या सर्व वस्तु क्षणभरात ती मिळवू शकत असे.

तिच्या जादूच्या शक्तीबाहेरची एकच गोष्ट होती–ती म्हणजे–एकाद्या सौंदर्यवती स्त्रीत ती स्वत:ला रूपान्तरित करू शकत नसे. आपल्या तरूणपणी ती दिसायला खूप सुंदर होती, पण आता ती इतकी कुरूप झाली होती कि तिला काही कामानिमित्त भेटायला येणारी माणसे तिच्याशी बोलतानाही तिच्याकडे न पहाता, आपला चेहरा दुसरीकडे वळवून बोलत असत! आपला सुरकुत्यांनी भरलेला चेहरा घेऊन दिवसभर खोकत-खोकत ती आपल्या महालात फिरे.

अशा परिस्थितीत त्या राणीला कधीही आरशात आपला चेहरा पहावासा वाटत नसे. तिचा चकणा डोळा तिच्या कुरूपतेत भरच घालीत असे. जरा बऱ्या दिसणाऱ्याही कोणा व्यक्तीशी तिला बोलावेसे वाटत नसे.

एके दिवशी पंचवीस वर्षांची एक तरुणी राणीकडे आली. ती दिसायला फारच सुंदर होती. तिचे नाव होते श्रद्धा.

श्रद्धाला आपल्या महालात पहाताच राणीच्या तळपायाची आग मस्तकात गेली. तिने ओरडून विचारले–"या मुलीला इथे कोणी आणले? कुणाची हिम्मत झाली असं करायला? ताबडतोब हिला इथून बाहेर घालवून द्या!"

वर्षा वामले

# व्यापाराची कला

शोभाकान्त नावाच्या एका चित्रकाराला एकदा तातडीने काही पैसे हवे होते. त्याने यासाठी आपले एक सुंदर चित्र विकायचे ठरवले. परंतु चार-पाच मुद्रांइतक्या किंमतीलाही कोणी ते चित्र विकत घ्यायला तयार नव्हते.

ही बातमी कळताच चित्रकाराचा गोविन्द नावाचा एक मित्र त्याच्याकडे आला आणि ते चित्र घेऊन गेला. लोकांचे जातायेता सहज लक्ष जाईल अशा जागीं त्याने ते टांगून ठेवले.

कोणी ते चित्र विकत घेण्याची इच्छा व्यक्त केली तर तो चिडून बोले—"मला हे चित्र विकायचेच नाही मुळी!" कोणा एका गावच्या जमीनदाराला हे वृत्त समजले तेव्हा गोविन्दकडे येऊन जबरदस्तीने त्याच्या हाती दोनशे मुद्रांची थैली अडकवून चित्र घेऊन गेला.

नंतर गोविन्द शोभाकान्तकडे जाऊन ती थैली शोभाकान्तला देऊ लागला; तेव्हा आश्चर्याने शोभाकान्तने विचारले—"मला हे पैसे तू का देत आहेस?"

"अरे, हे तर तुझ्याच चित्राचे पैसे." गोविन्द म्हणाला.

शोभाकान्तचा यावर विश्वास बसेना. त्याने आणखीच आश्चर्याने विचारले—"म्हणजे? माझ्या चित्राची इतकी खूप किंमत आली?"

गोविन्दने सारी हकिगत सांगून त्याला म्हटले—"अरे बाबा, नुसतं चित्र काढणं हीच फक्त कला आहे असं नव्हे,ते विकून दाखवणं ही सुद्धा एक कलाच आहे बरं का!"






कोणे एके काळी फ्रान्स देशात एक महाराणी राज्य करीत होती. तिचा महाल सुंदर संगमरवरी दगडांनी बांधलेला होता. महालाचे छत आतून बाहेरून चांदीने मढवलेले होते आणि महालातली प्रत्येक वस्तु सोन्याची होती. आणि त्यावर रंगीबेरंगी नवरत्ने सजवलेली होती. खरे पाहता ती राणी एक जादुगारीण होती. तिला आवश्यक त्या सर्व वस्तु क्षणभरात ती मिळवू शकत असे.

तिच्या जादूच्या शक्तीबाहेरची एकच गोष्ट होती—ती म्हणजे—एकाद्या सौंदर्यवती स्त्रीत ती स्वत:ला रूपान्तरित करू शकत नसे. आपल्या तरुणपणी ती दिसायला खूप सुंदर होती, पण आता ती इतकी कुरूप झाली होती कि तिला काही कामा-निमित्त भेटायला येणारी माणसे तिच्याशी बोलतानाही तिच्याकडे न पहाता, आपला चेहरा दुसरीकडे वळवून बोलत असत! आपला सुरकुत्यांनी भरलेला चेहरा घेऊन दिवसभर खोकत-खोकत ती आपल्या महालात फिरे.

अशा परिस्थितीत त्या राणीला कधीही आरशात आपला चेहरा पहावासा वाटत नसे. तिचा चकणा डोळा तिच्या कुरूपतेत भरच घालीत असे. जरा बऱ्या दिसणाऱ्याही कोणा व्यक्तीशी तिला बोलावेसे वाटत नसे.

एके दिवशी पंचवीस वर्षांची एक तरुणी राणीकडे आली. ती दिसायला फारच सुंदर होती. तिचे नाव होते श्रद्धा.

श्रद्धाला आपल्या महालात पहाताच राणीच्या तळपायाची आग मस्तकात गेली. तिने ओरडून विचारले—"या मुलीला इथे कोणी आणले? कुणाची हिम्मत झाली असं करायला? तावडतोब हिला इथून बाहेर घालवून द्या!"

वर्षा दामले

परंतु जराही विचलित न होता श्रद्धा म्हणाली–"महाराणी, मला मंत्रतंत्र माहीत आहे. मी आपलं सौंदर्य आपणाला देऊ शकते. काय विचार आहे आपला?"

हे बोलणे ऐकताच राणीच्या चेहऱ्या-वरच्या रागाची जागा प्रसन्नतेने घेतली. श्रद्धाकडे निरखून पहात तिने विचारले–"खरंच असं करायला तू तयार आहेस? या बदल्यात तुला माझ्याकडून काय हवे?"

"आपलं सर्व धन व आपला मुकुटही मला या बदल्यात हवा." श्रद्धा उत्तरली.

तिचे उत्तर ऐकून राणी रागाने गरजली–"काय म्हणालीस? तुला माझे धन आणि मुकुट हवा? वा ग वा! मी भले या कुरूप अन् म्हाताऱ्या अवस्थेत मरून जाईन, पण तू मागितलेल्या दोन्ही चीजा मी तुला कदापि देणार नाही. चल चालती हो इथून!"

श्रद्धा बिचारी निराश होऊन तिथून निघून गेली.

काही दिवसांनी राणी आजारी पडली. तिची सेवा करणाऱ्या दासी ही तिच्या-जवळ जायला कां-कूं करू लागल्या. राज वैद्याने तिला तपासून आपला निर्णय जाहीर केला की–राणी थोड्याच आठवड्यांची सोबतीण आहे!

आता राणीने तिच्याकडे पूर्वी येऊन गेलेल्या श्रद्धाचा शोध करवला. त्याबरोबरच तिने असाही निरोप कळवला की–'आता राणी आपली अपार संपत्ति अन् मुकुटही द्यायला तयार आहे!'

श्रद्धाने राणीकडे येऊन आपली शंका प्रदर्शित केली–"महाराणी, आपण जी संपत्ति अन् मुकुट मला देऊ करत आहात, ती जर आत्ता मी माझ्या सौंदर्य अन् तारुण्याच्या बदल्यात स्वीकारली तर मी ताबडतोब म्हातारी आणि अपंग होऊन जाईन. पूर्वी आपण माझी अट मानली नाही, पण आत्ता मात्र मला भीती वाटत आहे."

राणीने श्रद्धाची खूप स्तुति केली, खूप गोडगोड बोलून तिला राजी केले. दोघींच्यात समझोता झाला आणि क्षणभरातच दोघींची रूपे बदलून गेली!

राणी आता सुंदर आणि आकर्षक युवती बनली. तिचा देह शुद्ध सोन्यासारखा झळाळू लागला. तिच्या शरीरावरील तारुण्याचे तेज अन् डोळ्यातली चमक 'पहातच रहावे' अशी दिसू लागली! तिथले सर्वजण तिच्या सौंदर्यावर मोहित झाले. परंतु तिला मात्र आता एखाद्या खेड्यात जाऊन मोडक्या-तोडक्या झोपडीत रहाणे अन् अंगावर चिंध्या वागवणे भाग होते. तिची सर्व संपत्ति श्रद्धाकडे गेली होती!

इकडे श्रद्धा अगदीच कुरूप, घृणास्पद दिसू लागली होती, पण आता ती एका सुंदर राजवाड्यातली राणी बनली होती!

श्रद्धाने आपले रूप पहाण्यासाठी आरसा मागवून घेतला. पण आरशातलं आपलं रूप







तिला पाहवेना! तिने दोन्ही हातांनी आपला चेहरा झाकून घेतला! तिने ताबडतोब एक आज्ञा सोडली की–कोणीही तिच्या समोर येऊ नये! आता तिने आपल्या भोवतीच्या धनाच्या राशी पाहून आपल्या मनाला संतोष द्यायचा प्रयत्न केला! परंतु त्या धनराशी, ते वैभव, तो मुकुट तिच्या मनाच्या यातना घालवू शकले नाहीत.

यापूर्वी श्रद्धा आपल्या गावातल्या मैत्रिणींसह फुलांचे ताटवे व झाडांच्या सावल्यांबरोबर नाचत रहात असे, पण आता तिला काठीच्या आधारानेही उभे रहाणे कठीण होत होते! महालात विविध प्रकारचे उंची खाद्यपदार्थ आज्ञेसरशी हजर होण्याची शक्यता असून ही आता तोंडात दात नसल्यामुळे केवळ पातळ पदार्थांशिवाय ती अन्य काहीही खाऊ शकत नव्हती!

श्रद्धाला हळूहळू पश्चात्ताप वाटू लागला. राजमुकुट आणि संपत्तीच्या लोभाने आपण आपले तारुण्य व सौंदर्य राणीला देण्यात वेडेपणा केला – असे तिच्या लक्षात आले. ज्याचा आपण उपभोग घेऊ शकत नाही असे अपार धन काय उपयोगाचे–हे तिला पटले.

पूर्वी छान हसत-खेळत ती गायीं चरायला घेऊन जात असे. आता राज्यकारभारातल्या अडचणी समजून घेणे अन् त्या सोडवणे तिला कठीण जाऊ लागले. इकडे राणी ज्या गावी श्रद्धा रहात असे त्या गावी पोचली. आपले राज्य आणि राजवैभव नसल्यामुळे तीही दुःखी होऊ लागली. आता म्हातारपणच्या गैरसोयी व व्यथा ती विसरून गेली. गरीबीत जीवन जगणे तिला कठीण जाऊ लागले! "हे काय मला असले मळके व फाटके कपडे घालावे लागणार? या असल्या वेषात माझे तारुण्य व सौंदर्य कसे उठून दिसणार? या लहानशा गावात माझ्या सौंदर्याचे कौतुक तरी कोण करणार? इथे तर सारेच गांवढळ! शीः, काय मूर्ख मी! सौंदर्य अन् तारुण्याच्या मागे लागून मी अपार संपत्ति आणि राजमुकुट देऊन बसले! मला ते सर्व आता परत मिळालं तर काय बहार होईल!" असा विचार मनात येऊन ती चिन्तित झाली.

काय करावे–हे राणीला सुचेना. ती दुःखाने त्रासून गेली. एका बाजूला तिला अशी चिन्ताही सतावू लागली की–आपण आपले म्हातारपण परत मागितले तर बहुधा लवकरच आपण मरूनही जाऊ!

परंतु अशा उलटसुलट विचारांच्या जाळ्यातून ती एकदा बाहेर आली–तिने एक पक्का निर्णय घेतला. कितीही मोठ्यात मोठी राणी असो–मरण तर कुणालाच चुकत नाही. म्हातारपणच्या यातना आणि आजार यांना हिमतीने तोंड दिलेच पाहिजे. पण तारुण्य व सौंदर्यासाठी राज्य व अधिकाराचा त्याग करणे हा शुद्ध वेडेपणाच!

असा विचार करून राणी पुन्हा आपल्या महालात परत आली. श्रद्धाने तात्काळ ओळखले की–ती कशासाठी परत आली आहे! जास्त काही न बोलताच त्यांनी आपापल्या जुन्या रूपात स्वतःला परिवर्तित करून घेतले!

दुसऱ्या क्षणी चंचल मनाची ती राणी आपलं म्हातारं रूप पाहून घाबरली अन् श्रद्धाला म्हणू लागली–"अग श्रद्धा, मी चूक केली. खरं म्हणजे तुझं तारुण्यच यापेक्षा चांगलं! पुन्हा करू या का अदलाबदल?"

पण आता मात्र श्रद्धा या प्रस्तावाला कबूल होईना! "राणीसरकार, आपल्या दोन्ही अवस्थांचा अर्थ मला छान समजून चुकला आहे! वेदना सहन करत आणि अडचणींना तोंड देत-राणीचे जीवन जगणे–मला मुळीच पसंत नाही! त्यापेक्षा आपले तारुण्य घेऊन साधी ज्वारीची भाकरी खात अन् शेळया-बकऱ्या संभाळत गरिबीचे जीवन जगणे जास्त आनंदाचे आहे! मला कोणी अनेक राज्ये आणि संपत्ति देऊ केली तरी मी पुन्हा कधीही असली चूक करणार नाही. अच्छा, रामराम! चालले मी." असे म्हणून उड्या मारत, बागडत श्रद्धा तिथून निघून गेली.





# खरे प्रेम

अमरावती शहरात आनन्दगुप्त नावाचा प्रसिद्ध जव्हेरी रहात असे. त्याला गंगा, यमुना आणि सरस्वती नावाच्या तीन मुली होत्या.

आनन्दगुप्तच्या या मुली प्रौढ वयांत झाल्या होत्या, त्यामुळे त्या उपवर होता होता आनन्दगुप्त म्हातारा झाला होता. त्यामुळे त्याच्या मनात विचार आला की– आता तीनही मुलींचे विवाह एकदमच उरकून घेऊन आपली संपत्ति तिघींच्यात सारखी वाटून देऊन आपण आराम करावा.

एक दिवस तीन्ही मुलींना जवळ बोलावून तो म्हणाला–"हे पहा मुलींनो, मी आता म्हातारा झालो. तेव्हां आता मला असं वाटतं की तुम्हा तिघींचे विवाह उरकून आपली शेवटची इच्छा पूर्ण करण्यासाठी काशीयात्रेला जावे. काशीहून परतल्यावर तुम्हा तिघींच्या घरी आलटून पालटून रहात आपलं उरलंसुरलं आयुष्य घालवत रहावं?"

थोडा विचार करून थोरली कन्या गंगा म्हणाली–"बाबा, तुमचं म्हणणं योग्यच आहे. पण लग्नानंतर प्रत्येक स्त्रीला आपल्या पतीच्या आज्ञेत रहावं लागत ना? तुम्हीं माझ्याकडे येऊन राहिलात अन् माझ्या पतीला ते आवडलं नाही तर?"

आनन्दगुप्तला आपल्या मुलीचे म्हणणे बरोबरच वाटले.

नंतर त्याने आपल्या दुसऱ्या मुलीला– यमुनेला विचारले–"सांग यमुना, तुझा काय विचार?"

यमुना म्हणाली–"ताई म्हणते ते खरंच आहे. लग्नानंतर पतीची वागणूक कशी असेल याबद्दल आत्ताच काय सांगावं? त्यामुळे मला वाटतं..." असे म्हणून बोलता-बोलताच ती थांबली.

"काही हरकत नाही, पुढे बोल बाळ." आनंदगुप्त म्हणाला.

"बाबा, मला आपलं या शहरातलंच स्थळ पहा, म्हणजे मी दुसरीकडे राहिले तरी जवळच असेन नं?" यमुनेने आपले बोलणें पूर्ण केले.

"तुझं म्हणणंही ठीक आहे बाळ." असे म्हणून आनन्दगुप्त आता आपल्या तिसऱ्या कन्यकेकडे वळला. "बोल सरस्वती, तुझं काय म्हणणं आहे बाळ?" त्याने विचारले.

आतापर्यंत आपल्या मोठ्या बहिणींची मुक्ताफळे ऐकत असणाऱ्या सरस्वतीचे डोळे भरून आले. गदगदलेल्या आवाजात ती म्हणू लागली–"बाबा, माझ्या लग्नाची काय घाई आहे? तुम्हाला एकट्याला मी काशीयात्रेला मुळीच जाऊ देणार नाही. मी पण तुमच्याबरोबर येईन. त्याअगोदर तुम्ही या दोघींचे विवाह उरकून घ्या. काशीयात्रेहून आल्यावर नशिबात देवाने काय लिहिलं असेल तसं होईल."

छोट्या कन्येचे हे अपार प्रेम पाहून आनंदगुप्तला फार आनन्द झाला. उपरण्याने आपले डोळे टिपत तो म्हणाला– "रडतेस काय वेडे! तुझं माझ्यावरचं प्रेम आणि आदर पाहून मला असा धीर आला आहे की मी नक्कीच आणखी काही वर्षे जगू शकेन." असे म्हणत त्याने मुलीच्या मस्तकावरून प्रेमाने हात फिरवला.

आनन्दगुप्तने यानंतर आपली अर्धी संपत्ति थोरल्या दोघींना सारखी सारखी वाटून दिली आणि त्यांचे विवाह करून दिले. आणि सरस्वतीला बरोबर घेऊन तो काशीयात्रेला निघून गेला.

सहा महिन्यांनी काशीयात्रा संपवून आनंदगुप्त परत आला. आल्यावर योग्य स्थळ पाहून सरस्वतीचा विवाह करून दिला. या जावयाला त्याने घरजावई करून घेतले आणि आपल्या जव्हेरी-दुकानाची जबाबदारी त्याच्यावर सोपवली. योग्य तेथे त्याला मार्गदर्शन करीत आपले उर्वरित आयुष्य त्याने सुखाने घालवले.



# अमोल खजिना

एका जंगलाच्या कोपऱ्याला एक गरीब बाई आपली झोपडी बांधून रहात होती. तिला रामदीन नावाचा एक दहा वर्षांचा मुलगा होता. जंगलात सापडणारी फळे अन् औषधी झाडपाला गोळा करण्याच्या कामात तो आपल्या आईला मदत करी.

आपल्या आईचे रोजचे कष्ट पाहून रामदीनला मनातल्या मनात फार दुःख वाटे. त्याला मनात वाटे की जंगलात गुप्त खजिना सापडावा व आपण तो आईला द्यावा.

एक दिवस तो जंगलात फिरत होता आणि आपल्या नेहमीच्या सवयीप्रमाणे सर्वांना विचारत होता—"ए झाडा, तुझं वय काय रे?", "ए पक्ष्या, तुझं नाव सांग ना!"—अन् असलंच काहीकाही.

एका ठिकाणी विचित्र पोशाखातला एक बुटका माणूस त्याला दिसला. एका झाडाला रेलून उभा राहून तो काहीतरी गुणगुणत होता.

रामदीनने त्या बुटक्याजवळ जाऊन आपल्या आईच्या कष्टांचे वर्णन केले आणि त्याला विचारले—"इथे एकादा जमिनीत पुरलेला खजिना आहे का रे? मला तो काढून आपल्या आईला द्यायचाय्!"

यावर तो बुटका गडगडून हसला आणि म्हणाला—"काय म्हणालास? खजिना तर तुझ्या आईला केव्हाच मिळालाय्!" एवढे सांगून तो बुटका दाट झाडीत पळून गेला.

रामदीनने घरी येऊन आईला सर्व हकिगत सांगितली आणि विचारले—"आई, तुला मिळालेल्या खजिन्याबद्दल तू मला का कधीच काही सांगितले नाहीस?"

आई हसून त्याला म्हणाली—"अरे माझा तो अमोल खजिना म्हणजे तूच!" असे म्हणून रामदीनला जवळ ओढून तिने त्याचा मुका घेतला.






[ ६ ]

[ज्ञानभूमीच्या राजाने मनोदर्पणात पुजाऱ्याचे खरे स्वरूप पाहून रागाने त्याचे मस्तक उडवले. त्याच आरशाच्या द्वारे त्याला विनोदच्या उत्तम स्वभावाची ही पारख झाली आणि विषारी वायू पसरवणाऱ्या पर्वतरांगा ओलांडायला मदत करण्यासाठी राजाने विनोदला अदृश्य होण्याचे रहस्य समजाऊन सांगितले. ...पुढे वाचा.]

एकदा अदृश्य झाल्यावर पुन्हा मनुष्य रूपात कसे यायचे हे समजण्यास विनोदला जरा वेळच लागला. पण त्याच्या लक्षात आले की आपण एका खडकावर झोपलो आहोत! त्याच्या अंगात हातपाय हलवण्याचे ही त्राण नव्हते—इतका तो कमजोर झाला होता. हळूहळू त्याने डोळे उघडले तेव्हां सर्वत्र अंधारच पसरलेला त्याला दिसला. अंधाराला जरा डोळे सरावल्यावर त्याला आपल्या समोर एक साधुपुरुष बसलेला अस्पष्टसा दिसला. त्या मुनीचे डोळे एकाद्या नीलमण्यासारखे चकाकत होते. तो मनातल्या मनातच बोलल्यासारखा पुटपुटला—"हाय देवा! मी पुन्हा एकाद्या पुजाऱ्याबिजाऱ्याच्या तडाख्यात तर नाही सापडलो?"

"तू कोण आहेस? शेकडो वर्षांपासून बंद असलेले दार पार करून तू माझ्या



गुहेत कसा येऊ शकलास?" मुनीने आश्चर्याने विचारले.

"शेकडो वर्षांपासून? म्हणजे इतकी वर्षे गुहेबाहेर न पडता आपण इथेच रहात आहात?" विनोदने उठून बसत विचारले.

"हो, हो! पण तू माझ्या प्रश्नाचे उत्तर नाहीं दिलेस?" मुनीने पुन्हा विचारले.

विनोदने थोडक्यात स्वतःबद्दल माहिती साधूला सांगितली. ते ऐकून साधु पुन्हा न हलता-डुलता ध्यानस्थ बसला. एक तास-भराने त्याने डोळे उघडले आणि विनोदच्या मस्तकावर हात ठेऊन म्हटले—"बाळा, तुझ्यात नक्कीच पवित्र आत्मा वसत असला पाहिजे. म्हणून अदृश्य रूपात वावरत असताना तुझे शरीर माझ्याकडे आकृष्ट होऊन इथे पोचलास."

त्या तपस्व्याचे बोलणे ऐकत असताना विनोदला असा भास होऊ लागला की जणू काही आपण आनंदसागरात पोहत आहोत. विनोद समजून चुकला की मुनि साधासुधा नाहीं! त्याच्यात काही विशेष शक्ति आहे आणि तो दयाळु आहे.

"चला, बाहेर जाऊ या, तुला नवा प्रदेश दाखवतो. मीही हा प्रदेश पाहून खूप काळ लोटला. दोघेही गुहेच्या तोंडाशी आले. तोंडावर लावलेला पत्थर हलवण्याचा विनोदने प्रयत्न केला पण तो दगड रेस-भरही हलला नाही!"

"थांब, मीच करतो बाजूला!" असे म्हणून साधूने आपल्या काठीने दगडाला स्पर्श करताच तो गडगडत बाजूला जाऊन पडला! दोघेही गुहेतून बाहेर आले. गुहा एका उंच डोंगरावर होती. डोंगराखाली एक सुन्दर शहर दिसले.

"देवा रे, या गुहेभोवतालची सुन्दर झाडे-झुडपे कुठे गेली? डोंगराभोवतीचे चारी बाजूंना पसरलेले दाट जंगल कसे गायब झाले?" मनातल्या मनात असा विचार करत मुनि विनोदकडे वळला व त्याने त्या प्रदेशाबद्दल विनोदला माहिती सांगितली.



कोणे एके काळी त्या भागात भयंकर जंगल पसरलेले होते! मुनि सोडून अन्य कोणीही त्या प्रदेशात रहात नव्हते. एकदा आपल्या राजाच्या छळाला कंटाळून एक गरीब माणूस त्या डोंगराळ भागात येऊन पोचला. तहान भुकेने तो हैराण झाला होता. त्याच वेळी त्याला एका हिरव्यागार डोंगरावर काही पक्षी कुठलेसे फळ खाताना दृष्टीस पडले. तो ताबडतोब त्या डोंगरावर पोचला आणि पक्ष्यांनी अर्धवट खाऊन टाकलेले फळ त्याने गपागप खाऊन टाकले! त्याची तहान आणि भूक तेवढ्यानेच भागली!

आता त्याच्या मनात एक शंका डोकावू लागली—एवढे मोठे कलिंगड या छोट्या पक्ष्यांनी या डोंगरावर कसे उचलून आणले असेल? हा विचार मनात येताच त्याने आसपासची जागा नीट धुंडून पाहिली. त्याला मागील बाजूलाच एक वेल दिसला. त्याच्या लक्षात आले की ते कलिंगड याच डोंगरावर तयार झाले असले पाहिजे. त्याला मोठे आश्चर्य वाटले!

"मी स्वतः आपल्या योगशक्तीने रोज एक कलिंगड पैदा करून या पक्ष्यांना खायला देतो." मुनीने माहिती दिली.

"असे आहे होय? मग बाबाजी, मला ही एका पक्षाचे रूप देऊन टाका ना.



आपल्या कृपेने रोज कलिंगड खाऊन राहीन." तो गरीब याचना करू लागला.

"त्यासाठी पक्षी होण्याचे काय कारण? तुला हवे तर मी कलिंगडच इतके मोठ बनवत जाईन की तुझीही तहानभूक भागेल." मुनि म्हणाला.

"जशी आज्ञा!" असे म्हणत दोन्ही हात उचलून गरिबाने मुनीला नमस्कार केला. पण तरीही त्याच्या चेहऱ्यावर उदासवाणा भाव तसाच होता!

"तुझी पोटाची चिन्ता तर मिटली, आता तू का दुःखी?" मुनीने विचारले.

"आपण माझ्यावर फार उपकार केले आहेत. त्याबद्दल कृतज्ञता कशी व्यक्त करू



हेच मला समजत नाहीं—ही माझी पहिली चिन्ता, अन् माझी दुसरी चिन्ता म्हणजे—माझ्या पोटाची काळजी तर दूर झाली, पण तिकडे माझी कुटुंबीय माणसे कशा अवस्थेत असतील?" गरिबाने आपली अडचण मांडली.

"मग तू आपला परिवारही इथे घेऊन ये, त्यांनाही खाता येईल असे कलिंगड मी निर्माण करीन." मुनीने सहानुभूतीने म्हटले.

गरीबाने मस्तक झुकवून मुनीला प्रणाम केला. तरीही त्याच्या चेहऱ्यावरची उदासी अजून तशीच राहिली!

"आता कसल्या विचारात पडला आहेस बाबा?" मुनीने विचारले

गरीब माणूस उत्तरला—"आपल्या कृपेने मी अन् माझे कुटुंब तहान-भुकेच्या प्रश्नातून मुक्त होऊ शकतो, पण आता प्रश्न असा की, आम्ही ज्या बन्धु-बान्धव अन् मित्रपरिवाराच्या संगतीत इतका काळ राहिलो त्यांना विसरून कसे चालेल?"

"ओहो, हे तुझ्या काळजीचे कारण होय? बरं तर, तू तुझ्या कुटुंबियांबरोबर तुझे बंधु-बान्धव आणि मित्र परिवाराला ही इथे घेऊन ये—मग तर झालं?" साधुबाबाने तीही अडचण निवारली.

"हे करुणानिधान मुने, मी आपल्या बांधवांना आणि मित्रपरिवाराला इथे आणल्यावर त्यांची संख्या वाढत नाही का जाणार? इतक्या सगळ्या लोकसंख्येचे पोट एकच कलिंगड कसे काय भरू शकेल?" गरीबाने मोठ्या नम्रतेने आणखी अडचण मांडली!

मुनी क्षणभर गप्प राहिला आणि म्हणाला—"हे बघ, आता पुन्हा गुहेत जाऊन तपस्येला बसायचा माझा विचार आहे. पण त्यापूर्वी मी आपली जी योगशक्ति या स्थानी सोडून जाईन तिच्या योगाने तुम्हा लोकांना कलिंगड मिळत राहील. रोज तुमच्यापैकी एकाने इथे येऊन किती लोकांसाठी हवे हे मोठ्याने ओरडून सांगावे म्हणजे दुसऱ्या





दिवशी सकाळी तितक्या मोठ्या आकाराचे कलिंगड इथे तयार असेल. तुम्ही सर्वांनी ते बरोबर वाटून खावे. जे लोक ते खातील त्यांना त्या दिवशी पुन्हा भूक लागणार नाही. झाले समाधान?"

आता मात्र निःशंक मनाने गरीब माणूस आपल्या गावी गेला व आपला परिवार आणि बंधु-बान्धव, मित्रमंडळी यांच्यासह परत आला. डोंगरपायथ्याशी त्यांच्या लहान-लहान झोपड्या उभ्या राहिल्या, तिथे जमलेल्या सर्वांना उद्देशून मुनि म्हणाला—"ऐका, तुम्हा सर्वांच्या तहान-भुकेची समस्या मी सोडवली आहे, आता 'सत्याची साधना' हेच तुमच्या जीवनाचे उद्दिष्ट राहिले पाहिजे. आता तुम्ही सर्वजण हे उद्दिष्ट साधण्याच्या प्रयत्नाला लागा."

यानंतर मुनीने सर्वांना ध्यान कसे करावे हे शिकवले आणि डोंगरावरील गुहेत प्रवेश करून त्याने आपल्या तपस्येला सुरुवात केली. अशा प्रकारे शेकडो वर्षे निघून गेली.

मुनीच्या तोंडून ही सर्व हकीगत ऐकून विनोदने विचारले—"स्वामी महाराज, आपल्याला आत्ता डोंगरपायथ्याशी हे जे शहर दिसत आहे ते बहुधा त्यावेळी इथे आलेल्या शरणार्थी लोकांच्या वंशजांनी वसवले असावे. गुहेच्या तोंडाशी मला कलिंगडाचा वेल ही दिसला. अजूनही हे लोक कलिंगड घेऊन जात असतील तर नवल नाही."

"चल, आपण शहरात जाऊन तिथली वैशिष्ट्ये पाहून घेऊ." असे म्हणत मुनि पुढे चालू लागला.

विनोदही मुनीच्या मागे चालू लागला.

डोंगरावरून खाली पायथ्याकडे जाणाऱ्या रस्त्याच्या दुतर्फा फुलझाडे अन् वेली पसरल्या होत्या.

मुनि आणि विनोद थोड्याच वेळात डोंगरपायथ्याशी वसलेल्या शहराच्या प्रवेशद्वाराजवळ पोचले. रंगीबेरंगी पगड्या



घातलेली दोन बलिष्ट माणसे हातात तलवारी घेऊन तेथे पहारा करीत होती. द्वाराबाहेर लोकांची बरीच गर्दी होती.

"आम्ही लांबच्या देशाचे यात्रेकरी आहोत. आम्हाला डोंगरावर जाऊन पहायला परवानगी नाही देणार?" गर्दीतल्या एकाने विचारले.

"परवानगी मिळणार नाही. अद्भुत कलिंगड मिळते, त्या डोंगरावर जाण्याची योग्यता केवळ आमच्या प्रमुखाचीच आहे. एकूण किती लोकांना पुरेल एवढ्या कलिंगडाची आवश्यकता आहे याची सूचना द्यायची असते, म्हणूनच केवळ ते रोज डोंगरावर जातात." द्वारपालाने सांगितले.

द्वारपालाचे बोलणे ऐकल्यावर मुनि म्हणाला–"तो प्रमुख म्हणजे सर्वात पहिल्याने आलेल्या त्या गरीब माणसाचाच वंशज असणार."

आता ते दोघे प्रवेशद्वार ओलांडून आत गेले. "आपण आत घुसत आहोत, पण द्वारपालाने आपल्याला कसे काय अडवले नाही?" विनोदने आश्चर्याने विचारले.

"आपण आत्ता अदृश्य रूपात वावरत आहोत, आपले बोलणे सुद्धा त्यांना आत्ता ऐकू येणार नाही." मुनि म्हणाला.

विनोदला फारच आश्चर्य वाटले!

महाद्वारातून आत शिरल्यावर ते दोघे एका गल्लीतून चालू लागले, आणि एका मोठ्या मण्डपाजवळ पोचले. त्या मंडपाच्या प्रवेशद्वाराशी एका दगडावर 'निःशब्द!' असे लिहून ठेवले होते.

काही अधिकारी तेथे चारी बाजूंना पसरलेल्या हिरवळीवर फिरता फिरता मधून मधून त्या मंडपात डोकावून पहात होते.

मुनि म्हणू लागला–"ही जागा माझ्या चांगल्या आठवणीत आहे. त्या काळी या जागी एक विशाल बाग होती. मी त्या लोकांना इथे काय काय करायला हवे, कसे रहायला हवे वगैरे समजाऊन सांगितले

होते. चल, आता तिथे काय चालले आहे पाहू या." असे म्हणून त्याने त्या मंडपात प्रवेश केला. ओळीने बनवलेल्या आराम-खुर्चीसारख्या आसनांवर अनेक स्त्रीपुरुष आडवे पडून झोपले होते. त्यांच्यापैकी काही काही चक्क घोरत होते. अधिकारी लोक तेथे हिंडून कोण किती वेळ झोपते याचा हिशोब ठेवत होते. तेथील वातावरण पाहून मुनीने हे ही ओळखले की जास्तीत जास्त जोराने घोरत झोपणाऱ्या व्यक्तींना तिथे प्रोत्साहन दिले जाते आणि काही वेळाने या सर्वांचा हिशोब पाहून सर्वांत अधिक घोरत राहून झोपणाऱ्या माणसाला बक्षिस दिले जाते.

तेथे गाढ झोपलेल्या काही लोकांवर रागावून मुनीने त्यांचे केस धरून त्यांना खाली ओढले. विनोदने ही त्याचे अनुकरण करीत तसेच केले. त्याने ही काही लोकांना खाली ओढले.

थोड्याच वेळात अचानक झोपेतून जागे झालेल्या लोकांच्या किंचाळ्यांनी साऱ्या मंडपात एकच गोंधळ माजला. अधिकाऱ्यांनाही काही कळेना, ते नुसतेच गप्प राहिले.

नंतर मुनि त्या मंडपाबाहेर आला. विनोदनेही त्यांच्या मागून येत विचारले— "स्वामीजी, आपण त्या लोकांवर इतके का रागावलात? मला सांगता काय झाले ते?"

"डोळे मिटून ध्यान कसे करावे—हे मी त्यांच्या पूर्वजांना शिकवले होते. परंतु हे लोक तर ध्यान वगैरे सर्व विसरून गाढ झोपा घेणे आणि घोरणे यातच इति-कर्तव्यता मानून त्यातच चढाओढी लावत आहेत." मुनि उत्तरला.

तेथून निघून ते दोघे एका मंदिरासारख्या इमारतीजवळ आले. मंदिराच्या प्रांगणात नगराच्या अधिकाऱ्यांची सभा चालू होती. त्यांच्यात त्या नगराचा तरुण नेताही होता. विनोद व मुनि अदृश्य रूपाने त्यांच्यात जाऊन पोचले आणि मंदिराचे दरवाजे बंद केले गेले. (क्रमशः)





# हडळीचे शिक्षण

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाकडे परत आला, त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले व खांद्यावर टाकून नेहमीप्रमाणे मौन धारण करून स्मशानाकडे चालू लागला. प्रेतात रहाणारा वेताळ त्याला विचारू लागला—"राजा, एका राज्याचा शासक असूनही, भूत-पिशाच्चे, लांडगे-कोल्हे आणि घुबडांचा स्वैर संचार असलेल्या या स्मशानात तू हे जे कष्ट उपसत आहेस ते पाहून हसावे की रडावे हेच मला कळेनासे झाले आहे! तुझ्याप्रमाणेच आपल्या उद्दिष्टाबद्दल दृढनिष्ठा आणि सहनशीलता असलेली एक हडळ व एक मास्तर आपा-पल्या इच्छापूर्तीसाठी दृढनिश्चयाने आपला मार्ग आक्रमत राहिले, पण शेवटी दोघांनीही आपले काम अर्धवट सोडून दिले. त्यामुळे तुझ्याबद्दलही माझ्या मनात अशी शंका येऊ लागली आहे की केव्हातरी तूही असेच

## वेताळाच्या गोष्टी



करणार आहेस. ऐक, मी तुला ती गोष्ट सांगतो. तुझा थोडा श्रमपरिहारही होईल.

वेताळ गोष्ट सांगू लागला – धर्मपूरमधे बलरामदास नावाचा एक शिक्षक रहात असे. एके दिवशी आपल्या बायकोवर रागावून तो घरातून बाहेर पडला आणि गावच्या एका टोकाला असलेल्या चिंचेच्या झाडाखाली जाऊन बसला.

त्यावेळी चिंचेच्या झाडावरून एका छोट्याश्या हडळीने त्याच्या समोर उडी मारली आणि ती म्हणाली–"मास्तर, मला भिऊ नका, मी तुमच्याजवळ शिकायला आले आहे."

हडळीला पाहून बलरामदास घाबरला. त्याने विचारले–"कोण आहेस तू? तुला कशासाठी शिकायचंय?"

"मला शिक्षणाची अतिशय आवड आहे. पण काय करू? माझ्या लहानपणीच माझे वडील वारले. माझी आई खूप काबाडकष्ट करून मला वाढवायचा प्रयत्न करीत असे. पण खरं तर तिची कमाई आमचं पोट भरण्यापुरेशी नसे, म्हणून मी सुद्धा काहीबाही काम करून थोडा बहुत पैसा मिळवू लागले. मला शिकायची भारी हौस! म्हणून मी आपल्या कमाईतून थोडेफार पैसे वगळून ठेवत असे. काही दिवसांनी माझी आई अचानक आजारी पडली. घरातले सर्व पैसे तिचे औषधपाणी करता करता संपून गेले. इतके करूनही आई काही त्या आजारातून वाचली नाही. मला फार दुःख झाले अन् वैतागून मी नदीत जीव दिला! पण माझी शिक्षणाची इच्छा राहून गेली होती म्हणून मी हडळ झाले– तुम्ही मला सांगाल ते काम मी करीन, पण मला शिकवाच मास्तर!" तिने पुन्हा एकदा शिकवण्याबद्दल मास्तरांना गळ घातली!

"एक हजार सुवर्णमुद्रा हव्यात!" आपला लोभ प्रकट करत बलरामदास म्हणाला.

"माझ्याकडे तर इतकं धन नाही. पण मी राजाच्या खजिन्यातून चोरून आणू



शकेन, आणू!" हडळीने विचारले.

"अंहं, तुला आणखी एक काम करावं लागेल. माझी बायको रोज काही ना काही कारण काढून भांडण उकरून काढीत असते. मला शांतपणे जगू देत नाही. तिला भीती दाखवून ती माझ्या आज्ञा पाळू लागेल असं तू केलं पाहिजेस!"–बलरामदासने दुसरी अट सांगितली.

"ठीक आहे. हे ही करीन मी. मग शिकवाल ना मला?" पुन्हा आपल्या मागणीवर जोर देत तिने दुसरी अटही मान्य केली.

यावर बलरामदासने आणखी एक काम तिला सांगितले व ते कसे करायचे हे ही सांगितले.

काम असे होते–बलरामदासने गावातल्या एका वयस्क माणसाकडून काही कर्ज काढले होते. एका वर्षानंतर त्याने ते फेडूनही टाकले. पण तो माणूस म्हणतो की पैसे परत केलेच नाहीत. कर्ज परत केल्याबद्दल बलरामदासजवळ कागदी पुरावाही नाही. त्यामुळे गावचे काही लोक बलरामदासबद्दल शंका घेतात तर काहींना 'तो वयस्क माणूस खोटं बोलतो' असं वाटतं.

यासाठी आता या छोट्या हडळीने असं करायचं–तिने त्या वयस्क माणसाच्या



शरीरात प्रवेश करून गावातल्या लोकांसमोर त्याच्या तोंडून खरी गोष्ट वदवून घ्यायची. मग साऱ्या गावातल्या लोकांना कळून येईल की बलरामदास फारच सत्यवादी आहे, तो फार पवित्र आचरणवाला आहे. अन् त्यामुळे त्याला आता काही अद्भुत सिद्धि प्राप्त झाली आहे. आणि या सिद्धींचे लोकांच्यात प्रदर्शन करण्यासाठी या छोट्या हडळीने मदत करायला पाहिजे.

शिक्षणाची अतिशय आवड असल्याने त्या छोट्या हडळीने बलरामदासच्या या सर्वच्या सर्व अटी मान्य केल्या. आणि याचा परिणाम म्हणजे–थोड्याच दिवसात बलरामदासचे नशीब फळफळले!



बलरामदासच्या घरी एक हजार सुवर्ण-मुद्रा आल्या, त्याची बायको त्याची प्रत्येक गोष्ट ऐकू लागली—त्याच्या आज्ञा पाळू लागली, गावच्या त्या वयस्क माणसानें आपली चूक कबूल केली आणि आता बलरामदास आपल्या अंगच्या अद्‌भुत शक्तींचे प्रदर्शन करू लागला!

छोटी हडळ रोज शिकवणी सुरू करण्या-बद्दल बलरामदासच्या मागे भुणभूण लावत असे. एक दिवस तो तिला म्हणाला—"हे बघ, मी हल्ली तुझ्यामुळे कामात फार गुंतलेला असतो, अलिकडे मुलांना शिकवणंही मी बंद करून टाकलंय. तूच सांग, तुला तरी मी कसं शिकवू?"

"पण मास्तर, मी तर तुमच्या सर्व अटी पाळल्या आहेत, आता जर तुम्ही मला शिकवायचं नाकारलंत तर तुम्ही माझी प्रतारणा केल्यासारखं होईल." छोटी हडळ म्हणाली.

"पण तुला शिकायची गरजच काय? माझ्यामुळे तुझी हल्ली पूजा केली जात आहे. माझा आजकाल जो काही आदरसत्कार केला जातो, तो तुझ्यामुळेच की नाही?"

"पण मला आदर-सन्मान वगैरे काही नको. मला विद्याच हवी." छोट्या हडळीनें रोखठोक मागणी केली.

"मग मला माफ कर. मी काही तुला शिकवू शकणार नाही." बलरामदास म्हणाला.

"का नाही शिकवू शकणार, सांगा बरं? तुमच्या उत्तरानें माझं समाधान झालं नाही, तर तुमचा अन् तुमच्या संपूर्ण कुटुम्बाचा सर्वनाश करूनच इथून निघून जाईन, लक्षात ठेवा!" तिने जोरदार धमकी दिली.

क्षण दोन क्षण गप्प राहून मग बलराम-दास म्हणाला—"तुला माझं काय करायचं ते खुशाल कर. मी तुला अगदी खरंच सांगतो, ऐक—माझ्या शिक्षणाचा मला कसलाच उपयोग झाला नाही—पैसा मिळाला नाही नि मानसन्मानही मिळाला नाही. त्या-मुळे माझ्या मनात धन अन् यशाची इच्छा वाढत गेली. तू माझ्याकडे विद्या मिळवण्या-साठी याचना केलीस, पण मी चोरी-दगा-खोटेपणा आणि हिंसा यांची मदत घेऊन आणि इतरांनाही त्याबद्दल प्रोत्साहन देऊन स्वतःची इच्छा पुरी करून घेतली. अशा परिस्थितीत आता मी तुला विद्यादान केलं, तर मला हे सांगावं लागेल की मी जे काही केलं ते सर्व चूक होतं! मी तुला प्रोत्साहन देऊन तुझ्याकडून जी कामं करून घेतली ती चूक आणि दोषपूर्ण आहेत—आता तुला शिकवायची माझी योग्यता राहिली नाही. त्यामुळे मी आता निश्चय केलाय की तुलाच काय, पण यापुढे मी कुणालाच शिकवणार नाही."

क्षणभर बलरामदासवर दयादृष्टी टाकून छोटी हडळ तेथून अदृश्य झाली.

यानंतर बलरामदासने सर्व गावकऱ्यांना बोलावून त्यांच्यासमोर सांगितले—"माझ्या अद्‌भुत शक्तींचे प्रयोग बघायला तुम्ही येता. पण त्यामुळे तुमचा प्रत्यक्ष फायदा काहीच होत नाही—केवळ करमणूक होते. माझ्या शक्तींमुळ फक्त मलाच यश मिळाले. आता मात्र माझ्या मनात यशाची—मान-सन्मानाची इच्छा राहिलेली नाही. यापुढे विश्वकल्याणासाठी मी या शक्तीचा त्याग करून केवळ एक 'सामान्य माणूस' म्हणून जगू इच्छितो."

इतकी गोष्ट सांगून वेताळाने विचारले—"राजा, माझ्या मनात अशी शंका आहे



की–छोटया हडळीने बलरामदासचं तिला न शिकवण्याबद्दलचं कारण न पटलं तर त्याचा सर्वनाश करायची धमकी दिली होती. मग त्याच्या उत्तराने तिचं खरंच समाधान झालं का? तिन बलरामदासकडे दयार्द्र दृष्टीने का पाहिले? बलरामदाने अद्भुत शक्तींचा त्याग करून सामान्य माणूस बनून रहाण्याचं जे आश्वासन दिलं ते कितपत खरं आहे? या शंकेचं उत्तर माहित असूनही तू दिलं नाहीस तर तुझ्या डोक्याची छकले होऊन पडतील."

यावर विक्रमादित्य म्हणाला–"छोटया हडळीने बलरामदासकड दयापूर्ण दृष्टीन पाहिले याचे प्रमुख कारण असे की–ज्या गोष्टी दोषपूर्ण आहेत असे शिक्षणामुळे बलरामदाला माहित होते, त्या गोष्टी त्याने छोटया हडळीकडून करवून घेतल्या आणि त्याने हे तिच्याजवळ कबूलही केलं–त्याने जे शिक्षण घेतले त्याचा त्याच्या स्वत:वर काहीही प्रभाव पडू शकला नाही. त्यामुळे एक गोष्ट स्पष्ट झाली की यापुढे त्याने आपल्या शिष्यांना शिकवले तर ते शिक्षण त्या शिष्यांनाही प्रभावकारी होणार नाही. हे सत्य समजल्यानंतर छोटया हडळीच्या मनात शिक्षणाबद्दल विरक्ति उत्पन्न झाली. आणि तिने बलरामदासकडे दयापूर्ण दृष्टीने पाहिले. त्याच्या कथनामुळे ती संतुष्ट झाली असो वा नसो पण त्याने खरे तेच सांगितले हे तिला बरोबर कळून चुकले. त्यामुळे बलरामदासचं काही नुकसान न करता ती अदृश्य झाली.

परंतु जगाच्या कल्याणासाठी अद्भुत् शक्तींचा मी त्याग करतो' हे बलरामदासचं म्हणणं मात्र चक्क खोटं आहे: छोटया हडळीची मदत मिळाली नाही तर त्याच्या अद्भुत् शक्ति नाहीशा होतील–हे रहस्य गुप्त ठेवण्यासाठीच त्याने गावकऱ्यांसमोर आपल्या त्यागाचे नाटक करून त्यांचा विश्वास मिळवला. अशा प्रकारे उत्तर देऊन राजा मौन होताच प्रेतातला वेताळ अदृश्य होऊन पुन्हा झाडावर जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# राजा आणि चांडाळ

प्राचीन काळी उत्कल देशात पुरुषोत्तम देव नावाचा राजा राज्य करीत होता. तो जगन्नाथाचा परम भक्त होता. त्याची अशी धारण होती की आपले राज्य हे श्री जगन्नाथाचे राज्य आहे आणि आपण त्याचे सेवक म्हणून त्याच्या राज्याचा कारभार पहातो.

पुरी शहरात दरवर्षी आषाढ महिन्यात रथोत्सव साजरा केला जातो. या उत्सवात भाग घेण्यासाठी, आसपासच्या गावांतून हजारोंनी माणसे पुरीत गोळा होतात. रथयात्रेसाठी निघणाऱ्या तीनही रथांखाली झाडू मारायचे काम राजा स्वत: करत असे, आणि यानंतरच लोक रथ ओढायला सुरुवात करीत.

राजा पुरुषोत्तम देव दक्षिण दिग्विजयासाठी गेला असताना त्याने कांजीवरम्‌ची राजकन्या पद्मावती हिला पाहिले. तिचे असामान्य सौंदर्य पाहून पुरुषोत्तम देव तिच्यावर भाळला. त्याने तिच्याशी विवाहाचा प्रस्ताव घेऊन दूत पाठवला. राजाने हा प्रस्ताव आनन्दाने मान्य केला. विवाहासाठी उत्कलदेशी जायचे, त्याबरोबरच रथोत्सवही पहावा असे त्याच्या मनात होते.

रथोत्सवाच्या दिवशी देवालयापासून उद्यानभवन पर्यंतचा रस्ता माणसांनी दुतर्फा भरून गेला होता. वातावरणात माणसांचा कोलाहल भरून राहिला होता. "त्यातच शंखांचा आवाज ऐकू येत होता. मंदिरातून बलराम, कृष्ण व सुभद्रा यांच्या मूर्ति आणून रथावर ठेवल्या गेल्या.

पण पुरुषोत्तम देवला रथापुढे झाडू मारताना पाहून मात्र कांचीनरेश कावराबावरा झाला. त्याला हा प्रकार कमीपणाचा वाटला. रथयात्रा संपल्याबरोबर तो

उडिया लोककथा

कांजीवरम्‌ला परत गेला व तेथून त्याने उत्कलराजाला कळवले–"मी आपल्या मुलीचा विवाह तुमच्याशी करून देऊ इच्छित नाही."

कांचीनरेशाचा हा व्यवहार पाहून पुरुषोत्तम देव अतिशय चिडून गेला व युद्धाची घोषणा करून तो कांजीवरम्‌वर चालून गेला. युद्धात पुरुषोत्तम देवचाच जय झाला. राजकुमारी पद्मावतीला कैद करून तो उत्कलदेशी घेऊन गेला.

परंतु आता तिच्याशी विवाह करण्याची त्याची बिलकुल इच्छा नव्हती. त्याने आपल्या प्रधान मंत्र्याला बोलावून म्हटले–"मंत्री महाशय, हिच्या वडिलांनी मला 'चाण्डाळ' म्हणून संबोधले आहे. तेव्हा हिला तुम्ही ताब्यात घ्या अन् तिचा विवाह आपल्या राज्यातल्या एकाद्या चाण्डाळाशीच लावून द्या."

"जशी आज्ञा, महाराज." मंत्री म्हणाला.

परंतु महामंत्री फार दयाळु होता. त्याने राजाची आज्ञा न पाळता गुप्तपणे तिला आपल्याच घरात ठेवले व स्वतःच्या मुली प्रमाणे तो तिला सांभाळू लागला.

काही महिन्यांनी पुन्हा रथोत्सवाचा दिवस आला. आपल्या प्रथेप्रमाणे राजा रथासमोर झाडू मारू लागताच मंत्री पद्मावती सह राजासमोर आला व म्हणाला–"महाराज, मी आपली आज्ञा पाळायला विलम्ब लावला, क्षमा असावी. पण या माझ्या मुलीला आपणापेक्षा जास्त चांगला झाडूवाला पति कोठून मिळणार? कृपा करून आपणच हिचा स्वीकार करावा."

मध्यंतरी काही काळ लोटल्यामुळे राजाचा राग शांत झालाच होता. आपल्या मंत्र्याची ही युक्ति पाहून तो त्याच्यावर फार प्रसन्न झाला व मोठ्या वैभवपूर्वक त्याने पद्मावतीशी विवाह केला.

त्यांचे वारस आजही रथोत्सवाचे वेळी रथापुढे झाडू मारायचे काम मोठ्या श्रद्धेने करतात.



महाकाव्य कथा :

## शकुन्तला–३

दुर्वास मुनींच्या शापामुळे दुष्यन्ताला शकुन्तलेचा विसर पडला, यामुळे शकुन्तलेला फार दुःख झाले. त्यावेळी तिची आई मेनका तेथे आली व तिला तिने एका आश्रमात पोचवले. पुढे त्या आश्रमांतच शकुन्तला प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. तिने त्याचे नाव ठेवले–भरत. शकुन्तला भरताला मोठ्या प्रेमाने वाढवू लागली.



काही वर्षे निघून गेली. एके दिवशी एक कोळी नदीत मासे पकडत होता. बऱ्याच वेळा जाळे टाकूनही त्याला एकही मासा मिळाला नाही. शेवटी बऱ्याच वेळाने त्याच्या जाळयात एकच मोठा मासा मिळाला. आता मासे पकडण्याचे काम थांबवून तो मासा घेऊन घरी आला.





कोळयाने मासा बायकोच्या हाती देऊन त्याचा पदार्थ बनवायला सांगितले. तिने मासा कापला, तो काय चमत्कार ! तिला त्यात एक अंगठी सापडली. मोठ्या खुशीने कोळी ती अंगठी विकायला निघाला ! चांगली किंमत येईल असे त्याला वाटत होते !



तो एका सोनाराकडे गेला व त्याने अंगठी विकायची इच्छा प्रदर्शित केली. सोनाराने अंगठी हाती घेऊन नीट निरखून पाहिली, पण 'ही अंगठी एका माशाच्या पोटात सापडली' या गोष्टी-वर काही त्याचा विश्वास बसेना!

सोनार त्या कोळयाला बरोबर घेऊन राजा दुष्यंताकडे गेला. राजाच्या अधि-काऱ्यांना वाटले की, ही अंगठी त्या कोळयाने राजवाडयातून चोरली असावी. राजाने अंगठी आपल्या हातात घेऊन पाहिली.





अंगठी पाहिल्यानंतर राजाला गतगोष्टींचे स्मरण झाले. त्याला एकदम शकुन्तला आठवली! आता दुर्वास मुनींच्या शापाचा प्रभाव नाहीसा झाला होता! राजाने कोळयाला चांगले बक्षिस देऊन रवाना केले. राजाने शकुन्तलेचा जो अपमान केला होता तो आठवून त्याला आता फार दुःख झाले.

दुष्यन्ताने आपल्या दूतांना कण्वमुनींच्या आश्रमात पाठवले, पण तेथे ती नव्हतीच. तिच्या शोधासाठी राजाने चारी दिशांना आपले शिपाई पाठवले, पण शकुन्तलेचा कुठेच पत्ता लागला नाही.





राजा चिन्ताग्रस्त झाला. एक दिवस वनात विहार करीत असताना त्याला सिंहाच्या छाव्याशी खेळत असलेला एक मुलगा दिसला. ते दृश्य पाहून राजाला फार आश्चर्य वाटले.

राजा आपल्या घोडयावरून उतरला व मुलाला उचलून घेऊन त्याने त्याला त्याचे नावगाव विचारले. बाळाच्या तोंडचे गोड बोलणे ऐकून राजा फार खूष झाला. नंतर राजाचे बोट धरून तो मुलगा एका पर्णशाळेकडे घेऊन गेला.





आपला मुलगा भरत याला आपल्या वडिलांचा – दुष्यंत महाराजांचा – हात धरून आश्रमासमोर उभा असलेला पाहून शकुन्तलेचा प्रथम आपल्या नजरेवर विश्वास बसेना ! नंतर खरी परिस्थिती जाणून व गतआयुष्य आठवून तिला फार रडू आले. थोड्याच वेळात तिला कळून चुकले की ते केवळ दुर्वास मुनींच्या शापामुळेच घडले ! राजा त्यामुळेच तिला विसरून गेला होता.

आता राजाने मोठ्या सन्मानपूर्वक शकुन्तलेला आपली राजधानी हस्तिना-पूर येथे नेले. शकुन्तलेच्या आगमनामुळे दुष्यन्ताच्या जीवनात पुनश्च आनंदी आनंद पसरला ! राणी म्हणून त्याने शकुन्तलेला अभिषेक करवला व मोठ्या न्यायाने राज्य करून त्याने जनतेचे कल्याण साधले.





आपल्या वडिलांनंतर भरताला राज्य मिळाले. त्यानेही एक सुयोग्य शासक म्हणून यश मिळवले. देशातील अन्य सर्व राजांनीही त्याला 'सम्राट' म्हणून मान्यता दिली. असे मानले जाते की या भरत राजामुळेच आपल्या देशाला 'भारत' असे नाव मिळाले.

(संपूर्ण)



# चतुर म्हातारी

खूप वर्षांपूर्वीची गोष्ट आहे–एका गावात सीताराम शास्त्री नावाचा एक पंडित रहात असे. तो गावातल्या मुलांना शिकवत असे व गुरुदक्षिणेच्या रूपाने जे मिळेल ते घेत असे. घरखर्च काटकसरीने करून त्याने पाचशे रुपये जमवून ठेवले होते.

त्याच काळात काशीला पंडित लोकांची एक सभा होणार होती. सीताराम शास्त्री समोर एक अडचण होती–आपलं बचत करून ठेवलेलं धन कोणाजवळ सुरक्षित ठेवावे? घरातच आपणाजवळ ती रक्कम ठेवून घेण्यास त्याच्या पत्नीने साफ नकार दिला. ती म्हणाली–"पैसा ही मोठी वाईट वस्तु आहे. मी काही कुत्र्यासारखी पहारा देत बसू शकणार नाही! एखाद्या रात्री चोर घरात घुसले तर पैशांसाठी प्राणही घेतील माझा. एकटी बाईमाणूस मी!"

धन कोठे लपवून ठेवावे–हा विचार करीतच सीताराम शास्त्री दुर्गाप्रसादच्या दुकानी पोचला. त्याने दुर्गाप्रसादला सल्ला मागितला–"सांग बाबा, हे पैसे कुणाकडे ठेवू, म्हणजे ते नक्की सुरक्षित रहातील?"

"मित्रा, पैशांच्या बाबतीत प्रत्यक्ष ब्रह्मदेवावर सुद्धा विश्वास ठेवू नको. धन हे पापाचं मूळ आहे!" दुर्गाप्रसादने मित्राला सल्ला दिला. सीताराम शास्त्री घरी गेला आणि आपली पाचशे रुपयांची थैली घेऊन जाऊन दुर्गाप्रसादला म्हणाला–"दुर्गाप्रसाद, हे पहा, हेच माझे धन. काशीयात्रेहून मी परत येईपर्यंत हे तुझ्याकडे ठेव."

"बाप रे, मी या पैशांना हात ही नाही लावणार. वाटलं तर तूच आपल्या हाताने माझ्या घरात तुला पाहिजे तिथे खड्डा खणून आपलं धन लपवून ठेव, आणि परत



आलास की आपल्याच हाताने ते काढून घे." सीताराम शास्त्री मनात म्हणाला– "वाहवा! किती भला माणूस आहे हा दुर्गाप्रसाद!" असा विचार करत करतच त्याने एका जागी खड्डा करून आपले धन लपवून ठेवले, आणि तेथून निघून गेला.

यानंतर सीताराम शास्त्री काशीयात्रेला निघून गेला. तिथल्या सभेत भाग घेऊन हा पंडित परत घरी आला. नंतर दुर्गाप्रसादकडे जाऊन म्हणाला–"मित्रा, मी आता आपलं धन घेऊन जातो."

"वा, वा! जा ना घेऊन. तू ते कुठ ठेवलंस तुझ्या लक्षात आहे ना? उकर तिथे अन् घेऊन जा आपले पैसे."

परंतु सीताराम शास्त्रीने तेथे खोदून पाहिले तो पुरलेलं धन कुठे? तिथे तर काहीच नव्हते! तो दुर्गाप्रसादजवळ येऊन म्हणाला–"पैसे तर दिसत नाहीत! काय भानगड आहे?"

"अरे, मला रे काय ठाऊक! तुच तर आपल्या हाताने ठेवलं होतंस ना? मला तर ती जागा पण माहिती नाही. मी थोडाच आलो होतो तिथे तुझ्याबरोबर? नीट पहा बरं!" दुर्गाप्रसादने आपले अंग काढून घेतले.

सीताराम शास्त्रीने ओळखले की आपली फसवणूक झाली आहे. बिचारा उदासवाणा होऊन घरी परतला.

वाटेतच गौरीदेवी नावाची एक म्हातारी शास्त्रीबुवांना भेटली. तिने त्याचा उतरलेला चेहरा पाहून विचारले–"केव्हा परत आलास बाबा काशीयात्रेहून? चेहरा का असा दिसतोय तुझा? कसली काळजी एवढी?"

सीताराम शास्त्रीने हिला सर्व हकिगत सांगितली. यावर म्हातारी जरा विचारात पडली आणि नंतर म्हणाली–"तुझं सगळं धन मी दुर्गाप्रसादकडून परत मिळवून देते. काळजी नको करूस. फक्त मी सांगते तसतसं कर म्हणजे झालं." असे म्हणून गौरीदेवीने आपला उपाय त्याला नीट समजावून सांगितला. तिच्या म्हणण्याप्रमाणे सर्व करायला पंडित तयार झाला.

यानंतर थोड्या वेळाने म्हातारी दोन हजार रुपये किमतीचे दागिने घेऊन दुर्गाप्रसादकडे गेली. ती त्याला म्हणाली– "दुर्गाप्रसाद, माझा मुलगा दहा वर्षांपूर्वी काशीला शिकायला म्हणून गेला, तुला माहीतच आहे. पण अलीकडे त्याचा काहीच पत्ता नाही. मी तर आता म्हातारी झाले, माझा काय नेम आता? तेव्हा आत्ताच हिंडतीफिरती आहे तोवर काशीला जाऊन मुलाला शोधावं असं माझ्या मनात आलंय. मी तशी एकटीच आहे. माझ्याजवळ हे दोन हजाराचे दागिने आहेत. ते बरोबर कशाला घेऊन जाऊ? उगाच चोरा-चिलटांचं भय! सीताराम शास्त्री मागे एकदा म्हणाला होता की तू अगदी धर्मात्मा आहेस. त्याने आपलं धन काशीयात्रेला जाताना तुझ्या घरात गाडून ठेवलंय ना? तो म्हणत होता की दुसऱ्याचं धन तुला मातीसमान आहे. तेव्हा हे बघ मुला, मी परत येईपर्यंत माझेही दागिने तुझ्याकडे ठेव ना?"

म्हातारीचे बोलणे ऐकून दुर्गाप्रसादला वाटले आपलं नशीब चांगलंच उघडलंय म्हणायचं! त्याला असेही वाटले की सीताराम शास्त्री परत आल्याचे हिला नक्कीच माहीत नसावे! तेव्हा तो म्हातारीला म्हणाला–"आजीबाई, तुम्ही



आपल्या स्वतःच्या हातानेच हवे तिथे गाडून ठेवा आपले दागिने."

नेमका याच वेळी सीताराम शास्त्री पुन्हा तिथे आला अन् म्हणू लागला– "अरे दुर्गाप्रसाद, मी धन गाडून ठेवलं, त्या जागेबद्दल माझा गैरसमज झाला असावा असं वाटतंय. बरोबर जागा आत्ता माझ्या लक्षात आलीय. मी आता तिथ खोदून पाहू?"

हे ऐकून दुर्गाप्रसादच्या पोटात गोळा उठला! सीताराम शास्त्रीचे पाचशे रुपये गेल्याचे कळले तर ही बुढ्ढी दोन हजारांचे दागिने आपल्याकडे ठेवणार नाही असे त्याला वाटले, म्हणून तो सीताराम शास्त्रीकडे वळून एकदम म्हणाला–"अरे हो, तू सकाळी गेल्यावर माझ्याही मनात तसंच आलं! म्हणून मी ही दुसरीकडे खोदून पाहिले तेव्हा तुझी थैली जशीच्या तशी मिळाली, ही बघ." असे म्हणत त्याने कपाटातून पैशांची थैली काढून सीताराम शास्त्रीला दिली.

हे सर्व पहात असलेल्या म्हातारीने सीताराम शास्त्रीला म्हटले–"अरे सीतारामा, तू केव्हा आलास परत काशीहून? माझा मुलगा तिथे कुठे भेटला का रे तुला?"

"मी आज सकाळीच आलो आजी, तुमचा मुलगा भेटला होता मला काशीत! काही दिवस आजारी होता म्हणे, मग त्याने जागा बदलली. तुम्हाला कळवता नाही आलं. एका आठवडा भरात परत येणार आहे असं म्हणाला मला. मी येणारच होतो तुम्हाला सांगायला. बरं झालं इथेच भेटलात." सीताराम शास्त्रीने गौरीदेवीला सविस्तर माहिती दिली.

"बरं झालं बाबा, माझी उगाच फरफट वाचली. उपकार झाले बाबा माझ्यावर फार तुझे! आता कशाला जाऊ मी काशीला? चल सीतारामा माझ्याबरोबर, काहीतरी चांगलंचुंगलं करून खायला घालते." असे म्हणत सीताराम शास्त्रीसह म्हातारी तेथून चालू लागली.

दुर्गाप्रसाद 'आ' वासून पहात राहिला!






**त्या** वर्षी पाऊस चांगला झाला. जनावरे आणि वासरे चांगली धष्टपुष्ट झाली. नवीन वासरे जन्माला आली. गवत, झाडपाला, लतावेली खूप उगवले. धन-धान्य दूध-दुभते गोकुळात भरपूर झाले.

वर्षाऋतु संपून शरदऋतु सुरू झाला. नन्द आणि इतर प्रौढ लोकांनी एकत्र येऊन इन्द्रोत्सव साजरा करायचे ठरवले, आणि त्याची तयारीही जोरात सुरू झाली. सर्व लोक त्याच कामात गुंग राहू लागले. गोकुळात इन्द्रोत्सव दरवर्षी साजरा होत असे. सर्वांच्या उत्साहाला उधाण येई. सर्व गोपाळ एकत्र येऊन मोठ्या थाटा-माटाने हा उत्सव साजरा करीत.

कृष्णाने ही गडबड पाहून हसत-हसत विचारले–"आपणा सर्वांना कसला एवढा उत्साह आला आहे? कसलं पर्व आहे सध्या? कोणत्या देवाची पूजा करणार आहात आपण सर्वजण? कोणता लाभ मिळणार आहे त्यामुळे?"

गोपालांपैकी सर्वात वयस्कर माणसाने कृष्णाला सांगितले–"बाळा, सर्व लोकपालांचा राजा इन्द्र आहे न? वर्षाऋतुचा देवही तोच. आपल्या गायीगुरांवर उपकार करणाऱ्या इन्द्राची आपण गोपाळांनी आराधना करायलाच हवी. म्हणूनच आम्ही सर्वांनी इन्द्रोत्सव साजरा करायचं ठरवलं आहे."

हे उत्तर ऐकून कृष्ण त्यांना म्हणाला– "असं पहा, माणसांचे तीन मुख्य व्यवसाय



आहेत—शेती-वाडी, व्यापार-धंदा आणि पशु-उद्योग. ज्या लोकांचा जो पेशा असतो, तोच त्यांचा देव! आपण लोक गोपालक, वनांत रहातो, डोंगरा-रानांतच संचार करतो आणि गायीगुरं पाळून आपला उदर-निर्वाह करतो. तेव्हा जंगल, डोंगर अन् गुरं हेच आपले देव! सर्वांनी आपापल्या कुलदेवतांची पूजा करावी. शेतकरी गावात रहातात, जंगली किंवा आदिवासी लोक जंगलात रहातात. अन् आपण डोंगरांच्या आधाराने रहातो. ब्राह्मण लोक मंत्र-यज्ञ करतात, शेतकरी नांगराचा यज्ञ करतात, गोपाळांनी पहाडाचा यज्ञ करायचा, म्हणून आपण पर्वतोत्सव करणे जास्त योग्य होईल. जर माझ्या म्हणण्याप्रमाणे केलं नाहीत तर मी जबरदस्ती करून तुम्हा लोकांना पर्वतपूजा करायला भाग पाडीन."

अशा प्रकारे कृष्णाने बराच वेळ त्यांच्याशी हुज्जत घातल्यावर त्यांना त्याचे म्हणणे पटले. गोकुळातील जनता तसे पाहता सर्वस्वी कृष्णावर अवलंबून होती. त्याच्याशिवाय त्यांना कोणी त्राता नव्हता. कृष्णाने आतापर्यंत जी अद्भुत कामें केली होती, ती केवळ अपूर्वच होती—कोणाही सामान्य माणसाला ती करणे केवळ अशक्यच होते! याशिवाय कृष्णाने गोकुळवासियांना अनेकदा संकटातून वाचवले होते, त्यामुळे कृष्ण हा त्यांच्या दृष्टीने प्रत्यक्ष देवच होता.

या सर्व कारणांमुळे गोप मंडळींनी इन्द्रोत्सव साजरा करण्याची तयारी वगैरे बन्द केली आणि ब्राह्मण-पुरोहितांना बोलावून गिरि-यज्ञ उत्सवाची तयारी सुरू केली. खीर, मोदक वगैरे तयार केले गेले. विविध प्रकारचे अन्न शिजले, मांस, मध, चटण्या, दही, तूप, दूध वगैरे बंग्या अन् गाडयांवर चढवले गेले आणि आबालवृद्ध गोपमंडळी वाजंत्री लावून मिरवणुकीने गोवर्धन पर्वताकडे चालू लागले.

गोवर्धन पर्वताच्या जवळची एक जागा शेणाने सारवून, लिंपून त्यावर सुंदरशी





रांगोळी घातली गेली आणि श्रीकृष्णाच्या नेतृत्वाखाली एका उंच स्थानी गोवर्धनाची पूजा केली गेली. आपल्या बरोबर आलेल्या पदार्थांचा गोवर्धनाला नैवेद्य दाखवला गेला! सर्व गोपाळांनी गोवर्धनाला फुले वाहिली अन् नमस्कार केला. सर्व लोक जेव्हां नमस्कार वगैरे करण्यात मग्न होते तेव्हां पर्वताच्या अधिष्ठात्या देवाच्या रूपात-स्वतः श्रीकृष्णच पर्वतशिखरावर अवतरित झाला व सर्व लोक त्याच्याकडे मोठ्या विस्मयाने पहात असतानाच त्याने हात लांबवून सर्व नैवेद्य खाऊन टाकला! नंतर म्हणाला—"तुम्हा सर्वांच्या भक्तीने मी प्रसन्न आणि संतुष्ट झालो आहे. आता तुम्हाला काय पाहिजे ते मागून घ्या. तुमच्या सर्व इच्छा मी पूर्ण करीन. काय वरदान पाहिजे तुम्हाला?"

गोपाळ हात जोडून त्याला उद्देशून म्हणाले—"देवा, आम्ही सर्वजण तुझे दास आहोत, तुझ्या आज्ञेत आहोत. तू फक्त आज्ञा कर, आम्ही ताबडतोब त्याचे पालन करू."

"पर्वताच्या रूपाने इथें असलेल्या मलाच आपण देव माना अन् माझी पूजा-अर्चा करा. माझी आराधना केल्याने आपल्या सर्व इच्छा पूर्ण होतील. आपले गोधन वृद्धिंगत होईल आणि गायी आपणाला भरपूर दुग्धामृत देतील. तुम्हाला कसलीही कमतरता राहणार नाही. तुमच्या वर कोणते ही संकट येणार नाही. आलेच, तर मी तुमच्या संकटाचे निराकरण करीन. आता तुम्ही कसली ही काळजी करू नका. मी मनुष्यरूपाने तुमच्यातलाच एक होऊन राहीन." असे म्हणून पर्वत शिखरावरील देव अदृश्य झाला.

गोप लोकांनी एकाच वेळी पर्वतावर अधिष्ठित असलेला व पर्वताखाली त्यांच्यात मिसळून असलेला कृष्ण असे दोन्ही कृष्ण एकाच वेळी पाहिले व त्यांनी सर्वांनी कृष्णाला नमस्कार केला. यानंतर त्यांनी आपल्या गुरांच्या शिंगांची पूजा केली. त्यांच्या गळयांत घुंगुरमाला घातल्या व



अनेक प्रकारांनी त्यांना सजवले. जोरजोरात घोषणा देत त्यांनी पर्वताभोवती प्रदक्षिणा घातली व ठिकठिकाणी त्याची दृष्ट काढली. यानंतर ब्राह्मणांना भोजन देऊन यज्ञासाठी आणलेले उरलेले पदार्थ नैवेद्य म्हणून सर्वांनी खाल्ले. हे सर्व उरकल्यावर श्रीकृष्णासह सर्वजण परमानंदित होऊन गोकुळात परत गेले. सर्वांचा उत्साह बारवाणण्यासारखा होता. वाद्यांच्या तालावर नाचत-गात त्यांनी मार्ग आक्रमिला. एकादे सत्कार्य यशस्वीपणे पार पाडल्याचा आनंद सर्वांच्या मुद्रेवर चमकत होता.

तिकडे स्वर्गात इन्द्राला आपला अपमान झाला असे वाटून गोपाळांवर त्याचा राग उफाळून आला! त्याने संवर्तम् इत्यादि महामेघांना बोलावून त्यांना म्हटले— "वृंदावनात रहाणारे नन्दगोप आणि इतर सर्व वृद्ध गोप पूर्वी माझी पूजा करीत असत. तुम्ही सर्वांनी पाहिलेत ना, यंदा अहंकाराने प्रेरित होऊन माझी पूजा न करता त्या कपटी कृष्णाच्या सांगण्यावरून एका दुर्बळ अशा पर्वताची पूजा केली! त्यांना कदाचित असे वाटले असावे की आता आपले कर्तव्य संपले. पण आता पहातच रहा! मेघांनो, तुम्ही सतत सात दिवस मुसळधार पाऊस पाडून त्यांच्या निर्वाहाचे साधन असलेल्या गायीगुरांचे खूप नुकसान करा! त्याने मला फार आनन्द वाटेल. मी ही तुमच्याबरोबर राहून तुमचा पराक्रम व शक्ति किती आहे हे पाहीन. तुम्हाला प्रोत्साहन देईन."

गोकुळवासी लोकांना ईशान्य दिशेला एकाएकी वीज चमकताना दिसू लागली. जोरात वारा वाहू लागला, असह्य उकाडा जाणवू लागला! पाऊस पडण्याची लक्षणे दिसू लागली. पूर्वेला आकाश मेघांनी भरून आले व वीजा चमकू लागल्या. हा अवेळी पाऊस कसा? म्हणून वृद्ध अनुभवी गोपाळ आश्चर्यात पडले!

पाहता पाहता काळे ढग आकाशभर पसरले आणि सूर्य झाकोळून गेला! सारे आकाश अंधाराने भरून गेले.



कड्कड् आवाज करीत विजा कोसळू लागल्या, ढग गडगडू लागले, नंतर गारा पडल्या – आणि काय – लगेच मुसळधार पाऊस सुरू झाला.

तो पाऊस पाहून गोपाळ भयभीत झाले. त्यांना वाटले एकाएकी प्रलयकालच आला! स्वतःला या पावसातून कसे वाचवावे याचींच चिन्ता सर्वांना लागून राहिली! गुरांची दशा तर विचारूच नका! झाडे-झुडपे जमीनदोस्त झाली. विजा पडून काही वृक्ष जळून काळे ठिक्कर पडले! काही झाडे वादळ वाऱ्याने उन्मळून दूर जाऊन पडली, तर काही पाण्याच्या लोटाबरोबर वाहून जाऊ लागली. तुफानी पावसाने जंगलात भयाण तांडव मांडले! खूप पक्षी मरून पडले!

माणसांची दुर्दशा अवर्णनीयच! झोपड्या कोसळल्या, गाड्या उलटल्या, अधिकांश जनावरे मरून गेली. कुठे स्वयंपाक शिजवायचीही सोय राहिली नाही. धारा काढणे बंद झाले. आता या संकटकाळी गोपाळांनी कृष्णाकडे धाव घेतली–त्याची याचना केली–"हे कृष्णा, आम्ही तुझ्या पायाशी आलो आहोत. तूच आमचा आधार. तूच तार आम्हाला या संकटातून!"

कृष्णाला इन्द्राचा दुष्टावा समजून चुकला. दरवर्षी त्याचा जो उत्सव साजरा केला जाई तो थांबवल्यामुळे रागावून तो गोकुळावर असा सूड घेत आहे हे त्याने ओळखले! इन्द्राला वाटत आहे की, असे केल्याने कृष्ण असहाय होईल! हा सर्व विचार करून कृष्णाने ठरवले की सबंध गोवर्धन पर्वत उचलून त्याच्याच खाली सर्व माणसे व गायीगुरांना आश्रय दिला पाहिजे.

दुसऱ्याच क्षणी कृष्णाने अगदी लीलया गोवर्धन जमिनीवरून उचलला व छत्री-सारखा आपल्या हातात उचलून धरला! कृष्णाने पर्वत उचलला, तेव्हा त्यावरील मोठमोठे दगडधोंडे गडगडत खाली पडले. झाडे उपटली गेली. गुहेत असणारी सिंहा-सारखी जनावरे व बिळातले साप वगैरे







बाहेर आले. पर्वतावर रहाणारे विद्याधर पळून गेले. तेथे तपस्या करणाऱ्या मुनींची तपस्या भंग पावली!

गोवर्धन उचलल्यावर कृष्णाने गोपाळांना म्हटले–"तुम्ही सर्व आपापल्या गुरांना घेऊन पर्वताखाली या. तुमचे पावसापासून रक्षण होईल!" कृष्णाची हाक ऐकून ते सर्व आपले सामान, गाड्या, गायीगुरे व बायको-पोरांना घेऊन पर्वताच्या आश्रयाला आले.

सात दिवसपर्यंत मुसळधार पाऊस पाडल्यावर मेघांना परत बोलावून इन्द्र तेथून निघून गेला. मग काय? आकाश स्वच्छ झाले आणि सारे गोकुळ पर्वताखालून बाहेर आले! कृष्णाने उचललेला पर्वत यथास्थान ठेऊन दिला! आणि स्वतः पर्वतावर बसून आनंदाने चरत असलेल्या गायींकडे पहात राहिला!

कृष्णाने केलेले हे अद्भुत कार्य पाहून इन्द्राला निर्विकारपणे बसून राहवेना! तो मनातल्या मनात घाबरून गेला! म्हणून काही देवांना बरोबर घेऊन, ऐरावतावर बसून व हातात वज्र धारण करून तो पृथ्वीवर उतरला आणि गोवर्धन पर्वतावर कृष्ण बसला होता तेथे गेला. कृष्णाला पाहून इन्द्राच्या लक्षात आले की हा तर देवांचा देव! मग ऐरावतावरून उतरून नतमस्तक होऊन कृष्णाला नमस्कार केला!

कृष्ण इन्द्राला पाहूनही न पाहिल्या-सारखे करून तसाच निश्चल बसून राहिला. इन्द्राला समजून चुकले की कृष्ण आपल्यावर नाराज आहे. तेव्हा त्याने त्याची स्तुति केली. त्याने कबूल केले की गोपाळाच्या रूपात असल्यामुळे कृष्णच सर्वेश्वर आहे हे तो ओळखू शकला नाही आणि अहंकाराने त्याने कृष्णाला त्रास दिला! त्याने कृष्णाची क्षमा मागितली. नंतर इन्द्राने कृष्णाला 'गोपति' म्हणून अभिषेक केला व त्याला वस्त्रालंकार अर्पण केले.

शेवटी इन्द्राने कृष्णाला म्हटले–"हे कृष्णा, कंसाच्या अधीन असलेले अनेक राक्षस तुझ्या वाईटावर टपलेले आहेत,

त्या सर्वांचा शेवट तुझ्याच हातून होणार आहे. कंसाचा वध केल्यानंतर तू राजा होशील. तुझी आत्या कुंती हिने युधिष्ठिर व भीमसेन यांना जन्म दिल्यानंतर माझ्यापासून अर्जुन जन्मला आहे. तो तुझा भक्त बनून तुझ्या आश्रयाची इच्छा करील. तू त्याला आश्रय देऊन त्याचा उद्धार कर, त्याला यश दे. भविष्यात कौरव व पांडव यांचे युद्ध होणार आहे. त्यात अर्जुन जिंकावा अशी माझी इच्छा आहे."

"माझ्या आत्याचे पाचही पुत्र महापराक्रमी आहेत व देवांश घेऊनच ते जन्माला आलेले आहेत. पुढे ते सर्व पृथ्वीचे शासक बनणार आहेत. त्यांच्यातला मधला अर्जुन हा असाधारण शूर व पराक्रमी आहे—या सर्व गोष्टी मला माहितच आहेत. तू जे काही सांगितलेस ते सर्व मी अवश्य करीन. तुझे आगमन मला संतोषजनक वाटले. आता तू निश्चिन्त होऊन स्वर्गलोकाला जा."

यानंतर इन्द्राने कृष्णाला साष्टांग प्रणिपात केला, त्याला प्रदक्षिणा घातली व ऐरावतावर बसून अन्य देवांच्यासह मोठ्या प्रसन्नतेने आपल्या लोकी निघून गेला. कृष्णही आता पर्वतावरून उतरून गोकुळात निघून गेला.

कृष्णाच्या आगमनानंतर सर्व गोपाळांनी त्याला गराडा घातला. कृष्ण हा असाधारण आहे हे त्यांना पुन्हा एकदा स्पष्ट कळले. त्यांनी कृष्णाला विचारले—"कृष्णा, आमच्यात प्रच्छन्नपणे वावरणारा तू खरा कोण आहेस? तू तर त्रैलोक्याचा रक्षणकर्ता आहेस असे वाटते. असे असताना तू इथे गायी चारण्याचे काम का करतोस? खरे तर तुला पाहून आम्हाला भीतीच वाटते!"

कृष्ण हसून म्हणाला—"मी तर तुमच्यातलाच एक गवळी आहे, असे असताना तुम्ही मला असले प्रश्न का विचारता?" हे कृष्णाचे बोल ऐकून सर्वजण फार आनंदित झाले.





# प्रामाणिकपणा

जगन्नाथ आणि उमापती दोघेही मित्र साठ वर्षांचे होते. दोघे आपल्या गावाकडे निघाले होते. परंतु रामनगरची सीमा पार करताच सोसाट्याचा वारा सुटून पावसाचे मोठमोठे थेंबही पडू लागले. वादळाची ही लक्षणे पाहून कोठेतरी आश्रय घ्यावा म्हणून दोघेही भराभर पाय उचलू लागले आणि थोड्याच अंतरावरील भग्न अवस्थेतील मन्दिरात पोचले. तेथे अगोदरच एक तरुणी अश्रु पुसत उदासवाणी बसली होती.

तिला अशा स्थानी एकटीच बसलेली पाहून या दोघा वडिलधाऱ्या मित्रांना आश्चर्य वाटले. एकाने विचारले—"अग तू अशी एकटी कशी अडकलीस इथे?"

बोलावे न बोलावें अशा विचारात थोडा वेळ पदराशी चाळा करीत ती म्हणाली—मी जिवाला कंटाळून गेले आहे. आत्महत्या करायच्या प्रयत्नात इथे वादळ-वाऱ्यात सापडले." असे म्हणून ती पुन्हा रडू लागली.

तिचे उत्तर ऐकून जगन्नाथ व उमापती आश्चर्यात पडले. तिच्याकडे सहानुभूतीने पहात जगन्नाथने विचारले—"बाळ, अग राणीवशात रहाणाऱ्या तुझ्यासारख्या मुलीच्या मनात आत्महत्येचा विचार का यावा?"

तरुणी थोडा वेळ मान खाली घालून तशीच बसली व स्वतःला सावरत सांगू लागली—"राजा अन् राणी माझ्या विवाहाबद्दल बोलताना मी आज ऐकलं. आमच्या जमीनदारीचं काम करणाऱ्या शिवानन्द नावाच्या नोकराच्या मुलाशी माझा विवाह करून द्यायचं त्यांच्या मनात आहे. मी जमीनदाराची मुलगी असून आमच्याच नोकराच्या मुलाशी लग्न काय म्हणून



"करायचं? एवढ्यासाठीच मी आत्महत्या करायचं ठरवलं आहे."

त्या मुलीची ही गोष्ट ऐकून जगन्नाथ म्हणाला–"मुली, तू जमीनदार शामराय भूपतीची मुलगी प्रमिलाच असली पाहिजेस. तुझा वध करायचा अनेकदा प्रयत्न करून शेवटी कारावासाची शिक्षा भोगायला लागलेले ते दोन दुष्ट आम्हीच! आता तुरूंगातून सुटल्यावर काही उपकार करता आल्यास करून केल्या पापांचं ओझं थोडं तरी हलकं करावं म्हणून आम्ही दोघंही आपल्या गावाकडेच निघालो होतो पोरी!"

"त्या दिवशी त्याच शिवानन्दने आम्हाला अडवलं नसतं तर आज आमच्या डोक्यावर तुझ्या वधाच्या पापाचं ही केवढं मोठं ओझं असतं!" उमापती गहिंवरून म्हणाला.

"राजाप्रमाणेच तुम्ही लोकही त्या शिवानन्दाची एवढी तारीफ का करताय् मला काही कळत नाही!" प्रमिला म्हणाली.

उत्तरादाखल जगन्नाथ म्हणाला–"एकदा जमीनदार शामराय भूपतींना कसलासा भयंकर आजार झाला. वैद्यांनी अनेक प्रकारचे औषधोपचार केले पण त्याच्या जिवाला भीती होतीच. त्याची पत्नीही बऱ्याच काळापूर्वी देवाघरी गेली होती. अशा परिस्थितीत जमीनदाराचा आपल्या कोणत्याही नातेवाईकावरही विश्वास नव्हता. म्हणून त्यांनी आपले दिवाण उमापती आणि मित्र जगन्नाथ या दोघांना सहा वर्षांच्या छोट्या प्रमिलेचे पालक म्हणून नियुक्त केले. प्रमिला योग्य वयाची होई-पर्यंत सर्व जमीनजुमला व इस्टेटीची व्यवस्था पहाण्याचे काम ही या दोघांवरच सोपवले होते. या घटनेनंतर थोड्याच दिवसात जमीदाराचे देहावसान झाले.

एक आठवडा होतो न होतो तोच जगन्नाथने आपली पत्नी भद्रावती हिच्या-सह घराची व्यवस्था पहाण्याच्या निमित्ताने वाड्यातच ठाण मांडले! त्याने आपला



संसारच वाडयात मांडला, आणि छोटया प्रमिलेचे दिवस फिरले. ते दोघेही तिला खूपच त्रास देऊ लागले. कोणाला शंका येऊ नये म्हणून त्यांनी एक अशी योजना बनवली की प्रमिलेला नैसर्गिक मृत्यु आला असे इतरांना भासेल, आणि मग काय? इस्टेट आपल्यालाच हातात!

या दोघांचा दुष्ट कट ओळखून नोकर शिवानन्द विशेष काळजीपूर्वक प्रमिलेवर लक्ष ठेऊ लागला. मध्यंतरी श्यामराय भूपति बद्दल विशेष प्रेम व सहानुभूति असणारे त्या देशाचे राजा श्रीवर्द्धन राज्यांत भ्रमण करीत असता श्यामराय भूपतीच्या गावी आले.

त्यावेळी खाण्या-पिण्याच्या आबाळीमुळे प्रमिला फार दुबळी झालेली होती. राजा आल्याची बातमी कळताच भद्रावतीने प्रमिलाला न्हाऊ-माखू घातले, तिला रेशमी वस्त्रे नेसवली, आणि छान मेजवानीची व्यवस्था केली.

प्रमिलाची भेट झाल्यावर राजाने विचारले–"बेटी, खुशाल आहेत न? तुझ्या वडिलांनी तुला ज्या पालकांच्या हवाली केले, ते तुझी योग्य ती काळजी घेत आहेत ना?"

त्या वेळी भद्रावती प्रमिलेच्या पुढे एका झिरझिरीत पडद्या आड उभी राहिली नि




डोळे वटारत तिने प्रमिलेकडे पाहिले. तरी पण प्रमिला जरा ही न घाबरता म्हणाली–"ज्या दिवशी आपल्या सारखे लोक येतात, तेव्हांच मला चांगलं-चुंगलं खायला मिळतं, एरवी कोणी माझ्याकडे ढुंकून पहात नाही."

मग राजे प्रमिलेच्या पालकांवर चांगलेच रागावळे नि त्यांना धमकाऊन नीट वागण्या-बद्दल सूचना दिली.

त्या दिवशी रात्री भद्रावतीने प्रमिलेला गुदामात कोंडून मिरच्यांची धुरी दिली. सकाळी शिवानंदने येऊन पाहिले, तर प्रमिला शुद्धी वर नव्हती. त्यानें उपचार करून तिला शुद्धीवर आणले.



दोन दिवसानंतर जगन्नाथाने शिवानन्दाला बोलवून सांगितले—"हे बघ, गेले काही दिवस प्रमिलाची प्रकृति बरी नाही. वैद्य येऊन प्रमिलेला पाहून गेले नि औषधासाठी कुणाला तरी पाठवायला सांगून गेले. तू जाऊन औषध घेऊन ये बरं."

शिवानन्द वैद्यांकडे गेला व त्यांनी दिलेल्या औषधाच्या गोळ्या घेतल्या. त्याला या औषधाबाबत शंका होतीच. त्याने औषधाच्या गोळ्या रस्त्यांत फेंकून दिल्या आणि बाटलीत साखरेच्या गोळ्या भरल्या. एक आठवडा भर औषध देऊन ही प्रमिलेवर त्याचा काही परिणाम झाला नाही. कट रचलेल्या तिघांना ही याचे फार आश्चर्य वाटले.

यानंतर त्यांनी एक मांत्रिक आणला, रांगोळ्या काढून त्यांच्या मध्ये प्रमिलेला बसविले आणि मंत्र-पाठ सुरु केला. शिवानन्दाला कळून चुकले की हे सर्व प्रमिलेला त्रास देण्यासाठी घडत आहे. मग काय? लगेचच दुसऱ्या दिवशी मध्य-रात्री शिवानन्द प्रमिलेला शेजारच्या गावी घेऊन गेला नि तिला आपल्या एका नातेवाईकाकडे ठेवून आला. जमीनदाराच्या घरी येऊन शिवानन्द असा झोपून गेला कि जणू त्याला काही माहीतच नाही.

सकाळ होताच प्रमिला अदृश्य झाल्याची बातमी आगीसारखी गाव भर पसरली. केवळ जमीनदाराचे नोकरच नव्हेत, तर गांवकऱ्यांना ही उमापति व जगन्नाथाबद्दल संशय येऊं लागला. मृत जमीनदाराबद्दल लोकांच्या मनांत खूप श्रद्धा होती. दहा दिवस वाट पाहिल्यावर सुद्धा जेव्हां प्रमिला परत आली नाही तेव्हां लोकांनी राजाकडे तक्रार केली.

जगन्नाथ, उमापति व भद्रावती यांची कसून चौकशी करुन राजाने सर्वांना तुरुंगात टाकले.

थोड्या दिवसां नंतर शिवानन्दाने प्रमिलेला राजाच्या स्वाधीन केले आणि सांगितले—"प्रभु, या मुलीबद्दल थोडीशी सुद्धा सहानुभूति न ठेवता त्या दुष्टांनी संपत्तीच्या लोभाने तिला ठार करण्याचा कट रचला. म्हणून मी हिचे रक्षण करून तिला एका ठिकाणी लपवून ठेवले. माझी काही चूक असेल तर मला शिक्षा द्यावी महाराज!"

शिवानन्दाने सांगितलेला सर्व वृत्तान्त ऐकून राजा म्हणाला—"तू प्रमिलेवर एवढा उपकार केलास, आता तिच्या रक्षणाची जबाबदारी तूच घे."

शिवानन्दाने राजाचे म्हणणे मान्य केले नाही आणि म्हणाला—"पैशांना लालचावलेल्या लोकांमुळे प्रमिलेला सर्वत्र धोकाच आहे असे मला वाटते. ही मुलगी आपल्या देखरेखीखालीच सुरक्षित राहू शकेल."

त्या दिवसापासून प्रमिला राजाकडे राहू लागली. जमीनदारी बाबतची सर्व कामे राजाने शिवानन्दाकडे सोपवली. शिवानन्द अत्यन्त प्रामाणिकपणे ही जबाबदारी पार पाडू लागला. शेतांतील उत्पन्न व शेतसाऱ्याची वसूली करून मिळणारी रक्कम तो राजाला देऊ लागला.

इकडे जगन्नाथ कडून सर्व गोष्टी ऐकल्यावर प्रमिला डोळ्यांत अश्रू आणून म्हणाली—"वस्तु-स्थिति समजून घेण्याचा प्रयत्न न करता मी शिवानन्दांची उगाच अवहेलना केली. परमेश्वर माझ्या या अपराधाला क्षमा करील की नाही कोण जाणे!"

उमापति व जगन्नाथ यांनी प्रमिलेला सान्त्वना देत विचारले—"मुली, आता तुझा काय निश्चय आहे?"

प्रमिला म्हणाली—"तुमच्यापैकी एक जण माझ्या बरोबर जमीनदारीत चला. दुसऱ्याने राजाकडे माझा क्षेम-समाचार द्यावा. यानंतर शिवानन्दाच्या मुलाशी माझा विवाह होईल, त्यावेळी आपण हजर राहून मला आशीर्वाद द्यावा. मला खूप आनन्द होईल."

आता पर्यंत पाऊस छान थांबला होता. उमापति प्रमिलेसह जमीनदारीच्या गावी निघाला आणि जगन्नाथने रामनगरची वाट धरली.





# सौदामिनीची गोष्ट

चन्दन देशावर राजा अनंगवर्मा राज्य करत असतानाची गोष्ट. राजाला एकुलती एक मुलगी होती. सौदामिनी तिचे नाव. सौदामिनी तीन वर्षांची असतानाच तिच्या मातेचे देहावसान झाले! राजाने दुसरा विवाह केला नाही. तो कोड-कौतुकाने मुलीचा सांभाळ करू लागला.

उपवर होता-होता सौदामिनी फार सुंदर दिसू लागली. गुणवती अन् बुद्धिमती तर होतीच ती!

एक दिवस अनंगवर्मा कन्येला म्हणाला– "बाळ, आता तुझा विवाह करायला हवा. ही बघ अनेक देशच्या राजकुमारांची चित्रं आली आहेत, आणि या ताडपत्रांवर त्यांची वर्णनं लिहिलेली आहेत. नीट काळजीपूर्वक सर्व पहा आणि यांतून स्वतः-साठी योग्य पतीची निवड कर. तुला माहीतच आहे की तू ज्याची निवड करशील तो राजकुमार केवळ तुझा पतीच नव्हे तर या देशाचा भावी राजाही असेल." असे म्हणून राजाने काही चित्रे आणि ताडपत्रे तिच्या हाती दिली.

राजाच्या हातून ती चित्रे आणि ताडपत्रे घेऊन सौदामिनीने एका बाजूला ठेवून दिली आणि ती जरा वेळ आपल्याच विचारात उभी राहिली. नंतर ती वडिलांना म्हणाली–"बाबा, माझ्या भावी पतीच्या सौंदर्य, शौर्य आणी पराक्रम या बाबतीत जास्त तर्कवितर्क करायची मला गरज नाही, तो विचार तर तुम्हीच चांगला कराल, पण मी आपल्या भावी पतीच्या गुणांची मात्र पारख करू म्हणते. त्या माझ्या परीक्षेत जो सफल होईल, त्याच्या-शीच मी विवाह करीन, कारण माझ्या मते चारित्र्यासारखा दुसरा गुण किंवा दुसरे सौंदर्य या जगात नाही.

सिधु कुलकर्णी

मुलीच्या निर्णयावर राजा खूश झाला. त्याने विचारले–"कशी परीक्षा घेणार आहेस तू बाळ?"

"मी तुम्हाला एक गोष्ट सांगते बाबा. माझ्याशी विवाह करू इच्छिणाऱ्या कुमा-रांना तुम्ही ती सांगा. त्या गोष्टीत जी समस्या आहे, ती बरोबर सोडवणारा विजेता कुमार माझा पति होईल. कळले?" असे म्हणून ती राजाला गोष्ट सांगू लागली.

प्राचीन काळी वत्सल देशावर चक्रसेन राजा राज्य करीत होता. त्याच्या मुलीचं नाव होतं कनकप्रभा. दिसायला ती अतिशय सुंदर होती.



एक दिवस वत्सल देशाचा मित्रदेश कौडिण्य देशाचा राजा विश्वम्भर वत्सल देशातल्या एका उत्सवात भाग घेण्यासाठी आला होता.

त्यांवेळी एकदा चक्रसेनच्या विश्राम-गृहात टांगलेली चित्रे पहातापहाता एका रमणीच्या चित्राकडे विश्वम्भर चकित होऊन एकटक पहातच राहिला!

त्याची ही स्थिति जाणून चक्रसेन त्याला म्हणाला–"या चित्रातल्या रमणीचे सौंदर्य अप्सरानांही लाजवणारे आहे न? मलाही हे चित्र फारच आवडते."

हे शब्द ऐकून हलकेच हसत विश्वम्भर म्हणाला–"मला चित्रातील सौंदर्याने नव्हे, पण दुसऱ्याच एका गोष्टीने आश्चर्यात पाडले आहे. का कुणास ठाऊक, पण माझी अशी खात्री आहे की चित्रकाराने हे चित्र आपल्या डाव्या हाताने काढलेले आहे!"

आपल्या मित्राच्या बोलण्याचे आश्चर्य वाटून चित्रसेन म्हणाला–"छे, छे! हे चित्र काढणाऱ्या चित्रकाराचे नाव माथुर. त्याने उजव्याच हाताने हे चित्र काढताना मी आपल्या डोळ्याने पाहिले आहे! तुमची काहीतरी चूक होत असावी."

"अशी शक्यता आहे की त्याने तुमच्या समोर उजव्या हाताने चित्र काढायला सुरुवात केली, पण नंतर नक्कीच त्याने हे चित्र डाव्या हाताने काढले आहे."



विश्वम्भरने पुन्हा ठामपणे प्रतिपादन केले. चित्रसेन जरा रागात येऊनच म्हणाला– "ठीक आहे. आपण या गोष्टीची शहा-निशा करून घेऊ. आत्ताच मी माथुरला बोलावून घेतो अन् त्याच्याकडून खरे काय ते आपण काढून घेऊ. मी हरलो तर आपल्या मुलीचा – कनकप्रभेचा – विवाह तुमच्या पुत्राशी करून देईन."

उत्तरादाखल विश्वम्भरने डोळे हलवले आणि म्हटले–"तुमची अट तर प्रशंसनीय आहे. पण मी हरलो तर मी मरेपर्यंत तुमच्या देशातल्या विकास योजना राबवण्यासाठी दरवर्षी पन्नास हजार सुवर्णमुद्रा अनुदान म्हणून देत राहीन. ठीक आहे ना?"

नंतर चक्रसेनने माथुरला बोलावणे पाठवले. तो तासाभरात येऊन हजर झाला. राजाच्या तोंडून प्रश्न ऐकून प्रथम तो घाबरूनच गेला! पण नंतर त्याने कबूल केले की ते चित्र त्याने डाव्या हातानेच काढले होते!

चक्रसेन प्रथम जरा चकावलाच, पण पुन्हा स्वतःला सावरून त्याने माथुरला परत पाठवून दिले आणि नंतर तो विश्वम्भरला म्हणाला–"मी या बाबतीत पराजित झालो खरा, पण अंततोगत्वा माझा फायदाच आहे की नाही? आता मी महाराणी अन् कनकप्रभाला ही बातमी सांगून लवकरच मुहूर्त निश्चित करायची व्यवस्था करतो."

विश्वम्भरने मोठ्या प्रसन्नतेने आपली मान्यता दिली.

त्याच दिवशी संध्याकाळी राजकुमारी कनकप्रभेची माता महाराणी इन्दुमतिदेवी आपली कुलदेवी स्वयंप्रभादेवीची पूजा उरकून परत येत होती. त्याच वेळी चार डाकूंनी महाराणीची पालखी वहाणाऱ्यांना अडवले! नि त्यांना तोंड देण्याचा प्रयत्न केला. परंतु डाकूंनी त्यांना जखमी केले. त्यावेळी राजपथावरून चालणारी जनताही भयाने सैरावैरा पळत सुटली.

आता चारही डाकू महाराणीजवळ पोचणार तोच–एक तरुण विजेच्या चपळाईने तेथे आला आणि त्यांच्यावर तुटून पडला. त्याच्या तलवारीच्या वारांनी घाबरून डाकू तिथून पळून गेले. परंतु राजाच्या शिपायांनी पाठलाग करून त्यांना पकडले व त्यांच्या हातात बेड्या ठोकल्या.

राणी इन्दुमतीने त्या युवकाला विचारले– "बाळा, तू कोण आहेस? आपलं नाव-गाव सांग?"

तरुणाने विनयाने उत्तर दिले–"माझे नाव राजशेखर. महासेनापति त्रिविक्रम वर्मांचा मी नातेवाईक आहे."

महाराणीने प्रसन्न होत विचारले– "ओहो, म्हणजे महासेनापतींनी आपल्या मुलासारखा मानलेला त्यांचा पुतण्या तूच तर?"

मान हलवून राजशेखरने होकार दिला.

"मी ऐकलं होतं की तू काशीत विद्याभ्यास करीत असतोस? तुझं शिक्षण पूर्ण झालं काय?" इन्दुमतिदेवीने विचारले.

"महाराणी, एक महिन्यापूर्वीच शिक्षण पूर्ण करून परत आलो मी." राजशेखर उत्तरला.

"आनंदाची गोष्ट आहे बाळा! तू माझं आज रक्षण केलं आहेस. तुझं हे ऋण चुकवण्यासाठी शक्य झाल्यास माझ्याजवळचं अमूल्य सुवर्ण मी तुला देईन." असे म्हणून महाराणी पालखीत बसून गेली.

राणीला गुप्त रुपाने असे सुचवायचे आहे की राणी कनकप्रभेचा विवाह राजशेखरशीच लावून देणार आहे – असा



राणीच्या या बोलण्याचा अर्थ राजशेखरने लावून घेतला.

युवराज्ञी कनकप्रभेच्या विवाहासंबंधी राजा व राणीच्या मनात असे विचार चालू असताना इकडे खुद्द कनकप्रभेच्या बाबतीत एक निराळीच घटना घडत होती. त्याच दिवशी संध्याकाळी कनकप्रभा आपल्या सख्यांसमवेत उद्यानात फिरायला गेली होती. त्यावेळी मैत्रिणींच्या आग्रहाखातर कसलेसे एक गीत गातगात कनकप्रभा एका झाडीकडे गेली.

त्यावेळी आकाशमार्गाने जाणाऱ्या वरुणदत्त नावाच्या गंधर्वाने अप्सरांनाही लाजवील असे तिचे सौंदर्य पाहिले व तो मुग्ध होऊन तिच्याजवळच खाली पृथ्वीवर उतरला!

ध्यानीमनी नसताना अचानक आपल्या शेजारी एका गंधर्वाला पाहून कनकप्रभा आश्चर्याच्या धक्क्याने निश्चेष्ट झाली. ते पाहून तिच्या सख्याही दूर निघून गेल्या.

वरुणदत्तने कनकप्रभेला म्हटले–"मी आकाशातून संचार करीत असताना तुझ्या सौंदर्यानेच मला इथे खेचून आणले! मी एक गंधर्व आहे. माझे नाव वरुणदत्त! तुझी काही अडचण नसेल तर माझी तुझ्याशी विवाह करायची इच्छा आहे."

गंधर्वाचे हे बोलणे ऐकून कनकप्रभा चकित झाली! गंधर्वासारखी व्यक्ति अशी अचानक येऊन विवाहाचा प्रस्ताव मांडताना पाहून कनकप्रभेला आनंद झाला अन् आश्चर्यंही वाटले.

आता ती वरुणदत्ताला आपला होकार सांगणार तोच तिला अचानक आपल्या मातापित्यांची आठवण झाली!

तिने वरुणदत्तला म्हटले–"मी तर एक कन्या आहे. माझ्या मातापित्यांकडून उद्या मी आपणाला माझा होकार कळवीन."

स्मितहास्य करीत तिच्या या बोलण्यावर संमतिसूचक डोके हलवून वरुणदत्त म्हणाला–"ठीक आहे, मी परवा पुन्हा येईन." असे म्हणून तो तेथून निघून गेला.

(पुढील अंकी समाप्त)






विमलानन्द नावाचा एक साधू आपल्या शिष्यांसह तीर्थयात्रा करीत करीत आनन्दपूरला येऊन पोचला. त्या गावातल्या सर्वात श्रीमंत माणसाचे नाव होते लिंगराज. साधू व त्याच्या शिष्यांच्या रहाण्याची व्यवस्था व त्यांच्या जेवण्याखाण्यासाठी लागणारा सर्व खर्च लिंगराजनेच केला. शिवाय साधुबरोबर राहून त्याची सर्व सेवाही त्याने स्वत: केली.

विमलानन्द गाव सोडून जायला निघाला. त्याला निरोप देण्यासाठी सर्व गाव तेथे जमला. त्यांना आशिर्वाद देण्यासाठी साधू तेथे आला तेव्हा आपल्या मागे उभ्या असलेल्या लिंगराजला उद्देशून त्याने विचारले–"वत्सा, तू तर जन्मजात श्रीमंत आहेस, सर्व प्रकारची सुखसमृद्धि तुला लाभलेली आहे. असे असूनही तू माझी जी सेवा केलीस ती काय उद्देशाने केलीस, हे सांगतोस मला?"

यावर लिंगराज उत्तरला–"माणसाला काय केवळ धन हेच सर्वस्व आहे का? साधु संन्याशांच्या सेवेपरते दुसरे मोठे धन या जगात असू शकते?"

हे उत्तर एकून संतुष्ट झालेल्या विमलानन्दाने लिंगराजला आशिर्वाद देण्यासाठी हात उचलला, तोच मंगराज नावाचा एक गृहस्थ पुढे होत म्हणाला–"स्वामी, माझ्या मनात एक शंका डोकावत आहे. लिंगराजच्या बोलण्याच्या पुष्टयर्थ एकादा संदर्भ दिल्यावाचून आणि ते बोलणे उचित की अनुचित याचा विचार केल्यावाचूनच असे कसे म्हणता येईल की माणसाला धन हेच सर्वस्व नाही?"

विमलानन्द स्मितहास्य करीत म्हणाला–"एकादे सत्य प्रस्थापित करण्यासाठी काही नियम नसतात. तरीही मी जाणू इच्छितो की तुझ्या मनात हा विचार का आला?"









हा प्रश्न ऐकून मंगराज म्हणाला– "स्वामी, माझे कुटुम्ब खूप मोठे आहे. दिवसभर अंग मोडून काम करूनही मी कुटुम्बाच्या निर्वाहापुरते मिळवू शकत नाही. या गावातल्या अधिकांश लोकांची परिस्थितिही माझ्यासारखीच आहे. त्यामुळे 'माणसाला धनच सर्वस्व नाही' हे म्हणणे लिंगराजसारख्या काही श्रीमंतांनाच शोभून दिसते. माझी एवढीच शंका आहे."

मंगराजचे बोलणे एकून सर्व गावकरी जोरात हसू लागले. लिंगराजने खजिल होऊन मान खाली घातली.

आता विमलानन्द लोकांना समजाऊन सांगू लागला–"ऐका मंडळी, आत्ता मंगराज बोलला त्यात धर्मसूत्र गोवलेले आहे. खरोखरीच–माणसाला धनार्जन करणे हे फारसे महत्त्वाचे नाही–हे म्हणणे अपार पैसा कमावण्याऱ्या लिंगराजलाच शक्य आहे. तेव्हा अशा लोकांनी गरीब लोकांवर उपकार करण्यासाठी खर्च करणे अधिक योग्य."

साधूच्या बोलण्याच्या स्वीकारार्थ सर्व गावकऱ्यांनी माना हलवल्या.

लिंगराजच्या खांद्यावर हात ठेवत साधू म्हणाला–"तुझे 'धन सर्वस्व नाही' हे म्हणणे सार्थक करण्यासाठी मी आत्ता जे सांगितले, तसे वाग. माझी सेवा करण्याची धडपड करणारांना आजपर्यंत हा उपदेश मी दिला नाही आणि एक प्रकारे त्यांची उपेक्षा केली. मला वाटत असे की–सर्व ज्ञान मिळवले आहे. पण अशा स्थितीत आज लिंगराजने मला या गोष्टीचे स्मरण करून दिले! मी त्याला पुढे कधीही विसरू शकणार नाही." यानंतर सर्व गावकऱ्यांना आशिर्वाद देऊन आपल्या सर्व शिष्यांसह साधु विमलानन्द तेथून पुढील यात्रेला निघून गेला.

लिंगराजने यावरून बोध घेऊन तो त्या दिवसापासून आपले धन लोकोपयोगी कार्यासाठी खर्च करू लागला, आणि 'धर्मदाता' या नावाने प्रसिद्धी पावला!








आर्क्टिक महासागरातील बर्फाची टेकाडे गल्फ प्रवाहात प्रवेश करताच तीन आठवड्यात विरघळून जातात.







ताडाच्या झाडांच्या जवळजवळ २,८०० जाती आहेत. ही झाडे उष्ण प्रदेशातच अधिक प्रमाणात दिसतात. परंतु यातील दोन जाती युरोपीय महाद्वीपातही आढळतात.

# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी

विवेकशील माणूस कधीही आत्मस्तुति करीत नाही, कारण आत्मस्तुतीत परनिन्दाही निहित असते. याशिवाय काही लोकांची आणखी निराळी प्रवृत्ति असते. हे लोक स्वतःला अत्यन्त बुद्धिमान मानत असतात. त्यांच्या वागणुकीत व बोलण्यातही असा अभिमान दिसून येतो की ते सर्व गोष्टीत कुशल आहेत व इतर सर्वजण मूर्ख आहेत. याचे उदाहरण "वचनाला जागणारा" ही गोष्ट आहे.

## अमरवाणी

यत् तदग्रे विषमिव, परिणामेऽमृतोपमम्,
तत् सुखं सात्विकं, प्रोक्तमात्मबुद्धि प्रसादजम् ।

[ प्रारंभी विषाप्रमाणे भयानक असूनही — निर्मल व सात्विक जीवनामुळे मिळणारे सुख, उत्तरोत्तर अमृताप्रमाणे आनन्द-दायक होते.]

वर्ष : ३९ जुलै १९८८ अंक : १
एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००

# मुद्दल व व्याज

श्रीरंगपुरमधे लक्ष्मीपति नावाचा एक दुकानदार रहात असे. गावातल्या अन्य दुकानांपेक्षा लक्ष्मीपतीच्या दुकानात जास्त व्यापार चाले. त्यामुळे तो गावातल्या मूठभर श्रीमंतात एक गणला जाई. परंतु तो इतर धनवान लोकांप्रमाणे आपले धन कोणत्याही परिस्थितीत व्याजाने देत नसे. त्यामुळे त्याच्या या वागणुकीचे लोकांना भारी आश्चर्य वाटे. दर महिन्याला आपल्या प्राप्तीतला एक मोठासा हिस्सा काढून तो तिजोरीत सुरक्षित ठेवत असे.

लक्ष्मीपतीच्या शेजारीच एक सावकार रहात असे. त्याला लक्ष्मीपतीचा हा व्यवहार जरा विचित्रच वाटे. एक दिवस आपली ही शंका फेडून घेण्यासाठी त्याने या शेजाऱ्याला विचारले–"हे पहा लक्ष्मीपती, व्यापारात तू खूप पैसा मिळवला आहेस हे सर्वांनाच माहीत आहे. ते धन नुसते तिजोरीत बन्द करून ठेवण्यात काय फायदा? माझा सल्ला मान आणि हा पैसा व्याजी लाव. तुला मुद्दलाबरोबर व्याजही मिळेल. सध्या तू आपले पैसे नुसतेच तिजोरीत लपवून ठेवतो आहेस, त्यामुळे तुझ्याजवळ फक्त मुद्दलच राहील, व्याज मिळवायला तू मुकतो आहेस.

आपल्या शेजाऱ्याचा सल्ला ऐकून लक्ष्मीपति हसत म्हणाला–"तुला वाटतंय तितका काही मी मूर्ख नाहीय. मी ते पैसे तिजोरीत ठेवताना व्याजाचा हिशोब करून तितके व्याजही त्यात मिळवतो आणि मगच ते पैसे तिजोरीत ठेवतो, समजलं?"





# वचनाला जागणारा

गाववाले लोक खूपदा असे म्हणत की नारायण दरिद्री आहे, पण मोठा अभिमानी आहे तो! तो कधीही कोणासमोर हात पसरून कसली याचना करत नसे. उलट तो नेहमी दुसऱ्यांना मदत करी. स्वत: मात्र तो कुणाकडून कसली मदत घेत नसे. त्यामुळे लोकांची अशी धारणा होती की नारायण म्हणजे चांगल्या व्यक्तिमत्वाचे प्रतीक आहे!

हाच नारायण एक दिवस गावच्या चावडीवर बसून गप्पा मारणाऱ्या वीरभद्राला भेटून म्हणाला–"महाराज, आपण मला एक मदत केली पाहिजे."

त्यावेळी वीरभद्र चावडीत बसलेल्या लोकांसमोर स्वत:बद्दल मोठ्या लंब्याचौड्या गप्पा मारत होता, बढाई मारत होता. तो स्वत: चांगला श्रीमंत होता. त्यामुळे सर्वांचा त्याच्याशी काही ना काही कारणाने संबंध येत असे. यामुळे त्याच्याशी कसलाही प्रतिवाद न करता त्याचे बोलणे सर्वजण ऐकून घेत असत. अशा वेळीच नारायण तेथे येऊन त्याच्याशी बोलला आणि त्याने त्याची मदत मागितली म्हणून वीरभद्रला फार हर्ष झाला!

"बोल बाबा, तू कसलीही मदत माग, माझ्याकडून जमेल तितकी मदत मी नक्कीच करीन तुला." नारायणकडे मोठ्या सहानुभूतिने पहात तो म्हणाला.

"माझ्या मुलीच्या लग्नासाठी मला तीनशे रुपयांची गरज आहे." पुढे नारायण आणखी काही बोलणार तोच वीरभद्र हसून म्हणाला–"अरे गड्या, त्यात काय एवढं? तू हे पैसे तसेच घे. तुझ्यासारखा भला माणूस पैसे मागतो, अन् मी नाही म्हणू? मी सर्वात आधी सरळ तुमच्याचकडे आलो आहे." नारायण विनयाने म्हणाला.

वीरभद्र मोठ्या संतोषाने मान हलवून म्हणाला–"नारायण, तुला तर कधी कोणाकडे कसली मदत मागायला संकोच वाटतो, अन् त्यामुळे तू सर्वजणात आपल्याबद्दल फार चांगलं मत बनवून आहेस. गावातले सर्वजण तुझ्या स्वभिमानीपणाबद्दल चर्चा करत असतात. असा तू माणूस, तुला आयुष्यात प्रथमच गरज पडली, तेव्हा सरळ माझ्याचकडे आलास याच्यामागे काहीं कारण असेलच की! ते कारणतर सांग, ऐकू देत सर्वांना."

वीरभद्राच्या या बोलण्यामागे एक कारण होतं नक्कीच. नारायण हा सहसा करून कोणाची स्तुति करत नसे. आता त्याला पैशांची गरज पडली आहे. तेव्हा आता तरी कारण सांगताना तो आपली नक्कीच स्तुति करील, आपल्याबद्दल काहीतरी चांगलं बोलेल–अशी वीरभद्रची कल्पना होती. आणि ती प्रशंसा चावडीवर बसलेल्या लोकांच्याही अनायसे कानावर जाईल अशी त्याची अपेक्षा होती.

इतक्या बारीकशा गोष्टीबद्दल वीरभद्र उगीचच तमाशा करीत आहे–ही गोष्ट नारायणला बरी वाटेना. तरीही आपल्या मनातली भावना बाहेर प्रकट न करता तो म्हणाला–"कारण मला अगोदर बाहेर जाहीर होऊ द्यायचं नाहीय. माझं काम झालं की मी ते सांगेन."

"तू ते कारण केव्हाही सांग, पण ते या सर्वांसमोर सांगायला हवं, कबूल?" वीरभद्रने आपली अट सांगितली.

नारायणने वीरभद्रची ही अट मान्य केली. वीरभद्रने तावडतोब शेठजींना बोलवून घेऊन म्हटले–"शेठजी, तुम्ही नारायणला तीनशे रुपये कर्जाऊ द्या, मी त्यासाठीं जामीन रहायला तयार आहे."

शेठजींनी मान हलवून हे मान्य केले. नंतर नारायणच्या मुलीचे लग्न यथासांग पार पडले आणि लग्नाला एक आठवडा लोटतो, तोच नारायणने शेठजींची रक्कम सव्याज परत केली. नंतर ही खबर देण्यासाठी तो वीरभद्राकडे गेला. त्यावेळीही वीरभद्र चावडीवर आपल्या मोठेपणाच्या गोष्टी सांगत बसला होता.

नारायणचे बोलणे ऐकून वीरभद्रने आश्चर्याने विचारले–"अरे, तू इतक्या लवकर कसं काय कर्ज फेडलंस?"

"महाराज, मी आपल्या मुलीच्या लग्नासाठी थोडाबहुत पैसा जमवून ठेवला होता, आणि ती रक्कम मी एका वयोवृद्ध माणसाकडे संभाळून ठेवायला दिली होती. परंतु त्या माणसाने आपल्या काही गरजेसाठी ती रक्कम वापरली आणि त्याने मला विनवलं की मी त्याचं नाव कुणाला सांगू नये, अन् म्हणूनच मला कर्जाची जरूर पडली. आता त्या व्यक्तीने माझे पैसे मला परत केले आहेत म्हणूनच मी आपलं कर्ज फेडून टाकलं."







"एका गरीब माणसाचे पैसे आपल्या कामासाठी वापरणारा कोण हा म्हातारा?" वीरभद्राने रागाने विचारले.

चावडीवर जमलेले सर्वजण एकदम खदाखदा हसले हे ऐकून.

"मी त्या माणसाला वचन दिलंय म्हणून मी त्याचं नाव नाही सांगणार." नारायण दृढपणे म्हणाला.

वीरभद्र हळूच हसत म्हणाला—"हाँ, हाँ, हे तर खरंच! तू मोठा आपल्या वचनाला जागणारा इमानी माणूस आहेस ना! पण तू मला ही वचन दिलं होतंस की-तू जामीन विचारायला प्रथम माझ्या-कडेच का आलास याचं कारण सांगेन म्हणून? मग आता आपलं ते वचनही पाळून दाखव ना."

"हो, हो! जरूर सांगतो की. पण महाराज ते कारण मी फक्त आपणालाच सांगू, की या सर्वांसमक्ष सांगू?" नारायणने विचारले.

"सर्वांसमक्षच सांग." वीरभद्र हट्टाने म्हणाला.

"मग एकाच मंडळी! मी अतिशय स्वाभिमानी माणूस आहे. मी कधीही कुणासमोर आतापर्यंत हात पसरला नाही. असा मी माणूस एका वयस्क माणसाची अब्रु वाचावी म्हणून कर्ज मागायला गेलो, पण शेठजींनी त्यासाठी जामीन मागितला. आपण मला बिनव्याजी पैसे द्यायची तयारी दाखवलीत, तरी मी आपणाकडे केवळ जामीनकीच मागितली, रक्कम नाही घेतली. आपण जामीन राहिलात. म्हणूनच आपलाही मान रहावा म्हणून आपल्या मुलीच्या लग्नानंतर एका आठवड्यात शेठजींचं कर्ज फेडून टाकलं." नारायणने आपली गोष्ट स्पष्ट केली.

"ऐक, तू फक्त आपलीच टिमकी वाजवत बसला आहेस, माझ्या बाजूचं काहीच कसं नाही बोललास?" वीरभद्राने विचारले,

नारायण एक क्षणभर थांबून पुढे म्हणाला, "महाराज, यांत तर माझ्याबद्दल बोलायलाच बरंच काही आहे, आपल्याबद्दल बोलायला यात आहे काय मुळी? मी स्वाभिमानी आहे, पण वडिलधाऱ्या माणसाची प्रतिष्ठा शाबूत रहावी म्हणून मी आपला स्वाभिमानही बळी देऊ शकतो. जामीन रहाणाराला जामीन रहाण्याचं श्रेय मिळतं-पण त्यात त्याचं फारसं नुकसानही कधी होत नाही. मी कधीही कुणासमोर जाऊन आजपर्यंत कुठल्या प्रकारची मदत मागितली नाही. असा माणूस प्रथम आपल्याकडे येऊन मदत मागतो यात तुम्ही आपलं अहोभाग्य मानायला पाहिजे. खरंच आपण मोठे भाग्यवान आहात, म्हणूनच मी प्रथम आपणाकडे आलो."

वीरभद्राने आश्चर्याने म्हटले—"म्हणजे, तू माझ्याबद्दल फक्त हेच बोलू इच्छितोस? माझी मदत घेऊन वर तू स्वत:लाच माझ्यापेक्षा मोठा समजतोस?"

"महाराज, मी जरा भिडस्त माणूस आहे. आपण विचारलंत म्हणूनच मी इतकं बोललो. नाहीतर मी कोणी विचारल्यावाचून स्वत:च्या बाबतीत बोलणारा माणूस नव्हे. कुणी मला आपल्याबद्दल विचारावं अशी अपेक्षाही मी कुणाकडून करत नाही." नारायण उत्तरला.

"तू असल्या विचारांचा माणूस आहेस हे मला अगोदर माहीत असतं तर मी तुला जामीन राहिलोच नसतो." वीरभद्र रागाने म्हणाला. नारायण तिथून निघून जाण्याच्या तयारीत म्हणाला—"म्हणून तर मी आपणाला म्हणालो की—माझं काम पुरं झाल्यावरच मी खरं कारण सांगेन." आणि असे म्हणून तो तेथून निघूनही गेला.

एका वडिलधाऱ्या माणसाने नारायणचे पैसे वापरले, तरीही नारायणने गप्प राहून त्याची इभ्रत संभाळली. अशा इमानी माणसाने केवळ जामीनकी मागितली तर वीरभद्राने इतका तमाशा केला. असं काही त्याने फार महान् कार्य पार पाडलं आहे!

हे सत्य समजून आल्यावर वीरभद्राने चावडीत बसून आत्मस्तुति करायच्या आपल्या सवयीला तिलांजली दिली.





# नवा सेनापति

चन्द्रपुर नावाच्या राज्यावर राजा चन्द्रसेन राज्य करीत होता. त्याच्या जवळ असणाऱ्या चक्रगिरी राज्याचा शासक होता राजा चित्रकेतु. या दोन राज्यात अनेक वर्षांपासून वैरभाव होता.

एकदा राजा चित्रकेतुने युद्धाची घोषणा न देताच अचानक चन्द्रपुरच्या राज्यावर हल्ला केला. या युद्धात चित्रकेतु पराभूत होऊन जंगलात पळून गेला आणि चक्रगिरीच राज्य चन्द्रसेनच्या हाती आलं.

परंतु त्या युद्धात चन्द्रपुरचा सेनापति मारला गेला आणि उपसेनापति शक्तिवर्माही जबर जखमी झाला. राजवैद्यांनी इलाज करून त्याचे प्राण तर वाचवले, पण शस्त्रक्रिया करून त्यांना त्याचा एक पाय कापून काढावा लागला.

असा स्थितीत सेनेसाठी नवा सेनापति निवडणे भाग होते. या संदर्भात राजा आणि मंत्र्याने शक्तिवर्माचा सल्ला विचारला.

"महाराज, आपले जे दलपति आहेत त्यांच्यात काही साहसी, पराक्रमी आणि युद्धतन्त्रही जाणणारे तरुण आहेत. त्यांच्यात चढाओढ लावून विजयी तरुणाची सेनापती-पदावर नेमणूक करावी." शक्तिवर्माने त्यांना सल्ला दिला.

चढाओढीचे कामही राजाने शक्तिवर्मा आणि मंत्र्यांवरच सोपवले. त्यांनी या दलपतींमधे निरनिराळ्या स्पर्धा लावल्या. त्यांत दोन तरुण सफल झाले. एकाचे नाव होते जय आणि दुसऱ्याचे विजय.

आता या दोघांतून कोणाची निवड करायची ही समस्या मंत्री अन् शक्तिवर्मा-पुढे होती. मंत्र्याने यावर खूप गंभीरपणे विचार केला आणि शक्तिवर्माला एक उपाय सांगून तो तिथून निघून गेला.

दुसऱ्या दिवशी जय मंत्र्याला भेटायला गेला. मंत्र्याने त्याच्याकडे न्याहाळून पाहिले आणि म्हटले—"राजाने तुला सेनापति-पदावर नेमण्याची आज्ञा दिली आहे. आपलं कर्तव्यपालन करण्यात तुला पूर्वीच्या सेनापतिपेक्षाही जास्त खबरदारी घ्यायला हवी विजय!"

मंत्र्याचे बोलणे ऐकून घाबरून जाऊन जय म्हणाला—"महामंत्री, माझं नाव जय आहे, विजय नव्हे."

"अरे, हे तर मोठं विचित्रच वाटतंय. शक्तिवर्माने तर निरोप पाठवला होता की विजयची निवड करून ते त्याला माझ्याकडे पाठवत आहेत!" मंत्री म्हणाला.

"काहीतरी चूक घडलीय, मी आत्ताच जाऊन शक्तिवर्माला आपणाकडे बोलवून आणतो." असे म्हणून तो भराभर पावले उचलत तिथून निघून गेला.

थोडया वेळाने विजय मंत्र्याकडे आला. मंत्र्याने त्याच्याकडेही निरखून पहात म्हटले—"तू आत्तापासूनच चन्द्रपूरचा सेनापति बनला आहेस, राजाची तशी आज्ञाही झाली आहे. जय, तुला आपल्या कर्तव्यपालनात पूर्वीच्या सेनापतिपेक्षा अधिक दक्षता बाळगायला हवी."

मंत्र्याचे बोलणे ऐकून विजय आश्चर्याने म्हणाला—"महामंत्रीजी, माझं नाव विजय आहे. माझ्या आणि जयच्या नावात फक्त एकाच अक्षराचा फरक आहे. म्हणून आपल्या ऐकण्यात बहुधा चूक घडली असावी. मी आत्ताच आपलं शंकानिवारण करतो पहा." असे म्हणून त्याने लगेच पहारेकऱ्याला बोलवून त्याला आज्ञा दिली—"अरे, तू आत्ता तावडतोब शक्तिवर्माकडे जाऊन त्यांना निरोप दे की नवीन सेनापति विजय तुम्हाला बोलवत आहे. जा तावडतोब त्यांना इथे घेऊन ये."

हे उत्तर मिळाल्याने मंत्र्याने संतोषाने मान हलवून हळूच हसत म्हटले—"विजय, यात काही चूकबीक झालेली नाहीय. आजपासून तूच या राज्याचा सेनापति आहेस."

सारंग देसाई












# समयसूचकता

एकदा एक राजा जंगलात शिकारीला गेला. त्याच्याबरोबर काही शिपाई आणि त्याचा विदुषकही होता.

सकाळपासून दुपारपर्यंत खूप शोधाशोध करूनही त्यांना एकही जंगली जनावर दिसलं नाही, शेवटी झाडाची पानं खात असलेलं एक हरणाचं पिल्लू राजाला दिसलं. हरणाची कसली शिकार करायची असा विचार प्रथम राजाच्या मनात आला. पण शिकार न करता राजगृहाकडे जाणं ही राजाला रुचेना. म्हणून त्याने हरणाची शिकार करायचं ठरवले.

राजाने मोठ्या आतुरतेने धनुष्याला बाण लावून त्या पिल्लावर सोडला. पण बाण काही बरोबर लक्ष्यावर बसला नाही.

ते पाहून विदुषक ओरडला–"शाब्बास महाराज!" यावरून राजा चिडला अन् रागाने विदुषकाला म्हणाला–"असली प्रशंसा म्हणजे मी आपला अपमान समजतो."

यावर विदुषक झटकन म्हणाला–"महाराज, मी आपल्या धनुर्विद्येची तारीफ नाही केली, आपल्या करुणेची अन् कृपेची तारीफ केली."

विदुषकाच्या या समयसूचकतेमुळे राजा त्याच्यावर फारच खूश झाला आणि त्याने आपल्या गळ्यातला कंठा काढून विदुषकाला बक्षिस दिला.






[७]

[ज्ञानभूमीतून अदृश्य होऊन एका नव्या प्रदेशात असलेल्या पहाडावरील गुहेत एका मुनिसमोर जाऊन पोचला. मुनि आणि विनोद गुहेतून बाहेर येऊन पायथ्याशी असलेल्या नगरात अदृश्य रूपातच तेथील सर्व हालचाली पहात एका मन्दिराच्या प्रांगणात पोचले. नंतर तेथील दरवाजे बन्द करून घेण्यात आले. ...पुढे वाचा]

मन्दिरात हजर असलेल्या लोकात सर्वात उंच असलेला माणूस म्हणाला–"आपल्या सर्वांच्या सद्भाग्याने याही वर्षी आपण सर्व प्रकारची 'पापं' पकडून कैद करू शकलो, हे कळवायला मला अत्यंत आनंद होत आहे. हे सर्वजण चांगले बलिष्ट व मजबूत बांध्याचे आहेत. त्यांना आपण देवीला अर्पण करू, तेव्हा त्या आहाराने आपली देवी संतुष्ट होईल यात शंका नाही."

"आम्ही त्यांना एकदा पाहू शकतो काय?" नायकाने विचारले.

यावर तो उंच माणूस सर्वांना एका पिंजऱ्याकडे घेऊन गेला. पिंजऱ्यातील तीन दृढकाय व्यक्तींकडे इशारा करत तो म्हणाला–"हा पहा काम, तो आहे क्रोध आणि आपल्याकडे घाबरल्या नजरेने पहातो आहे तो दाढीवाला आहे ना, तो आहे लोभ."

मनोज दास



नंतर ज्या चमकत्या तलवारीने त्यांचा बळी घेण्यात येणार होता त्या तलवारीकडे त्या अधिकाऱ्यांनी एक दृष्टि टाकली.

मुनि क्रोधाने म्हणाला–"या नगराचा सर्वनाश करून टाकला पाहिजे."

विनोद सोडून इतर कोणाच्याच कानावर हे मुनिचे बोलणे गेले नाही. विनोद मुनिकडे आश्चर्याने पाहू लागला.

"मी आपल्या मनातल्या काम, क्रोध, लोभ इत्यादि दुर्गुणांचा देवीसमोर त्याग करत आहे." तो उंच माणूस बोलत होता.

"ही दुष्ट माणसं इतर प्रदेशांतल्या काही भोळ्याभाबड्या लोकांना पकडून आणून, अन् त्यांना काम, क्रोध, लोभ आदि नावं देऊन देवीसमोर त्यांना बळी देत आहेत." असे म्हणून दुःखाने मुनि त्या मंदिराचे आवार सोडून बाहेर निघून आला.

आणखी थोडा नगर-संचार केल्यावर त्यांना नगरातील अनेक गैरप्रकार समजून आले.

त्या शहरात कलिंगडाचा व्यापार जोरात चालू होता! दररोज संध्याकाळी नगर-नायक त्या पहाडावर जाई आणि आस-पासच्या भागातून आलेली माणसे धरून जितक्या लोकांना कलिंगड हवे असेल, तेवढी संख्या ओरडून सांगून परत येई.

मोठ्या अद्‌भुत तऱ्हेने पहाडावर उत्पन्न होणारे कलिंगड आपल्या अद्‌भुततेमुळे आणि सुंदर चवीमुळे आसपासच्या भागातल्या हजारो लोकांना आपणाकडे आकर्षित करी! उगवत्या सूर्याच्या किरणांनी सुशोभित दिसणारे ते अवाढव्य कलिंगड पाहण्यासाठी, अन् त्याचा एक तुकडा मिळवण्यासाठी येणाऱ्या या लोकांकडून इथले अधिकारी लोक मनाला येईल तेवढी किंमत वसूल करीत. अशा प्रकारे आपल्या पूर्वजांना मिळालेल्या वरदानाचा गैरफायदा घेऊन पैसे मिळवत. हे लोक दिवसभर झोपा काढीत असत आणि दरवर्षी आसपासच्या प्रांतातून काही निष्पाप लोकांना पकडून कैदेत टाकून त्यांना दुर्गुणांची नावे देऊन नगरदेवीसमोर त्यांना बळी देत असत. यासाठी ते मोठा उत्सवही साजरा करीत.

नगरसंचार पूर्ण करून मुनि आणि विनोद सूर्यास्ताच्या सुमारास पहाडावर परतले. कलिंगडाच्या वेलाच्या मागे असलेल्या खडकावर ते दोघे बसले. थोड्या वेळाने गडद रंगाची वस्त्रे नेसलेला नायक पहाड चढताना दिसू लागला. तो तरूण नायक मोठ्या उत्साहाने शिट्टी वाजवीत वर येऊन पोचला. गुहेच्या तोंडावरील शिळा बाजूला पडलेली पाहून त्याला मोठे आश्चर्य वाटले! नंतर गुहेत डोकावून उच्च आवाजात तो म्हणाला–"उद्या वीस हजार लोकांना खाता येईल एवढे मोठे कलिंगड पाहिजे."

"वीस हजार लोकांसाठी? कारे बाबा, तुझ्या गावातली लोकसंख्या वीस हजार आहे काय?" मुनिने त्याला विचारले.

त्या अचानक आवाजामुळे नायकाने मागे वळून पाहिले. समोरच्या शिळेवर बसलेला मुनि व त्याच्या बाजूला उभा असलेला विनोद हे दोघे त्याला दिसले.

"तुम्ही कोण आहात? इथं तुमचे काय काम आहे?" नायकाने त्यांना विचारले.

"तुला माहीत आहे, इथे एक मुनि रहात होता अन् त्यानेच हे विचित्र कलिंगड बनवून देण्याचे वरदान दिले होते?" मुनिने त्याला विचारले.





"हो, मी ही गोष्ट ऐकली आहे नक्कीच, पण मी तर ती एक दंतकथा समजत होतो." नायक उत्तरला.

"अरे वा! रोज कलिंगड मिळणे हे तेवढे खरे, अन् त्या मुनिने दिलेले वरदान मात्र दंतकथा काय? चांगला न्याय आहे की!" मुनि म्हणाला.

यावर नायक काय बोलणार?

मुनीने विनोदकडे वळून म्हटले– "पाहिलस बेटा, आज ही अशी परिस्थिति आहे! लोकांना फुलं पाहून आनन्द लुटता येतो, पण ती निर्माण करणाऱ्या जगन्नियंत्याचा मात्र त्यांना विसर पडतो, त्यांना कधी आठवणच होत नाही!"

हे ऐकून नायक हसून म्हणाला–"मुनिवर, आपलं गुहेबाहेर प्रकट होणं ही तर आम्हाला फारच आनंदाची गोष्ट आहे. आपण आजपर्यंत गुहेत आपलं आयुष्य घालवलंत. पण आजपासून आपणाला रहाण्यासाठी सर्व सुखसोयींनी युक्त असा महाल मी आपल्याला देईन! अनेक वर्षात आपण काही खाल्लं नसेल, आपण आत्ता माझ्याबरोबर चला, आपणाला सर्व प्रकारच्या मिष्टान्नांनी युक्त असे भोजन देण्याची व्यवस्था मी करतो."

"तू माझ्या प्रश्नाचे बरोबर उत्तर अजून दिले नाहीस. नुसत्याच उलटसुलट गोष्टी बोलत आहेस? खरं खरं सांग, तुला कलिंगड वीस हजार जणांसाठी का हवे आहे?" मुनिने रागाने पुन्हा विचारले.

"आम्ही तसे शहरवासी पंधरा हजार आहोत. पण आज आसपासच्या गावातून पाच हजार माणसे आली आहेत, आणि त्यांनाही कलिंगड हवे आहे. आम्ही त्या प्रमाणात त्यांच्याकडून पैसे वसूल करणार आहोत. वाटलं तर त्या प्राप्तीतून तुम्हालाही काही भाग आम्ही देऊ. हं, आणि एक सुंदर कल्पना माझ्या मनात आली आहे–त्या कलिंगडाबरोबर आपणही थोडा वेळ पहाडावर बसलात तर ते दृश्य दाखवून त्या लोकांकडून आपण आणखीही काही



पैसे वसूल करू शकू–बोला, आहे की नाही नामी कल्पना?" नायकाने मोठ्या उत्साहाने मुनीला विचारले.

"गप बैस." मुनि ओरडलाच.

त्यानंतर थोडा वेळ मुनि गप्प बसून राहिला, सूर्यास्ताची वेळ झाली होती. सर्व पक्षी आपापल्या घरट्यात परत येत होते.

"या पहाडावर कलिंगड निर्माण करण्याचा चमत्कार दाखवला, तर त्यामागे असलेली शक्ति ओळखून ही माणसे देवभक्ती करू लागतील असा माझा विचार होता. पण रोजच दिसणारे सूर्य, चंद्र आणि रात्री आकाशात लटकणारे असंख्य तारे पाहूनही ज्या लोकांना त्यामागील अद्भुत रहस्याचा बोध होत नाही, ते लोक कलिंगड उत्पन्न होण्याच्या चमत्कारामागील परमार्थ समजतील असा विश्वास बाळगण्यात माझीच चूक झाली." असा विचार प्रकट करून मुनि स्वतःच स्वतःबद्दल दुःखी झाला.

थोड्या वेळात मुनीच्या भुवया उंचावल्या गेल्या आणि–"उद्या मी तुम्हा लोकांसाठी एक खूप मोठे कलिंगड पैदा करीन. पण ते लगेच फुटून तुकडे तुकडे होऊन तुम्हा लोकांच्या अंगावर कोसळेल. आणि तेच तुमच्या या नगराचा नाश करील. आता जा तू इथून." मुनीने नायकाला हुकूम केला.



नायक पहाडावरून उतरून नगराकडे निघून गेला.

"मुनिवर, मला असे वाटते की आपल्या या धमकीमुळे या लोकांच्यात खूप परिवर्तन होईल. त्यांना आपली चूक कळून येईल. मला असेही वाटते की 'आपण आपल्याला मिळालेल्या अपूर्व संधीचा दुरुपयोग केला' अशा विचाराने त्यांना पश्चात्ताप होईल." विनोद म्हणाला.

"त्यांच्यात इतक्या लवकर काही परिवर्तन होईल असे मला मुळीच वाटत नाही. वेडेपणाचेही हजारो प्रकार असतात. वाटलं तर ते लोक पुढे काय करतात हे तू आत्ताच जाऊन पाहून ये." मुनि म्हणाला.



मुनीने सुचवल्यावरून विनोद पहाडा-वरून उतरून पुन्हा नगरात पोचला. तो पौर्णिमेचा दिवस होता. सर्वत्र स्वच्छ चांदणे पसरले होते, नगराच्या मध्यावर असलेल्या एका मैदानात नगरातले सर्वजण जमले होते. एका उंच व्यासपीठावर उभा राहून नायक भाषण करीत होता. विनोद या गर्दीजवळ पोचला. नायक बोलत होता–

"मुनीने दिलेल्या आव्हानाला आपण कोणत्या ना कोणत्या उपायाने तोंड द्यायला हवे. आणि त्याची योजना हाणून पाडली पाहिजे. यासाठी एकच उपाय आहे. उद्या पहाटे आपण सर्व नगरवासी अणि आसपासच्या गावातून आलेले सर्व यात्रेकरू मिळून पहाडाजवळ पोचू. पहाडावरील कलिंगड फुटून खाली कोसळताच आपण सर्वांनी ते सर्वच्या सर्व तुकडे उचलून खाऊन टाकू, पाहू या कलिंगडाचे तुकडे आपल्या शहराचा कसा नाश करतील ते."

नायकाचे हे भाषण ऐकून सर्वांनी मोठ्या उत्साहाने माना हलवून त्याला अनुमोदन दिले.

त्या क्षणापासून दुसऱ्या दिवशी पहाटे कोसळणाऱ्या संकटाला तोंड देण्याची तयारी सुरू झाली. पहाटे कलिंगडाचे जास्तीत जास्त तुकडे खाता यावे म्हणून त्या रात्री सर्वांनी उपास करायचा निश्चय केला. आसपासच्या गावातून आलेले अन्य सर्व लोकही दुसऱ्या दिवसाच्या पहाटेची आतुरतेने वाट पाहू लागले.

नगरातल्या लोकांच्या अज्ञानाची कीव करीत विनोद पुन्हा मुनिजवळ येऊन पोचला. तोपर्यंत अर्धी रात्र उलटून गेली होती.

पूर्वेला तांबडे फुटले आणि हजारोंच्या संख्येने लोक पहाडाच्या पायथ्याशी पोचले. आश्चर्याने तोंडे वासून ते सर्वजण ओळी ओळीने उभे राहिले अन् जवळ जवळ त्याच वेळी सूर्याच्या किरणात चमकणारे जवळ जवळ पहाडाच्याच आकाराचे भले मोठे कलिंगड पहाडावर अवतीर्ण झाले! डोळे दिपवणारे ते कलिंगड पाहून लोकांच्या

मनात उत्साहाबरोबर एक प्रकारचे भय ही उत्पन्न झाले.

अचानक ते कलिंगड फुटून त्याचे हजारो तुकडे खाली जमलेल्या लोकांवर पडले. जनता मोठ्या अहमहमिकेने ते तुकडे उचलून तोंडात भरू लागली, खाली वाहणारा रसही ते सर्वजण ओंजळी भरभरून पिऊ लागले. एका तासाभराच्या अवधीत तेथे फक्त कलिंगडाची सालेच काय ती मागे राहिली!

यानंतर पुन्हा एकदा जनता एका जागी एकत्रित झाली आणि आत्मस्तुति करीत त्यांनी एक ठराव पास केला.

थोड्या वेळाने आसपासच्या गावचे लोक तिथून काढता पाय घेऊ लागले आणि मध्यान्हापर्यंत तो भाग जवळजवळ पुन्हा ओसाड झाला!

नगरातल्या रस्त्यांवरूनही हळूहळू लोकांचा संचार कमी झाला.

नगरातील काही लोकांनी हावरटपणाने कलिंगडाचे अधिक तुकडे खाल्ल्याने त्यांना अपचन झाले. आजपासून आता कलिंगड येणें बंद होईल. मग उद्यापासून पोटाची काय व्यवस्था हा विचार काही लोकांना सतावू लागला. कित्येक पिढयांपासून कलिंगडाचा व्यापार हेच त्यांचे उदर-निर्वाहाचे एकुलते एक साधन होते, त्यामुळे उद्यापासून कसे जगायचे हा त्यांच्यापुढे मोठा प्रश्न उभा राहिला.

त्यांच्यातली काही वयास्कर माणसे म्हणू लागली–"ऐका, मुनि म्हणाला होता की कलिंगड नगराचा सर्वनाश करील. त्याचा अर्थ असा नव्हे की हे कलिंगड फुटून नगराचा सर्वनाश होईल! फुटले ते कलिंगड आपणाला मिळणारे शेवटचेच कलिंगड, उद्यापासून पुन्हा कलिंगड मिळणार नाही. म्हणजे याचाच अर्थ असा की या शहराचा आपोआपच नाश होईल."

सकाळपासून लोकांचे सर्व कार्यकलाप पहाणारे मुनि आणि विनोद चिंतेने भरलेल्या जनतेला सोडून अदृश्य रूपातच त्यांच्यापासून दूर निघून गेले. (क्रमशः)



# विचित्र निर्णय

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाजवळ परत आला. झाडाच्या फांदीवरून प्रेत काढून घेऊन ते आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमी प्रमाणे मौन स्वीकारून तो स्मशानाकडे चालू लागला. यावर प्रेतात वसणाऱ्या वेताळाने त्याला विचारले–"राजा, मध्यरात्रीच्या वेळी या भयानक स्मशानात तू हे जे कष्ट उपसत आहेस, ते तू स्वतःचे काही ईप्सित साधण्यासाठी करत आहेस, की तुझ्या कोणा इष्ट बांधवांसाठी करीत आहेस अशी माझ्या मनात शंका आहे. हे काम तू जर तुझ्या बांधवांसाठी करीत असशील तर ते साध्य झाल्यावर ते बांधव तुझ्याबद्दल आपल्या मनात आदरच बाळगतील याबद्दल काय खात्री? उदाहरणादाखल मी तुला एक राजा व त्याचा पुत्र यांची गोष्ट सांगतो, ऐक. तुझे श्रमही तू विसरशील ती ऐकताना.



वेताळ गोष्ट सांगू लागला–

प्राचीन काळातली गोष्ट आहे. महेन्द्रगिरीवर राजा पद्मपाद राज्य करीत होता. त्याच्या मुलाचं नाव होतं प्रवीण. विवाहानंतर अनेक वर्षे वाट पाहून मगच हा मुलगा जन्मला, म्हणून राजाचं त्याच्यावर जरा अधिकच प्रेम होतं.

प्रवीण पाच वर्षांचा झाला तेव्हा त्याला अक्षरओळख करून देण्यात आली, आणि राजानं त्याला सिद्धमुनींच्या गुरुकुलात भरती केलं. प्रवीण एक राजकुमार म्हणून सिद्धमुनि त्याला विशेष आदराने वागवीत. पाठ दिले जात असताना सर्व मुले चटईवर बसत, तर याला मऊमऊ गादीवर बसवलं जाई!

काही दिवस गुरुकुलातली ही सर्व वागणूक, वातावरण प्रवीणला फार आवडलं. पण तो जसा बारा वर्षांचा झाला, तसं या गोष्टी त्याला छान समजून येऊ लागल्या कि, गुरुजी आपल्याला विशेष आदराने वागवतात, आणि यामुळे त्याला फार दुःख वाटलं. मग काय, एक दिवस मुनींना त्याने सरळ विचारलं–"आचार्य, आपण माझ्यात अन् इतर मुलांच्यात असा फरक का करता?"

यावर सिद्धमुनि म्हणाले–"युवराज, याच गुरुकुलात काय, पण इतर कोणत्याही गुरुकुलात तुम्हाला अशीच वागणूक मिळेल. असाच आदर दिला जाईल."

दुसऱ्याच दिवशी राजकुमार प्रवीण कुणालाही न सांगता-सवरता सिद्धमुनींच्या आश्रमातून बाहेर पडला आणि जवळच्याच एका ज्ञानमुनि नावाच्या आचार्यांच्या गुरुकुलात दाखल झाला. तेथे राहून गुरुजींची सेवासुश्रूषा करीत अन् इतर सामान्य मुलांसारखीच कंदमुळे वगैरे खात आपला विद्याभ्यास करू लागला.

या गुरुकुलातल्या वल्लभ नावाच्या मुलाशी त्याची गाढ मैत्री जमली.

काही दिवस असेच निघून गेले. इकडे राजकुमाराच्या शोधासाठी गुप्तचर सर्वत्र शोधाशोध करीत होते. अखेर ज्ञानमुनींच्या आश्रमात सामान्य विद्यार्थ्या सारखाच रहात



असलेला प्रवीण त्यांना सापडला. त्यांनी प्रवीणबरोबर ज्ञानमुनींनाही धरून राजा पद्मपादकडे नेले.

खरी हकीगत कळल्यावर राजा पद्मपादाला अत्यंत राग आला आणि त्याने ज्ञानमुनींना विचारले–"तुला इतका अहंकार आहे की तू राजकुमाराकडून आपली चरणसेवा करून घेतलीस? न्यायशास्त्र असं घोषित करतं की भावी राजाचा अपमान हा या सबंध राज्याचाच अपमान आहे. या अपराधासाठी मी तुला आजीवन कारावासाची शिक्षा ठोठावत आहे."

प्रवीण हा राजकुमार असल्याची गोष्ट मला ठाऊक नव्हती, तेव्हा आपण निरपराधीच आहोत–हे सांगण्याचा ज्ञानमुनींनीं खूप प्रयत्न केला, पण-पुत्र प्रेमाने आंधळ्या असलेल्या राजाने मुनींच्या विनवणीची मुळीच पर्वा केली नाही.

आणखी बारा वर्षे निघून गेली. प्रवीण आता सज्ञान झाला. एक दिवस त्याच्या मनात आलं की राज्यात फिरून आपल्या पित्याबद्दल प्रजेचं काय मत आहे, ते पहावं.

त्याने सारथ्यांपैकी एकाला बोलावून आज्ञा केली–"तू एका राजकुमाराचा वेष घालून रथात बस. मी सारथ्याच्या वेषाने रथ हाकायला बसतो. म्हणजे राज्यशासनाबद्दल जनतेचं मत मला नीट जाणून घेता येईल."



प्रवीणच्या या सूचनेला सारथी तयार होईना, तेव्हा क्रोधाने प्रवीण म्हणाला–"मी तुला हुकूम देत आहे. तू माझ्या आज्ञेच पालन केलंच पाहिजेस."

बिचारा सारथी निरुपाय होऊन युवराजाचा पोशाख घालून रथात बसला आणि सारथ्याचा वेष घालून प्रवीणने रथ हाकत सीमेपर्यंत नेला, आणि तिथे एका झाडाखाली त्याने रथ थांबवला.

प्रवीणला जवळच एक झोपडी दिसली. त्या झोपडीत एक गरीब बाई रहात होती. तिचा मुलगा तापाने फणफणलेला होता.

आणि ती बाई त्याला पाणी पाजीत होती. त्याच वेळी प्रवीण झोपडीच्या दारात पोचला. आणि म्हणाला–" माई, या देशाचा राजकुमार जवळच्या एका झाडाखाली रथात बसला आहे. त्याला तहान लागली, थोडं पाणी देता का ?"

ते बोलणे ऐकताच गरीब बाईचा तो आजारी मुलगा घाबरून म्हणाला–" आई, अगदी ताबडतोब युवराजांना पाणी दे. नाहीतर मुलाला पाणी न दिल्याबद्दल राजा रागावून तुला कडक शिक्षा देईल. ज्ञानमुनींना नाही का त्याने उगीचच शिक्षा केली ? मी तर आजारीच असतो, अन् अशा अवस्थेत मी तुलाही मुकलो तर मला कुत्र्याच्या मौतीने मरावे लागेल !"

मुलाचे हे बोलणे ऐकून सारथ्याच्या वेषातला युवराज दुःखाने व्याकुळ झाला. अन् मुकाट्याने जाऊन रथावर स्वार झाला. थोड्या अंतरावर गेल्यावर एक वळण आले. वळणाशी रथ पोचताच एकाएकी रथाची दोन्हीं चाकं बाहेर निघाली अन् रथ उलटून पडला. त्या अपघातात सारथ्याबरोबरच प्रवीणलाही खोल जखमा झाल्या.

या घटनेची वार्ता कळल्यावर राजा पद्मपाद रागावला आणि सारथ्याला दोषी ठरवून राजा म्हणाला–"अरे वा रे वा ! तू युवराजाला सारथ्याच्या जागी बसवून स्वतः आरामात रथात बसलास काय ? तू युवराजांचा हा जो अपमान केलास



त्याबद्दल मी तुला दहा वर्षं कारावासाची शिक्षा देत आहे."

यानंतर राजकुमाराने राजाला एकांतात गाठून सांगितले की त्याच्याच सांगण्यावरून सारथ्याने वेष बदलला होता, तेव्हा त्याला दिलेली शिक्षा रद्द व्हावी.

परंतु पद्मपादने युवराजाला दाद दिली नाही. राजा म्हणाला–"तुझ्यासारख्या भोळ्या तरुणाच्या सांगण्यावरून सारथी तुझ्या जागी बसला अन् त्यामुळेच हा अपघात घडला. तेव्हा अपघाताला जबाबदार तोच ! जर काही मोठा अपघात झाला असता अन् मी तुला मुकलो असतो तर मी तरी तुझ्यावाचून जगू शकलो असतो का ?"

यानंतर थोड्या दिवसांनी रात्री पहारेकऱ्यांची नजर चुकवून एका व्यक्तीने रात्री अंतःपुरात प्रवेश केला आणि सरळ युवराजाच्या शयनकक्षात पोचून त्याने त्याला भोसकण्यासाठी हात उचलला !

परंतु त्यावेळी युवराज जागाच होता, म्हणून त्याने त्या व्यक्तीचा हात पिरगळून त्याच्या हातचा सुरा काढून घेतला. नंतर त्याच्याकडे निरखून पाहिले तेव्हा त्याला ओळखून प्रवीण आश्चर्यचकित झाला ! त्याने विचारले–"अरे, वल्लभ तू ?"

यावर तो युवक म्हणाला–"हां हां, युवराज मीच तो ! तुझ्यामुळेच गुरुदेवांवर मोठा अन्याय झाला. मला त्यावेळी वाटलं की तू अजून लहान आहेस. तुझा त्यात





काही दोष नाही. परंतु आता तर तू पुरेसा मोठा झाला आहेस. अजूनही गुरुजींना मुक्त न करवता गप्प बसून राहिलास याचा अर्थ काय? म्हणून शेवटी मी निश्चय केला की तुझ्यावरील आत्यंतिक प्रेमामुळे तुझ्यासाठी इतरांवर अत्याचार व अन्याय करणाऱ्या तुझ्या वडिलांना चांगला धडा शिकवावा. याकरताच मी एकाद्या छायेसारखा तुझ्या मागे लागून मीच तुझ्या रथाच्या चाकांचे चिमटे काढून घेऊन तुला अपघात घडवला."

प्रवीण यावर काही बोलणार इतक्यात पहारेकरी तेथे आले आणि वल्लभला कैद करून घेऊन गेले. राजाने त्याच वेळी सुनावणी करून वल्लभला फाशीची शिक्षा सुनावली. सकाळ होताच फाशीची अंमलबजावणी करण्याची सूचनाही त्याने दिली.

परंतु त्याच रात्री प्रवीणने एक आश्चर्यकारक निर्णय घेतला. त्याने सर्व सेना ताब्यात घेऊन राजाला तुरुंगात बंद केले आणि स्वत:लाच 'राजा' म्हणून घोषित केले.

त्यानंतर प्रवीणने वल्लभची फाशी रद्द करवली. ज्ञानमुनि व सारथी यांनाही त्याने मुक्त केलं आणि त्यांना तो म्हणाला-"माझ्यामुळे तुम्हा तिघांना अपराध नसतानाच शिक्षा भोगावी लागली, याबद्दल मी तुमची क्षमा मागतो. माझी तुम्हाला आता अशी विनंती आहे की शासनाच्या कामात आजपासून तुम्ही मला मदत करा, आणि मी केलेल्या चुकीचं अंशत: का होईना, परिमार्जन करायची मला संधी द्या."

परंतु ज्ञानमुनि आणि सारथी या दोघांनीही प्रवीणची विनंति अमान्य केली आणि ते दोघेही तिथून निघून गेले.

मग प्रवीण वल्लभला म्हणाला—"मित्रा, तू माझा खाजगी चिटणीस म्हणून सदा माझ्याजवळ रहावेस अशी माझी तुला विनन्ती आहे."

वल्लभने तावडतोब ही विनन्ती मान्य केली. वेताळाने इतकी गोष्ट सांगून म्हटले—"राजा प्राणाहूनही आपल्यावर अधिक प्रेम करणाऱ्या आपल्या पित्याला प्रवीणने कैदेत का ठेवले? त्याचबरोबर दोन वेळा आपली हत्या करण्याचा प्रयत्न केलेल्या वल्लभची फाशीची शिक्षा रद्द करवून उलट त्याला आपला खाजगी चिटणीस म्हणून का नेमले? ज्ञानमुनि व सारथी या दोघांनी प्रवीणला मदत करायला नकार का दिला? या प्रश्नांची योग्य उत्तरं माहित असूनही तू दिली नाहीस तर तुझ्या मस्तकाची छकलं छकलं होऊन जातील."

यावर विक्रमादित्य म्हणाला, "प्रवीणने गुप्त वेषात जाऊन जेव्हा गरीब बाईच्या आजारी मुलाच्या तोंडचे उद्गार ऐकले तेव्हा त्याला कळून चुकले की आपले वडील मर्यादेपेक्षा जास्त पुत्रवात्सल्याच्या आहारी जाऊन जर्नानिंदेला पात्र होत आहेत. त्यानंतर सारथ्याच्या बाबतीतही काहीसं असंच घडलं. सारथ्याने आपलं निर्दोषित्व सिद्ध करायचा प्रयत्न केला, तरीही त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून राजाने त्याला कारावासाची शिक्षा दिली. अशा परिस्थितीत त्याची हत्या करायला आलेल्या गुरुकुलातील सहाध्यायी वल्लभने ज्ञानमुनींच्या कारावासाबद्दल बोलून प्रवीणच्या मनात ज्ञानोदय केला. या सर्व घटनांच्या आधारे प्रवीणने निर्णय घेतला की जोपर्यंत आपले वडील राज्यकारभार पाहतील, तोपर्यंत त्यांच्या हातून कुणा ना कुणावर अन्याय होतच राहील आणि तोपर्यंत कुणाला बरोबर न्याय मिळणारच नाही, या विचाराने प्रेरित होऊनच प्रवीणने स्वत:ला 'राजा' म्हणून घोषित केलं आणि आपल्या पित्याला राजमहालात बन्दी केलं! ज्ञानमुनि आणि सारथी यांनी त्याला मदत करण्याचं अशासाठी अमान्य केलं की, राजाच्या सेवेत धोका असतो हे त्यांनी अनुभवलं होतं. परंतु वल्लभने मात्र प्रवीणच्या मनातलं परिवर्तन बरोबर ओळखलं आणि त्यामुळेच तो त्याची विनंती अमान्य करू शकला नाही."

अशा प्रकारे राजाचा मौनभंग होताच प्रेतातील वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा त्या झाडावर जाऊन बसला. (कल्पित)



# आत्माहुति

एकदा धर्मगिरीच्या राजाच्या खजिन्यातून एक हजार सुवर्णमुद्रांची चोरी झाली. चोराला पकडण्याची जबाबदारी राजाने युक्तिवर्मावर सोपवली, पण त्याचबरोबर अशी अटही घातली की–युक्तिवर्माने दुसऱ्या दिवशी सूर्यास्तापूर्वी चोराला पकडले पाहिजे, नाहीतर त्याला स्वखुशीने आत्मबलिदान करावे लागेल.

युक्तिवर्माने राजाची अट मान्य केली. आणि म्हटले–"महाराज, मी जर चोर पकडू शकलो नाही तर माझ्या आत्माहुतीनंतर त्याला आपण एका मंत्र्याचे पद द्यावे, कारण चोरी करुन तो माझ्या हाती न सापडला तो नक्कीच मोठा मेधावी असला पाहिजे."

दुसऱ्या दिवशी सूर्यास्ताला काही घटका कमी असतानाच दरबारात हजर असलेल्या राजापुढे युक्तिवर्माने निवेदन केले–"महाराज, मी चोर पकडू शकलो नाही. मी आता आत्माहुति करणारच आहे. कृपा करुन माझ्या विनंतीप्रमाणे आपण चोराला मंत्रीपद देऊन माझ्या आत्म्याला शांति प्रदान करावी."

"मग महाराज, आपला मंत्री म्हणून आपण माझी नियुक्ति करा." असे म्हणत कोषाधिकारी मोठ्या प्रसन्नतेने उठून उभा राहिला.

मग काय राहिलं ! राजाच्या आज्ञेने सैनिकांनी कोषाधिकाऱ्याला कैद केले ! राजाने युक्तिवर्माच्या युक्तीवर खूश होऊन त्याच्याकडे प्रसन्नतेने पाहून त्यालाच आपले मंत्रीपद बहाल केले आणि त्याचा सत्कारही केला.





महाकाव्य कथा :

## मुद्राराक्षस १

शेकडो वर्षांपूर्वी सर्वार्थसिद्धि नावाचा राजा मगध देशावर राज्य करत होता. त्याच्या दरबारात सर्व प्रकारे योग्य आणि समर्थ असा 'राक्षस' नावाचा मंत्री होता. या मंत्र्याच्या योग्य सल्ल्यामुळे राज्यकारभार फार सुरळीत चालत असे.

राजाला दोन बायका होत्या. त्याची प्रथम पत्नी क्षत्रीय वंशातली होती. तिच्या मुलांना 'नंद' असे म्हणत असत, आणि दुसरी पत्नी शूद्र जातीची होती. तिचे नाव मुरा. तिच्या मुलाचे नाव चन्द्रगुप्त, मुरेचा मुलगा म्हणून त्याला 'मौर्य' असेही नामाभिधान प्राप्त झाले होते. तो असामान्य प्रतिभावान म्हणून प्रसिद्ध होता. तोच राजाचे सेनापति-पदही भूषवीत होता.





मुरेचा हा मुलगा चन्द्रगुप्त लहानपणापासूनच बुद्धिमत्ता, साहस, पराक्रम इत्यादि गुणांतही विशेष प्रख्यात होता. घोडेस्वारी, शस्त्रविद्या इत्यादि क्षत्रियोचित विद्यांमध्येही तो नंदापेक्षा अधिक प्रवीण होता, म्हणून सर्वत्र त्याची खूप प्रशंसा केली जाई.











राजा सर्वार्थसिद्धिचा मृत्युसमय जवळ झाला. त्यावेळी वारस म्हणून सिंहासनावर या मौर्याने बसावे, नंद इतके लायक नाहीत, असा विचार मोठ्या प्रेमाने राजाने प्रकट केला. पण त्यामुळे नंदांच्या मनात चन्द्रगुप्ताबद्दल द्वेष उत्पन्न झाला.

राजाच्या मृत्युनंतर नंदांनी मौर्य वंश समूळ नष्ट करण्यासाठी कारस्थान करून एका मध्यरात्री मौर्यांच्या घराला वेढा घातला आणि चन्द्रगुप्ताला त्याची पत्नी व मुलाबाळांसह एका तळघरात कैदी म्हणून बंद केले.





तळघरात कैदी असलेल्या या परिवाराला नंदांचा एक सेवक एका भोकातून केवळ एकाच माणसाला पुरेसे अन्न व पाणी देत असे.

इतकेच अन्न सर्वांनी वाटून खाल्ले तर तर कोणाचेच पोट भरणार नाही, अन् सर्वांनाच मरावे लागेल म्हणून सर्वांनी चर्चा करून असा निर्णय घेतला की एकानेच ते अन्न रोज खाऊन जगावे आणि नंदांच्या या कृतीचा सूड घ्यावा. त्या निर्णयाप्रमाणे ते अन्न केवळ चन्द्रगुप्तच खात असे.





इकडे नन्दांमधला ज्येष्ठ भाऊ मगधाच्या सिंहासनावर बसला. काही दिवस गेल्यावर एक दिवस वंग देशातून एक राजदूत मगधाच्या दरबारात आला. तो आपल्या राजाच्या आज्ञेने आपल्याबरोबर एक समस्या सोडवण्यासाठी घेऊन आला होता. दरबारात विद्वत्सभेसमोर त्याने ती समस्या ठेवली आणि त्याचे उत्तर सांगायचे आव्हान दिले. दरबारात कोणीच ती समस्या सोडवू शकेना!

तेव्हा नंदांच्या मंत्र्यांपैकी एकजण म्हणाला—"महाराज, कारागृहात बन्दी असलेला चन्द्रगुप्तच अशा प्रकारच्या समस्येचं उत्तर सांगायला समर्थ आहे. त्याला दरबारात बोलावून आणलत तरच आज आपली अब्रू वाचेल?" राजाला हा सल्ला पसन्त पडला.





कारागृहाचे दार उघडले गेले. तेथे फक्त चन्द्रगुप्तच जिवन्त राहिलेला होता! बरोबर एक वर्षाने आज तो बाहेरचं जग पहात होता! त्याला स्नान वगैरे घालून चांगलं भोजन दिलं गेलं अन् राजवस्त्रं नेसवून त्याला ती समस्या सांगितली गेली.

चन्द्रगुप्ताने राजसभेत प्रवेश केला आणि वंगदेशातून आलेल्या राजदूताकरवी प्रस्तुत केलेली समस्या त्याने चुटकी-सरशी सोडवून दाखवली. यावर सर्वच दरबारी अत्यन्त आनन्दित झाले आणि त्यांनी चन्द्रगुप्ताच्या बुद्धिमत्तेची अनेक प्रकारे तारीफ केली!



यानंतर सभासदांनी मोठ्या उत्साहाने चन्द्रगुप्ताला एका हत्तीवर बसवले व त्याला मिरवत त्याच्या घरी नेऊन पोचवले. अशाप्रकारे चन्द्रगुप्त अचानकच अतिशय लोकप्रिय बनला. जनतेचे त्याच्यावर फारच प्रेम बसले. त्यामुळे जननिन्देला भिऊन नंद पुन्हा त्याला कैदेत टाकू शकले नाहीत.

(क्रमशः)



# पिशाच्च तरुणीची इच्छा

गंगासागर गावच्या उत्तर दिशेला एक चिंचेचं बन होतं. ते ओलांडून गेलं की एक उंच टेकडी होती. त्या टेकडीवर देवी दुर्गेचं एक देऊळ होतं. या चिंचेच्या बनात एक पिशाच्च तरुणी येऊन एका झाडावर राहू लागली. गावातले लोक बन ओलांडून, टेकडी चढून देवीच्या दर्शनाला जातात हे पाहून तिला आश्चर्य वाटे आणि त्या लोकांचे कष्ट पाहून दुःख ही वाटे. देवी-बद्दलही तिच्या मनात असूया उत्पन्न झाली.

दिवसासुद्धा इथे अंधारच असतो. या बनातल्या उंच झाडावर मी रहात असलली पाहून सुद्धा लोक इतक्या कष्टाने टेकडी चढून का जातात? त्यांना काही अडचण असेल तर ती मी नाही का दूर करू शकणार? असे त्या पिशाच्च तरुणीच्या मनात येई.

त्या गावातला एक धनवान माणूस, एक मध्यम वर्गीय माणूस आणि एक गरीब स्त्री असे तिथे दररोज अगदी न चुकता देवीच्या दर्शनाला जात.

एक दिवस तो धनवान माणूस सूर्यास्ताच्या वेळी देवीचे दर्शन उरकून गावाकडे परत जात होता. तो चिंचेच्या बनात पोचला न पोचला तोच या पिशाच्च तरुणीने झाडावरून त्याच्या पुढ्यात उडी मारली. आणि ती म्हणू लागली–"आपण बिचारे रोज मोठ्या कष्टाने इतक्या दूर चालत येता. त्या देवीने तुमच्या काही अडचणी आतापर्यंत दूर केल्या का? मी चुटकीसरशी तुम्हांला तुमच्या अडचणीतून सोडवू शकते."

तो धनवान पहिल्याने तर अचानक ते पिशाच्च पाहून घाबरूनच गेला. पण तिला नीट बोलताना पाहून आपलं धैर्य एकवटून म्हणाला–"माझ्या अडचणींबद्दल मी काय सांगू? माझ्याजवळ धन, जमीन-जुमला

मळका इनामदार



कश्शाची कमतरता नाही, पण काय सांगू! मला पळभरही झोप येत नाही."

पिशाच्च तरुणीने त्या धनवान माणसाच्या अस्वस्थतेच खरं कारण बरोबर ओळखलं आणि ती त्याला म्हणाली—"हे पहा, आज रात्री पासूनच तुमची ही अडचण दूर होईल, पण त्या बदल्यात तुम्ही एक मंदिर माझ्यासाठी या चिंचेच्या बनात बांधलं पाहिजे, कबूल?"

"माझी अडचण खरंच दूर झाली तर झटक्यात मी तुझं देऊळ बांधून टाकीन." असे म्हणून तो माणूस तिथून निघून गेला.

थोड्या वेळाने तो मध्यमवर्गीय माणूस त्या बनात आला.

ती पिशाच्च तरुणी त्याच्यासमोर जाऊन म्हणाली—"तुम्हाला नियमितपणे देवळात जाताना मी पहाते. तरीही माझा असा अंदाज आहे की त्या देवीने तुमची इच्छा काही पुरी केली नाही. बरोबर?"

"नशिबाची साथ असेल तर ना! ते असेल तरच आपली इच्छा पुरी होते." तो मध्यमवर्गीय माणूस म्हणाला.

"आत्ताच समजून चाल, की तुझी इच्छा पूर्ण झालेली आहे. पण त्या बदल्यात माझं एक काम करावं लागेल तुला. एका श्रीमन्त माणसानं माझ्यासाठी इथे एक देऊळ केलंय, आता तुझं काम असं, की तू रोज या देवळात दिवा लावायचास, काय?" त्या पिशाच्च तरुणीने आपली अट सांगितली.

"माझी इच्छा पुरी तर होऊ दे! माझी एक पंचवीस वर्षांची मुलगी आहे. हुंडा द्यायची ऐपत नसल्यामुळे मी तिचं लग्न करू शकत नाही." तो गृहस्थ म्हणाला.

"मी प्रथमच तुझी अडचण ओळखली होती. तुझी अडचण संपलेली आहे. आता तू घरी जा आणि बघ माझं म्हणणं खरं आहे की नाहीं ते!" ती तरुणी म्हणाली.

तो गृहस्थ गेल्यावर आणखी थोड्या वेळाने ती गरीब बाई आली तिकडून. या पिशाच्च तरुणीने तिचीही चौकशी



वगैरे करून म्हटलं—"मी तुझी अडचण दूर करते. बस, तू माझं एकच काम करायचंस—या बनात जे देऊळ बांधलं जाईल तिथे तू आपल्या गाववाल्यांना बोलावून जत्रा आणि उत्सव साजरा करवायचास."

यावर ती बिचारी बाई म्हणाली—"माझी अडचण दूर झाली तर मी सुद्धा त्या जत्रेत उत्सवात नाचेन अन् गाईन. माझा नवरा पक्का दारुडा आहे. मला मारझोड करीत असतो."

"तुला आता तसली अडचण रहाणार नाही बघ. घरी जाऊन पहा." त्या पिशाच्च तरुणीने तिची समजूत काढली.

आता ती पिशाच्च तरुणी स्वप्न पाहू लागली की त्या बनात तिच्यासाठी देऊळ बांधलं गेलंय, दूरदूरचे लोकही तिथे येऊन पूजा-अर्चा करतायत—काय न् काय!

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी त्या धनवान माणसाला बनात येताना पाहून तिने विचारलं—"आता माझ्या मंदिराची पायाभरणी कधी करशील?"

तो श्रीमन्त माणूस चिडून म्हणाला—"सर्वात आधी मी तुलाच गाडून टाकायचा मुहूर्त पहातो थांब! माझ्या सगळ्या धनाचा कोळसा करून टाकलास काय? आता बऱ्या बोलाने माझी संपत्ति होती तशी करून टाक, नाहीतर पहा मी मांत्रिक



बोलावून तुला जमिनीत गाडून टाकीन समजलीस?"

गाडून टाकायची धमकी ऐकून ती पिशाच्च तरुणी भयाने कापू लागली, आणि म्हणाली—"असं नको करू बाबा! तुम्ही घरी जाऊन पहा. तुमच्या घरी सर्व होतं तसं झालेलं असेल."

त्यानंतर पुन्हा तिकडून आलेल्या त्या मध्यम परिस्थितीतल्या माणसाला पाहून तिने विचारले—"तुझी अडचण दूर झाली ना? दिवा लावताना माझं स्मरण केलंस की नाही?"

"दिवा लावण्याऐवजी तुझ्यासाठी होम करणार आहे. मी आपल्या मुलीचं लग्न

करायला असमर्थ आहे म्हणून सांगितलं तर तू तिला तरुण मुलगा करून टाकलास? तू तिला पुन्हा पहिल्यासारखी करून टाक, नाहीतर....'' आवेशाने त्या गृहस्थाने म्हटले.

हात जोडून ती म्हणाली–''होम नको करू बाबा, घरी जाऊन पहा तर खरं!''

यानंतर थोडया वेळाने ती गरीब बाई रागाने धुमसत अन् ओरडतच तिथं आली. पिशाच्च तरुणीने विचारले–''ओहो, तू उत्सवात नाचणार आहेस ना? आत्तापासूनच सरावाला सुरुवात केलीस काय?''

हा प्रश्न ऐकून ती बाई आणखीनच उत्तेजित होऊन दातओठ खात म्हणाली–''जत्रा अन् उत्सव कसला? थांब, तुला खड्डयातच पुरून टाकते. तुला म्हटलं होतं की माझा नवरा दारू पिऊन मारपीट करतो आणि माझ्या कमाईचे पैसे घेऊन जातो, तर तू त्याला लकव्याचा रोगी बनवलंस?''

मग काय! ती गरीब बाई पिशाच्च तरुणीला शिवीगाळ करीत चालू लागली.

आता त्या पिशाचीला वाटलं की इथे जास्त रहाण्यात आपल्याला धोका आहे.

हा विचार मनात पक्का ठसल्यावर ती पिशाच्च तरुणी तिथून उडाली आणि जंगलातल्या एका मोठ्या पारंब्या असलेल्या वडावर जाऊन बसली. तिथे बसून रागाने ती मोठ्याने म्हणाली–''हे लोक सर्व मोठे दुष्ट आहेत.''

त्याच वृक्षावर कायम रहाणारी एक पिशाच्च-म्हातारी हिचा ओरडा ऐकून एकदम दचकली अन् तिने डोळे उघडले. पिशाच्च तरुणीकडून सर्व हकीगत जाणून घेतल्यावर तिने तिला समजावले–''हे बघ, सगळी चूक खरं म्हणजे तुझीच आहे. माणूस देवाच्या शक्तीची पूजा करतो, पण कोणी पिशाच्चांच्या जादूविद्येची पूजा नाही करीत. तसंच, देवळं ही देवांसाठी बांधली जातात. आपल्यासारख्या पिशाच्चांसाठी नव्हे, कळलं का? तू आता या अनुभवाने शहाणी हो, आपला स्वभाव बदल. गावाकडे कधी जाऊ नको, इथेच या झाडावर रहा आपली मुकाट्याने.''





# कृष्णावतार

कृष्ण तरुण झाला. त्याच्या सौंदर्य आणि बलपराक्रमामुळे गोकुळातील सर्व स्त्रिया त्याच्याकडे आकृष्ट होऊ लागल्या. एके दिवशी मध्यरात्री आपल्या सभोवार गोपिकांना वर्तुळात उभे करून कृष्ण त्यांच्याशी क्रीडाविनोदात मग्न होता. त्याच वेळी अरिष्ट नावाचा एक राक्षस एका भयंकर बैलाच्या रूपात जोराने हंबरत तेथे कृष्णाचा अंत करण्यासाठी येऊन पोचला.

बैलाचे ते भयंकर रूप व त्याचे भयानक हंबरणे पाहून सर्व गोपस्त्रिया घाबरून गेल्या व डोळे बंद करून कृष्णाच्या मागे येऊन उभ्या राहिल्या.

सर्व गोपिकांना धीर देऊन कृष्णाने आपल्यावर हल्ला करायला आलेल्या बैलाची शिंगे सर्व बळ एकवटून आपल्या दोन्हीं हातांनी घट्ट पकडली आणि त्या बैलाला एका जागी डांबून टाकले. नंतर त्याची मान पिरगळून त्याला जोराने मागे ढकलून दिले!

नाकातोंडातून रक्त ओकत तो बैल निर्जीव होऊन जमिनीवर कोसळला.

आत्ता कुठे गोपिकांच्या जिवात जीव आला व कृष्णाला घेरून तोंड भरभरून त्याची स्तुति करू लागल्या.

इकडे कृष्ण गोकुळात खेळात व निरनिराळ्या क्रीडा करण्यात मग्न होता, तर तिकडे मथुरेत कंसाचे धाबे दणाणले होते! चिंतेने तो व्याकुळ होऊन गेला होता! जिवंत असून मेल्यासारखी त्याची अवस्था झाली होती! एके दिवशी त्याने आपल्या



सभाभवनात उग्रसेन, वसुदेव, सत्यक, अंधक कंपक, दारुक, निपृथ, बभ्रुण आणि अन्य यदु व भोजवंशी सर्व प्रमुख व्यक्तींना बोलावून घेऊन त्यांना म्हटले.

"आपण सर्व बुद्धिमान आहात, ज्ञानी आहात. कोणत्याही कठीण समस्येचे उत्तर शोधण्याचे सामर्थ्य आपणात आहे. आपण सर्व माझे परमहितैषी आहात. परंतु आता मी एका मोठ्या संकटात सापडलेला पाहूनही आपण माझी उपेक्षा करीत आहात. नंदगोपाचा मुलगा माझा सर्वनाश करायच्या मागे लागलेला आहे. तो एकाद्या उपेक्षित रोगासारखा, वायुची मदत मिळालेल्या मेघासारखा किंवा एकाद्या विषवृक्षासारखा दिवसेंदिवस अधिकाधिक विकसित होत राहिला आहे. खूब डोकेफोड करूनही मला समजत नाही कि कसली शक्ति घेऊन तो जन्माला आला आहे! असं वाटतं की तो बहुधा काही देवांश घेऊनच जन्मला असला पाहिजे."

कंस पुढे म्हणाला–

"आता राक्षसवीरांत केवळ केशीच काय तो बाकी आहे आपल्याकडे! आणि केशीचाही कृष्णाच्या हातून निकाल लागला तर पुढची पाळी माझी स्वतःचीच! ज्याला केवळ इतरांना मारून टाकण्याचाच छन्द आहे तो मला काय सोडील? मुळीच नाही सोडायचा! आणि कृष्णाबरोबर बल-पराक्रमात जवळ जवळ त्याचीच बरोबरी करू शकणारा बलरामही आहेच! खरं म्हणजे नारदाने मला सर्व काही सत्य सांगितले आहे. देवकीने मध्यरात्री ज्या मुलाला जन्म दिला, त्याला याच वसुदेवाने रात्रीच्या रात्री जाऊन नन्दाच्या पत्नीजवळ निजवले, तिला झालेली मुलगी घेऊन हा परत आला, आणि तिला देवकीच्या कुशीत आणून ठेवले. ती मुलगी ही माझ्या हाता-तून वाचून आकाशात उडाली आणि ती आता विन्ध्यवासिनी देवी होऊन बसली आहे! आजपर्यंत इकडे माझा अत्यंत निकट हितैषी असल्याचे नाटक करत असतानाच





त्याने मला मोठा दगा दिला आहे. मी त्याला जितका मान दिला, जितका त्याचा आदर केला, तितकाच किंबहुना त्याहूनही अधिक त्याने माझ्याशी द्रोह केला आहे."



नंतर कंसाने वसुदेवाकडे वळून म्हटले–

"मी तुझ्या मनातला विचार ओळखला आहे. तुला आपल्या पुत्राकरवी माझा वध करवून त्याला मथुरेचा राजा बनवून त्याच्याकडून इथले राज्य करवायचे आहे. पण एक गोष्ट तुला माहीत नाही असे दिसते–साक्षात् इन्द्रही जरी पृथ्वीवर आला तरी तो माझे काहीही वाकडे करू शकणार नाही. इथेच तू भ्रमात सापडलास बघ! तू स्वतः चक्रवर्तीच्या घराण्यात जन्मलास, लहानपणापासूनच माझ्या वडिलांच्या छत्र-छायेत वाढलास. माझ्या बहिणीशी लग्न करून तू अखिल यादवकुलाच्या गुरुस्थानी पोचलास. असा इतक्या लायकीचा तू माणूस–इतके निन्द्य कर्म करायला तयार झालास! तुझं पाप तुलाच लखलाभ–मी तुझा वध करणार नाही. मी आजपर्यंत बन्धु, मित्र किंवा ब्राह्मणाची हत्या केली नाही. तुझ्या अपराधाची शिक्षा म्हणून मी तुला मारून इथून हाकलून देऊ शकतो. पण असेही करायची माझी इच्छा नाही. तुला इथून स्वतःच जायचे असेल, तर तू जाऊ शकतोस, रहायचे असेल तर रहा."

नंतर भोजवंशी अक्रूराकडे वळून कंस म्हणाला–"मी या वर्षी आपल्या धनुष्याचा एक महान उत्सव साजरा करायचं ठरवत आहे. त्यात भाग घेण्यासाठी दूर दूर देशचे राजे, महाराजे इथे येणार आहेत. पुष्कळ दिवसपर्यंत त्यांना मेजवान्या द्याव्या लाग-तील गोकुळातून खूपसे दूध-दही-तूप अन् जंगली मध वगैरे जिन्नस मागवावे लागतील. तेव्हा तू गोकुळात जाऊन त्या लोकांना आज्ञा दे, कि वेळेवर इथे सर्व जिन्नस पोचायला हवेत. परतताना नन्दगोप व त्याच्या परिवारातल्या लोकांना बरोबर घेऊन ये. आपला भाचा बलराम अन् कृष्णाला पहायला माझे मन व्याकुळ झाले



आहे. मी ऐकलं आहे की ते दोघे मोठे बलशाली अन् पराक्रमी आहेत. तू त्यांना नीट समजावून पटवून दे कि मी खरोखरीच त्यांना पहायला फार उत्सुक आहे! त्यांना माझ्याबद्दल विश्वास वाटेल असेच बोल त्यांच्याशी! इथे माझ्याजवळ दोन जबरदस्त पहिलवान आहेत, त्यांच्याशी त्या दोघांची कुस्ती लावून मी त्यांची परीक्षा घेणार आहे. तू त्यांना घेऊन येण्यात यशस्वी झालास तर तू माझ्यावर महान् उपकार केलेस असे मी समजेन. कदाचित् हा वसुदेव तुझे कान भरायचा प्रयत्न करील, पण तू त्याचे मुळीच काही ऐकू नकोस! आताच तू गोकुळाकडे प्रस्थान कर."

कंसाच्या परिवारातील अनेकजण कृष्णाला प्रत्यक्ष देवाचाच अवतार मानत. अक्रूर अशांपैकीच एक होता. कृष्णाला प्रत्यक्ष पहाण्याची संधी मिळून आपण तरून जाणार-म्हणून तो मनातल्या मनात फारच आनन्दित झाला! आणि कंसाचा निरोप घेऊन रथावर स्वार होऊन तो तावडतोब गोकुळाकडे निघाला.

सभाभवनात कंसाने वसुदेवाबद्दल जे अपमानजनक आरोप अनर्गळपणे केले ते ऐकून अधिकांश सभासदांना फारच दुःख वाटले, परंतु कंसाविरुद्ध काही बोलायला कोणी धजले नाही. परंतु त्यांच्यात सर्वात वयोवृद्ध माणूस अंधक नावाचा एक यादव होता, त्याने मात्र मोठ्या निर्भयपणे कंसाला म्हटले—

"कंसा, तू आत्ता जे काही बोललास, ते राजोचित खासच नव्हे. मागचा-पुढचा काही विचार न करता एका वयोवृद्ध माणसावर दोषारोपण करून त्याला लांछन लावणे उचित नव्हते. असला व्यवहार करून तू आपल्या आईवडिलांच्या व व वंशाच्या नावाला काळे फासले आहेस! वसुदेवाने आपल्या मुलाचे प्राण वाचवण्यासाठी लपवले तर तू त्याला दोष लावतोस? मातापिता आपल्या वंशाचे रक्षण करण्यासाठी किती संकटे झेलतात हे काय तुला माहीत नाही? तुझ्या आईबापांनीही तुझ्यासाठी किती यातना सोसल्या असतील! त्यांच्यामुळेच तू इतका मोठा झालास ना? तुझ्याशी आपली मैत्री न तोडता आम्ही तुला चिकटून राहिलो हा आमचा मूर्खपणाच झाला म्हणायचा! आमच्यापेक्षा तो अक्रूर किती भाग्यवान! कृष्णाचे दर्शन घेऊन परत येणाऱ्या अक्रुरालाच नुसते नजरेने पाहून आम्ही उद्धरून जाऊ. कृष्ण इथे आलाच, तर तुझा मृत्यु निश्चित समजून रहा. तुला मदत करायला कोणी उरणार नाही. तेव्हा आत्ताच तू गोकुळात जाऊन त्याच्या दयेची याचना केलीस तर तुझा तरणोपाय आहे." अंधकाचा हा सल्ला ऐकून कंस रागाने वेडा झाला, आणि त्याचवेळी आपल्या आसनावरून उठून तो सभाभवनाबाहेर चालता झाला! नंतर इतर सभासदही आपापल्या निवासाकडे परतले.

अक्रूर गोकुळात पोचण्यापूर्वीच कंसाने केशी राक्षसाला वृन्दावनात पाठवले. घोड्याचे रूप घेतलेला तो राक्षस वृन्दावनात पोचून तेथे चरणाऱ्या गायीगुरांवर व गोपाळांवर चालून गेला. त्या भयानक घोड्याला पाहून सर्वच गोकुळवासी भयभीत झाले. तो घोडा तेथील जनावरांना चिरून त्यांचे मांस खात होता, त्यांचे रक्त पीत होता! त्या राक्षसाने वनातल्या गुरांचा सर्वनाश केला. नंतर त्याने आपली संक्रांत गोपाळांच्या घरांकडे वळवली! त्याला दुरून येताना पाहूनच घाबरलेले गोकुळ-





वासी जन कृष्णाच्या आश्रयाला धावले. कृष्णाने त्या सर्वांना अभय दिले व त्याने जोराने टाळ्या वाजवून केशीला जास्तच भडकावले! या आव्हानामुळे घोड्याला जास्तच चेव आला. डावीकडे मान वळवून आपले तोंड वासून आपल्या भयानक दाढा दाखवत तो एकदा भेसूर खिकाळला आणि त्याने कृष्णावर हल्ला करायचा पवित्रा घेतला! आपल्या मागच्या पायांवर उभा राहून पुढील टापा उंचावून तो कृष्णावर उडी घेणार, तोच कृष्ण एक पाऊल मागे सरकला आणि आपला हात घोड्याच्या तोंडात कोंबून त्याने त्याची जीभच घट्ट पकडली.

आता काय! घोड्याचा सारा आवेश जागच्या जागीच जिरल्यासारखा झाला! आता कृष्णाच्या पकडीतून सुटूही शकत नव्हता, की त्याला आता चावूही शकत नव्हता! शेवटी जमिनीवर आपल्या टापा आपटत आपटत सर्व अवसान गळून जाऊन तो जमिनीवर कोसळला! त्याचे डोळे बाहेर निघाले. कृष्णाने त्याची जीभ खेचून काढली, त्याचा गळा चिरून काढला, त्याचे दात पाडून टाकले आणि त्याच्या बगलेत बुक्के मारून मारून त्याची दारुण हत्या केली!

केशि मरून पडलेला पाहिल्यावर गोकुळ-वासी लोकांना धीर आला. त्यांनी खोल श्वास घेतला! नंतर कृष्णाला घेऊन सर्वांनी त्याचे अभिनन्दन केले. गोपिकांनी फुलांचे हार घालून त्याचा गळा भरून टाकला! त्याचवेळी अदृश्य रूपात आकाशा-तच थांबून नारद कृष्णाला म्हणाला— "वत्सा, तुला माहीतच आहे की मी कलहप्रिय—कळलाव्या—आहे! म्हणूनच तुझे हे युद्ध पहाण्यासाठीच विशेष करून मी देवलोकातून आलो आहे. तू आत्ता जो पराक्रम केलास, तो केवळ इन्द्र आणि शिवालाच शक्य होता, इतरांना अशक्य! इन्द्रालाही कठीण गेले असते अशा केशीचा वध तू मोठ्या सहजपणे केलास. याचा वध

केलास म्हणून तू 'केशव' या नावाने प्रसिद्ध होशील." असे म्हणून नारद निघून गेला.

या अवधीत उत्तम अश्व जोडलेल्या रथावर आरूढ होऊन मधे कुठे ही न थांबता अक्रूर गोकुळाजवळ येऊन पोचला. सूर्यास्त होऊन चारी बाजूंना हळूहळू अंधार पसरू लागला होता, तो अंधार बाजूला सारत आकाशात चन्द्राचा उदय झाला. गोकुळात सर्वत्र एक प्रकारचा कोलाहल भरून राहिला होता. सर्वजण गोपाळांची आणि आपापल्या गायींची नावे घेऊन त्यांना हाकारत होते, धार काढण्याचा चुळुकचुळुक आवाज येत होता. अशा कोलाहलपूर्ण गोकुळाच्या मध्यावर अक्रूर आपला रथ घेऊन आला, थोड्याच अंतरावर कृष्ण-बलरामांची जोडी पाहून त्याला फारच आनन्द झाला. झटकन रथातून उडी मारून तो कृष्णाजवळ पोचला. आपला परिचय सांगून मोठ्या श्रद्धा अन् भक्तीने त्याने चरणस्पर्श करून कृष्णाला प्रणाम केला. कृष्णाने त्याला आपल्या हाताने वर उठवले आणि त्याला आलिंगन दिले! नंतर त्याला कुशल प्रश्न विचारून बलरामासह कृष्ण त्याला आपल्या घरी घेऊन गेला.

अक्रूराच्या बोलावण्यावरून नन्द व इतर वयोवृद्ध गोपाळ त्याच्या जवळ आले. त्यांना अक्रूर म्हणाला.

"कंस महाराजांनी आपल्या धनुष्याचा एक मोठा उत्सव करायचा संकल्प केला आहे. आपण सर्वजण स्वतः त्या उत्सवासाठी येऊन आपापले शुल्क जमा करावे. मेजवान्यांसाठी दूध, दही, लोणी आणि जंगली मध वगैरे येताना आपल्या बरोबर घेऊन या. आपले भाचे बलराम व कृष्ण यांना उत्सवात भाग घेण्यासाठी कंसाने विशेष प्रामुख्याने आमंत्रण दिले आहे. आपण सर्वजण ताबडतोब रवाना होण्याच्या तयारीला लागा. पण या दोघांना मात्र मी आत्ताच आपल्या रथात बसवून घेऊन जातो."





# कासवाची कवटी

फार वर्षांपूर्वी सूचौ नगराच्या पश्चिम द्वाराजवळ वेन थी नावाचा एक माणूस रहात असे. तो अत्यन्त बुद्धिमान होता. त्याने बुद्धिबळ, चित्रकला, नृत्य, संगीत, तंतुवाद्य इत्यादि अनेक कला शिकून घेतल्या व त्या सर्वांत प्राविण्य मिळवले. परंतु त्याच्या लहानपणी कोणा एक ज्योतिषाने त्याची पत्रिका पाहून भविष्य वर्तवलं होतं की तो खूप मोठा श्रीमन्त माणूस होईल. या कारणाने ज्योतिषावर विश्वास ठेवून त्याने कधीही पैसा कमावण्याचा उद्योग केला नाही, उलट आपली असलेली सर्व संपत्ति चैनीत मौजमजेत उधळून टाकली.

एक दिवस वेनला बातमी कळली की, तिथले चाळीस व्यापारी व्यापारासाठी समुद्रीयात्रेला निघाले आहेत. मग काय! ह्याने ही त्यांनी आपल्याला बरोबर न्यावे म्हणून त्यांच्या विनवण्या केल्या. व्यापाऱ्यांनी त्याला संमति दिली..

व्यापाऱ्यांच्या प्रमुखाने दहा तोळे चांदी वेनच्या हातावर ठेवून त्याला म्हटले—"वेन, या चांदीतून तुला काही माल खरेदी करणे जमणार नाही. तेव्हा यातून काही फळं-बिळं खरेदी केलीस तर बघ. वाटेत खायला तरी होतील!" बंदरावर त्यावेळी खूपशी संत्री विकायला आली होती. वेनने आपल्याजवळची सगळी चांदी देऊन काही संत्र्यांच्या टोपल्या खरेदी केल्या.

काही दिवसांच्या सफरीनंतर जहाज एका देशात पोचले. कप्तानाने तेथे जहाज नांगरले. सर्व व्यापारी आपापला माल घेऊन जहाजातून उतरले तेव्हा वेनला एकदम आपल्या संत्र्यांची आठवण झाली. फळं खरीदते वेळी व्यापाऱ्यांनी त्याला चिडवल्यामुळे संपूर्ण यात्रेत त्या संत्र्यांकडे

चीनमधील लोककथा



पहायची आठवणही त्याला झाली नव्हती. आता संधी मिळाली, तेव्हां फळं सडली तर नाहीत ना हे पहावे–या विचाराने त्याने त्या टोपल्या वर काढवून घेतल्या अन् नीट ओळीत रचून ठेवल्या. त्याला फळं तर चांगली वाटली. एकादे फळ खाऊन पहावे म्हणून त्याने एक संत्रे बाहेर काढले आणि सोलून त्याची एक एक फाक तो तोंडात घालू लागला.

बंदरात काम करणारे नोकर व त्यावेळी तिथे असणारी इतर माणसे त्या लाल-केशरी रंगाच्या, चमकणाऱ्या सुंदर फळांकडे आश्चर्याने पाहू लागली. मग त्यांच्या लक्षात आले की ही खाण्याची फळे आहेत. त्यांच्यापैकी एकाने चांदीचे एक चांगले वजनदार नाणे काढले अन् ते वेनच्या हाती देऊन एक फळ देण्याची खूण केली. फळ मिळाल्यावर त्याने वेनने केल्याप्रमाणे त्या संत्र्याचे साल काढले आणि नंतर त्याची एकेक फाक काढून खाण्या ऐवजी त्याने ते संबंध संत्रे तसेच तोंडात घातले आणि चावून त्याचा रस गिळून टाकला व नंतर चोथा आणि बियाही एकदम गिळून टाकल्या. त्याला फळाची चव फारच आवडली. नंतर वेनला एकदम दहा नाणी देऊन तो त्याच्याकडून दहा फळं घेऊन गेला.

आता संत्री खरीदायला लोकांनी गर्दी केली. थोडयाच वेळात त्याची निम्मी फळं संपून गेली. तेव्हा उरलेली अर्धी फळं त्याने दुप्पट पैसे घेऊन विकून टाकली.

इतक्या वेळात इतर व्यापारी आपला माल विकून जहाजावर परतले. वेनच्या व्यापाराची हकीगत ऐकून ते म्हणाले–"तू तर मोठा भाग्यवान दिसतोस वेन! आता इथे काही माल विकत घे, चीनमधे जास्त किमतीत विकला जाईल तो." परंतु आपल्याला इथे नशिबाने पैसा मिळाला एवढयावरच वेन संतुष्ट होता. त्याला संत्री विकून मिळालेली चांदी काही कमी नव्हती.



यानंतर आपला माल विकणं व नवा खरीदणं या कामात व्यापाऱ्यांचे पंधरा दिवस गेले. यानंतर पुन्हा जहाजात बसून ते परतीच्या प्रवासाला लागले. काही दिवसांनी समुद्रात जोराचे वादळ सुरू होऊन जहाज भरकटू लागले. शेवटी ते एका निर्जन बेटाजवळ आले. वादळ संपेपर्यंत तिथेच थांबण्याच्या इराद्याने जहाजाने तिथे नांगर टाकला.

वेन लगेच ते बेट पहायला निघाला. सर्वांनी त्याचा उत्साहभंग करायला सुरुवात केली. "या निर्जन बेटावर पहाण्यासारखं आहेच काय मुळी!" परंतु त्यांचे न ऐकता वेन निघालाच. बेटाच्या मध्यावर एक मध्यम आकाराची टेकडी होती त्यावर पसरलेल्या वेलींच्या सहाय्याने वेन वर पोचला. सभोवार पहातो तो काय! चारी बाजूंना पाणीच पाणी पसरलेले! इतक्यात गवतावर पडलेल्या एका विचित्र वस्तूकडे त्याची नजर गेली. जवळ जाऊन पाहिले तर ती एका कासवाची कवटी आहे असे त्याला दिसून आले. पण ती कवटी एका पलंगाएवढी मोठी होती! वेन आश्चर्याने विचार करू लागला–"अरेच्या, कासवंसुद्धा कधी इतकी मोठी असू शकतात? मी इतरांना सांगितलं तर माझ्या बोलण्यावर कोणी विश्वासही



ठेवणार नाही. सर्वजण मला 'थापाडया' म्हणतील. शिवाय मी जर ही कवटी घेऊन जाऊन सरळ कापून तिला पाय लावले तर दोन पलंग सहज बनतील याचे!" अशा विचाराने वेनने कपडयाच्या एका टोकाला ती खोपडी बांधली आणि बंदरापर्यंत ती ओढत ओढत घेऊन गेला. ती पाहून सर्व व्यापाऱ्यांना आश्चर्य तर वाटलेच, पण काहीजण तक्रार करू लागले की ही चीनपर्यंत घेऊन जायची म्हणजे उगीच ओझे मात्र होईल. काहीजण म्हणाले की हिचा काही आजारावर इलाज म्हणून चांगला उपयोग होईल. परंतु वेन सर्वांना उद्देशून म्हणाला–"तुम्ही सर्वांनी विदेशी



माल घेतला आहे ना बरोबर? मग माझाही हा विदेशी मालच आहे. फरक इतकाच की मी ही वस्तु कवडीही न खर्च करता मिळवली आहे.”

दुसऱ्याच दिवशी वादळ एकदम शान्त झाले आणि जहाज पुन्हा आपला मार्ग आक्रमू लागले. जहाज चीनच्या तटाला लागले. व्यापाऱ्यांचे दलाल तेथे येऊन पोचले आणि त्यांनी जहाजातून आलेल्या व्यापाऱ्यांना तेथील स्थानिक व्यापाऱ्यांकडे घेऊन जाण्यासाठी निमंत्रण दिले. या संदर्भात वेन आणि त्याचे सहकारी एका अबू हसन नावाच्या इराणी व्यापाऱ्याला भेटायला गेले. त्याने आपल्या या पाहुण्यासाठी एक मोठी मेजवानी देण्याची तयारी केली.

अशा प्रकारच्या मेजवानीसाठी बसण्याची योजना त्या त्या व्यापाऱ्याच्या लायकीप्रमाणे असे—म्हणजे ज्या व्यापाऱ्याचा माल अधिक मूल्यवान असेल त्याला पहिलं स्थान दिले जाई व त्याप्रमाणे मालाच्या योग्यतेप्रमाणे त्यापुढील स्थाने देत देत अगदीं कमी मोलाच्या मालवाल्या व्यापाऱ्याला पंक्तीत शेवटचे स्थान मिळे. तेव्हा या व्यापाऱ्यांना पंक्तीत उचित स्थान देण्यासाठी इराणी व्यापाऱ्याने त्यांच्या मालाच्या याद्या तपासायला सुरुवात केली. वेनजवळ यादीच नसल्यामुळे त्याला पंक्तीत शेवटचे स्थान मिळाले.

दुसऱ्या दिवशी अबू हसन जहाजावर माल पहाण्यासाठी गेला. वर पोचल्याबरोबर तिथेच समोर जहाजाबरोबर हेलकावत असलेली ती कासवाची प्रचण्ड कवटी त्याला दिसली! आश्चर्याने त्याने विचारले—“ही अमूल्य वस्तु कोणाची? ही विकली गेली आहे की काय?”

इतर व्यापाऱ्यांकडून त्याला ती कवटी वेनची असल्याबद्दल कळले.

मग काय! त्या इराणी माणसाच्या चेहऱ्यावर दुःख आणि राग एकाएकीच प्रकट झाले. तो ओरडून म्हणाला—“तुम्ही सर्वजण इतकी वर्षं माझ्याशी व्यापार करत आलात तरीही त्या बिचाऱ्याबद्दल काही बोलला नाहीत, अन् त्याला पंक्तीत शेवटी बसवले गेले! आता तुमच्या मालाच्या खरेदीबद्दल मी मागाहून पाहीन. मला अगोदर वेनची क्षमा मागायला हवी.” असे म्हणून तो वेनला बरोबर घेऊन तटावर पोचला.

अबू हसन वेनला आपल्या दुकानात घेऊन गेला, त्याला मोठ्या मानाने तेथे बसवून तो परत जहाजावर गेला आणि मग इतरांना त्याने आपल्या बरोबर घेतले. नंतर सर्वासमक्ष त्याने वेनला विचारले—“आपण ही कासवाची खोपडी मला विकायला तयार आहात?”

वेन काही अडाणी नव्हता, त्याने मोठ्या कावेबाजपणे म्हटले—“भाव चांगला मिळाला तर विकेन की!”

“मग बोला, काय किंमत देऊ याची? लक्षात ठेवा, मी उगीच घासाघीस करणारा माणूस नव्हे.” अबू हसनने उत्तर दिले.

वेनने चांगशी सल्लामसलत केली. दोघांनी खाजगी बोलणे केले.

शेवटी चांगने गंमत म्हणून म्हटले—“वेन दहा हजार रुपये मागू इच्छितो.”

“म्हणजे त्याला हा माल विकायचा नाहीय का?” हसनने विचारले.

व्यापाऱ्यांना आता कळून चुकले की कासवाची खोपडी ही अत्यंत किमती वस्तु आहे. आता चांगने हसनला वेनची खरी खरी हकीगत सांगितली. आणि म्हणाला की याची किमत हसनने स्वतःच ठरवावी. हसनने पन्नास हजार तोळे चांदी देऊन ती खोपडी खरीदली! असे मानले जाते की कासवच्या अशा कवटीत चांगले एक एक इंच व्यासाचे अमूल्य मोती भरलेले असतात! काही असो. वेनचे दुर्दिन आता संपले होते. यानंतर त्याने एका सुन्दर मुलीशी विवाह केला आणि लवकरच तो मोठ्या व्यापाऱ्यांत गणला जाऊ लागला. त्याने आपले पुढील आयुष्य मोठ्या सुखासमाधानात व्यतीत केले.





# सौदामिनीची गोष्ट

[ मागिल अंकापासूनपुढे चालू ]

इथपर्यंत गोष्ट सांगून सौदामिनी आपल्या आपल्या वडिलांना म्हणाली–"बाबा, आता कनक प्रभेने कोणाशी विवाह करावा–कौण्डिण्य देशच्या राजकुमाराशी करावा, की गंधर्वाशी करावा? हा पेचात टाकणारा प्रश्न झाला खरा. आई व मुलीने निर-निराळया तरुणांना वर म्हणून निवडले आहे, वडिलांनीही आणखी तिसऱ्याचीच निवड केलीं आहे. तेव्हा या तिघांपैकी तिचा कोणाशी विवाह होणे न्यायसंगत होईल? ही या गोष्टीतली समस्या आहे."

"माझ्याशी विवाह करू इच्छिणाऱ्या व्यक्तींना ही गोष्ट सांगा बाबा, आणि ते या समस्येचे जे उत्तर सांगतील, त्यावरून मी माझा निर्णय सांगेन."

आता राजा अनंगवर्माला आपली उत्सुकता दाबून ठेवता येईना. तो म्हणाला–"तू जी गोष्ट सांगितलीस, त्यातली कनक-प्रभा गंधर्वाशीच विवाह करते ना, बाळा?"

हळूच हसत सौदामिनीने मानेनेच त्यांचे उत्तर चुकीचे आहे हे दर्शवले.

"मग कुणाशी?" अनंगवर्मा पुढे काही बोलणार इतक्यात त्याला थांबवत सौदा-मिनी म्हणाली–"बाबा, याचे उत्तर तर तुमचा होणारा जावई देईल. परंतु बाबा, तिनांपैकी नुसतेच एकाचे नाव सागून भागणार नाही. नीट कारणही सांगायला हवे."

यानंतर काही महिने निघून गेले. सौदामिनीची गोष्ट कित्येकांनी ऐकली, पण कोणीही समाधानकारक उत्तर देऊ शकेना. अनंगवर्माला आपल्या मुलीच्या विवाहाची चिंता लागून राहिली.

अशातच एके दिवशी अनंगवर्माचा दूरचा नातेवाईक, जयन्त देशचा राजा विचित्रसेन याच्या हाती एक पत्र देऊन त्याला अनंगवर्माकडे पाठवले.

पत्रात असे लिहिले होते–"प्रिय बन्धु अनंग, तुला माहीतच आहे की तीन पिढयांपूर्वी शेजारील बल्हण देशाशी युद्ध करताना आमचे राज्याचा पराभव होऊन आमचे राज्य त्यांचे मांडलीक बनले. बल्हणचा सध्याचा राजा विकर्ण हा त्याच्या पूर्वजांपेक्षाही जास्त कुटिल बुद्धीचा आणि क्रूर आहे. आता तो मला राज्यावरून दूर करून माझे राज्य स्वतःच्या राज्याला जोडून घेण्याच्या विचारात आहे, तसे त्याचे प्रयत्नही चालू आहेत. मी आता म्हातारा झालो आहे. जमेल तितक्या लवकर मी चन्द्रहासचा राज्याभिषेक करायच्या विचारात आहे. विकर्णाच्या कारस्थानी स्वभावाबद्दल चन्द्रहासला त्याचा फारच राग आलेला आहे व तो सैन्याचे संगठन करून बल्हण राज्यावर चढाई करण्याचे योजत आहे. यासाठी तो पहाडी व जंगली जातीच्या तरुणांना जमवून त्यांना सैनिकी-शिक्षण देत आहे. अशा माझ्या मुलाला–चन्द्रहासला–मी तुझ्याकडे पाठवत आहे. चन्द्रहासच्या नेतृत्वाखाली बल्हण देशावर आक्रमण करण्यासाठी तू त्याला काही प्रमाणात

सिंधु कुलकर्णी





सैन्य व आर्थिक सहाय्य करावेस अशी माझी तुला विनन्ति आहे."

पत्र वाचून अनंगवर्मा प्रसन्न झाला व चन्द्रहासला म्हणाला–"तुला आवश्यक ते सैनिक व आर्थिक सहाय्य मी जरूर देईन. इतके विशाल राज्य व संपत्ति असूनही मी मात्र, सध्या एका विचित्र अडचणीत सापडलो आहे."

"आपली काय अडचण आहे, सांगता मला?" चन्द्रहासने नम्रतेने विचारले.

"तुला तरी सांगून काय उपयोग म्हणा!" असे म्हणून अनंगवर्माने त्याला सौदामिनीची गोष्ट सांगितली. आणि म्हटले–"आतापर्यंत जे जे आले, त्यांनी तिघांपैकी एकाचे नाव तर सांगितले. पण सौदामिनीला पसंत पडेल असे कारण मात्र कोणी सांगू शकला नाही."

"राजकुमारीला पसन्त पडेल असे उत्तर कदाचित् मी देऊ शकेन असे वाटते मला." चंद्रहास म्हणाला.

हे ऐकून अत्यंत आनन्दित होऊन अनंगवर्मा म्हणाला–"वा, वा! यासारखी आनन्दाची गोष्ट काय असेल! बोल, काय तुझं उत्तर?"

चन्द्रहास जरा वेळ गप्प राहिला, अन् म्हणाला–"कोणीही मुलगी आपल्या वडिलांची स्वतःची संपत्ति होऊ शकत नाही. चक्रसेनने विश्वम्भरशी पैज मारून कनकप्रभाला पणाला लावले. जी आपली संपत्ति नाही, ती पणाला लावण्याचा चक्रसेनला कोणताही न्याय्य हक्क नव्हता, म्हणूनच कौण्डिण्य-युवराजाशी कनकप्रभेचा विवाह करण्याची काही आवश्यकता नाही. चक्रसेनचे वचन धर्म किंवा न्यायसम्मत नाही.

आता राहिला· वरुणदत्ताचा प्रश्न? तो केवळ कनकप्रभेच्या सौंदर्यावर मोहित होऊन तिच्याशी विवाह करायला तयार झाला. आणि स्त्रीसुलभ मनोवृत्तिमुळे गंधर्वासारख्या व्यक्तीकडून आपली प्रशंसा ऐकून कनकप्रभा त्याच्याशी विवाह करायला तयार झाली. तिने पुढेमागे येणाऱ्या अडचणींचा विचारही केला नाही. त्यामुळे त्या दोघांमध्येही मानसिक पावित्र्याचा अभाव असल्याने हा विवाहही न्यायसंगत वाटत नाही.

कनकप्रभेच्या आईने मात्र आपल्या मुलीसाठी राजशेखर योग्य वर· आहे असे मानले आणि मनापासून त्याला जावई बनवायचा निश्चय केला. परंतु त्याचबरोबर कनकप्रभेच्या इच्छेचा कानोसा घ्यावा म्हणून मोठ्या विवेकाने तिने राजशेखरला म्हटले होते–"मी देऊ शकले, तर माझ्याजवळचे अमूल्य सुवर्ण तुला देईन." तेव्हा आपल्या मुलीच्या हिताच्या दृष्टीने ही निवड केलेली असल्यामुळे हा विवाहसंबंध न्यायसंगत व सर्वोत्तम म्हणायला हवा, म्हणूनच कनकप्रभेचा राजशेखरशी विवाह करणे योग्य होईल."

यावर अनंगवर्माला अत्यंत संतोष व विस्मयही वाटला. त्याने चन्द्रहासचे हे उत्तर सौदामिनीकडे पाठवले.

थोडयाच वेळात सौदामिनीची सखी, सौदामिनीच्या पाळलेल्या पोपटासह हातात पुष्पहार घेऊन तेथे आली व चन्द्रहासला म्हणाली–"युवराज्ञीने नतमस्तक होऊन आपणाला प्रणाम कळवण्यास सांगितले आहे व या तिच्या पोपटाकरवी ही पुष्पमाला आपल्या गळ्यात घालायला सांगितले आहे. माझ्या गोष्टींतील समस्येचे आपण अत्यंत योग्य समाधान दिले याबद्दल मला अतिशय संतोष होत आहे."

मग पोपटाने चन्द्रहासच्या गळ्यात पुष्पमाला घातली. अनंगवर्माला परमानन्द झाला व नंतर सौदामिनी व चन्द्रहास यांचा विवाह सोहळा थाटामाटात पार पडला.

यानंतर काही दिवसांनी चन्द्रहासने आपल्या सासऱ्याचेही सैन्य घेऊन विकर्णावर जोरदार हल्ला चढवला. त्याला युद्धात पराजित करून चन्दन, जयन्त व बल्हण या तीन्ही देशांचा तो राजा बनला. पुढे कित्येक वर्षे त्याने आपले आयुष्य सुखाने घालवले.





# अनुरूप जोडपे

एका गावात दामोदर आणि रमाबाई नावाचं एक जोडपं रहात असे. दामोदर सकाळीच उठून शेतावर कामाला जाई व संध्याकाळी परत येई. रमाबाई घरीच राहून घरातलं कामकाज पाही अन् त्याबरोबरच आपल्या पाळलेल्या कोंबड्यांची देखरेख करी. कोंबड्या पाळणं हा तिचा एक आवडता छन्द होता. त्यामुळे आस-पासचे गावकरी आपल्या कोंबड्या संभाळण्याचं काम तिला देत, कोंबड्यांची पिल्लं थोडी मोठी झाली की तिला संभाळणावळ म्हणून दोन पिल्लं बक्षीस देत, अन् बाकी आपल्या घरी घेऊन जात. असं करताकरता तिच्याजवळ पंचवीस-तीस कोंबड्या जमल्या.

दामोदरला कोंबडी खायला खूप आवडत असे. कित्येक वेळा त्याने एकादी कोंबडी मारून छान कालवण करायला रमाबाईला सुचवले. पण रमाबाईने आपली एकादी-सुद्धा कोंबडी मारायला साफ नकार दिला.

दामोदरने खूप विचार करून एक युक्ति काढली. एक दिवस तो बायकोला म्हणाला–"अग रमा, काल मला एक साधुबाबा भेटले. आपल्याला हल्ली चांगलं पीक येत नाही ना, त्याचं कारण मी त्यांना विचारलं. तर ते म्हणाले–आपल्या गावाच्या टोकाला ते पिंपळाचं झाड आहे न, त्याच्या ढोलीत पिकांचा देव वास्तव्य करून आहे. रोज एक कोंबडी शिजवून तिचा नैवेद्य त्या ढोलीत ठेवून मागे वळून न बघता घरीं निघून यायचं. असं एक महिनाभर केलं तर म्हणे तो देव आपल्या-वर प्रसन्न होईल आणि आपल्या शेतात चांगलं पीक येईल."

ही हकीगत ऐकून रमाबाई प्रथम जरा बावरलीच. पण बराच विचार करून तिनं आपल्या मनाचं सान्त्वन केलं की–हरकत नाही, पीक तर चांगलं येईल. हा विचार पक्का झाल्यावर नवऱ्याच्या सांगण्याप्रमाणे करायचं तिने ठरवलं.

त्या दिवसापासून नियमितपणे रोज एक कोंबडी मारून त्याचं छान मसालेदार कालवण करून ते अन् भात असा नैवेद्य ती त्या पिंपळाच्या ढोलीत ठेवून, मागे न पहाता परत येऊ लागली.

रमाबाई परत फिरल्याबरोबर झाडावर लपून बसलेला दामोदर खाली उतरून, ढोलीतून नैवेद्य काढून जेवणावर यथेच्छ ताव मारून ढेकर देई.

असे होता होता एक महिना लोटला. रमाबाईने शेवटची कोंबडी कापली. पण नवऱ्याने म्हटल्या प्रमाणे सस्य-देवता खूश होण्याची चिन्हं काही दिसली नव्हती.

रमाबाईच्या मनात शंका आली कि या देवाच्या मागे काहीतरी रहस्य असावे. म्हणून त्यादिवशी नैवेद्य त्या ढोलीत ठेवल्यानंतर रोजच्या प्रमाणे मागे वळून न बघता परतण्याऐवजी ती थोडी दूर जाऊन एका झाडामागे लपून राहिली आणि पाहू लागली की पुढे काय होतंय!

मग काय गंमत! दामोदर झाडावरून उतरला आणि ढोलीतून जेवण बाहेर काढून मजेत खाऊ लागला! हे पाहून रमाबाईच्या तळपायाची आग मस्तकात पोचली! धावत जाऊन ती नवऱ्याजवळ पोचली आणि आपले हात दुखून येईपर्यंत

२५ वर्षापूर्वीच्या चांदोबातील गोष्ट



तिने त्याला चांगलं बडवून काढलं. नंतर आपलं समाधान होईपर्यंत तिने त्याला शिव्या दिल्या आणि–"असल्या नवऱ्याबरोबर संसार करणं यापुढे मला शक्य नाही." असं म्हणून घरी निघून गेली.

घरी आल्यावर ती माहेरी जायच्या तयारीला लागली. आपले कपडे-लत्ते एका मोठ्या करंडीत ठेवले आणि आसपासच्या बायकांचा निरोप घ्यायला गेली.

बायको निघून गेल्यावर दामोदरही घरी आला. त्याने आपल्या बायकोचा बेत ओळखला–ती बायकांचा निरोप घेऊन परत येण्यापूर्वीच तिने तयार करून ठेवलेल्या करंडीत तो लपून बसला.

रमाबाईला निरोप द्यायला आसपासच्या बायका गोळा झाल्या. रमाबाईने आपल्या घराकडे शेवटची नजर टाकली आणि तिला जोराने रडू फुटले. नंतर करंडी डोक्यावर उचलून घेऊन आपल्या माहेरी निघून गेली.

तिथे पोचल्यावर तिने आपल्या आईपुढे नवऱ्याच्या करणीचा पाढा वाचला आणि हुंदके देऊन देऊन ती रडू लागली. आईने रमेचं सान्त्वन करून म्हटले–"रडू नको रमा, आता आजपासून तुला त्या नवऱ्याचं तोंडसुद्धा पहायची गरज नाही. इथेच रहा आपली तू."

नंतर मुलीने एवढं काय आणलंय असं सहज कुतूहल वाटून आईने करंडीचं झाकण उघडून पाहिलं, त्याबरोबर दामोदर उडी मारून करंडीतून बाहेर आला. आणि हसत हसत म्हणाला–"आईसाहेब, मी तुमचा जावई."

हे पाहून तिने विचार केला कि तिच्या घरी मुक्काम करण्यासाठीच मुलगी व जावई इथे आले आहेत. तेव्हा तिने त्या दोघांनाही रागाने घरातून बाहेर काढून लावले अन् ओरडून त्यांना ताकीद दिली की–इथे पाय ठेवाल तर खबरदार!

नाइलाज होऊन रमाबाईने पुन्हा आपल्या नवऱ्याबरोबरच संसार चालवायचं ठरवलं आणि त्याच्याबरोबर पुन्हा आपल्या गावी परत आली.







## धबधबा

ब्राझील व अर्जेंटिनाच्या सीमेवर असलेल्या इगुवाकु धबधब्यातून पावसाळ्यात ८० दिवसपर्यंत दर सेकन्दाला १६७,५०० घनफूट इतके पाणी खाली वहात असते. या धबधब्याच्या खाली असलेली नदी या पाण्यामुळे आतापर्यंत दोन वेळा इतकी फुगली की (२५० फूट) तिची उंची व धबधबा एका पातळीत आले!



## पाण्यातला बेडूक

दक्षिण आफ्रिकेत आढळणाऱ्या एक प्रकारच्या बेडकाला नखे असतात. व तो जवळजवळ आपल्या आयुष्यभर पाण्यातच रहातो. या जातीच्या बेडकांच्या मागील पायांना नखे असतात, त्यांच्या मदतीने हे बेडूक आपले अन्न मिळवतात.

















### नक्षत्र-रेणूंमध्ये स्नान

सन १९८७ मध्ये एके दिवशी जगातील सर्व लोकांनी अदृश्य स्वरूपात पडलेल्या नक्षत्र-रेणूत स्नान केले. अंतरिक्षात स्फोट झालेल्या एका नक्षत्राने हे रेणू पृथ्वी-वर सर्वत्र विखुरले होते.

### भूकम्प

सन १९८७ मध्ये जग भर एकूण ७६ भूकम्प झाले. कोलम्बिया व ईक्वेडारच्या सीमेवर झालेला भूकम्प सर्वात अधिक भयंकर होता. या भूकम्पात एक हजारा-हून अधिक लोक मृत्युमुखी पडले.






### विचित्र स्वाक्षरी

लंडनच्या डाक व्हाइट हेडने नुकतेच बँकेत आपले खाते सुरू केले. तसे पाहिले तर लाखो लोक खाती उघडतात, तुम्ही विचाराल आश्चर्य ते काय ? आश्चर्य असं की डाक व्हाइट हेड माणूस नाही. १५ महिने वयाचे ते एक पिल्लू आहे. ते आपल्या पुढल्या पायाचा ठसा उमटवून पैसे काढते.

### शांतिज्योत

१९४५ च्या ऑगस्ट महिन्यात हिरोशिमा वर अणु-बॉंब पडला. येथील भग्नावशेषातून मिळवलेली एक शांति ज्योत नुकतीच संयुक्त राष्ट्र-संघाच्या समारंभासाठी पाठविण्यात आली. अण्वस्त्रांच्या कपातीबाबत चर्चा करण्यासाठी योजलेल्या संयुक्त राष्ट्रसंघाच्या समारंभा-तील प्रतिनिधींना अणुयुद्धाच्या भयंकर परिणामांचे स्मरण व्हावे यासाठी ही शांति-ज्योत पाठविण्यात आली आहे.



# दखल

एका जमीन्दाराने आपल्या महालाच्या सिंहद्वारावर हत्तीच्या दोन मूर्ति घडवून स्थापित करायचा निश्चय केला आणि नागवर्मा नावाच्या मूर्तिकाराला पाचारण केले. नागप्पा मल्लवर्मा नावाच्या आपल्या शिष्यासह येऊन पोंचला. जमीनदाराचा विचार जाणून त्याने सांगितले की या मूर्ति बनविण्यासाठी कमीत कमी एक महिना तरी लागेल.

नागवर्म्याचे हे उत्तर ऐकून जवळच उभ्या असलेल्या दिवाणाने मधेच टोकले–"हे कारागीर काम मिळाले की ते लवकर पूर्ण न करता उगाच लांबवीत राहतात."

नागवर्मा यावर काही बोलू शकला नाही. मान खाली घालून मुकाटयाने उभा राहिला. शिष्य मल्लवर्म्याने मधेच दखल दिली–"हे पहा, काम किती सोपं आहे याची आमच्या गुरुजींना बरोबर कल्पना नाही. हत्तीच्या मूर्ति तयार करण्यात असा काय वेळ लागणार आहे ? आपण हत्तीच्या उंचीच्या दोन शिला मागवून घ्या."

"पण काम केव्हां पुरं होईल तें सांगशील ?" दिवाणाने पृच्छा केली.

"काम पूर्ण व्हायला कितीसा वेळ लागणार ! त्या दोन शिलांमध्यें हत्ती सारखा दिसणारा अंश ठेवून बाकीचा तासून काढून फेंकून द्यायचा. की काम संपलच !" मल्लवर्माने सहज उत्तर दिले.

मल्लवर्म्याच्या बोलण्यांतील मर्म समजून जमीनदार मंदस्मित करीत म्हणाला–"तुम्हाला आपलं कारागिरीतलं कौशल्य दाखवायचं आहे. पण कामाचा सोपेपणा तुम्हाला माहीत नाही असं दिसतय ! किती ही वेळ लागला, नि किती ही खर्च झाला तरी हरकत नाही. पण लक्षांत ठेवा मूर्ति सुंदर आणि आकर्षक बनल्या पाहिजेत !"

मग काय ? दिवाणाला आपल्या अनावश्क दखल दिल्याबद्दल लाज वाटली आणि त्याने मान खाली घातली.





# भोळ्या माणसाचा शाप

सूरजमल हा एक साधासुधा तरुण होता. त्याच्या वडिलांनी मरता मरता त्याला सांगितले–"बेटा, तू मेहनत करून पैसा मिळव, कधीही कुणासमोर हात पसरू नकोस. देवावर विश्वास ठेव. त्याच्या कृपेने तुला आपल्या कष्टांचं फळ नक्की मिळेल. असा वागल्यावरसुद्धा तुझ्यावर कोणी अन्याय केला तर त्याला शाप लागेल."

वडील वारल्यावर सूरजमल आपल्या वडिलांच्या उपदेशाचे अगदी काटेकोरपणे पालन करू लागला. तो कधीही कोणाचे मन दुखवीत नसे, सर्वांना तो होईल तितकी मदत करी. त्यामुळे सर्वजण त्याला चांगला माणूस म्हणत असत, पण त्याला त्याच्या मेहनतीबद्दल कोणीच काही देत नसे. त्याच्या गाठीला कधी चार पैसे जमा होत नसत.

एकदा तो आजारी पडला. त्याला वैद्याकडून इलाज करून घ्यायला हवा होता. पण वैद्याने औषधपाण्याचे पैसे आगाऊ मागितले !

सूरजमलने त्याला मोठ्या दीनपणे म्हटले–"महाराज मजजवळ पैसे नाहीत. पण बरा झाल्यावर मी आपणाकडे काम करून औषधाचे पैसे चुकवीन."

पण वैद्याने साफ सांगून टाकले की–पैसे हाती आल्यावरच मी इलाज सुरू करीन बिचारा सूरजमल दु:खाने घरी निघून गेला !

त्या दोघांचे बोलणे वैद्याची मुलगी पद्मिनी हिने ऐकले होते. सूरजमलच्या मागून ती त्याच्या घरी गेली अन् म्हणाली–"माझ्या वडिलांनी यापूर्वी तुझ्याकडून काम करून घेतलेलं आहे, पण तुला त्याचे पैसे नव्हते दिले त्यांनी. तू त्यांच्या तोंडावर हे का नाही बोललास ?"



सूरजमलने आपल्या वडिलांनी आपल्याला दिलेल्या उपदेशाबद्दल पद्मिनीला सांगितले. ती सर्व कहाणी ऐकून तिने त्याला सल्ला दिला–"तू तर फारच भोळा माणूस दिसतोस. तू जर असाच व्यवहार चालू ठेवलास तर कधीच आपलं पोट भरू शकणार नाहीस. जरा सर्वांना तोंड द्यायला शीक."

पद्मिनीच्या बोलण्याची काही पर्वा न करता तो तिला म्हणाला–"ऐक, आज तुझं सांगणं ऐकून मी तुझ्या वडलांशी भांडतही. पण रोज मला असा सल्ला कोण देणार ? कुणी सल्ला दिल्यावाचून कुणाला तोंड देऊन त्याच्याशी भांडू शकत नाही मी. अन् जी गोष्ट आपल्याला करता येत नाही ती करू बघणं धोक्याचं नाही का ?"

"ए, तू मला फार आवडलास. तू माझ्याशी लग्न कर. मी तुला रोज छान छान सल्ला देत जाईन." पद्मिनी म्हणाली.

"आपल्या लग्नाला तुझे वडील मान्यता देतील ?"

"का नाही देणार ? पण अगोदर तुला आपली तब्येत नीट करायला हवी न ! घे, या दोन्ही बांगड्या सोन्याच्या आहेत. या माझ्या वडिलांच्या हाती देऊन त्यांना म्हण की–बांगड्या तुझ्या आईच्या आहेत. मग ते तुझ्यावर उपचार करतील. प्रकृति बरी झाली की त्यांना आपल्या लग्नाबद्दल विचार. ते नक्की मान्यता देतील." असे म्हणत पद्मिनीने आपल्या हातातल्या दोन बांगड्या उतरवून त्याच्या हातावर ठेवल्या.

बांगड्या पहाताच वैद्याचा चेहरा खुलला ! त्याने नीट ठेवण्यासाठी बांगड्या आपल्या मुलीच्याच हाती दिल्या. तब्येत सुधारेपर्यंत सूरजमलला वैद्याने आपल्या घरीच ठेवून घेतले. पद्मिनीने वेळच्या वेळी औषधपाणी व खाणेपिणे देऊन त्याची नीट काळजी घेतली मग काय ! एक आठवडाभरातच सूरजमलची तब्येत एकदम छान झाली.

"आता तू आपल्या घरी जाऊ शकतोस." वैद्य त्याला म्हणाला.

सूरजमलने यावर पटकन त्याच्या मुलीशी लग्न करायची आपली इच्छा त्याच्याजवळ प्रकट केली.

वैद्याने आश्चर्याने विचारले–"कायरे, तू लग्न केलंस तर बायकोला पोसायची योग्यता आहे का तुझ्यात ?"

"तुमची पद्मिनी मोठी बुद्धिमान् मुलगी आहे. तिने साथ दिली तर आम्ही सर्व काही मिळवू शकू." सूरजमलने उत्तर दिले.

"माझी मुलगी बुद्धिमान आहे हे मला माहीत आहे रे ! पण तुला हे नको का समजायला, की अशी बुद्धिमान मुलगी तुझ्यासारख्याशी लग्नाला मुळीच तयार होणार नाही ?"

"पद्मिनीचं तर माझ्यावर प्रेम आहे. तसं नसतं तर तिने आपल्या हातातल्या सोन्याच्या बांगड्या मला कशाला दिल्या असत्या ?" आपला भोळेपणा प्रकट करीत सूरजमल म्हणाला.

सूरजमलने दिलेल्या बांगड्या आपल्याच मुलीच्या होत्या हे कळल्यावर आपल्या डोक्यावर हात मारून, घेऊन वैद्य ओरडू लागला.

त्याने आपल्या मुलीला बोलावून घेऊन याबद्दल विचारले. यावर पद्मिनी म्हणाली–



"बाबा, सूरजमलने आतापर्यंत आपल्याकडे कितीतरी वेळा निरनिराळी कामं केली, पण तुम्ही कधी त्याला मजुरी दिलीत ? ती मजुरीच मी आत्ता त्याला दिली."

वैद्य आपल्या मुलीला काही बोलू शकला नाही. पण तो सूरजमलला म्हणाला–"अरे, तू तर चक्क मला फसवलंस, आता माझ्याकडे काम करून आपलं कर्ज फेड."

वैद्य सांगेल ती कामं करायचं सूरजमलने मान्य केले. आता वैद्य त्याला म्हणाला–"हे पहा, आमच्या घराच्या मागल्या बाजूला एक मोठा खड्डा आहे. तू तुझ्या घरामागे खोदून ती माती आणून टाकून आमचा हा खड्डा बुजवायचास. पण



एक अट लक्षात ठेव—या कामात तू इतर कोणाचीही मदत घ्यायची नाहीस, एकटयानेच हे काम करायचे.''

सूरजमलने वैद्याच्या घरामागे जाऊन खड्डा पाहिला. 'बापरे, केवढा मोठा खड्डा होता तो! वैद्याची अट पुरी करायची झाली, तर तो खड्डा भरायला एक वर्ष तरी सहज लागले असते.

''महाराज, हे काम तर फारच कठीण आहे, दुसरं काही काम सांगा.'' सूरजमल वैद्याला म्हणाला.

''तू मला फसवून माझ्याकडून उपचार करून घेतलास, तेव्हां तुला ही शिक्षा झालीच पाहिजे, नाहीतर मला चार सोन्याच्या गिन्न्या दे.'' वैद्य म्हणाला. शेवटी सूरजमल वैद्याची पहिली अट मान्य करून खड्डा भरायचे काम करू लागला. त्याचे घर वैद्याच्या घरापासून बरेच दूर होते. रोज तो आपल्या घरामागे खोदून माती काढत असे, ती टोपल्यात भरून घेऊन जाऊन वैद्याच्या घरामागील खड्डयात टाकत असे.

दिवस जाऊ लागले, सूरजमलच्या घरामागचा खड्डा हळूहळू मोठा होऊ लागला, पण वैद्याच्या घरामागचा खड्डा भरायचे चिन्ह काही दिसेना! सूरजमलची ही स्थिती पाहून लोकांना त्याची दया येई. या अन्यायी कृत्याबद्दल काही लोकांनी वैद्याची कानउघाडणीही केली. पण वैद्यावर त्याचा काहीही परिणाम झाला नाही. अगदी पालथ्या घड्यावर पाणी!

काही गाववाल्यांनी सूरजमलला समजावायचा प्रयत्न केला—''अरे वेडया, हे काम तुझ्या एकटयाच्याने होण्यासारखे नाही. तू काम बंद कर. वैद्य तुझं काहीही वाकड करू शकणार नाही.''

पण सूरजमल म्हणाला—''वैद्य जर माझ्यावर अन्याय करील तर त्याचा परिणाम त्याला नक्कीच भोगावा लागेल. त्याला नक्की माझा शाप बाधेल. मी त्याची अट पूर्ण करायचा प्रयत्न करीत राहीन, पण त्याने मला 'दगाबाज' म्हणावं हे मला आवडायचं नाही.''

एक दिवस आपल्या घरामागे माती खणत असताना सूरजमलची कुदळ कसल्याशा वस्तूवर आपटली अन् 'खणखण' असा आवाज आला! त्याने काढून पाहिले तर दोन तांब्याची भांडी निघाली! दोन्ही भांडी सोन्याच्या नाण्यांनी भरलेली होती! सूरजमलच्या आश्चर्याला पारावर राहिला नाही. मूठभर सुवर्णमुद्रा घेऊन तो वैद्याकडे गेला. घरात वैद्य नव्हता, पद्मिनी एकटीच होती.

तिला सर्व हकिगत सांगून सूरजमल म्हणाला—''बघ, पद्मिनी, माझी मेहनत फुकट नाही गेली. माझ्या वडिलांच्या सांगण्याप्रमाणेच माझ्या फळ कष्टांचं मला मिळालं!''

''मग आता तुला खड्डा भरायची काही जरूर नाही. यातली चार नाणी माझ्याकडे दे. मी ती माझे बाबा घरी आल्यावर त्यांना देईन. त्यांना जेव्हां तुला सापडलेल्या दोन भांडयांबद्दल कळेल, तेव्हा ते आपल्या लग्नाबद्दल बोलायला आपण होऊन तुझ्याकडे येतील. तू आता घरी जा.'' पद्मिनीने मोठ्या आनंदाने त्याला सांगितले.



आसपासच्या लोकांना बोलावून, आपल्याला सोने सापडल्याची वार्ता सूरजमलने त्यांना सांगितली. त्याला आपल्या मेहनतीचे फळ मिळाल्याचे पाहून त्या सर्व लोकांना फारच आनन्द वाटला.

एक म्हातारा म्हणाला—''हे जे काही घडलं ते सर्व सूरजमलच्या वडिलांच्या सांगण्याप्रमाणेचं घडलं. पण वैद्याने त्याच्यावर जो अन्याय केला त्याबद्दल वैद्याला शिक्षा कशी मिळणार हे मात्र कळत नाही!''

या घटनेनंतर दोनच दिवसांची गोष्ट—वैद्य काही वनस्पती, पाळंमुळं वगैरे आणण्यासाठी जंगलात गेला होता. तेथे एक अस्वल त्याच्या मागे लागले. घाबरून पळता पळता तो एका गुहेत शिरला. तेथे चार डाकू आपल्या लूटीची वाटणी करत बसले होते. वैद्याला तेथे पाहून त्यांनी खूप मारपीट



केली. पण त्यांना जेव्हा हे कळले की तो काही राजाचा शिपाई वगैरे नाही, तेव्हा त्यांनी वैद्याला आपल्याबरोबर ठेऊन त्याला काम दिले. दोन दिवस वैद्याने त्यांना स्वयंपाक करून जेवायला घातले, त्यांचे कपडे वगैरे धुतले आणि दमून जाऊन तो अगदी हमसून हमसून रडू लागला. असल्या कामाची सवय नसल्यामुळे त्याचे अंग आंबून गेले होते—"हे बघ, आमच्याबद्दल कुठे काही वाच्यता करू नकोस. तुझीच अब्रू धुळीला मिळेल, आमचं तर काही नुकसान होणार नाही." असे म्हणून ते लोक तिथून निघून गेले.

सर्व गाववाले वैद्याच्या समाचाराला गेले. त्याची सगळी हकीगत ऐकून ते म्हणाले—"वैद्यराज, एका परीने तुम्ही भाग्यवानच आहात असं म्हटलं पाहिजे. डाकू लोक हाती आलेल्या माणसाला सहसा जिवंत सोडून देत नाहीत, ठेवायचंच असेल तर कायम आपले गुलाम म्हणून ठेवून घेतात."

"ऐक, हे जे घडलं ना, ते खरं म्हणजे तू सूरजमलवर जो अन्याय केलास त्याचंच फळ आहे. आम्ही असं ऐकलंय की त्याच्या बापाने त्याला असा उपदेश दिला होता की—देवावर विश्वास ठेऊन काम केलं तर श्रम कधीही वाया जात नाहीत आणि अशा भावनेने काम करणाऱ्या सूरजमलचा शापही नेहमी खरा होईल. आता तेच खरं झालं आहे. सूरजमलचा शापच तुला बाधला." एक म्हातारा वैद्याला उद्देशून म्हणाला.

"होय, आपलं म्हणणं खरंच आहे. मी सूरजमलच्या बाबतीत मोठाच अन्याय केला आहे. आता मी आपल्या मुलीचा त्याच्याशी विवाह करून देऊन आपल्या पापाचं प्रायश्चित्त घेणार आहे. सूरजमल कुठे आहे. ?" वैद्य म्हणाला.

सूरजमल त्यावेळी तिथे जमलेल्या गर्दीतच उभा होता. तो एकदम जमिनीवर लोटांगण घेऊन आपली छाती पिटून घेत रडायला लागला! त्याच्या अशा रडण्याचे कारण कुणालाच समजेना. सर्वजण त्याचे सांत्वन करू लागले.

शेवटी एक एक करत सर्वजण तिथून निघून गेले, केवळ पद्मिनी, सूरजमल आणि वैद्यच फक्त मागे राहिले.

"तू रडतोयस का? शेजारी जंगलात डाकू आहेत अन् ते तुझं सोनं चोरतील अशी का तुला भीती वाटत आहे?" पद्मिनीने विचारले.

"अंहं, असं नाही काही! पण सर्व लोक म्हणतात की तुझ्या बाबांच्या यातनांचं कारण माझा शाप आहे!" सूरजमलने व्याकुळतेने म्हटले.

"म्हणू देत रे! गोष्ट खरीच आहे न! तू शाप दिलास न दिलास तरी माझ्या बाबांना इतकी शिक्षा तर हवीच होती!" त्याचे सान्त्वन करीत पद्मिनी म्हणाली.

"पण तुमच्या अपराधासाठी इतकी थोडीशीच शिक्षा?" सूरजमल म्हणाला.

सूरजमलच्या रडण्याचे कारण जाणून पद्मिनी जोरजोरात हसू लागली. पण वैद्याचा चेहरा मात्र लाजेने लाल झाला. हे पाहून पद्मिनी म्हणाली—"बाबा, सूरज दुसऱ्यांची सेवा करण्याच्या वृत्तीचा आहे. तो इतका भोळा अन् निष्पाप आहे की द्वेष नावाची वस्तु त्याला माहीतच नाही. त्याला खरंच असं वाटतंय की तुम्ही आपल्या अपराधाबद्दल जी शिक्षा भोगलीत ती अपुरीच आहे. तुम्हीही स्वतः विचार करून पहा—तुम्ही त्याला किती दुखवलंय! निष्पाप माणसाचा शाप कधी खोटा होत नाही. तो तुम्हाला बरोबर दुःखच देत राहील. सूरजमलबद्दल तुमच्या मनात जो द्वेष आहे, तो घालवायचा प्रयत्न करा."

वैद्याने सूरजमलसमोर आपले सर्व अपराध कबूल केले. आणि त्याला आता सर्व प्रकारची मदत करायचे आश्वासन दिले. सूरजमलही आता हळूहळू आपला द्वेष विसरून गेला.

यानंतर सूरजमल व पद्मिनी यांचा विवाह झाला अन् पुष्कळ वर्षे त्यांनी सुखाने संसार केला.



# विचित्र छन्द

मद्रास-दादर एक्सप्रेसच्या पुणे बोगीतून माधव अन् मुकुन्द नावाचे दोन तरुण प्रवास करत करत होते. "तू कोणत्या गावचा रे ?" मुकुन्दने विचारले.

"मी पुण्याचा, तिथेच उतरणार मी." माधव म्हणाला.

"असं होय ? मी पण पुण्याचाच. वा, वा ! हे छान झालं हं ! बरं आता सांग तुझं घर कोणत्या भागात ?" मुकुन्दने विचारले.

"बाजीराव रोडवर, शनीपाराजवळ. का ?" माधवने विचारले.

"अरे ! आश्चर्यच आहे ! मी पण तिथेच रहातो. तिथे तू कोणत्या वाड्यात रहातोस ?" मुकुन्दने पुन्हा विचारले.

"केमिस्ट डिके यांचा वाडा." माधवने माहिती दिली.

"अरे ! मी पण त्याच वाड्यात रहातो, कमाल आहे !" मुकुन्द आश्चर्याने म्हणाला.

त्यांचा हा संवाद ऐकणाऱ्या एका सहप्रवाश्याने विचारले–"काय रे, तुम्ही दोघंही एकाच वाड्यात रहाता अन् एकमेकांना ओळखत नाही ?"

"छान ओळखून आहोत की ! आम्ही दोघं सख्खे भाऊ. आमचंच आडनाव डिके. लांबचा प्रवास आहे ना, म्हणून वेळ काढायला काही तरी गप्पा मारतो आहोत झालं." दोघं हसत हसत म्हणाले.

त्यांचा हा विचित्र छन्द पाहून इतर प्रवासी खो खो हसू लागले.






[८]

[ज्ञानप्रदेशातुन निघून विनोद एका नव्या प्रदेशात पोचला. तेथील प्रजेचे अज्ञान व धनलोलुपता पाहून मुनि अत्यंत व्याकुळ झाला ! नंतर विचित्र कलिंगड फुटून त्या जनतेवर कोसळले. ते तुकडे सर्वांनी आधाशीपणे खाल्ले ! यानंतर तेथील चिन्तामग्न जनता सोडून मुनि व विनोद तेथून चालू लागले. पुढे वाचा...]

विनोद तो विचित्र धबधबा पार करून गेल्याला थोडेच दिवस झाले होते, तरी एवढ्यातच सोन्याच्या दरीचा राजा अगदी अधीर होऊन गेला. तो मोठ्या उत्सुकतेने विनोदच्या परत येण्याची वाट पाहू लागला. विनोदच्या परतण्याची बातमी लवकर मिळावी म्हणून त्याने योग्य अशा डोंगरावर व उंच उंच वृक्षांवर टेहळणी-साठी माणसे नेमली !

राजा भोजन सुरु करू लागताच लाडू पाहून त्याला एकदमच सुवर्ण-प्रतिमेची आठवण येई अन् दुसऱ्याच क्षणी तो धावत पळत त्या भग्नावशेषांमधे उभ्या असलेल्या सुवर्ण मूर्तिजवळ जाऊन पोचे ! तिथे पोचल्यावर पुन्हा त्याला जेवण सोडून आल्याची आठवण होऊन चिन्ता वाटू लागे. यासाठीही त्याने एक निराळीच व्यवस्था केली–त्याने अर्धवट सोडलेल्या जेवणाच्या



थाळधा घेऊन त्याच्या मागे जाण्यासाठी तीस सेवकांनी नेहमी तयार असावे.

राजा अलिकडे नेहमीच आपल्या मंत्र्यांकडे व महाज्ञानीकडे पाहून विचारी–"मी आत्ता कसा दिसतोय?"

हल्ली सुन्दर दिसण्यासाठी राजा कसकशी काळजी घेत असतो हे या सर्वांना चांगल्या प्रकारे माहीत होते. राजा आजकाल पहिल्यापेक्षा दुप्पट आहार घेत असे, दररोज आपल्या शरीराला लोणी साय वगैरेनी मालिश करून घेऊन मगच तो स्नान करी, अन् हे सारे प्रयत्न अशासाठी– की, त्या सुवर्ण मूर्तीत प्राणसचार झाला की त्या स्त्रीशी विवाह करता यावा!

"महाप्रभु, आपण तर अतीव सौंदर्याने सुशोभित दिसत आहात." मंत्री व महाज्ञानी राजाच्या प्रश्नाला उत्तर देत.

'महाज्ञानी'नी ओळखलं होतं की आपल्या या सामान्य वर्णनावर राजा संतुष्ट नाही.

राज-दरबारातले दोन कवि आता राजाच्या सौन्दर्याचे वर्णन करण्यासाठी महाज्ञानी व मन्त्र्यांना नवनवीन उपमा सुचवून त्यांच्याकडून पैसा उकळू लागले. अशा प्रकारे कवींनी भाषा-कोषांत भर घातलेल्या नव्या शब्दांचा अर्थ न कळूनही केवळ मंत्री ज्या गंभीरतेने त्यांचा उच्चार करीत, ते पाहूनच राजा फार खूश होई, तो आपल्या मिशांवर ताव देऊ लागे!

महाज्ञानी महामंत्र्यांनी एक दिवस राजापुढे निवेदन केले–"चण्डमार्तण्ड प्रभु, ही सुवर्ण मूर्ति एकदा हसली की बास! तिचे डोळे उघडतील अन् तिच्या हृदयाचे ठोके ही आपोआप चालू होतील. विचार अन् चांगली दृष्टि असणारी कोणीही व्यक्ति आपल्या सौन्दर्यावर फिदा झाल्यावाचून राहू शकत नाहीं–मूर्तीची काय कथा?"

राजाने खूप डोके खाजवले! मंत्र्याचे म्हणणे तर छानच आहे, पण या मूर्तीला हसवायचे तरी कसे? आता ही समस्या सोडवण्यासाठी राजाने खूप विचार केला! नंतर राज्यातल्या सर्व विदुषकांना बोलावले गेले. राज-खजिन्यातला खूप पैसा खर्चून या सर्वांसाठी चित्रविचित्र पोशाख बनवले गेले अन् ते कपडे घालून त्या सर्वांना मूर्तीसमोर नाचण्याची आज्ञा दिली गेली, कसाही वाकडयातिकडया हालचाली करायला सांगितले गेले. सर्वांनी या आज्ञेनुसार आपल्याकडून खूप प्रयत्न केले. विदुषक खूप नाचले अन् शेवटी नाचून-नाचून ते थकले! तरीही तलवारीचे भय दाखवून राजसैनिकांनी त्यांना बेशुद्ध पडेपर्यंत नाचायला लावले. तरीही मूर्ति हसली नाहीच!

राजाने विचार केला की असल्या प्रयत्नांनी काही आपल्याला इच्छित फलप्राप्ति होणार नाही. त्याने दवंडी पिटवली की जो कोणी सुवर्णमूर्तीला हसायला लावील त्याला मोठे बक्षिस दिले जाईल.

एके दिवशी सुवर्णमूर्ती समोर एकाएकी अद्भुत प्रकाश चमकला! पहारेकऱ्याला वाटले की हा प्रकाश मूर्तीच्या हसण्याचाच नक्की! त्याने पळत जाऊन राजाला बातमी दिली–"महाराज, सुवर्णमूर्ति हसली! भोजन करत असलेला राजा या बातमीमुळे एकदम उठला अन् धावत सुवर्णप्रतिमेजवळ पोचला. त्याने नीट निरखून पाहिले पण मूर्तीच्या चेहऱ्यावर हसण्याचे कसलेही चिन्ह त्याला दिसेना! यावर पहारेकऱ्याकडे वळून राजा म्हणाला–"हे बघ, तुला मी मोठं बक्षिस जरूर देईन! पण मूर्तीला प्रथम हसताना पहाण्याचा पहिला मान अन् हक्क-माझा आहे. तेव्हा आता मी तुझे डोळेच काढून टाकण्याची आज्ञा देतो!"



हे ऐकून बिचारा पहारेकरी भयाने थरथर कापू लागला. पण त्या दिवशी त्याचे नशीब बलवत्तर होते म्हणूनच की काय राज-सेवकांना पहारेकऱ्याचे डोळे काढण्यासाठी राजा आज्ञा देणार, इतक्यात वृद्ध मंत्री तेथे येऊन पोचला अन् त्याने



आणलेल्या वार्तेच्या गडबडीत पहारेकऱ्याचे डोळे वाचले! वृद्ध मंत्री राजाला म्हणाला– "चण्डमार्तण्ड प्रभु, आपल्या राज्यात एक महामान्त्रिक आला आहे, तो निरनिराळे चमत्कार करून दाखवण्यात पटाईत आहे."

राजाला मान्त्रिक म्हणाला–"महाराज, आपण आज्ञा द्या, मी आपणाला अनेक चमत्कार करून दाखवतो." असे म्हणून त्याने टाळ्या वाजवल्या.

दुसऱ्याच क्षणी मान्त्रिकाचा एक शिष्य एका अस्वलाला तेथे खेचून घेऊन आला.

"सांगा महाराज, आपणाला आत्ता काय दिसत आहे?" मान्त्रिकाने राजाला विचारले.

"वा रे वा! अस्वलाला माणसाळवणें काही फारसं कठीण काम नव्हे! शी:, ताबडतोब घेऊन जा त्याला दूर, काय घाण येतेय् त्याच्या शरीराची." नाक दाबत राजा रागाने म्हणाला.

"जशी आज्ञा महाराज, पण मी जास्त वेळ याला अस्वलाच्या रूपात ठेवणार नाही." असे हसत हसत म्हणत मान्त्रिकाने त्या अस्वलाला एक लाथ मारली. त्याबरोबर ते अस्वल जमिनीवर झोपले. दुसऱ्याच क्षणी मान्त्रिकाच्या शिष्याने त्याच्या अंगावर एक दुपट्टा पसरला. नंतर मान्त्रिकाने तोंडाने काही मंत्र पुटपुटत हातातच्या मंतरलेल्या दंडाने अस्वलाच्या शरीराला दोन-चार ठिकाणी स्पर्श केला, आणि त्याला तीनदा प्रदक्षिणा घातली. आणि काय! त्या दुपट्ट्याखाली जणू काय ते अस्वल तडफडत आहे अशी काहीशी हालचाल झाली. मान्त्रिकाने आणखी काही मन्त्रोच्चार केला व शेवटी 'ओम् फट्' म्हटले. ताबडतोब त्या दुपट्ट्याखालून एका व्यक्तीने बाहेर उडी मारली आणि तो राजाच्या समोर उभा राहिला! राजाने त्याच्याकडे नीट निरखून पाहिले. त्या माणसात अस्वलाची कोणतीही चिन्हें दिसत नव्हती! राजाला फारच आश्चर्य वाटले हे पाहून!



ती वेळ रात्रीची होती, म्हणून तिथे लोकांची गर्दीही कमी होती. मूर्तीच्या रक्षणासाठी नेमलेले पहारेकरी-शिपाई आणि राजाच्या भोजनाच्या थाळ्या नेणारे शिपाई इतकेच लोक तेथे होते. ते बिचारे राजाशी कसे बोलणार? थोडेसे दरबारी पदाधिकारी आणि अन्य काही अधिकारीही होते तिथे, पण राजाच्या विरुद्ध बोलणे उचित नव्हे हे जाणून ते गप्प बसले होते! मांत्रिकाने अस्वलाचा माणूस बनवला यावर राजाचा पूर्ण विश्वास बसला होता! मन्त्रिगणांनीही असाच काहीसा अभिनय केला की त्यांचाही राजाच्या म्हणण्यावर विश्वास आहे. काहींच्या मनात आले, की मान्त्रिकाने एका माणसालाच अस्वलाचे रूप देऊन राजाला 'बनवलं' आहे—पण तसं प्रत्यक्ष बोलून दाखवण्याचं धाडस कोण करणार?

इतक्यात त्या अस्वलाचा माणूस बनलेल्या व्यक्तीने एका मंत्र्याचे नाक ओरबाडून त्याला जख्मी केले! राजाने विचारले—“अरे, हा नवा माणूस अजून अस्वलासारखा गुरगुरत का आहे?”

“महाराज, आता लवकरच याचे गुरगुरणेही बंद होईल. उद्या या वेळेपर्यंत तो व्यवस्थित बोलूही लागेल. नंतर नखांऐवजी तो आपल्यासारखाच तलवार अन् भाल्याचाही उपयोग करू शकेल.” मान्त्रिकाने समजावले.

“महाप्रभु, मी अस्वलाचे माणसात रूपान्तर करू शकतो हे आपण पाहिलेच. माझ्यातल्या या शक्तीबद्दल आपला काय विचार आहे?” मान्त्रिकाने राजाला विचारले.

थोडा विचार करून मान हलवत राजा म्हणाला—“थांब, सांगतो माझा काय विचार आहे ते. तू हवं तर आणखी एका अस्वलाचा माणूस बनवू शकतोस, पण आत्ता याची काही आवश्यकता नाही असं मला वाटतंय्, नमुन्यासाठी एका अस्वलाचा माणूस बनवलास तेवढा पुरे.”



“वा, वा! आपले राजेसाहेब काय विवेकशील आहेत!” सर्व दरबारी एकसमयावच्छेदे करून ओरडले.

“महाप्रभु, मी जर अस्वलाचा माणूस बनवू शकलो तर, आपल्याला काय वाटतं—मी या सुवर्णप्रतिमेची खरी स्त्री बनवू नाही शकणार?” मान्त्रिकाने राजाला विचारले.

“का नाही? खरंच की! तू नक्कीच हा बदल करू शकशील! अरे, मला तर आत्ता आनंदाने उड्या माराव्याशा वाटत आहेत. पण काय करू मला उड्याच मारता येत नाहीत रे!” राजा म्हणाला.

“महाराज, आपणाला आपल्या पोटाचं ओझं जास्त झालंय्! पण मी आपणाला खात्री देतो, की ही सुवर्णमूर्ती सजीव होऊन उठून चालू लागण्यापूर्वीच आपलं पोटही विरघळून जाईल.” मान्त्रिक राजाला आश्वासन देऊ लागला.

“अरे महामांत्रिका, आम्ही आत्ता तावडतोब त्या जादुच्या दुपट्ट्याने ही मूर्ती झाकून टाकतो. तू आपल्या मंतरलेल्या दण्डाने या प्रतिमेवर पाहिजे तिथे, पाहिजे तसे प्रहार कर, मी तुला मुळीच अडवणार नाही. या पाषाणहृदयी स्त्रीने मला इतके दिवस वाट पहायला लावली आहे. आता अंगावर प्रहार होतील तेव्हां तिलाही माझे कष्ट कळतील.” राजा म्हणाला.



“हे शक्य नाही महाराज! या प्रतिमेत प्राणप्रतिष्ठा करण्यासाठी आणखी एक उपाय करायला हवा. त्यासाठी आपणाला एक आठवडाभर उपास करावा लागेल, नंतर या मूर्तीच्या मागे असलेल्या गुहेत बसून ध्यान करावे लागेल. मगच आपणाला इच्छित फळ मिळू शकेल!” मान्त्रिकाने राजाला चेतावणी दिली.

“एक आठवड्याचा उपास?” राजाने आश्चर्याने विचारले.

“होय महाराज, एका आठवड्याला एक मिनिटही कमी होणार नाही.” मान्त्रिकाने जोरदार उत्तर दिले.

"लाडू खाता येतील मला त्या काळात?" राजाने लालचावलेल्या आवाजात विचारले.

"नाही प्रभु! असं मुळीच जमणार नाही." महामान्त्रिक बोलला.

"बरं मग, अधून-मधून कोंबडीचं मास तरी खाता येईल नं?" अर्धवट जेवलेल्या त्या चमकणाऱ्या थाळ्यांकडे लोभी दृष्टीने पहात पुन्हा राजाने विचारले.

"कोंबडीचं मासच काय, अंडी सुद्धा नाही खाता येणार समजलं?" असे म्हणून राजाकडे मोठ्या सहानुभूतीने पहात हसत हसत मान्त्रिक पुढे म्हणाला—"ह्या उपासाचा काळ संपल्यावर प्राण संचार झालेल्या या मूर्तीबरोबर बसून आपण जे मिष्टान्न भोजन कराल त्या आपल्या सुन्दर भविष्याची कल्पना करून पहा महाराज! अन् शिवाय एका अप्सरेशी लग्न करणारा पहिलाच राजा म्हणून आपलं नाव इतिहासात लिहिलं जाईल ते वेगळंच!" असे म्हणून त्याने राजाच्या पाठीवर थोपटले. आता होकारार्थी मान हलवून राजाने हे सर्व स्वीकारल्याबद्दल सूचना दिली.

"महाराज, आपल्याला सहानुभूति दाखवण्यासाठी मीही उपास करू इच्छितो." असे म्हणून मान्त्रिक पुढे काही बोलणार, इतक्यात मंत्रि, आणि दरबारी अधिकारी एका आवाजात म्हणाले—आम्हीही आपल्या-बरोबर उपास करू महाराज."

"वा वा, हे छान झालं हं! स्वतः चण्डमार्तण्ड प्रभु उपास करतील तेव्हां आपणच फक्त जेवण्याची इच्छा इतरांच्या मनात तरी कशी येईल बरं? पण मला मात्र ह्या पूर्ण आठवडा राजासाठी विशेष श्रम करावे लागणार आहेत. तेव्हां मी जर जेवलो नाही तर मी कमजोर होऊन जाईन. राजेसाहेबांनी अन्यथा समजू नये-पण मला वाटतं राजेसाहेबांना तयार केलं जाणारं अन्न या आठवडाभर मीच खात जाईन. म्हणजेच मी हे सर्व नीट पार पाडू शकेन." मान्त्रिक म्हणाला.

"होय, तुझ्या मनात असेल तसंच कर तू" राजा म्हणाला. (क्रमशः)





# सुवर्ण योग

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडाकडे परत गेला, झाडावरून प्रेत काढून खांद्यावर घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन तो स्मशानाकडे निघाला. तेव्हा प्रेतात राहणारा वेताळ म्हणाला—"राजा, तू जे व्रत घेतलेस ते तडीस नेण्याचा दृढ संकल्प केलास ही गोष्ट प्रशंसनीय तर खरीच, पण काही काही बाबतीत खूप कष्ट करून मनापासून एकाद्या कार्यासाठी सिद्ध झालेल्या माणसांना निष्कारण अपमान सहन करायची पाळी येते. अशापैकीच एक तूही असावास काय अशी शंका माझ्या मनाला ग्रासून राहिली आहे. उदाहरणादाखल मी तुला एक गोष्ट सांगतो, ती ऐक." वेताळ गोष्ट सांगू लागला :—

जंगलात पक्ष्यांची शिकार करून नागदत्त नावाचा एक पारधी आपले पोट भरत असे. एके दिवशी सबंध जंगल धांडोळून एकही

## वेताळाच्या गोष्टी



पक्षी त्याच्या हाती लागला नाही. शेवटी थकून तो एका झाडाच्या सावलीत बसला. त्याच वेळी सुवर्णकान्तीने तळपत असलेला एक हंस त्याच झाडाच्या दिशेने येत असलेला त्याला दिसला! नागदत्ताने झटकन् एक बाण धनुष्याला लावून त्या पक्ष्याच्या दिशेने सोडला. पण काय आश्चर्य! बाण हंसाच्या शरीरात घुसून दुसऱ्या बाजूने बाहेरही निघून गेला, पण हंस काही खाली पडला नाही!

हा चमत्कार पाहून तो त्या पक्ष्यामागे धावू लागला. हंसाच्या शरीरातून निघालेली दोन पिसे नागदत्ताच्या हाती लागली. ती दोन पिसं सोनेरी तेजाने चमकत होती!

आता काहीही करून त्या हंसाला पकडण्याचे पक्केच वेड नागदत्ताच्या डोक्यात शिरले आणि तो हंसाच्या दिशेने पुढेपुढे सरकत राहिला. संध्याकाळपर्यंत पुढे गेल्यावर त्याला एक म्हातारा भेटली. म्हाताऱ्याच्या हातात अनेक औषधी वनस्पता अन् काष्ठं-मुळं वगैरे होती. नागदत्तने त्याला मिळालेली पिसेही दाखवली.

त्या वृद्धाने पिसे नीट निरखून पाहिली आणि विचारले–"अरे ही तर खरी सोन्याची पिसं आहेत! तू तो सोन्याचा हंस स्वत: पाहिलास का?"

नागदत्तने हंसाबद्दल सविस्तर हकिकत सांगितल्यावर त्या वृद्धानेही आपली माहिती दिली–मणिसिद्धि नावाचा तो वृद्ध एका जमीनदाराचा मुलगा होता. मणिसिद्धि पाच वर्षांचा असतानाच त्याच्या वडिलांना एका भयंकर रोगाने पछाडले. या जमीन-दाराजवळ कित्येक मण सोने होते! जमीनदाराला काही मंत्रशक्ति अवगत होत्या. त्यांचा उपयोग करून, त्याने आपले सर्व सोने एका गुहेत नेऊन ठेवले आणि त्या गुहेचे तोंड मंत्रशक्तीने बन्द करून ठेवले. उघडण्याचे विवरण एका ताम्रपत्रावर लिहून ते त्याने आपल्या बायकोजवळ देऊन ठेवले. यानंतर थोड्याच अवधीत तो मरून गेला.



मणिसिद्धिची आई त्या ताम्रपत्राची मोठ्या जागरूकतेने काळजी घेई. तिच्या मनात होते की आपला मुलगा मोठा झाला की ते त्याच्या हाती सोपवून मोकळे व्हावे! परंतु दुर्भाग्य त्या दोघांचेही! तो ताम्रपट एकदा आगीच्या भक्ष्यस्थानी पडला अन् वितळून गेला! शेवटी त्या काळजीने मणिसिद्धिची आई आजारी पडली अन् झुरून झुरून मरून गेली!

आता मणिसिद्धि अगदीच भिकारी झाला! एका जमीनदाराचा मुलगा म्हणून त्याने ज्या वैभवात आपले आयुष्य घालवले त्याची आठवण होऊन, काहीही करून पुन्हा ते वैभव मिळवायचेच असा निश्चय करून त्याने पारसविद्या व रसशास्त्र जाणणाऱ्या गुरूंची सेवा करायला सुरुवात केली. असे करता करता आता तो वृद्धही झाला, पण अजूनही तो आपल्या कार्यात सफल झाला नाही.

अशा प्रकारे आपली सर्व माहिती सांगून मणिसिद्धि नागदत्ताला म्हणाला–"हा सुवर्णहंस आपण पकडलाच पाहिजे, चल, मीही येतो तुझ्याबरोबर."

यानंतर ते दोघेही हंसाच्या शोधासाठी पुढे निघाले. दुसऱ्या दिवशी दुपारपर्यंत ते एका नदीकिनारी पोचले. तेथील एका झाडाच्या फांदीला आपल्या दोन्ही पायांनी घट्ट आवळून धरून एक साधु उलटा लटकत



असलेला त्यांनी पाहिला. त्याच्या डोक्या-खालीच एक चिता धडधड जळत होती! चितेची उष्णता तशीच सहन करत तो साधु तपस्या करीत होता!

ते दृश्य पाहून आश्चर्यचकित झालेले हे दोघे त्या साधुजवळ गेले. तेवढ्यात साधूने आपले डोळे उघडून त्यांना पाहिले आणि विचारले–"तुम्ही कोण आहात? या भयंकर जंगलात तुमचं काय काम आहे?"

नागदत्ताने त्याला आपला आशय सांगितला. यावर साधुने पटकन झाडावरून चितेत उडी मारली अन् भरकन त्यांच्या जवळ जाऊन तो म्हणाला–"बाबांनो, माझे नाव वज्रकंठ. माझे वडील राज-



दरबारात कोषाध्यक्ष होते. मी एक साधा सैनिक आहे. एकदा कोषागारात एक मोठी चोरी झाली. राजाने माझ्या वडिलांवर आळ घेऊन त्यांना तुरुंगात टाकले! काही दिवसांनंतर डाकूंची एक टोळी लुटालूट करण्यासाठी आमच्या राजाच्या सीमेवर पोचली, मी अन् इतर काही सैनिकांनी मिळून त्यांच्याशी लढाई केली. त्यांचा म्होरक्या आमच्या हाती सापडला. त्याच्या गळयातला हार पाहून मी ओळखले की हा हार तर कोषागारातून चोरीला गेलेल्या मालातलाच आहे! मी त्याला लगेच राजाच्या ताब्यात दिले. पण इतक्या काळात माझे बिचारे वडील मरून गेले होते!

वडिलांच्या दुःखाने व्याकुळ होऊन मी लगेच गाव सोडले आणि संन्याशांच्या एका टोळीत सामिल होऊन त्यांच्याबरोबर देशाटन करीत राहिलो. माझी एक प्रबल इच्छा आहे—मला या जन्मातच काही करून राजा बनायचे आहे. जवळ पैसा असेल तर सैन्य जमवून, त्यांच्या मदतीने राज्य जिंकून राजा बनणं काही मोठंसं कठीण नाही. एका महान् संन्याशाचा उपदेश घेऊन लक्ष्मीला प्रसन्न करून घेण्यासाठी मी इथे अशी उपासना करीत आहे."

हे बोलणे चालू असतानाच सुवर्णहंस आपले पंख फडफडावीत त्यांच्या डोक्यांवरून उडून गेला. ते पाहून वज्रकंठ उत्साहाने म्हणाला—"अरे, हा तर सुवर्णहंस! त्यांचं रहाण्याचं एकादं सरोवर इथेच कुठे जवळपास असलं पाहिजे. चला पाहू या आपण!"

आता ते तिघे हंस उडाल्या दिशेने पुढे जाऊ लागले. वाटेत त्यांना जीर्णावस्थेतले कालीमातेचे एक मंदिर दिसले. तिथे एक लहान मुलगा कालीमातेची पूजा करीत होता अन् त्याच्या पाठीशीच एक भीमकाय माणूस एका दगडावर आपल्या तलवारीला धार लावत होता.

मग त्या तिघांनी आपसात काही चर्चा केली अन् त्यांनी मिळून एकदम त्या माणसावर हल्ला केला. त्याचे दंड त्यांनी घट्ट धरून ठेवले.

"मी आपल्या मुलाचं काहीही करीन. मला आडवणारे तुम्ही कोण?" ओढाओढी करत तो अजस्त्र माणूस ओरडू लागला.

वज्रकंठने त्याला रागावून विचारले—"खरं सांग, ही काय भानगड आहे?"

तो सांगू लागला—"माझं नाव मणिवर्मा. कित्येक पिढ्यांपासून आम्ही या देवीचे पुजारी आहोत. मला तीन मुलगे होते. थोड्या दिवसांपूर्वी माझा मोठा मुलगा आजारी पडला. त्याला औषधोपचार करायला माझ्याजवळ पैसा नसल्यामुळे तो बिचारा मृत्युमुखी पडला. मी दुःखाने वेडापिसा होऊन रात्रभर या मंदिरातच कालीमातेला शिव्या देत पडून राहिलो. शेवटी स्वप्नात दर्शन देऊन ती मला म्हणाली—"बाकीच्या दोघा मुलांपैकी तू एकाचा बळी दिलास तर मी तुझ्या घरात सोन्याचा पाऊस पाडीन. त्यासाठीच आत्ता मी या माझ्या मुलाचा बळी देणार आहे."

रागाने त्याच्याकडे पहात मणिसिद्धिने म्हटले—"अरे मूर्खा, तलवार फेक ती अगोदर! आम्हाला थोड्याच वेळात सुवर्णयोग प्राप्त होणार आहे." असे म्हणून मणिवर्माला आपल्या तिघांचा तिथे येण्याचा उद्देश त्याने सांगितला.



आता चौघेही मिळून हंसाच्या दिशेने निघाले. दुसऱ्या दिवशी सकाळीच ते एका पहाडाजवळ पोचले अन् पहाड चढून वर गेले. तेथे त्यांना एक मोठे सरोवर दिसले. सरोवरात शेकडो सुवर्णहंस सूर्यप्रकाशात सोन्याच्या ढेकळांप्रमाणे चमकत विहार करीत होते! पाण्यात सर्वत्र सुवर्णकमळे उगवलेली होती.

ते दृश्य ते सर्वच क्षणभर अवाक् होऊन पहात राहिले! नागदत्त सोडून बाकी तिघेही सुवर्णकमळे तोडण्यासाठी पाण्यात उतरले.

नागदत्ताची दृष्टी मात्र केवळ सुवर्णहंसावर खिळून होती. तोही पाण्यात उतरून

हंस पकडण्यासाठी पुढे झाला. पण हंस त्याला चुकवून पोहत पुढे निघून गेले.

नागदत्त त्यांच्यामागे थोडे अंतर पुढे गेला आणि सहज मागे वळून पहातो तो काय! ते तिघेही तिथून गायब! त्या ऐवजी तीन सुवर्णहंस मात्र आपल्या चोंची पुढे करून पोहत असलेले त्याला दिसले.

हे पाहून नागदत्त दचकलाच! सरोवरातून तो भरकन बाहेर पडला अन् मागे वळूनही न पाहता तो आपल्या घराच्या दिशेने चालू लागला.

इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, नागदत्ताप्रमाणेच इतर तिघंही सुवर्णहंस पकडण्यासाठीच तर गेले होते ना? मग ते तिथे मात्र सरोवरात उतरल्यानंतर त्यांचे तीन हंसात रूपान्तर झाले, पण नागदत्त मात्र एकटाच त्या संकटातून बाचून बाहेर कसा आला? माहिती असूनही तू या प्रश्नाचे उत्तर दिले नाहीस, तर तुझ्या मस्तकाची छकलं-छकलं होतील हे तुला ठाऊकच आहे!

विक्रमादित्यने उत्तर दिले–"नागदत्त तर एक पारधीच आहे, त्याचा धंदाच मुळी पक्षी पकडण्याचा आहे, तोच त्याच्या जीवनाचा आधार आहे. त्याला दुसरा कुठलाच पक्षी न मिळाल्याने तो सुवर्णहंसाच्या मागे लागला. त्याने प्रथम जेव्हा बाण सोडला तेव्हा तर तो हंसाला, सामान्य हंसच समजला होता. पण बाकी तिघांचा प्रश्न अगदी भिन्न आहे. ते सोनं मिळवण्याच्या लोभाने आले होते! म्हणूनच ते सरोवरात उतरले तेव्हां हंस सोडून देऊन ते सुवर्णकमळं मिळवण्यासाठी धावले. पण नागदत्ताने असं नाही केलं! त्याच्या दृष्टीने पक्षीच मुख्य आहे, सोनं नव्हे! आपले साथी हंसांच्या रूपात परिवर्तित झालेले पाहून त्याने ओळखले की हे सरोवर जादूने भरलेले आहे, म्हणूनच हंस पकडायचं सोडून तो घराकडे चालू लागला."

इतके बोलून राजा पुन्हा मौन झाल्याबरोबर वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडावर जाऊन लटकू लागला. (कल्पित)





# खरा विश्वस्त

प्राचीन काळी मगध राज्यात अगदी बारीक-सारीक गोष्टीवरूनही शैव व वैष्णव यांच्यात भांडणे होत असत. जनतेत आपापसात हा जो भेदभाव होता तो मिटवावा म्हणून मगध सम्राटाने आपल्या राजधानीत दोन बाजूंना दोन संगमरवरी मंदिरे बांधून घेतली–एक शिवमंदिर अन् दुसरे विष्णुमंदिर. या दोन्ही मंदिरांसाठी मिळून एक योग्य विश्वस्त नेमण्याची राजापुढे समस्या उत्पन्न झाली.

"असा कोण सुयोग्य माणूस आपल्या नजरेसमोर आहे का मंत्रीमहाशय?" राजाने मंत्री माधव वर्माला विचारले.

"आहे तर! अशा कार्यासाठी देवाबद्दल भक्ति असणारा, धर्मभीरु, व्यवहारकुशल अन् चतुर असा केवळ एकच माणूस माझ्या नजरेत आहे, तो म्हणजे शिवराम जोशीच!" मंत्र्याने ठासून म्हटले.

मग कसला अवकाश! राजाने ताबडतोब शिवराम जोशीला त्या दोन्ही मंदिरांचा 'विश्वस्त' म्हणून नेमले. शिवराम जोशीच्या आधिपत्याखाली मंदिरांचा चांगला संतोषकारक विकास होत राहिला.

एके दिवशी राजा महानन्द शिवराम जोशीची परीक्षा घेण्यासाठी व्यापाऱ्याच्या वेषात निघाला. दोन्ही मंदिरांच्या मधे असणाऱ्या धर्मशाळेत तो उतरला.

त्या धर्मशाळेत इतरही अनेक भक्त उतरलेले होते, त्यामुळे शिवराम जोशीने राजाला ओळखलेही नाही! परंतु, त्याच्या हातातल्या मौल्यवान अंगठ्या पाहून त्याला वाटले की हा कोणी चांगला धनवान व्यापारी असावा. भक्तांकडून येणाऱ्या भेटी आणि वर्गणीतून आपल्या राज्यात निरनिराळे विकास कार्यक्रम कसे राबवले जातात

प्रमिला पुराणिक

हे जोशीने त्या व्यापाऱ्याला सांगितले आणि स्वत: बरोबर जाऊन त्याला दोन्ही मंदिरेही दाखवली.

राजाने तावडतोब एका ताडपत्रावर "एकशे सुवर्णमुद्रा" अशी संख्या लिहून विश्वस्ताला विचारले–"पुरे होईल एवढं धन माझ्याकडून?"

शिवराम जोशी मंद हसून म्हणाला–"आपल्या दोन बाजूंना दोन देव आहेत. एकशे एक सुद्धा पुरेसे नाही होणार, ही संख्या आणखी थोडी मोठी करा न!"

राजाने जरा विचार करून जोशीला विचारले–"कोणत्या बाजूला वाढवू ही संख्या?"

"हे पहा, देणारा भक्त अन् घेणारा भगवान! असं म्हणतात की दान गुप्त रूपानेच करावं! ठीक आहे, आपण संख्या वाढवायचा विचार केलाच आहे, तर एक काम करा–या संख्या आहेत ना, त्यात आणखी 'एक' जोडा." शिवराम जोशी म्हणाला.

राजाने लगेच 'एकशे'च्या संख्येपुढे 'एक' अंक काढला, आणि आता ती संख्या 'एक हजार एक' सुवर्णमुद्रा-अशी झाली.

पण शिवराम जोशीचे एवढ्याने काही समाधान होईना. तो म्हणाला–"महाराज, ज्या भक्ताला ही गोष्ट पटली की शिव आणि राम यांच्यात केवळ नावाचाच फरक आहे–नाहीतर खरं म्हणजे दोन्ही एकच आहेत, अशा भक्तांची दोघांवर सारखीच भक्ती असते. आपण उजवीकडच्या विष्णुच्या मंदिरासाठी एक अंक वाढवला, मग बिचाऱ्या शिवालयातल्या शंकरानेच काय पाप केलंय? त्याही बाजूला एक अंक वाढवणंही न्यायसंगत होईल ना!"

यावर राजाने 'एक'चा आकडा डाव्या बाजूला ही जोडला. अन् आता हा आकडा 'अकरा हजार एक' सुवर्णमुद्रा–असा झाला. मंत्र्याच्या म्हणण्याप्रमाणे शिवराम जोशी हाच 'विश्वस्त' या पदाला योग्य आहे हे पाहून राजा फारच प्रसन्न झाला.



महाकाव्य कथा :

# मुद्राराक्षस २



वंग राजाच्या राजदूताने टाकलेले कोडे चन्द्रगुप्ताने सोडवल्यामुळे जनतेत त्याचा भाव वाढला. हत्तीवर बसवून त्यांनी त्याची मिरवणूक काढली अन् त्याला त्याच्या स्वत:च्या घरी मोठ्या सन्मानाने पोचवले. त्यामुळे नन्द त्याला पुन्हा कैदेत टाकू शकेनात.

याच काळात ग्रीक सम्राट सिकन्दराने भारतावर आक्रमण केले अन् त्याने काही दिवस भारतातच मुक्काम ठोकला. या परिस्थितीचा फायदा घेऊन चन्द्रगुप्त मुद्दामच ग्रीक सेनेत भरती झाला आणि त्याने त्यांच्या युद्धकलेचा सांगोपांग अभ्यास केला.





चन्द्रगुप्ताने एक दिवस एका ग्रीक सेनापतीचा अपमान केला. त्यामुळे ग्रीक सैनिक त्याला पकडायला धावले, पण मोठ्या शिताफीने चन्द्रगुप्त तेथून पळून जाऊन एका सुरक्षित स्थानी पोचला.



याच सुमारास इकडे एकदा मगधच्या राजवाड्यात कसलीशी मेजवानी होती. त्यात पुढे चाणक्य या नावाने प्रसिद्धी पावलेल्या विष्णुगुप्त नावाच्या एका ब्राह्मणाचा—तो फारच सामान्य वाटल्याने—नन्दांनी अपमान केला व त्याला पंक्तीतून उठवून राजवाड्या-बाहेर हाकलून दिले. या अपमानाने चिडलेल्या चाणक्याने पूर्ण नन्दवंशाचाच नायनाट करण्याची प्रतिज्ञा केली.

योगायोगानेच एकदा चन्द्रगुप्त व या चाणक्याची अचानक भेट झाली! दोघेही एकमेकांचे जिवलग मित्र झाले. नन्दवंशाबद्दल दोघांच्या मनात अढी होतीच. चाणक्याचे बुद्धिकौशल्य अन् चन्द्रगुप्ताचा पराक्रम दोन्हीही एक-मेकांना छान सहाय्यभूत झाले अन् दोघांनी मिळून नन्दांचा सूड घेण्याचा विडा उचलला!





त्यावेळी मगधच्या सीमेवर असलेल्या अरण्यप्रदेशाचा पर्वतक नावाचा एक म्लेंच्छ राजा होता. या पर्वतकाशी हातमिळवणी करून चाणक्याने त्याला असे वचन दिले की—पर्वतकाने सैनिक-सहाय्य दिले तर त्या सैन्याच्या मदतीने मगध राज्य जिंकून त्या राज्याचा अर्धा हिस्सा पर्वतकाला दिला जाईल. पर्वतक या गोष्टीला तयार झाला.

चन्द्रगुप्ताने पर्वतकाच्या सैन्याच्या मदतीने मगधवर चढाई केली. घनघोर युद्ध झाले आणि नन्दांच्या सैन्याचा सपशेल पराभव झाला! मगध राज्यावर चन्द्रगुप्ताचे आधिपत्य स्थापन झाले!





त्यावेळी आपला मन्त्री राक्षस याच्या मदतीने महानन्द एका गुप्त भुयारी मार्गाने निघून गेला. परंतु चाणक्याच्या सैनिकांनी तिथूनही त्याला हुडकून काढून त्याचा वध केला! आपल्या राजाच्या मृत्युमुळे स्वामिभक्त राक्षस दुःखमग्न झाला.

मगध राज्यात राजा म्हणून चन्द्रगुप्ताचा राज्याभिषेक झाला. अत्यंत पराक्रमी आणि वीर चन्द्रगुप्त राजा म्हणून लाभल्यामुळे मगधच्या जनतेला परमानंद झाला.





महानन्दाच्या मृत्युमुळे दु:खित झालेल्या मंत्री राक्षसाने चन्द्रगुप्ताचा सूड घेण्याचे एक कारस्थान रचले. विष-प्रयोग करून राजा चन्द्रगुप्ताचा वध करण्यासाठी त्याने एका सुन्दर विष-कन्येला राजवाड्यात पाठवले, परंतु गुप्तचरांच्या मदतीने चाणक्याने ही गोष्ट अगोदरच जाणून घेतली.

राजवाड्यात पोचलेल्या विषकन्येला चाणक्याने तांबडतोब अटक केली. आपल्या गुन्ह्याबद्दल तिने क्षमा मागितली. पण चाणक्याने तिचा वध केला नाही, इतकेच नव्हे तर धूर्तपणे त्याने तिला हाच प्रयोग पर्वतकावर केल्यास मोठे बक्षिस देण्याचे आमिष दाखवले. अटीप्रमाणे पर्वतकाला अर्धे राज्य द्यायला हवे होते, ते वाचवण्या-साठी चाणक्याने ही युक्ति वापरली. धन्य त्या चाणक्याची!





पूर्वयोजनेप्रमाणे विषकन्या पर्वतकाच्या महालात पोचली. आपले रूप-लावण्य आणि संगीत-नृत्यादि कलांचा पूर्ण उपयोग करून तिने पर्वताकाचे मन आकर्षित करून घेतले, अन् संधी साधून दारूण विष मिसळून त्याला मारून टाकले.

(क्रमश:)



# उत्तम दान

पद्मनाभ हा वज्रपुरी गावचा रहिवासी होता. गावात त्याचं एक मोठं किराणा मालाचं दुकान होतं. एकदा तो आपल्या धंद्याच्या कामासाठी दंतपुरला गेला. तिथलं आपलं काम पुरं करून तो बैलगाडीतून आपल्या गावी परतत होता.

गाडीने दंतपुराची हद्द ओलांडल्यावर पद्मनाभला वाटेत एक माणूस दिसला. पद्मनाभला पाहिल्यावर तो माणूस भराभरा त्याच्या गाडीजवळ येऊन विचारू लागला— "महाराज, मी याच रस्त्यावर असणाऱ्या पुरुषोत्तमपुर गावात रहातो. आपण गाडीत जागा देऊन मलाही घेऊन जाल?"

दंतपुरात खरेदी करत असताना एका दुकानात पद्मनाभने या माणसाला पाहिलं होतं, दोघांनीही त्या दुकानात काजू खरी-दले होते. बरंच झालं, या माणसाला गाडीत घेतलं तर बोलत बोलत वेळ तरी बरा जाईल! या विचाराने पद्मनाभने त्याला आपल्या गाडीत चढू दिलं. हा माणूस गाडीत चढला अन् शरभ गाडीवानाने गाडी पुढे हाकली.

बोलता बोलता पद्मनाभला त्या माणसा-विषयी ही माहिती मिळाली. त्याचं नाव होतं रंगराज. तो पुरुषोत्तमपुरचा रहाणारा. तिथे त्याची तीन एकर जमीन होती. शेतीवाडी करून तो आपला संसार चालवी.

येता येता रस्त्यात कोणीही भिकारी दिसला की पद्मनाभ त्याला सुटे पैसे दान देई, पण 'आपल्याजवळ सुटे पैसे नाहीत' अशी सबब सांगून रंगराजने मात्र त्या सर्वांना टाळलं!

हे पाहून पद्मनाभ रंगराजला म्हणाला— "हे पहा रंगराज, मी नेहमी भिकाऱ्यांना काही न काही देत असतो. खरं म्हणजे, वेळ पडली तर आपल्या काही इच्छा

मनीषा रणनवरे

मारूनही आपल्याजवळ असेल त्यातलं काही न काही गरिबांना दान द्यावं. म्हणजेच माणसाचा जन्म सार्थकी लागतो."

इतक्यात गाडीच्या चाकाची खीळ सुटून खाली पडली. ते ओळखून शरभने एकदम गाडी थांबवली, अन् काळजीपूर्वक रस्त्याच्या एका बाजूला त्याने गाडी खेचून नेली. खीळ नीट जागच्या जागी पक्की बसवण्या-साठी एकादा बरासा दगड शोधायला तो जरा दूर निघून गेला.

पद्मनाभ आणि रंगराज गाडीतून उतरून एका झाडाखाली सावलीला उभे राहिले. इतक्यात एक अगदी अस्थिपंजर असा दुबळा म्हातारा तिथे येऊन पोचला. त्याचे डोळे अगदी खोल गेलेले होते. त्याच्या हातात एक काठी होती. चांगले मौल्यवान कपडे घातलेल्या पद्मनाभला पाहून म्हाताऱ्याने दीनतेने विचारले–"बाबा, मी दोन दिवसांचा उपाशी आहे. तुमच्याजवळ काही खायला असलं तर द्या ना!"

"अरे, या रस्त्यात खायला काय रे मिळणार? जवळच इथे पुरुषोत्तमपुर गाव आहे न, तिथे एकाद्या खानावळीत तुला जेवण मिळू शकेल. मी तुला पैसे देतो, ते घेऊन जा."

हे ऐकून रंगराज गाडीपाशी गेला, आपल्या थैलीतली काजूची पोटली घेऊन तो परत झाडापाशी आला. ती पोटली म्हाताऱ्याच्या हाती देत तो म्हणाला–



"आजोबा, यात काजू आहेत. ते खाल्ले की तुमची थोडी भूक भागेल. काजू खा, अन् वर थोडं पाणी प्या."

म्हाताऱ्याचे डोळे पाण्याने भरून आले. तो रंगराजला म्हणाला–"बाबा, मी ऐकलंय की काजू फार महाग असतात. कधी-मधी खाता यावे, म्हणून आपण चांगले पैसे खर्चून इतके पोटलीभर काजू खरीदले असाल. मला नकोत बाबा हे!"

"काही हरकत नाही आजोबा, तुम्ही उपाशी आहात ना? तुमची थोडी तरी भूक भागवल्याचं समाधान मिळेल मला! या गृहस्थांनी आत्ताच थोड्या वेळापूर्वी मला शिकवलंय् की आपल्या इच्छा मारण्यानेच आपल्या जन्माचं सार्थक होतं. असे म्हणत रंगराजने पद्मनाभकडे पाहिलं.

म्हातारा रंगराजला नमस्कार करून म्हणाला–"बाबा, माझे दात देवदयेने अजून शाबूत आहेत. माझ्या आयुष्यात केव्हातरी मी थोडेसे काजू खाल्लेत नक्की, पण एकदम इतके काजू मला कधीच मिळाले नव्हते." असं म्हणून ते पोटलं उघडून आनन्दाने त्यातले काजू खात खात म्हातारा तिथून निघून गेला.

भुकेने व्याकुळ होऊन तिथे आलेल्या म्हाताऱ्याच्या चेहऱ्यावर संतुष्ट भाव पाहून पद्मनाभ काही विचारात गढून गेला. त्याला राहून राहून असं वाटू लागलं की–आपण जो काही दान-धर्म करीत असतो त्या-



पेक्षा रंगराजचं हे दान मोठं आहे. रंगराजने आपली इच्छा मारून एका भुकेल्या जिवाला शांत केलं आहे. पण मी कधी असं दान करू शकलो नाही. कोरडा उपदेश देणं सोपं आहे, पण स्वतः आचरणात आणणं कठीण!—हे सत्यही त्याला उमगलं.

इतका वेळ तो रंगराजला एक सामान्य माणूसच समजत होता. पण आता मात्र त्याला तो एक उत्तम माणूस वाटू लागला! त्याने म्हटले—"रंगराज, मला मोठं आश्चर्य वाटतंय. आपण दोघांनी एकाच दुकानात काजू खरीदला होता."

यावर रंगराज हसून म्हणाला—"माझी बायको गर्भारशी आहे. तिला काजू खायची इच्छा झाली म्हणून आज काजू खरेदी करून घेऊन चाललो होतो घरी, इतकंच. तशी काजू खरीदण्याइतकी माझी ऐपत नाही."

यानंतर रंगराज जवळच्या एका विहीरीवर गेला अन् हातपाय धुवून, पाणी पिऊन परत आला. तोपर्यंत आता गाडीही तयार झाली होती. वाटेत पुरुषोत्तमपुरला उतरून रंगराज आपल्या घरी निघून गेला. घरी पोचताच समोर येऊन त्याची बायको विचारू लागली—"आणलेत काजू माझ्यासाठी?"

रंगराजने नकारसूचक मान हलवली अन् बायकोला सर्व हकीकत सांगितली—"ओहो, असं झालं होय?" असं म्हणून त्याची बायको थैलीतल्या इतर किराणा वस्तु बाहेर काढू लागली, अन् इतक्यात आश्चर्याने म्हणाली—"अरे हे काय! काजूची पोटली तर आहे की या थैलीत!" असं म्हणून तिने पोटली नवऱ्याला दाखवली.

रंगराजलाही यावर मोठं आश्चर्य वाटलं! क्षणभर विचार करत तो गप्पच राहिला अन् मग म्हणाला—"पद्मनाभ फारच चांगला माणूस आहे. त्याने मला विचारलं होतं की मी काजू कशासाठी खरीदले होते ते, अन् मग मी जेव्हा पाणी प्यायला विहिरीकडे गेलो, तेव्हाच त्याने आपले काजू माझ्या थैलीत ठेवले असले पाहिजेत."






त्या रात्री कृष्ण, बलराम व अक्रूर यांनी मोठ्या सुखाने एकत्र बसून जेवण केल्यानंतर ते तिथे झोपण्यासाठी एकाच जागी आडवे झाले. तेव्हा अक्रूर कृष्णाला समजावून सांगू लागला, "वत्सा, तू आपल्या आईच्या पोटी जन्म घेतल्यानंतर हे असलं हीन दर्जाचं जीवन जगत अनेक मोठी कार्यं पार पाडलीस. पण आता हे जीवन पुरे झालं, आता तू आपल्या स्वतःच्या वंशाला यश आणि प्रतिष्ठा दे. तुझे पिता वसुदेव एक महान् व्यक्ति आहेत. तुम्ही दोघेही भाऊ सर्व गोष्टीत अत्यन्त समर्थ असे आहात. असे पराक्रमी दोन दोन पुत्र असूनही वसुदेव मात्र कंसाला भिऊन त्याच्या दरबारात अपमानास्पद जीवन कंठत आहे. कंस तुमच्या पित्याची निन्दा करतो. ती ऐकूनही आमच्यासारखे लोक दुःखाने मान खाली घालून अश्रु गाळण्यापलिकडे काही करू शकत नाहीत. तुझ्या आईच्या—देवकीच्या दुःखाला तर काही सीमाच नाही! तिच्या पोटी जन्मलेल्या सर्व मुलांचा कंसाने वध केला! इतक्या मुलांना जन्म देऊन ती एकाही मुलाला स्तनपान देऊ शकली नाही! कृष्णा, तू इतका सुन्दर आहेस, पण तुझ्या आईला तुझे हे सुन्दर मुखकमल पहायची एकदा तरी संधी मिळाली का? म्हणूनच मला असं वाटतं की आता तिचं मातृत्व सफल करायची जबाबदारी तुझ्यावरच आहे. तुझ्यासारखा मुलगा असूनही ती रात्रंदिवस शोकमग्न रहात असेल तर या



पेक्षा ती वांझ असती तर बरंच झालं असतं की नाही ?"

अक्रूराचे हे बोलणे ऐकून कृष्णाच्या लक्षात आले–की, मथुरा नगरीला जाऊन कंसाचा संहार करून आपले माता-पिता वसुदेव-देवकी यांना सुख देणं हेच आपलं कर्तव्य आहे !

सकाळ झाल्याबरोबर अक्रूर, कृष्ण व बलराम प्रात:कर्मे उरकून रथावर स्वार झाले. रथ हाकत अकुर गोकुळ पार करून मथुरेला जाणाऱ्या रस्त्यापर्यंत पोचला. काही गोपिका रथाच्या मागेमागे काही अंतर आल्या, कृष्णाचे प्रयाण त्यांना आवडले नाही, काही जणींनी याबद्दल अक्रूराची खूप निन्दा केली. काही लोकांनी विचारले–"उद्या एकादा राक्षस येऊन आमच्यावर हल्ला करू लागला तर आमचे रक्षण कोण करील ? आमचे काही गाववाले कृष्णाला जायला अनुमति देत आहेत. वेड तर नाही लागलं त्यांना ?"

थोडे दूर जाईपर्यंत सर्व रथामागे धावले, पण नंतर मात्र रथाचा वेग वाढला व गोपिका मागे पडल्या. तेव्हां एका जागी त्या थांबल्या आणि रथ धुळीच्या लोटात अदृश्य होईपर्यंत एकटक तिकडेच पहात राहिल्या आणि नंतर नाइलाजाने गोकुळात परतल्या.

दुपारपर्यंत प्रवास केल्यावर रथ कालिन्दी किनारी एका कदम्ब वृक्षाखाली थांबवण्यात आला. अक्रूर बलराम व कृष्ण यांना म्हणाला–"मी नदीत स्नान करून, अर्घ्यं देऊन आत्ता परत येतो, तोपर्यंत तुम्ही दोघं रथातच बसून रहा. या अवधीत घोडेही जरा गवत खातील." असे म्हणून अक्रूर नदीच्या पात्रात उतरला–आणि कमरे इतक्या पाण्यात जाऊन त्याने बुडी मारली.

पाण्यात अक्रूराला रसातळ दिसू लागले ! तेथे वासुकी, कर्कोटक इत्यादि नागश्रेष्ठ मुक्त संचार करत होते. अत्यन्त सुंदर पद्धतीने बनवलेल्या रत्नमंडपात सहस्रफणा



असलेला शेष नाग अक्रूराला दिसला. शेषाचा देह स्वच्छ पांढरा आणि कुंडली मारलेल्या अवस्थेत होता. त्याच्या लव-लवत्या जिभांची ओळ विजेच्या तारेसारखी चंचल दिसत होती, त्याच्या दोन्हीं बाजूंना मुसळ, नांगर व तालवृक्ष अंकित केलेले झेण्डे फडफडत होते. शेषनागाच्या त्या कुण्डलीवर श्यामवर्णाचा व कमलनयनांचा कृष्ण पीतवस्त्रे धारण करून बसलेला होता !

अशा रूपात दिसलेल्या कृष्णाची अक्रूराने मंत्रोच्चारणाने आराधना केली व मानसिक रूपानेच निरनिराळ्या पूजासाहित्याने त्याची पूजाही केली.

यानंतर अक्रूर जेव्हा पाण्याबाहेर आला तर त्याला समोर काय अद्‌भुत दिसले ! रथावर बसलेल्या बलराम व कृष्णाच्या शरीरावर त्याने केलेल्या पूजेचे साहित्य सत्यस्वरूपात अक्रूराला दिसून आले ! हे पाहून अक्रूराला फारच आश्चर्य वाटले अन् पुन्हा खात्री करून घेण्यासाठी त्याने पाण्यात बुडी मारली आणि आदिशेष व त्यावर बसलेला कृष्ण यांना पुन्हा एकदा पाहून घेतले.

शेवटी आपले अनुष्ठान समाप्त करून अक्रूर जेव्हा बाहेर आला, तेव्हा कृष्णाने त्याला विचारले–"अक्रूर, बराच उशीर



केलात पाण्याबाहेर यायला ? पाताळात आपल्याला नक्कीच काही तरी अद्‌भुत दृश्य पहायला मिळालेलं दिसतंय् ! तुमच्या चेहऱ्यावरचं अजूनही दिसणारं आश्चर्य पाहून मला तसं वाटतंय !"

"देवा, आपणाजवळ राहण्याचे भाग्य मिळालंय् यापरते अद्‌भुत आणखी काय असणार ? आपण व आपले हे बंधु आत्ता जसे दिसत आहात तसेच अगदी मी आत्ता पाण्यातही पाहिले. आपल्या यथार्थ रूपाचे वर्णन करणे प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाही शक्य होणार नाही ! अशा परिस्थितीत मी बिचारा कोणत्या झाडाचा पाला ! माझ्या-वर असाच वात्सल्य-भाव ठेवून आपण



अनुग्रह करावा हीच इच्छा ! बरं, आता आपल्याला नगरात पोचायला हवं" अक्रूर म्हणाला.

कृष्ण हसून म्हणाला–"आता आम्ही तुमच्या हाती आहोत, आमच्या हाती काय आहे ? तुम्ही कराल तसं मान्य !"

नंतर रथ पुन्हा चालू लागला. शेवटी मध्यकाळच्या सुमारास ते मथुरेला पोचले. कृष्ण अक्रूराला म्हणाला–"आजपर्यंत शहर कसं असतं, हे आम्ही पाहिलं नाही. कंस महाराजांना भेटेपर्यंत काही आमच्या जिवात जीव रहायचा नाही. आम्ही आत्ताच जरा शहराच्या मुख्य रस्त्यांवर हिंडून येतो न ? आम्हाला परवानगी देणार ?"

अक्रूराने कृष्ण-बलराम यांना रथातून खाली उतरवले. अन् म्हटले–"मला वाटतं तुम्हा दोघांचा वसुदेवाकडे जायचा विचार असावा ? पण, असं नका करू बाबांनो, प्रथम कंसाकडे जा. त्याचं दर्शन घेतल्यावाचून वसुदेवाकडे गेलात तर ते महाराज नाराज होतील." असे म्हणून कृष्ण-बलरामांना मथुरेत आणल्याची खबर कंसाला पोचवण्यासाठी अक्रूर मोठ्या वेगाने रथ हाकत निघून गेला.

बन्धनातून मुक्त झालेल्या हत्तींच्या जोडीसारखे कृष्ण व बलराम आता मथुरा नगरीच्या राजपथावरून शहराचे वैचित्र्य मोठ्या आश्चर्याने पहात हिंडत होते. त्यांना नगरात असे फिरताना पाहून नागरीकही त्यांच्याबाबतीत अनेक गोष्टी आपसात बोलू लागले.

थोडे पुढे चालून गेल्यावर त्या भावांना रंगकार नावाचा एक धोबी भेटला. तो अनेक प्रकारच्या वस्त्रांचे एक मोठेसे गाठोडे डोक्यावर घेऊन जात होता. कृष्णाने त्याला हाका मारून म्हटले–"थांब रे बाबा जरासा, आम्ही आत्ता राजाच्या दर्शनाला जात आहोत. राजसभेत प्रवेश करणारांनी चांगल्यापैकी वस्त्रे धारण करायला हवीत ना ? तू फार चांगला माणूस दिसतोस. दे ना आम्हाला यांतली काही चांगली वस्त्रे निवडून !"



कृष्णाचे बोलणे ऐकून धोबी रागावलाच ! तो चिडून म्हणाला–"अरे वा रे वा ! जंगलात जनावरं चरायला नेणाऱ्या असभ्य अन् असंस्कृत गवळ्यांना कंस महाराजांची वस्त्रं हवीत काय नेसायला ? या वस्त्रांबाबत तुम्हाला काय माहिती असणार म्हणा ! अनेक मोठमोठ्या राजांनी कंस महाराजांना भेटी दाखल पाठवलेली वस्त्रं आहेत यात ! मोठे आले वस्त्रं मागणारे ! निरर्थक बडबड बंद करून चालू लागा आपल्या वाटेने !"

धोब्याचे असले उद्धट उत्तर ऐकून कृष्णाला चांगलाच राग आला ! त्याने धोब्यावर तलवारीचा वार करून त्याचे मस्तक धडावेगळे केले ! धोबी तिथेच मरून पडला. त्या धोब्याला अनेक बायका होत्या. त्या सर्वजणी धावत तेथे आल्या अन् समोरचे दृश्य पाहून गाऱ्हाणे सांगायला वेगाने राजाकडे निघून गेल्या !

सुंदर वस्त्रे आणि फुले ल्यायलेले ते दोघे भाऊ राजपथावरून पुढे जाऊ लागले आणि त्यांना एक कुब्जा दिसली. तिच्या हातात सर्वत्र सुगन्ध पसरवत असणारे चन्दन भरलेले एक पात्र होते. कृष्णाने जवळ जाऊन त्या स्त्रीच्या चेहऱ्यावरील बुरखा उचलून तिच्या डोळ्यात आपली दृष्टी स्थिरपणे मिळवून तिला विचारले–"हे



चन्दन तू कुणासाठी घेऊन जात आहेस, सांग बरे ?"

"कंस महाराज स्नान उरकून आत्ता या चन्दनाची वाटच पहात असतील. माझ्यावाचून इतर कोणी उगाळलेलं गन्ध त्यांना चालत नाही. मी स्वतःच रोज हे गन्ध उगाळून नेऊन त्यांच्या अंगाला लावायला हवं ! अरे, तुम्हाला पाहून नादावले मी अन् सर्व बोलत बसले तुमच्याशी ! आता मात्र क्षणभरही थांबून चालणार नाही मला !" भानावर येत कुब्जा म्हणाली.

"आम्ही दुसऱ्या प्रांतातून आलेले मल्ल-योद्धे आहोत. तुमचा राजा, राज्य आणि



धनुष्य उत्सव पहाण्यासाठी या नगरात आलो आहोत. तू स्वतःचं मोठेपण आम्हाला सांगितलंस. पण आम्ही असं नुसतंच कसं खूश व्हावं तुझ्यावर? त्या भांड्यातलं चन्दन दिलंस तर आम्हीही दोघं ते आमच्या अंगाला लावून थाटात जाऊन दरबारात बसू." कृष्ण म्हणाला.

कृष्णाचे हे बोलणे ऐकून कुब्जेला हसू आले. चन्दन पुढे करत ती म्हणाली— "ठीक आहे, घ्या बाबांनो हे चन्दन."

कृष्णाने प्रथम चन्दन बलरामाच्या हाती दिले. त्यातले थोडेसे घेऊन आपल्या अंगाला लावले अन् बाकीचे तेथे जमलेल्या मुलांना देऊन टाकले. यानंतर कृष्णाच्या मनात आले की या कुब्जेच्या पाठीचे कुबड नीट करावे. मनात हा विचार आल्याबरोबर कृष्णाने कुब्जेच्या पायाच्या बोटांवर आपल्या पायांची बोटे दाबून धरली आणि हाताच्या तर्जनीने त्याने तिचा चेहरा वर उचलला, आणि काय आश्चर्य! क्षणभरातच कुब्जेच्या शरीरात फरक घडून आला! तिच्या शरीराचे वाकडेपण निघून गेले अन् बारीक कंबर, सपाट पाठ अन् नीटस उंच बांधा तिला प्राप्त झाला! आपला हा देह पाहून तिला स्वतःलाच फार आश्चर्य वाटले, तिच्या आनन्दाला पारावार राहिला नाही. हसून कृष्णाचा हात आपल्या हातात घेत ती त्याला म्हणाली—"आपण माझ्यावर केवढा मोठा उपकार केला आहे. आपण खरोखर फार महान् आहात. आता माझ्या घरी पायधूळ झाडून मला धन्य करा. असेच पुढे जाऊ म्हणाल तर ते काही जमणार नाही."

"मी आत्ता फार गडबडीत आहे. पुन्हां केव्हातरी नक्की येईन तुझ्या घरी. घरून चाल की तू माझीच स्त्री आहेस." असे म्हणत कृष्णाने मोठ्या युक्तीने हळूच आपला हात तिच्या हातून सोडवून घेतला, आणि बलरामासह तो पुढे निघाला. ते दोघेही आपला उद्देश प्रकट न होऊ देता, साध्या गवळ्यांसारखेच व्यवहार

करत, सावकाश चालत कंसाच्या भवना-जवळ पोचले. तिथे खूपच कोलाहल चालू होता. अनेक राजांकडून येणाऱ्या हत्ती-घोडे-रथ इत्यादि भेट-वस्तु हजारोंच्या संख्येने तेथे पोचत होत्या.

महालाच्या आतील बाजूस शस्त्रागार होते. ते सोने व मूल्यवान रत्नांनी बनवलेले होते. अनेक राजे-महाराजे ते शस्त्रागार पहायला तेथे आले होते. असंख्य सैनिक शस्त्रागाराच्या रक्षणासाठी तैनात केलेले होते.

"महाराज कंसांचं ते सुप्रसिद्ध धनुष्य या शस्त्रागारातच आहे का? केवळ ते पहाण्यासाठीच आम्ही खूप दुरून आलो आहोत. आम्हाला ते पहायला मिळेल?" कृष्ण-बलरामांनी आपल्याला काहीच कळत नसल्याच्या आविर्भावाने विचारले. त्यांचा भोळेपणाची गंमत वाटून तेथील रक्षक त्यांना धनुष्य ठेवलेल्या जागी घेऊन गेले. ते विशाल धनुष्य आरामात पहुडलेल्या तक्षकाच्या शरीरासारखे दिसत होते.

ते पहात कृष्णाने—"मी असं ऐकलं आहे की याला दोरी लावणे देव अथवा दानवां-नाही शक्य होणार नाही. पाहू या बरं खरं काय ते!" असे म्हणत ते धनुष्य अगदी सहजपणे एकाच हाताने उचलले, आणि त्यावर प्रत्यंचा चढवून तिचा टणत्कार केला! त्या टणत्काराचा भयंकर आवाज चारी दिशांना घुमला! तिथे उपस्थित असलेले लोक 'तोंडात बोटे घालून' पहातच राहिले तो चमत्कार! कृष्णाने नंतर ते धनुष्य आपल्या मुठीत घट्ट दाबून कडकन् मोडून टाकले! ज्या धनुष्या-साठी एवढा मोठा उत्सव मांडला होता ते धनुष्य मोडून पडले होते! त्या गडबडीत कृष्ण हळूच तिथून सटकला आणि गर्दीत मिसळून शस्त्रागाराबाहेर आला.

शस्त्रागाराच्या रक्षणासाठी नेमलेले पहारेकरी धावतच कंसाच्या अंत:पुरात पोचले आणि गदगदल्या आवाजात त्यांनी सर्व वृत्त कंसाला कथन केले.





# लांडग्याच्या वेषात

ब्रिटनच्या एका किल्ल्यात एक सामन्त रहात असे. तो चांगला तरूण होता आणि राजाचा प्रिय मित्रही होता. त्याची पत्नी फारच सुन्दर होती अन् दिसायला अगदी सती-साध्वी वाटे ती! तिची वागणू-कही तशीच होती, पण प्रत्यक्षात मात्र तिचे शील चांगले नव्हते. तिचे दुसऱ्याच एका सामन्तावर प्रेम होते अन् त्याच्याशी विवाह करायची संधी ती पहात होती!

त्या स्त्रीला एकदा आपल्या नवऱ्याचे एक रहस्य ध्यानात आले—तो आठवड्यातून तीन दिवस कुठे तरी जात असे अन् ते तीन दिवस संपले की तो परत येई. त्याच्या बायकोला वाटले की यात नक्कीच काहीतरी गुप्त रहस्य असले पाहिजे! अन् ते रहस्य कळले तर तिला त्या गोष्टीचा फायदा घेता आला असता. म्हणूनच तिने एके दिवशी आपल्या पतीला विचारले—"अहो, जरा ऐकता का? तुम्ही तर आठवड्यातून तीन दिवस मला एकटीला सोडून कुठे निघून जाता, मला फार वाईट वाटतं."

"मी काय करू? नाइलाज म्हणूनच मला जावं लागतं ग! जाणूनबूजून तुला सोडून क्षणभर तरी रहायला मला कसं आवडेल बरं?" पती म्हणाला.

"कशाबद्दल हा नाइलाज? मला सांगा तरी काय प्रकार हा!" पत्नीने विचारले. यानंतर पत्नीने बरीच आर्जवं, रडणं-भेकणं, थोडीशी जबरदस्ती वगैरे केल्यावर पतीने 'आपलं रहस्य कोणाला सांगणार नाही' याबद्दल तिच्याकडून शपथ घेववून तिला म्हटले—"आठवड्यातून तीन दिवस मला जबरदस्तीने लांडग्याच्या रूपात जंगलात रहावं लागतं. माझं हे एक दुर्भाग्यच आहे, काय करू?"

फ्रान्समधील लोककथा



"पण हे घडतं कसं ?" पतीने विचारले.

"मी जंगलात प्रवेश करून माझे सर्व कपडे एका ठिकाणी खुणेने ठेवून देतो अन् लगेच मला लांडग्याचं रूप येतं. मग तीन दिवस असे घालवल्यावर मी परत येऊन आपले कपडे घालू लागलो की पुन्हा मला मनुष्य-रूप प्राप्त होतं." पतीने नीट समजावून सांगितले.

"पण हे कपडे तुम्ही ठेवता कुठे?" पत्नीने मोठा गरीबपणाचा आव आणून विचारले.

"ए, ती तर सर्वात गुप्त गोष्ट आहे. ते मात्र कुणालाही सांगणं धोक्याचं आहे, कारण ते कपडे जर मला परत मिळाले नाही तर झालंच, मला जन्मभर लांडग्याच्या रूपातच रहावं लागेल!" पतीने सांगितले.

हे ऐकून तर त्या दुष्ट बायकोला मनातल्या मनात फारच आनन्द झाला. पुन्हा ती कपडे सुरक्षित ठेवण्याची जागा सांगण्याबद्दल तिने फारच हट्ट केला. पतीला वाटले कि पत्नीचे आपल्यावर अपार प्रेम आहे, आणि या विश्वासानेच त्याने आपले हे गुप्तरहस्यही तिला सांगून टाकले– "जंगलाच्या मध्यभागी एक मोडके देऊळ आहे. त्याच्या मागल्या बाजूच्या झाडांच्या मध्यावर असलेल्या खडकात एक पोकळी आहे. त्या पोकळीत मी आपले कपडे लपवून ठेवतो."

पुढल्या वेळीं तिचा पति जेव्हा जंगलात गेला, तेव्हा तिने आपल्या प्रियकराला निरोप पाठवून बोलावून घेतले अन् त्याला आपल्या नवऱ्याचे रहस्य सांगून टाकले. तिच्या सांगण्या वरून तो जंगलात गेला आणि त्याने त्या गुप्त जागेतून तिच्या नवऱ्याचे कपडे उचलून तिला आणून दिले. ते कपडे तिने एका मोठ्या पेटाऱ्यात ठेवले.

लांडग्याच्या वेषातला सामन्त तीन दिवस जंगलात काढल्यानंतर आपले कपडे चढवण्यासाठी नेहमीच्या जागी आला. पहातो तो काय, कपडे गायब! आपल्याच बायकोने आपल्याला फसवले ही गोष्ट त्याने ओळखली, पण तिचा सूड कसा घेणार तो? घराकडे जाण्यासाठी लांडग्याच्या वेषातच तो जंगलाबाहेर पडला असता तर माणसांनी त्याची शिकार केली असती.

इकडे काही आठवडे त्या दुष्ट बाईने खोटेखोटेच आपल्या नवऱ्यासाठी रडून-भेकून घालवले अन् शेवटी आपल्या प्रियकराशीं लग्न करून मोठ्या आनन्दात राहू लागली!

एक दिवस राजा शिकारीसाठी त्या जंगलात गेला. त्याच्याबरोबर आलेल्या कुत्र्यांना या लांडग्याचा वास लागला. आणि ते भुंकत भुंकत लांडग्याच्या मागे लागले. राजा व त्याच्या बरोबरच्या इतर शिकाऱ्यांनीही कुत्र्यांच्या मागोमाग आपले घोडे घातले.

शिकारी कुत्र्यांच्या हाती न लागता लांडगा काही तास पळत राहिला व शेवटी दमला. मरणाला तयार होऊन शेवटी तो एका जागी उभा राहिला! त्याला दिसले कि अनेक कुत्रे व माणसे त्याच्या जवळ जवळ येत आहेत. त्याच्यावर अत्यंत प्रेम असणाऱ्या राजाला त्याने ओळखले अन् दुसऱ्याच क्षणी तो राजाजवळ पोचला. आपला एक पाय उचलून त्याने घोड्याच्या रिकिबीवर ठेवला अन् आपले डोके त्याने राजाच्या पायावर टेकवले.



ही विचित्र गोष्ट पाहून राजाला मोठे आश्चर्य वाटले. तो म्हणाला–"हे काय आश्चर्य! हा लांडग्याला माझ्याकडून अभय हवे आहे असे वाटते. शिकाऱ्यांनो, आपल्या कुत्र्यांना आवरा. आपण या लांडग्याला जंगलातच सोडून देऊ.

राजाने सोडून दिले तरी लांडग्याने राजाची साथ सोडली नाही. राजा आपल्या महालाकडे जाऊ लागला तसा लांडगाही लंगडत लंगडत त्याच्या घोड्याच्या बाजू-बाजूने बरोबर जात राहिला.

लांडग्याला आपल्याबरोबर राजमहाला-पर्यंत आलेला पाहून राजाने आपल्या सेवकांना आज्ञा दिली–"लांडग्याला माझ्या-



कडून रक्षण हवे आहे असे दिसते, मी नक्कीच त्याचे रक्षण करीन. दररोज याला चांगले मांस खायला देऊन त्याची नीट देखदेख करा."

त्या दिवसापासून हा लांडगा राजवाड्याच्याच आवारात राहून एखाद्या कुत्र्यासारखा राजाच्या मागे मागे फिरू लागला. दिवसभर तो राजाबरोबर फिरे अन् रात्री राजाच्याच पलंगाजवळ झोपी जाई.

हळूहळू आपल्या शिकारी कुत्र्यांपेक्षा या लांडग्यावरच राजाचे अधिक प्रेम बसले.

या घटनेनंतर थोड्याच दिवसांनी राज्यकारभाराच्या काही महत्वाच्या कामासाठी राजाने आपल्या सर्व सामन्तांची सभा बोलावण्याची आज्ञा दिली. सभेसाठी आलेल्या सामन्तांतच लांडग्याचे कपडे पळवून नेऊन त्याच्या बायकोशी विवाह करणारा तो सामन्तही होता. त्याला पाहिल्याबरोबर गुरगुरुन लांडग्याने त्याच्यावर झडप घालून त्याला खाली पाडले! आता लांडगा त्याच्या गळ्याचा चावा घेणार, तोच इतर लोकांनी मधे येऊन लांडग्याला त्याच्यापासून खेचून बाजूला केले. परंतु त्याच दिवशी लांडग्याने तीनदा हाच प्रकार केला! ते पाहून राजालाही फार आश्चर्य वाटले, कारण एरव्ही हा लांडगा कधीही, कुणालाही, कसलाही त्रास देत नसे. मग याने त्याच एका सामन्तावर तीनदा हल्ला का बरे केला? या शंकेबरोबरच राजाच्या मनात हेही एक भय घर करून राहिले की हा लांडगा संधी मिळताच त्या सामन्ताला मारून टाकू शकेल अन् त्यामुळे लोक चिडून लांडग्याचा वधही करतील! सामन्ताचा वध काय किंवा लांडग्याचा वध काय–राजाला हे दोन्हीही घडायला नको होते. त्यामुळे सर्व सामन्त तिथून सुखरूप परत जाईपर्यंत लांडग्याला साखळीने बांधून ठेवण्यात आले.

यानंतर काही दिवसांनी राजा पुन्हा जंगलात शिकारीला गेला. लांडगा अर्थात बरोबर होताच. जंगलातल्या विश्रामगृहात राजा विश्रांतीसाठी थांबला. ते विश्रामगृह लांडग्याच्या वेषातल्या सामन्ताचेच होते, 'राजा आपल्या विश्रामगृहात उतरला आहे' ही बातमी सामन्ताच्या पहिल्या पत्नीला कळताच–राजाला प्रसन्न करावे अन् जमल्यास आपला नवा पती असणाऱ्या सामन्तासाठी काही विशेष सवलती मिळविण्याच्या उद्देशाने काही भेटवस्तु व उपहाराची सामग्री घेऊन नोकरांसह ती विश्रामगृहात पोचली.

ती राजासमोर येताच लांडग्याने तिच्यावर झडप घालून तिचा गळा पकडला. आता तो तिच्या गळ्याचा चावा घेणार इतक्यात तिच्या किंकाळ्या ऐकून तेथे हजर असणारे लोक आपल्या तलवारी खेचून लांडग्याला मारायला धावले. राजाने मधे पडून हा सर्व प्रकार थांबवला नसता तर लांडग्याचा वधच झाला असता.

राजा त्या लोकांशी बोलू लागला–"या स्त्रीचा पूर्वीचा पति माझा मित्र आहे. तो कुठे गेला, त्याचे काय झाले वगैरे कोणालाच ठाऊक नाही. हिच्या दुसऱ्या पतीने त्याची ही पत्नी अन् त्याची संपत्ती दोन्ही आपल्या ताब्यात घेतले. कधी कोणाच्या वाटेला न जाणाऱ्या या लांडग्याने या दोघांवरच हल्ला केला. तेव्हा या दोघा पति-पत्नीना पकडून कैदेत ठेवा. नंतर हळूहळू आपोआप सत्य बाहेर पडेल."

थोडे दिवस कारावास भोगल्यानंतर सामन्ताच्या पत्नीने राजाला सर्व हकिगत सांगितली व आपला गुन्हा कबूल केला.

राजाने पेटाऱ्यात ठेवलेले कपडे मागवून घेतले. त्या कपड्यांसह त्याने लांडग्याला एका खोलीत पाठवले. थोड्याच वेळात सामन्त आपल्या मानवी रूपात बाहेर आला.

राजाने सामन्ताची दुष्ट पत्नी आणि तिच्याशी विवाह करणारा सामन्त या दोघांना हद्दपारीची शिक्षा दिली आणि आपल्या मित्राची सर्व संपत्ति त्याला परत देववली. पण आता तो सामन्त आपल्या किल्ल्यात राहू इच्छित नव्हता, म्हणून तो राजाबरोबरच राहू लागला.





# कुऱ्हाडीची करामत

शेकडो वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. देवगिरी राज्यावर विक्रमसिंह नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या दरबारी एक मंत्री होता–युगंधर, आणि एक सेनापति होता–शशिवर्मा. युगंधर महा बुद्धिशाली होता व शशिवर्मा महान् पराक्रमी होता. या दोघांमुळे देवगिरि राज्यावर आक्रमण करायला कोणी धजत नसे. अजेय देवगिरि राज्यात प्रजा सुख-समाधानाने रहात असे.

याच कालात सेनापति शशिवर्म्याला एक दिवस हृदय-विकाराचा झटका आला आणि त्यातच त्याचा अंत झाला. आता राजापुढे मोठी समस्या निर्माण झाली की शशिवर्म्याच्या जागी सेनापति पदावर कोणाची नियुक्ति करावी? शशिवर्म्याच्या तोडीचा सेनापति सहज मिळणे कठिण!

राजा विक्रमसिंहाने मंत्री युगंधराशी चर्चा केली आणि सेनापति-पदासाठी योग्य व्यक्तीची निवड करण्याबाबत राज्यभर दवंडी पिटवली. दवंडी ऐकून युद्ध-विद्येत कुशल असे अनेक तरूण स्पर्धेत भाग घेण्यासाठी राजधानीत येऊन पोचले.

या सर्व तरुणांसाठी घोडेस्वारी, खड्ग-युद्ध, मल्ल-युद्ध, लाठी चालविणे वगैरे विविध स्पर्धा योजण्यात आल्या. शेवटी जवळ जवळ सर्व स्पर्धांमध्ये सारखे गुणी असे दोन युवक निघाले–निशान्त आणि निखिल. या दोघांची शक्ति व सामर्थ्य समान दिसू लागली. दोघांपैकी कोण सरस हे ठरविणे कठिण होऊन बसले. सेनापति म्हणून दोघांतून कोणाची निवड करावी हे राजाला समजेना.

शेवटी राजाने मंत्री युगंधराशी पुनः सल्ला-मसलत केली आणि धनुर्विद्येचे एक प्रात्यक्षिक योजले. दोन वडाच्या झाडांच्या फांद्यांवर टोकाशी दोन छोटे बनावटी पक्षी लावण्यात आले. खाली ठेवलेल्या आरशात त्या पक्ष्यांचे प्रतिबिंब पाहून बाणाने बरोबर पक्षी पाडायचा.

वर्षा दामले



आज्ञा मिळताच निखिलने दोन-तीन क्षणात अगदी सहज रीतीने पक्षी खाली पाडला. पण निशान्तला हे काम करायला अमळ विलम्ब लागला. त्याने आरशांत प्रतिबिंब पाहून योग्य कोन साधण्यासाठी थोडी इकडे-तिकडे हालचाल करून योग्य पवित्रा घेतला.

राजा विक्रमसिंहाने प्रसन्नतापूर्वक युगंधराला सांगितले–"मंत्रीजी, सेनापति-पदासाठी मला निखिलच अधिक योग्य वाटतो. तुम्ही काय म्हणता?"

"क्षमा करावी महाराज! मी आपल्या विचाराशी सहमत होऊ शकत नाही." युगंधराने विनयपूर्वक निवेदन केले.

"महामंत्री, आपण असं का बरं म्हणता? निखिलने आदेश मिळताच दुसऱ्या क्षणी लक्ष्य-भेद केला. निशान्त इकडे-तिकडे पहात राहिला नि थोड्या वेळाने त्याने पक्षी खाली पाडला." राजा विक्रमसिंहाने विचारले.

यावर मंत्री उत्तरला–"महाराज, असं पहा, निशान्तला लक्ष्य-भेद करायला विलंब लागला हे खरं आहे. पण यामुळे त्याची योग्यता कमी होत नाही. लक्ष्य सोडून एक पान ही खाली पडू नये असा विचार करून बाण सोडायला निशान्तला थोडा वेळ लागला. पण त्याने आपल्या योजनेनुसार फक्त पक्षिच खाली पाडला. निखिलच्या बाणाने नुसता पक्षिच नव्हे जर पानं नि झाडाची एक फांदी ही खाली आली.

यावर राजा विक्रमसिंह पुन्हा विचारात पडले.

मंत्री राजाला म्हणाला–"महाराज, आपण परवानगी दिलीत, तर एक आणखी छोटी स्पर्धा ठेवण्याचा माझा विचार आहे. मग आपण निर्णय करू शकाल की बुद्धिबळ नि बाहुबळ यात समान शक्ति असणारा युवक निशान्तच आहे."

विक्रमसिंहाने मंत्र्याची योजना मान्य केली.

युगंधराने ताबडतोब दोन कुन्हाडी आणवल्या. निखिल व निशान्त दोघांच्या हातात एकेक कुन्हाड दिली आणि समोरची दोन वडाची झाडें तोडण्याचे काम त्यांना सांगितले. त्यांना सांगण्यात आलं की जो प्रथम झाड पाडील, त्याची सेनापति-पदावर नियुक्ति करण्यात येईल.

हातात कुन्हाड आल्यावरोबर निखिलने उत्साहाने झाडावर प्रहार करायला सुरुवात केली. पण निशान्तने एकदा कुन्हाड नीट पारखली. कुन्हाडीला धार नाही हे लक्षात येताच एका दगडावर घासून कुन्हाडीला छान धार लावली.

अशा प्रकारे जवळ जवळ दोन तास गेले. तोपर्यंत निखिलने झाड तोडण्याचे काम अर्धे संपविले. निशान्त मात्र अजून धार लावण्यांतच गुंतला होता.

राजा विक्रमसिंह हे सर्व आश्चर्याने पहात होता.

थोडचा वेळाने निशान्तने आपल्या धारदार कुन्हाडीकडे कौतुकाने पाहिले आणि झाड तोडायला सुरुवात केली. तोपर्यंत निखिलचे हात दमून गेले होते. आता त्यांच्यात काही प्राण राहिले नव्हते. कुन्हाडीच्या घावांचा झाडावर काही परिणाम होत असलेला दिसेना.

पण निशान्तने मात्र न थकता जलद गतीने झाड तोडण्याचे काम पूर्ण केले. हे पाहून निखिल आपल्या अर्धवट तोडलेल्या झाडाकडे निराशेने पहात तेथेच पडून राहिला.

राजा विक्रमसिंहाला अत्यंत आनंद झाला आणि त्याने मंत्री युगंधराला आलिंगन दिले.

राजाने तत्काळ निशान्तला सेनापति बनवून त्याच्या सत्कारार्थ एक मोठा समारंभ घडवून आणला. युगंधर व निशान्त या जोडीने राजा विक्रमसिंहाला राज्यकारभारात सर्व प्रकारे साह्य केले.






एका गावात राजेश नावाचा एक कासार रहात असे. गावा बाहेर प्रशस्त जागी त्याने आपली छोटी झोपडी बांधली होती आणि आपल्या कुटुंबासह तो तिथे राही. घर बांधलं होतं ती जमीन व झोपडी शिवाय राजेश जवळ आपली संपत्ति म्हणून गायीचं एक वासरु आणि थोडचा कोंबडचा पण होत्या.

राजेश रोज सकाळी उठून गायीची धार काढी, तिला चारा घालून स्वतः शिळा भात खाई. दुपारचं जेवण घेऊन तो बांगडचा विकण्यासाठी घराबाहेर पडे. संध्याकाळ पर्यंत आसपासच्या गावात बांगडयांचा व्यापार करून घरी परते.

एक दिवशी राजेश एका वडाच्या झाडाजवळ पोचला. तेव्हां दुपारची वेळ होती. जवळच एक विहीर होती. राजेशने आपलं बांगडयांचं गठोडं झाडाखाली ठेवलं आणि लोटा भर पाणी घेऊन आला. पोट भर जेवला आणि जे काही शिल्लक राहिलं ते असा विचार करून सोडून दिलं की एकादं कुत्रं येऊन साफ करून जाईल. मग आपलं बांगडयांचं बंडल खांद्यावर उचलून पुढची वाट धरली.

राजेश जाताच तिथं एक ब्रह्मराक्षसी येऊन टपकली. तिची झाडावरची जुनी झोपडी मोडून पडली होती. म्हणून आपली नवी झोपडी बनवण्यासाठी ती या वडाजवळ आली होती. राजेशने तिथे अन्न ठेवलेलं तिला दिसलं. भूकेने व्याकुळ झालेल्या ब्रह्मराक्षसीने मटामट सारं शिल्लक अन्न खाऊन टाकलं.

ब्रह्मराक्षसीने यापूर्वी केवळ कच्चे मांस नि रक्त यांचाच आस्वाद घेतला होता. आता तिला कळलं की माणसांचा आहार किती स्वादिष्ट असतो. तिच्या मनात



आलं, रोज असलंच भोजन मिळावं नि आपण माणसा सारखं जीवन चालवावं. मग काय, राजेश कासाराची वाट पहात ती तिथंच बसली.

दिवस भराचा व्यापार संपवून राजेश त्याच वाटेने परत आला. वडाच्या झाडाखाली बांगडयांचं बंडल ठेवलं, आणि विहिरीवर जाऊन पाणी पिऊं लागला. तिथं त्याला एका बाईच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. राजेशने मागे वळून पाहिले, तर वडाच्या बुंध्याशी एक बाई रडत असताना दिसली.

"बाई, तू कोण आहेस? रडतेस का?" राजेशने विचारले.

"बाबा, मी खूप दूरची राहणारी आहे. नवरा कुणास ठाऊक कुठे निघून गेला. मला पोटभर अन्न मिळत नाही, दुर्भाग्य माझं! काय करू. बसलीय रडत!" बाईने रडत रडत उत्तर दिलं.

"बिचारी, तुझ्यावर मोठच संकट आलेलं दिसतंय! माझ्या घरी चल, मला आपल्या कामात मदत कर. मी तुला पगार नाही देऊ शकणार, पोट भर अन्न मात्र देईन. तुझ्या नवऱ्याचा पत्ता लागला तर तू आपल्या घरी जा." राजेशने समजूत घातली.

ब्रह्मराक्षसीला तेच पाहिजे होतं. तत्काळ म्हणाली—"बाबा, मला जे काम द्याल ते मी करीन, माझी सगळ्याला तयारी आहे. पण मी करू शकणार नाही असं काही काम मला सांगितलं तर मी क्षण भर सुद्धा तुमच्या घरात राहणार नाही. समजलं?"

राजेशने ब्रह्मराक्षसीची अट मान्य केली. राजेश बाईच्या रूपातील त्या ब्रह्मराक्षसीला घरी घेऊन आला. राजेशच्या पत्नीने आपल्या नवऱ्याच्या तोंडून त्या बाईची सर्व हकीकत ऐकली. बायकोने विचारले—"बाई, तुझं नाव काय?"

"माझं नाव आहे दानवी." ब्रह्मराक्षसीने चटकन उत्तर दिलं.

दुसऱ्या दिवसापासून दानवी राजेशच्या घरी काम करू लागली. ती सकाळी उठून



सर्व घर झाडी. सडा घाली. राजेशने गायीची धार काढल्यावर ती गाय-वासराला चरायला घेऊन जाई. दुपारी परत आल्यावर राजेशच्या बायकोला घरातील सर्व कामात मदत करी.

एक दिवशी रात्री राजेश खूप उशीरा घरी आला आणि दरवाज्या वर थाप मारली. त्यावेळी घरातील सर्व जण रात्रीचे जेवण संपवून झोपले होते. थंडीचे दिवस असल्यामुळे सर्वांनी रजया पांघरल्या होत्या. राजेशची बायको खाटे वर झोपली होती नि दानवी खाली जमिनीवर. ऊबदार रजईतून बाहेर येऊन दरवाजा उघडण्याची राजेशच्या बायकोची इच्छा नव्हती. म्हणून ती दानवीला म्हणाली—'हे बघ, ते आलेत असं वाटतं दानवी, दरवाजा उघडशील?'

दानवीने एक सुस्कारा टाकला. चटईवर पडल्या पडल्या हात लांबवून तिने दरवाजाची कडी काढली. राजेशच्या बायकोने हा प्रकार पाहिला. ती घाबरली, तरी पण मोठ्या धीराने तिने आपल्याला सावरले. दुसऱ्या दिवशी सकाळी तिने नवऱ्याला सर्व हकीगत ऐकवली—"आहो, ही मानवी नाहीं, कोणी आपलं नाव 'दानवी' उगाच कसे ठेवील? ही मनुष्य नाही, नक्की राक्षस असली पाहिजे."



प्रथम राजेशचा आपल्या बायकोच्या बोलण्यावर विश्वासच बसेना, तरी पण त्याच्या मनात शंका जरूर आली. कारण तो रात्री जेव्हा घरात आला, तेव्हां दानवी तर चटईवर झोपलेली होती. दरवाजाची कडी काढून पुन: चटईवर येऊन झोपण्या इतका मधे वेळ नव्हता. दानवी मनुष्य असो वा नसो, बायको खूप घाबरली आहे हे जाणून राजेशने तिला घराबाहेर काढण्याचा निश्चय केला. पण विनाकारण घराबाहेर काढणं ही ठीक नव्हतं. दानवीने प्रथमच सांगितलेली अट त्याला आठवली—"मी जे काम करू शकणार नाही, ते मला करायला सांगितलं तर मी क्षणभर घरात

राहणार नाहीं. थेट चालू लागेन!" म्हणून राजेशने तिला घरांतून हाकलण्यासाठी एक युक्ति योजली.

तो दानवीला म्हणाला—"हे बघ दानवी, आपल्या घराच्या चारी बाजूला भरपूर मोकळी जागा आहे. या जागेत आपण खूप झाडं लावू शकतो. पण अगोदर चारी बाजूला एक भिंत बांधली पाहिजे. तू हे काम करू शकशील?"

दानवीने मुळिच नकार दिला नाही. तिने हे काम आनंदाने स्वीकारले. स्वत: जमीन खणून माती काढली नि विटा बनविल्या. घराच्या चारी बाजूला तिने एक छान भिंत बांधून काढली. मग तिने काही नवीन झाडे लावली आणि एक सुंदर बाग बनविली.

राजेशला कळून चुकले की दानवी मानव नाही. गांवातील सर्वांना ही गोष्ट समजली. दानवीच्या जाळ्यांतून कसे मुक्त व्हावे याचा राजेश विचार करू लागला. तसं पाहिलं तर दानवी कुणाला त्रास देत नव्हती. तरी पण अशा व्यक्तीला घरात ठेवणं धोक्याचं होतं. गावातल्या लोकांनी त्याच्यावर दडपण आणायला सुरुवात केली—"एक तर तू दानवीला घराबाहेर काढ. नाही तर स्वत: गाव सोडून चालता हो." राजेशच्या घराच्या आजू-बाजूला नेहमी बघ्यांची गर्दी दिसत असे.

एक दिवशी राजेशच्या कुटुंबातील सर्व जण घराच्या आवारात गप्पा मारीत बसले होते. त्यावेळी एका उंदीराचा पाठलाग करीत एक मांजरी तिथे आली. उंदराने झटकन तेथील एका बिळात प्रवेश केला.

राजेशच्या मुलाने दानवीची विनवणी केली—"दानवी आक्का, त्या उंदराला पकडून आणशील कां?"

'तुला काय वाटलं मी उंदराला पकडू शकणार नाही?' असे विचारीत सर्वांच्या समक्ष दानवीने उंदरासारखे लहान रूप धारण केले नि बिळांत घुसली. योग्य वेळ पाहून राजेशने एक घमेलभर माती आणून बीळ बुजवून टाकलं. तेव्हा पासून दानवी पुन्हा कुणाला कुठे दिसली नाही.



## नैसर्गिक आश्चर्ये :




अमेरिकेतील अरिझोना भागात असलेल्या 'ग्रँड कानियन' दऱ्या जगांतील प्रख्यात विशाल दऱ्या आहेत. ४ ते १३ मैल रुंद व २१७ मैलांच्या लांबीत पसरलेल्या या दऱ्या ७००० फुट खोल आहेत. २२५ मिलिअन वर्षांपूर्वी कोलोराडो नदीच्या प्रवाहामुळे या दऱ्या निर्माण झाल्या. वातावरणांतील बदलामुळे या दऱ्यांना विचित्र रूप प्राप्त झाले आहे.

सहारा वाळवंटांतील वाळूची खोली काही ठिकाणी काही इंच, तर काही ठिकाणी जवळ जवळ ४०० फुट इतकी आहे.






### दिसणारं रक्त

अंटार्क्टिकाच्या बर्फाळ प्रदेशांतील माशांचे रक्त आपण डोळ्यांनी पाहू शकतो. रक्तधारी प्राण्यामधील शेकडा ९० टक्के प्राण्यांच्या रक्तात हेमोग्लोबिन असते. ते शरीराच्या सर्व भागात प्राणवायुचा पुरवठा करते. या माशांच्या रक्तात ते हेमोग्लोबिन नसते.



# चांदोबातील नवलाई

## वजनदार समुद्रपक्षी

समुद्र आणि समुद्रतटवर्ती भागात निवास करणारे २५ फुट लांब पंखांचे आणि ९० पौंड इतके वजनदार असे पक्षी जवळजवळ पाच मिलियन वर्षांपूर्वीच नाहीसे झाले. या जातीच्या एका पक्षाचे अवशेष नुकतेच अमरिकेत सापडले आहेत. सध्याच्या काळात असलेले अल्बट्रॉस नावाच्या विशालकाय समुद्रपक्षांचे वजन केवळ २० पौण्डच असते.

ALBATROSS

## पतंगाबरोबर उडणारी मुलगी

कॅलिफोर्नियाची रहिवासी डीन ड्रॉ या नावाची एक मुलगी उद्यानात पतंग उडवत असताना पतंगाबरोबर अचानक आकाशात उडाली! उडाल्यावर ती एकदम खाली पडली, पण तिला कोणत्याही प्रकारची जखम झाली नाही. गोष्ट अशी घडली की डीन ड्रॉच्या पतंगाचा धागा बऱ्याच खालच्या पातळीवरून उडणाऱ्या एका विमानाला अडकला बन् मुलगी वर उडाली! तिच्या हाताची पकड सैल झाल्यामुळे ती खाली कोसळली!

## हिरा पाठवणारा अज्ञात दाता

वॉशिंग्टनच्या संग्रहालयाला दररोज असंख्य पत्रे येतात. असेच एक सामान्य प्रकारचे पार्सल उघडून पाहता त्यांतून एक लाल हिरा निघाला! असे म्हटले जाते की संपूर्ण जगात अशा प्रकारचे लाल हिरे फक्त चारच आहेत. पण ते कुठे कुणाकडे आहेत याबद्दल कुणाला काहीही माहिती नाही. सर्वांना पहाता येण्यासारखा हा एकाच हिरा आहे. त्याची किंमत कित्येक लाख इतकी आहे!

## महिला पोलीस-ठाणे

अलिगडच्या एका पोलीस ठाण्यात चपराश्यापासून इन्स्पेक्टर पर्यंत सर्व स्थानांवर केवळ स्त्रियांचीच नियुक्ति केली गेली आहे!

# हित-अहित

एकदा सुधर्म नावाच्या राजाकडे त्याचे शिपाई एका तरुणाला घेऊन आले. तो एक परदेशी युवक होता. वाटसरूंना लुटून एकाची हत्या केल्याचा आरोप त्याच्यावर होता, म्हणूनच शिपाई त्याला कैद करून घेऊन आले होते. राजाने त्याला देहान्ताची शिक्षा सुनावली.

शिपाई त्याला तिथून खेचून घेऊन जाऊ लागले. तेव्हा तो काहीतरी विचित्र बडबडू लागला. त्याची भाषा राजाला कळत नव्हती, म्हणून त्याने मन्त्र्याला कैद्याच्या बोलण्याचा अर्थ विचारला.

मन्त्री म्हणाला–"हा युवक आपल्या न्यायप्रियतेची तारीफ करत आहे."

"ओहो, असं होय? मग त्याची मृत्युची शिक्षा रद्द करून त्याला एक वर्ष कारावासाची शिक्षा द्या." राजा हसून म्हणाला.

तेव्हां तावडतोब तिथला एक सभासद उठून म्हणाला–"महाराज, हा आपली प्रशंसा नव्हता करीत, उलट आपली निन्दाच करीत होता. मला त्याची भाषा येते."

सभासदाचे हे बोलणे ऐकून राजा क्षणभर विचारात पडला. नंतर म्हणाला–"मन्त्री खोटे बोलला, पण त्या खोटेपणाने एकाचा जीव वाचवण्याचे काम केले! पण आत्ता तू जे खरं बोललास ते सत्य मात्र एकाचा जीव घ्यायला कारण होईल. एकाद्याचे अहित करणाऱ्या सत्यापेक्षा हित करणारे असत्यही श्रेयस्कर नव्हे का?" असे म्हणून शिपायांकडे वळून राजा म्हणाला–"याला तुरुंगात टाका. तेवढीच शिक्षा पुरे त्याला."

राजाचा हा निर्णय ऐकून सभासदांनी हर्षनाद केला.





# दूरचे डोंगर

महीधर माणिक्यपुरचा जमीनदार होता. तो मोठा दक्ष तर होताच, दिसायला ही देखणा होता. खूप मोठी जमीनदारी होती त्याची. एकदा महीधरने सामान्य शेतकऱ्याचा वेष धारण केला आणि आपल्या दिवाणाला बरोबर घेऊन जमीनदारीच्या गावांची पाहणी करण्यासाठी निघाला. त्याला आपल्या प्रजेची सुख-दु:खं जाणायची इच्छा होती.

एका गावाच्या जवळ एक माणूस फाशीची दोरी झाडावर बांधत असलेला त्यांनी पाहिला. जमीनदार त्याच्या जवळ गेला नि हसत विचारले–"का बाबा, झाडावर ही फासाची दोरी कशासाठी बांधत आहेस? स्वत:साठी की दुसऱ्या कोणासाठी?"

फास बांधणाऱ्या माणसाने सांगितले–"या जगांत माझ्याहून अधिक अभागी कोणी असेल तर ना तो फासावर लटकून मरायला तयार होणार! हा फास मी स्वत: साठीच बांधत आहे!"

"बरं, पण हे तरी सांग की तुझ्यावर असं काय मोठं संकट येऊन पडलय?" जमीनदाराने विचारले.

"संकट? काय सांगू मित्रा? माझं नाव सीतापति. माझं लहानपणापासून जलजाक्षी नावाच्या एका मुलीवर प्रेम आहे. तिच्याशी लग्न करण्याची माझी इच्छा आहे. पण ती तर माझा तिरस्कार करते. तिला माणिक्यपुरच्या जमीनदाराशी लग्न करायचंय! म्हणून मी निराश होऊन स्वत:ला फासावर चढवण्यास तयार झालो आहे." त्या तरुणाने आपल्यावरील संकटाबाबत सांगितले.

जमीनदाराने यावर थोडा विचार केला, आणि म्हणाला–"मित्रा, जमीनदार माझा मित्र आहे. त्याला समजाऊन सांगून कसे

का होईना जलजाक्षी तुझ्याशी लग्न करील अशी व्यवस्था मी करतो. तू जा, काळजी करू नकोस." असं सांगून सीतापतीला त्याने घरी रवाना केले.

यानंतर दिवाणाकडे पाहून जमीनदार म्हणाला–"चला, आपण जलजाक्षीच्या गांवी जाऊन तिच्या वडिलांशी बोलणे करू या." दोघे ही लगेच जलजाक्षीच्या गावाकडे निघाले.

थोडयाच वेळात दोघे जण त्या गावी पोचले. एका रस्त्याच्या वळणावर एका घरासमोर बरीच गर्दी जमलेली त्यांना दिसली. गर्दीतल्या एका माणसाला बाजूला बोलवून जमीनदाराने विचारले–"इथे कसली बरं एवढी गर्दी जमली आहे?"

जमावांतल्या एका माणसाने सांगितले–"या घराच्या मालकाच्या मुलीची जमीनदाराशी लग्न करण्याची इच्छा आहे. बिचाऱ्या मुलीचा बाप तिला सांगतो आहे–लग्न काय घेऊन बसलीस, नुसतं जमीनदाराचं दर्शन ही मी तुला घडवून देऊं शकणार नाही. यावर त्या मुलीला फार दुःख झाले नि ती बिहीरीत उडी टाकायला निघाली. वेळेवरच सर्वांनी मिळून तिला वाचविले!"

हे सर्व समजताच दिवाणाच्या मनात या मुलीबद्दल अधिक सहानुभूति निर्माण झाली. तो जमीनदाराला म्हणाला–"ही बिचारी मुलगी तुमच्यासाठी प्राणार्पण करायला निघाली! आपण तिच्याशी लग्न का करीत नाही?"



जमीनदार घाबरून म्हणाला–"बाबा, मला एक बायको आहे ती पुरेशी आहे. कृपा करून मला असला सल्ला न द्याल तर बरें. काही असा उपाय सांगा ज्यामुळे जलजाक्षी सीतापति बरोबर लग्नाला तयार होईल."

यावर जमीनदार व दिवाण तेथून निघाले. रस्त्यात दोघांनी परस्पर विचार करून एक युक्ति शोधून काढली.

सुमारे एक आठवडयानंतर दोन दूत जलजाक्षीच्या घरी पोचले आणि म्हणाले–"शिकार करायला गेले असता जमीनदारांच्या पायाला जबर जखम झाली आहे. वैद्यांनी चांगली परीक्षा करून सांगितलं की जरा ही हालचाल न करता पूर्ण विश्रांति घेतली तरच जमीनदारांच्या पायाची जखम भरून येईल. अन्यथा कठीण आहे. म्हणून आम्ही त्यांना एकाद्या अत्यन्त विशाल व अनुकूल अशा घरात ठेवू इच्छितो. आम्हाला वाटलं त्यांना हे घर सर्वस्वी सोयीस्कर होईल. आपल्याला यात फार त्रास होण्याची शक्यता आहे का?"

हे ऐकून जलाजाक्षीचा आनंद गगनात मावेना. ती म्हणाली–"लवकर घेऊन या जमीनदारांना! जखमेमुळे किती त्रस्त असतील बिचारे!"

थोडयाच वेळात चार सेवकांसह जमीनदार घोडयावर स्वार होऊन तेथे येऊन पोचला. डोळयांत अश्रु आणून जलजाक्षी म्हणाली–"आपली ही स्थिति पाहून मला





अत्यन्त वेदना होत आहेत. बरीच मोठी जखम झालेली दिसतीय!"

त्या दिवशी रात्रभर जलजाक्षीने जमीनदाराची सेवा केली. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी जमीनदाराच्या नोकरांनी दिवाणाकडून मोठ-मोठ्या पात्रात उंची दारू आणली. जलजाक्षीने त्याला विचारले–"या भांड्यातून काय आले आहे?"

जमीनदाराने सांगितलं –"मनाला आल्हाद देणारं मद्य यांत आहे. मी जर मद्य-सेवन न केलं तर मला रात्रभर जागरण करावे लागेल. झोपच येणार नाही मला! समजले?"

जलजाक्षीने असं काही तोंड फिरविलं की तिच्या मनात घृणा उत्पन्न झाली, लगबगीने ती घराच्या परसाकडे निघून गेली.

संध्याकाळी उंची वस्त्रे धारण केलेली तीन माणसे आली. जमीनदारासह फासे खेळत खेळत त्यांनी सर्व रात्र घालविली. या खेळात जमीनदाराने आपल्या जवळचे सर्व पैसे तर गमवलेच, वर कर्जबाजारी होऊन बसला!

जमीनदाराकडून जिंकलेले पैसे घेऊन ते तिघे घराबाहेर पडले. तेव्हा दिवाण व्यथित अंतःकरणाने म्हणाला–"हुजूर, आपण अशीच बेहद्द दारू पीत राहिलात तर आपली तब्येत आणखी ढासळणार, आणि फांसे खेळून सर्व धन गमावणार! मला हे मुळिच पसंत नाही. असंच चालू राहिलं तर आपली तब्येत नि जमीनदारी किती दिवस टिकून राहील?"

"मला त्याची चिंता नाही. टिकेल तेवढी टिकेल! माझ्यासारख्या जमीनदाराला सर्वांत महत्त्वाची गोष्ट कोणती असेल तर मनोरंजन! हे बघ, तुला सांगायला विसरलो, फांसे खेळता खेळता माझ्या जवळची सर्व रक्कम संपली नि मी कर्ज-बाजारी बनलो आहे. मला आता पैसे पाहिजेत. भैरव डोंगराच्या पलीकडील चार गावे पूर्वीच आपण विकलेली आहेत. आता आणखी दहा गावं विकून पैसे आण गड्या!" जमीनदाराने फर्मावले.

यानंतर छातीवर हाथ ठेऊन जोरजोराने कण्हत जमीनदार एकदम आडवा पडला. धावत जाऊन नोकर वैद्याला घेऊन आले.

वैद्याने जमीनदाराला एक काढा पाजला आणि समजाऊन सांगितलं–"हुजूर, आपली प्रकृति साफ बिघडली आहे. एक महिना भर औषधोपचार केला पाहिजे. तोपर्यंत आपण आपला महाल सोडून बाहेर जाऊ शकणार नाही. चांगलीच काळजी घेणे आवश्यक आहे."

जमीनदाराला त्याच्या वाड्याकडे घेऊन जाण्याची व्यवस्था झाली. परसातील विहिरीजवळ जलजाक्षी उभी होती. तिच्याजवळ जाऊन जमीनदार म्हणाला–"जलजाक्षी, तुझं सौंदर्य नि तू केलेली सेवा पाहून मी प्रभावित झालो आहे. आपल्या महालात गेल्यावर पुढील सर्व व्यवस्था करून मी तुला निरोप पाठवीन. माझ्याशी लग्न करायला तुझी बहुतेक काही हरकत नसावी."

जलजाक्षीने विनयपूर्वक निवेदन केले–"महाराज, आपण मला क्षमा करावी. एक वेळ आपणाशी लग्न करायची माझी इच्छा होती हे खरं आहे. पण आता आपणाविषयी माझ्या मनात केवळ घृणा भरलेली आहे. स्त्रीला एखाद्या आदर्श पतीची इच्छा असते, अनेक प्रकारच्या दुर्व्यसनात कडबडलेला नवरा काय कामाचा? आपण एक मोठे जमीनदार आहात अवश्य, पण आता मला असं वाटतय सीतापतीच मला अधिक योग्य पति होईल. जो अनुभव आला त्यावरून मला समजून चुकलं–दुरून डोंगर साजरे!"

आपली युक्ति यशस्वी झाल्याचे पाहून जमीनदार मनांतल्या मनात अत्यन्त प्रसन्न झाला, आणि आपल्या वाड्याकडे निघाला. या घटनेनंतर थोड्याच दिवसात सीतापतीचे जलजाक्षीशी लग्न झाले. ते दोघे सुखाने राहू लागले.





# ओझे वहाण्याचे बक्षिस

वेदवतीचे विख्यात रहिवासी श्यामशास्त्री एक विख्यात वेदपंडित होते. धर्म, जात, वर्ण इत्यादि भेदभावांमुळे जगात सर्वत्र नेहमी खून, मारामाऱ्या व हत्या होत असतात, ते पाहून श्यामशास्त्रींना फार दुःख होई. यावर काही उपाय करता आला तर पहावा म्हणून शास्त्रीबुवांनी इतर धर्म संबंधी अनेक प्रमुख ग्रंथ मिळवून त्यांचा सखोल अभ्यास केला, आणि त्यांना एका अद्‌भुत गोष्टीचे ज्ञान झाले!

ते असे की—जगातील कुठलाही धर्म हिंसेचा उपदेश देत नाही. सर्वच धर्म संपूर्ण मानव जातीत समानता मानून जगाच्या कल्याणाचीच अपेक्षा करतात!

या आधारे श्यामशास्त्रींनी ठरवले कि हे सत्य व्याख्यानांद्वारे जनते समोर मांडायचे! श्रोत्यांच्या शंकांचे निरसन त्यांच्या त्यांच्या धार्मिक ग्रंथातील उदाहरणांद्वारे करता आले पाहिजे-असे ठरवून त्याने आपला कार्यक्रम सुरू केला. हा कार्यक्रम पद्धतशीर अमलात आणता यावा म्हणून श्यामशास्त्रींनी विभिन्न धर्मासंबंधींचे ग्रंथ एका लाकडी पेटीत नीट रचले आणि ती पेटी ठिकठिकाणी वाहून नेण्यासाठी वीरदास नावाच्या एका मजूराची नेमणूक करून तो देशाटन करायला निघाला.

सुरुवातीला शास्त्रीबुवांच्या व्याख्यानांकडे कोणी फारसे लक्ष दिले नाही. परंतु कोणीही धर्मासंबंधी वा इतर कोणती शंका विचारली की ते लगेच तो तो धर्मग्रंथ काढून आपल्या व्याख्यानातील त्या भागासंबंधीचे उदाहरण दाखवून देऊन त्या शंकेचे निरसन करीत. श्यामशास्त्रींच्या या नव्या पद्धतीचा हळूहळू जनतेवर प्रभाव पडू लागला. अनेक सभांतून शास्त्रीबुवांनी सुरू केलेल्या या कार्याचा गौरव करून लोक त्यांना धन किंवा अन्य वस्तूंच्या रूपाने इनाम देऊ लागले.

अशा प्रकारे एक वर्ष निघून गेले. एकदा एका जमीनदाराने श्यामशास्त्रींना एक लाख रुपयांचे इनाम दिले, आणि या घटनेनंतर एकाच महिन्याने त्या राज्याच्या राजाने दोन लाख रुपये देऊन त्यांचा भव्य सत्कार केला!

अशा प्रकारे श्यामाशास्त्रींना केवळ आर्थिक लाभच झाला असे नव्हे तर त्यांचे नावही सर्वतोमुखी झाले. परंतु श्यामाशास्त्रींच्या पुस्तकांची पेटी वहाणारा वीरदास मात्र दिवसेंदिवस दुर्बळ होत चालला होता! त्याच्या आजाराबद्दल श्यामशास्त्रींना काहीच माहिती नव्हती, म्हणून त्यांनी त्याला एका मोफत वैद्यशाळेत दाखल केले. तेथे वैद्यांनी परीक्षा करून सांगितले की वीरदासच्या तब्येतीत शारीरिक दृष्टीने काहीच दोष नाही!

शास्त्रीबुवांना या गोष्टीचे फारच आश्चर्य वाटले, व त्यांनी वीरदासला विचारले—"वीरदास, अरे खरं खरं सांग, काय बिघडलं तुझं?"

वीरदास मनातलं सांगायला बराच वेळ टाळाटाळ करत राहिला, पण पुन्हा पुन्हा आग्रह केल्यावर तो म्हणाला—"महाराज, मी आपल्या साऱ्या धार्मिक ग्रन्थांचा भार वहातो, परंतु यश आणि संपत्ति फक्त आपल्याच वाट्याला येते. आपल्या प्राप्तीशी तुलना करता मला काय मिळतं?"



श्यामशास्त्री म्हणाले—"वीरदास तू ग्रंथ भरलेली पेटी गाडीत ठेवतोस आणि गाडीतून व्यासपीठावर नेऊन ठेवतोस. या हिशोबाने पाहिले तर हा भार वाहण्याचे काम तू दिवसाकाठी दोन तासांपेक्षा जास्त वेळ करीत नाहीस. बरोबर आहे?"

"ते बरोबर आहे, पण आपण ज्या पद्धतीने प्रचार करीत आहात त्याकरता ओझं वहाण्याचं काम मी करतो त्यामुळेच आपणाला कीर्ति अन् धन मिळते की नाही?" वीरदासने विचारले.

"होय, होय! तूच रोज दोन तास ओझं वहातोस, आणि ओझं अधिक वाटेल तेव्हां तू डोक्यावरून ते ओझं खाली उतरवून ठेऊ शकतोस. परंतु मी मात्र ते ओझं माझ्या डोक्याच्या आतील मेन्दूत सतत दिवसभर वागवतो. आता तूच न्याय कर." श्यामशास्त्रींनी विचारले.

श्यामशास्त्रींना जेव्हा कोणी काही प्रश्न विचारतात तेव्हा ते कसे ताबडतोब एकादा ग्रंथ उघडून, त्यात कोणत्या पानावर कोणता मजकूर आहे हे कसे बरोबर सांगू शकतात, हे वीरदासला चांगलेच माहीत होते. त्याची आठवण होऊन तो म्हणाला—"महाराज, मला माझी चूक कळून आली आहे. ओझे वहाण्याच्या कामात मी एका मजुराची एका मेधावी व्यक्तीशी तुलना केली आहे. मला क्षमा करा."

परंतु श्यामशास्त्री एवढ्यावर गप्प बसले नाहीत. आपल्या मिळकतीतला काही अधिक भाग त्यांनी वीरदासला दिलाच, आणि शिवाय सर्व धर्मांच्या समन्वयाचा उपदेश करण्याच्या आपल्या कामाबरोबरच वीरदासच्या मदतीचाही आवर्जून उल्लेख करू लागले.

आणखी काय हवे? वीरदासचे मानसिक दुःख अदृश्य झाले! यानंतर जेव्हा जेव्हा तो आपल्या डोक्यावरचे ओझे खाली उतरवी, तेव्हा तेव्हा मोठ्या सहानुभूतीने म्हणे—"माझ्या बिचाऱ्या मालकांना मात्र अशी संधि कधीच मिळत नाही!"






[१]

[विनोद धबधबा पार करून गेला. 'सोन्यांची दरी' राज्यात एक मांत्रिक आला आणि त्याने एका अस्वलाचे मनुष्यात रूपांतर करून दाखवले. त्याने राजाला दाखवून दिले कि—आपण त्या सोन्याच्या मूर्तीचे खऱ्या स्त्रीत रूपांतर करू शकू. यासाठी त्याने एक अट घातली की राजा, मंत्री आणि महाज्ञानी या सर्वांनी एक आठवडा उपास करावा! पुढे वाचा...]

दुसऱ्या दिवशी सकाळीच राजाने आपले मन्त्री व महाज्ञानी यांना बोलवून घेऊन म्हटले—"तुम्ही सर्वांनी ही माझ्याबरोबरच एक आठवडा उपास करावा—या गोष्टीला मी परवानगी देत आहे." याबरोबरच 'इथून पुढे एक आठवडाभर यापैकी कोणीही राजवाडा सोडून बाहेर जाऊ नये' अशी आज्ञाही दिली!

उपासाचा एक दिवस संपता संपताच सर्वजण भुकेने हैराण झाले. तरीही सर्वांनी आपल्या चेहऱ्यावर गांभीर्य कायम ठेवले.

मान्त्रिक मात्र राजवाड्याच्या भटारखान्यात राजासाठी रोज बनवल्या जाणाऱ्या पदार्थांवर ताव मारू लागला. त्याने खाऊन उरलेले पदार्थ त्याचा शिष्य सफाचट करून टाकी! तिसऱ्या दिवसापर्यंत राजा अशक्तपणामुळे ढिला पडला, चौथ्या



दिवशी तर तो चक्क कण्हू लागला! त्यामुळे एक घोटभर इतकाच फळांचा रस सेवन करायची परवानगी मान्त्रिकाने मोठ्या उदारपणे त्याला दिली!

अप्सरेशी लग्न झाल्यानंतर कसे सुखोपभोग अन् भाग्य प्राप्त होईल याची रसभरित वर्णने मान्त्रिक मधून मधून राजासमोर करी आणि बिचारा राजा ते ऐकून खुषीने हळूहळू हसे! त्याच्या डोळ्यातून आनंदाश्रु झरत! आपल्या या 'सोन्याची दरी' राज्यात कुठेतरी सोन्याचा गुप्त खजिना आहे ही गोष्ट राजाला चांगलीच ठाऊक होती. त्यामुळे सुवर्णप्रतिमेत प्राणप्रतिष्ठा झाल्यावर तिच्याशी आपले लग्न होईल व ती आपल्याला त्या खजिन्याचे रहस्य सांगेल या आशेने मोठ्या उत्साहाने तो आपले हे उपासाचे दिवस व्यतीत करत राहिला.

शेवटी कसाबसा उपासाचा तो आठवडा संपला. आठव्या दिवशी भल्या पहाटेच राजाच्या अंगाला लोणी वगैरे मर्दन करून, स्नान घालून त्याच्या अंगावर मूल्यवान वस्त्रे चढवली गेली. नंतर निरनिराळे अलंकार घालून त्याला छान सजवले गेले.

मान्त्रिकाने मंत्री आणि सर्व महाज्ञानी यांना बोलावून म्हटले–"आता मला महाराजांना प्रतिमेपलिकडील गुहेत घेऊन जायचे आहे. ते आपल्या उपासाची समाप्ति तेथेच करतील. एक खास गोष्ट तुम्हाला सांगतो, नीट ऐकून ठेवा: मी आता महाराजांवर मायाशक्तीचा प्रयोग करणार आहे. या काळात कोणीही त्यांच्याजवळ जाण्याचा प्रयत्न केल्यास त्या व्यक्तीचे आयुष्य कमी होईल.

थोडयाच वेळात महामंत्री आणि महाज्ञानी आप-आपल्या घराकडे धावले. इकडे राजाच्या अंगात उठून उभे रहाण्याचीही ताकत नव्हती. त्याला खाटेवर निजवून सेवकांनी उचलून त्या मूर्तीजवळ नेले.

तेथे पोचल्यावर हसत हसत मान्त्रिक म्हणाला–"या अप्सरेला सोन्याच्या खजिन्याबद्दल माहिती आहे. महाराजांशी हिचा विवाह करायला आता एकच दिवस बाकी उरला आहे."

मान्त्रिकाच्या तोंडचे हे शब्द ऐकून राजा आपली सर्व शक्ति एकवटून उठून बसला आणि मान्त्रिकाचा हात धरून उभा राहिला. नंतर तो मूर्तीच्या मागे असलेल्या गुहेकडे हळूहळू चालू लागला.

राजाच्या अंगरक्षकांनाही मान्त्रिकाने त्या डोंगराच्या पायथ्याशीच वाट पहात थांबण्याची आज्ञा दिली होती.

"मला इतकी भूक लागली आहे की असं वाटतं ही सुवर्णमूर्ती मी गिळून टाकावी. पण मला हिच्याशी लग्न करायचं आहे न!" राजा मान्त्रिकाला म्हणाला.

राजा व मान्त्रिक गुहेत प्रवेश करायच्या वेळीच राजाला जेवणात रोज लागणारे निरनिराळ्या प्रकारचे पदार्थ घेऊन राजसेवक तेथे येऊन पोहोचले. मान्त्रिकाच्या शिष्याच्या आज्ञेवरून ते सेवक ते पदार्थ निरनिराळ्या थाळ्यांतून व्यवस्थित ठेऊन तेथून निघून गेले. थाळ्यांत वाढून ठेवलेले ते पदार्थ पाहून राजाला फारच आनन्द झाला! त्याच्या चेहऱ्यावर तेज दिसू लागले–"वा, वा! आता मी हे सर्व खाऊ शकतो ना?" राजाने आनन्दाने ओरडून विचारले.

"महाराज, थोडक्यासाठी गडबड करू नका. आता पूजेचा एक खास कार्यक्रम व्हायचा आहे. इकडे पहा प्रभु, समोरच्या





भिंतीत जे भुयार आहे ते दिसतंय आपल्याला? आपण आता गुडघ्यावर रांगत त्यातून पलिकडे जा आणि नंतर मी सांगेन तसतसे करा. काम फारच सोपे आहे! त्यानंतर आपण आपल्याला वाटले ते पदार्थ खाऊ शकता. त्यानंतर....."

मान्त्रिक पुढे काही बोलणार इतक्यात राजा म्हणाला–"अप्सरेशी माझा विवाह होईल! असेच ना?"

"हां, हां प्रभु, असंच! आता आपण आपली वस्त्रे उतरवून त्या भोकात प्रवेश करा." मान्त्रिक म्हणाला.

"मला वस्त्रे का उतरवावी लागतील?" राजाने आश्चर्याने विचारले.

"महाप्रभु, हा ही पूजेचाच एक भाग आहे. आता लवकरच आपलं नशीब उजळणार आहे ही गोष्ट विसरू नका. असं भाग्य मिळण्यासाठी मी वस्त्रंच काय पण आपलं कातडंही उतरून द्यायला तयार होईन." मान्त्रिक म्हणाला.

नाइलाजाने राजाने मान्त्रिकाचे हे ही म्हणणे मानले. मान्त्रिक अन् त्याच्या शिष्याने राजाचा रत्नजडित कुडता, जवाहिरे जडवलेला साफा, जरीच्या किनारीचे धोतर वगैरे कपडे एकएक करून काढून घेतले. नंतर कंठहार, अंगठ्या वगैरे आभूषणे ही उतरवली.

यानंतर दोघांनी मिळून राजाला त्या भोकात ढकलले. राजा आपल्याशीच पुटपुटला–"अरे, डोळे फाडफाडून पाहूनही इथे काहीच दिसत नाही! काय गडद अंधार आहे इथे!"

"थोड्याच वेळात आपणाला त्याची सवय होईल." राजाला आणखी पुढे ढकलत मान्त्रिक म्हणाला.

मान्त्रिकाने तेवढ्यात आपली नकली दाढी काढून फेकून दिली, राजाची वस्त्रे आणि आभूषणे चढवली आणि त्याने विकट हास्य केले. आणि म्हणाला–"आता पूजेचा कार्यक्रम समाप्त झाला, समजलं?"



"मला भूक लागलीय. जेवणाच्या थाळ्या इकडे सरकवून दे." राजा ओरडून म्हणाला.

मान्त्रिकाने भोकात आत डोकवून पाहिले. त्याला पाहून राजाने आश्चर्याने विचारले–"तू कोण आहेस?"

"मी चण्डमार्तण्ड महाप्रभु आहे." मान्त्रिक उतरला.

"काहीतरी बोलू नकोस. तू राजा असशील तर मग मी कोण आहे?" राजाने विचारले.

"कदाचित मान्त्रिक असशील!" वेषातला मान्त्रिक म्हणाला.

मला तर मंत्र तंत्र काहीच येत नाही. येत असते तर या गोल दगडांचे लाडू बनवून टाकले असते मी!" राजा म्हणाला.

"कदाचित बिसरला असशील. राजवाड्यातल्या खजिन्याची किल्ली कुठे ठेवली आहे हे मी अजिबात विसरून गेलोय, तसंच तूही मंत्र तंत्र विसरला असशील. सांग, ती किल्ली कुठे आहे? ती जागा सांगितलीस तर बक्षिस म्हणून मी तुझं भोजन आणि प्रकाश यांची व्यवस्था करीन." मान्त्रिकाने राजाला आमिष दाखवले.

"मी मुळीच सांगणार नाही. मला तुझी फसवाफसवी कळून चुकली आहे. नीच माणसा, मला अशा तऱ्हेने दुर्बल बनवून तू फसवत आहेस!" राजा चिडून ओरडला.



आता मान्त्रिकाच्या शिष्याने जेवणाची एक एक थाळी मान्त्रिकापुढे धरली आणि मान्त्रिक ते भराभर खाऊ लागला.

"माझं जेवण मला देणार नाहीस?" राजाने ओरडून विचारले.

मान्त्रिकाने एक लाडू राजाच्या हातावर ठेवत म्हटले–"जोपर्यंत तू खजिन्याच्या किल्लीची जागा सांगणार नाहीस, तोपर्यंत तुला रोज फक्त एक लाडूच मिळेल खायला."

आणि मी ते सांगितल्यावर तो ही न देता तू मला उपाशी मारून टाकशील असंच ना? काय मूर्ख मी! तुझ्यावर विश्वासलो!" असे पुटपुटत राजा लाडू खाऊ लागला.

• • •



विचित्र कलिंगड फुटून गेले अन् त्या नगरातली जनता चिन्तेत बुडाली. ते नगर सोडून मुनि व विनोद एका अरण्यप्रदेशात पोचले.

"पहा समोर, ते क्षितिजावर निळे पहाड दिसत आहेत ना, ते ओलांडून पलीकडे जाणं दुष्कर आहे. परंतु तुझ्या राज्यातल्या सुवर्णप्रतिमेचं रहस्य जाणण्यासाठी आत्तापर्यंत तू इतका दूरचा जो प्रवास केलास तो सफल करण्यासाठी तुला ते पहाड ओलांडणं तर भाग आहे." मुनि विनोदला म्हणाला.

"अदृश्य होण्याचा मन्त्र मला ठाऊक आहे, मुनिवर! ज्ञानभूमीच्या राजाने मला त्या मन्त्राचा उपदेश दिलेला आहे." विनोद म्हणाला.

"पण ती विद्या केवळ मानवी विश्वापर्यंतच मर्यादित आहे. तुला आत ज्या प्रदेशात पोचायचे आहे ते मानवी-विश्व नव्हे! तिथले लोक तसे मानवांसारखेच दिसतात, पण वास्तवतः ती सामान्य माणसे नव्हेत." मुनिने सांगितले.

"मग मी चालत तिथवर जाईन." विनोद दृढनिश्चयाने म्हणाला.

"तेही शक्य नाही. कारण तू कितीही दिवस चालत राहिलास तरी हे जंगल सुद्धा चालून संपणार नाही. त्या लोकांना भेटायचं असेल तर तुला गुप्त-मार्गानेच जावे लागेल." मुनिने समजावले.

"हे महात्मा, अशा स्थितीत मला मदत करणारे आपल्यावाचून दुसरे कोणीच नाही. माझ्यावर कृपा करून आपणच मला तिथे पोचवा ना!" मुनिला प्रणाम करत विनोदने विनवले.

"ठीक आहे." असे म्हणून हसत हसत मुनि उठले आणि विनोदचा हात धरून त्या पहाडाकडे निघाले.

आपली शुद्ध जाते आहे असे विनोदला क्षणभर वाटले. दुसऱ्याच क्षणी त्याला असे भासले की आपण पक्ष्याच्या पिसासारखे हलके होऊन हवेत तरंगत जात आहोत.

या स्थितीत किती वेळ तो मुनिबरोबर जात राहिला हे विनोदला स्वत:ला काहीच कळले नाही! त्याला एकदम असे भासले की आपल्या पाठीवर कोणी हात ठेवला आहे. आणि त्याने डोळे उघडले! छोटयाशा डोंगरावरच्या एका खडकावर आपण मुनि-समवेत बसलेलो आहोत असे एकदम त्याच्या लक्षात आले! पहाट होत होती, पूर्व दिशेला असलेल्या आकाशात पसरलेले मेघखण्ड समुद्रफेसासारखे दिसत असल्याने आकाशाला अपूर्व शोभा आली होती.

डोंगरपायथ्याशी असलेल्या मैदानात काही झाडे दिसत होती. त्यांची खोडे ताडांच्या खोडांसारखी दिसत होती, पण त्यांच्या फांद्या किंवा पाने वगैरे अजिबात काही दिसत नव्हते! कारण त्यांचे शेंडे ढगातून आत घुसून आकाशात पोचले होते!

"इतकी उंच झाडे तर मी आजपर्यंत कुठेच पाहिली नाहींत." विनोदने आश्चर्य व्यक्त केले.

"ही झाडे कायम अशी उंच नसतात. आकाशात रहाणाऱ्या देवकुमारांना मधुर फळे तोडता यावीत म्हणून केवळ थोड्या वेळापुरतीच ती अशी उंच होतात." मुनिने नवीनच माहिती दिली.

नंतर पुन्हां विनोदने मैदानाकडे पाहिले, तोपर्यंत ती झाडे आपल्या सर्वसामान्य उंचीची झाली होती! ते पाहून विनोद म्हणाला—"वा:! हे तर एक अजब विश्वच दिसते आहे!"

"आत्ता आपण मानवलोकाच्या सीमेवर आहोत. उत्तम प्रकारचे जीवन व्यतीत करणारे जीवच इथे रहातात. लवकरच त्यांच्यातल्या काही माणसांना तू भेटू शकशील." मुनि म्हणाला.

याच वेळी एक बारीकसा आवाज ऐकून विनोदने मागे वळून पाहिले. तेथील दृश्य पाहून त्याला आश्चर्य वाटले आणि भयही! एकाद्या पुतळ्यासारखा तो तिथेच उभा राहिला.

(क्रमश:)



# योग्य निर्णय

दृढनिश्चयी विक्रमादित्य झाडापाशी परत आला. झाडावरून त्याने प्रेत उतरवून घेतले व ते खांद्यावर टाकून नेहमीप्रमाणे मौन धारण करून स्मशानाकडे चालू लागला. तेव्हा प्रेतात वास करणाऱ्या वेताळाने विचारले—"राजा, आपलं उद्दिष्ट पुरं करण्यासाठी ज्या दृढविश्वासाने अशा मध्यरात्री तू या भयानक स्मशानात कष्ट करीत आहेस, ते पाहून मला तर आश्चर्य वाटत आहे. कोणतंही कार्य मन लावून केल्यास सफल होते ही गोष्ट सत्य तर खरीच, पण काही माणसं भित्रेपणा आणि मानसिक दुर्बलतेमुळे आपल्या कामात यशस्वी होऊ शकत नाहीत. माझ्या या म्हणण्याच्या पुष्टयर्थ मी तुला शरच्चंदिका नगरचा राजा 'विक्रमसिंह याची गोष्ट सांगतो. आपले कष्ट विसरण्यासाठी ती ऐक.



वेताळ गोष्ट सांगू लागला–

अश्वपुरीची युवराज्ञी नन्दिनी वर्णनातीत सुन्दर होती. तिच्याशी विवाह करायला अनेक राजकुमार लालचावले होते. परंतु नन्दिनीची तर विजयपुरीच्या युवराज वसन्तसेनशी विवाह करण्याची इच्छा होती. याचे कारण म्हणजे वसन्तसेन केवळ दिसायला सुन्दर होता इतकेच नव्हे तर एक महान वीरही होता. नन्दिनीने आपल्या मनची गोष्ट आपला पिता कीर्तीकान्त याला सांगितली. आपल्या मुलीचा हा विचार ऐकून राजा दुविधेत पडला, कारण अनेक राजकुमार नन्दिनीशी विवाहाची इच्छा बाळगून होते! अशा स्थितीत सर्वांची उपेक्षा करून विजयपुरीसारख्या छोट्याशा राज्याशी संबन्ध जोडणं म्हणजे इतर राजांशी शत्रुत्व पत्करण्यासारखे होते. त्यामुळे नन्दिनीचे स्वयंवर करणेच योग्य होईल असा निर्णय त्याने घेतला.

त्याच काळात एक दिवस वन-विहाराला जाण्यासाठी नन्दिनी रथात चढली. तिच्या सख्या मात्र अजून चढायच्या होत्या, इतक्यात जवळच्या गजशाळेतून हत्तींचा चित्कार ऐकू येऊन रथाचे घोडे बिचकले अन् नन्दिनीला घेऊन एका दाट जंगलाकडे उधळले!

त्या जंगलात प्रताप नावाचा एक डाकू रहात असे. त्याने हे दृश्य पाहून आपला घोडा वळवून रथाजवळ नेला आणि मोठ्या चपळाईने त्याने नन्दिनीला रथातून खाली घेतले!

आपले रक्षण करणाऱ्या त्या डाकूजवळ नन्दिनीने कृतज्ञता व्यक्त केली. आणि त्याला विचारले–"तू कोण आहेस? या दाट अरण्यात तू का रहातोस?"

डाकू उत्तरला–"हे सुन्दरी, मी एक डाकू आहे. माझं नाव प्रताप. तुझे सौन्दर्य पाहून माझे डोळे दिपून गेले आहेत. तुझी हरकत नसेल तर मी तुझ्याशी विवाह करू इच्छितो. विवाहानंतर मी हा लूटमारीचा धन्दा सोडून चांगला मार्ग आक्रमीन.

डाकूची इच्छा जाणून नन्दिनीला आश्चर्य वाटले. ती म्हणाली–"मी अश्वपुरीची युवराज्ञी नन्दिनी. माझी तुझ्याशी विवाह करायची इच्छा नाही. पाहिजे तर तू माझ्या अंगावरचे हे सर्व दागिने घे, मी मोठ्या आनन्दाने ते तुला देईन. ते घेऊन तू आपल्या वाटेने निघून जावेस हे बरे."

तिचे उत्तर ऐकून डाकू प्रताप मोठ्या विनयाने म्हणाला–"युवराज्ञी, मी आपल्याला सुरक्षिततेने राजधानीत पोचवतो. चला."

प्रतापचे उत्तर ऐकून नन्दिनी अत्यंत प्रसन्न झाली. अन् त्याच्याबरोबर निघाली. ते थोडे पुढे गेले असतील इतक्यात धरणी कंपित होईल अशी कुणाच्याशा पावलांची चाहूल लागली. डाकू घाबरून पळून गेला.

थोड्याच वेळात लंबकर्ण नावाचा राक्षस नन्दिनीजवळ येऊन पोचला आणि म्हणाला–"वा, वा! काय अद्भुत सौंदर्य तुझं! माझ्यासारख्या राक्षसाला सुद्धा वेडं केलं या सौन्दर्याने."

राक्षसाचे हे बोलणे ऐकून जराही विचलित न होता नन्दिनी म्हणाली–"मी अश्वपुरीची राजकन्या आहे. दुर्भाग्याने मी या दाट जंगलात अडकले आहे."

"युवराज्ञी, तुझं दुर्भाग्य हेच माझं भाग्य! मला तुझ्याशी लग्न करायचंय. तू माझं हे विक्राळ रूप पाहून घाबरू नकोस.





माझ्या कामरूपी शक्तीने हवे ते रूप मी धारण करू शकतो. माझ्याशी लग्न केलंस तर ही आसपासची सर्व राज्यं जिंकून मी तुला महाराणी बनवीन!" असे बोलतच तो एका सुन्दर युवकाच्या रूपात तिच्यापुढे उभा राहिला.

"राक्षसा, या क्षणी तू मला मारून खाऊन टाकलंस तरी चालेल, पण मी तुझ्याशी लग्न नाही करू शकणार." नन्दिनी म्हणाली.

यावर मोठा दीन चेहरा करून राक्षस म्हणाला–"तू माझ्याशी लग्न नाही केलंस तरी चालेल, पण तुझ्यासारख्या सुन्दर स्त्रीचा मी वध नाही करणार."

नन्दिनी तिथून थोडी पुढे गेली तोच गोवर्धन नावाचा एक माणूस एका लहानश्या झोपडीसमोर ध्यानमग्न बसलेला तिला दिसला. नन्दिनीने विचार केला की त्याच्याच आश्रयाला जावे म्हणजे तो आपल्याला राजधानीत पोचवेल.

थोड्या वेळाने गोवर्धनने डोळे उघडून नन्दिनीकडे पाहिले. तिचे अलौकिक सौंदर्य पाहून तो आश्चर्यचकित झाला! त्याने नन्दिनीला विचारले–"हे सुन्दरी, कोण आहेस तू?"

नन्दिनीने त्याला आपली सर्व रामकहाणी ऐकवली आणि आपणाला राजधानीत पोचवून देण्याची विनन्ति केली.

"युवराज्ञी, मी अवनिक राज्याचा राजा गोवर्धन आहे. जीवनाबाबत विरक्ति आल्यामुळे मी संन्यास ग्रहण केला. परंतु, तुला पाहून मात्र माझ्या मनात पुन्हा जीवनाबद्दल आसक्ति उत्पन्न झाली आहे. तू मान्यता दिलीस तर तुझ्याशी विवाह करून पुन्हा राज्य-भार सभाळायची माझी इच्छा आहे."

"स्वामीजी, मला क्षमा करावी! मी आपली इच्छा पूर्ण करू शकणार नाही. नाइलाजच झाला तर मी संन्यासिनी बनेन, पण आपणाशी विवाह कदापि नाही करू शकणार!" नन्दिनी उत्तरली.



"क्षमा कर युवराज्ञी, तू आज इथेच विश्राम कर. उद्या सकाळीच आपण तुझ्या नगराकडे जायला निघू." गोवर्धन म्हणाला.

इतक्यात तेथे घोड्याच्या टापांचा आवाज ऐकू आला. मूल्यवान भरजरी वस्त्रे धारण केलेला एक युवक घोड्यावरून तेथे येऊन पोचला. घोड्यावरून त्याने गोवर्धनला प्रणाम केला आणि म्हटले–"स्वामीजी, मी शरच्चन्द्रिक राजा विक्रमसिंह! शिकार खेळता खेळता मी दमून गेलो. अन् तहान लागल्यामुळे मी इथे आलो. मला प्यायला पाणी मिळेल?"

याच वेळी विक्रमसिंहाची दृष्टि नन्दिनीवर गेली. त्याने आश्चर्याने विचारले–"अश्वपुरीची राजकन्या नन्दिनी तू?"

नन्दिनीने होकारात्मक मान हलवली विक्रमसिंह प्रसन्न होऊन म्हणाला–"माझे अहोभाग्य की मला तुझं इथं दर्शन झालं! तू इथे कशी?"

नन्दिनीने त्याला आपली हकिकत सविस्तर सांगितली. विक्रमसिंह यावर म्हणाला–"तुला तुझ्या राजधानीत पोचवायची जबाबदारी माझी!" असे म्हणत त्याने गोवर्धनच्या हातातून पाणी घेऊन प्यायले आणि तो म्हणाला-"स्वामीजी, राजकन्येला मी सुरक्षित तिच्या राजधानीत पोचवीन." नंतर नन्दिनीला घोड्यावर बसवून तो तिला प्रथम आपल्या राजधानीत घेऊन गेला.

तिथे पोचल्यावर तो नन्दिनीला एका विशेष दालनात घेऊन गेला. त्या दालनात





नन्दिनीचे पूर्ण आकारातले एक चित्र होते. ते पाहून नन्दिनीला मोठे आश्चर्य वाटले.

ते ओळखून विक्रमसिंह नन्दिनीला म्हणाला–"नन्दिनी, तुझ्याशी विवाह करण्याबद्दल मी कित्ती दिवस स्वप्न पहात होतो. तुझ्या वडिलांना मी यासंबंधी पत्रही लिहिलं होतं. पण तू जर नकार दिलास तर मी तुझ्या पित्याला युद्धात पराजित करून तुझ्याशी विवाह करीन."

नन्दिनी यावर म्हणाली–"महाराज, कृपा करून विवाहाच्या बाबतीत आपण माझ्यावर जबरदस्ती करू नका. मी विजयपुरीच्या युवराज वसंतसेनला मनाने वरले आहे."

या उत्तराने क्रोधित होऊन विक्रमसिंह म्हणाला–"नन्दिनी, मी तुला सोडणार नाही. राक्षस-विवाह करीन."

हे उत्तर ऐकून नन्दिनीने विकट हास्य केलं.

ते पाहून विक्रमसिंहाने आश्चर्याने विचारले–"तू अशी का हसते आहेस?"

"त्याच्याशी तुमचा काहीही संबंध नाही. आपणाला माझ्याशी जबरदस्तीनेच विवाह करायचा असेल तर माझं एक काम करा. जंगलात मला भेटलेल्या डाकू प्रतापला, लम्बकर्ण नावाच्या राक्षसाला आणि त्या संन्यास धारण केलेल्या गोवर्धनला प्रथम इथे बोलवून घ्या. नंतर डाकू प्रताप आणि राक्षसाचा सत्कार करून, त्या गोवर्धनला कडक शिक्षा करा." नन्दिनीने आपली अट सांगून टाकली.

क्षण दोन क्षण मौन राहून नंतर विक्रमसिंह म्हणाला–"नन्दिनी, मला क्षमा कर. तुला मी आत्ताच्या आत्ता आपल्या राज्यात पाठवण्याची व्यवस्था करतो."

नंदिनीला अमूल्य भेटवस्तु देऊन थोडयाच वेळाने विक्रमसिंहाने तिला अश्वपुरीला पाठवून दिले.

वेताळाने एवढी गोष्ट सांगून म्हटले–"राजा, विवाह करण्यापूर्वी डाकू अन् राक्षसाचा सत्कार करण्याची आणि गोवर्धनला शिक्षा देण्याची अट नन्दिनीने विक्रमसिंहाला का सुनावली? ज्या मुलीची विक्रमसिंह मनापासून कामना करीत होता, ती हाती आली असताही त्याने तिला सोडून का दिले? याचे कारण विक्रमसिंहाचा भित्रेपणा किंवा त्याची मानसिक कमजोरी तर नव्हे? अन् खरं पाहता नन्दिनीला विकट हास्य करण्याचे काय कारण? या सर्व प्रश्नांची उत्तरे माहीत असूनही तू दिली नाहीस तर तुझ्या मस्तकाची छकले छकले होऊन पडतील.

विक्रमादित्य यावर उत्तरला–"नन्दिनीच्या हास्याचे एक कारण खास कारण आहे. तिने वसंतसेन नावाच्या युवराजाशी विवाह करण्याचा मानस डाकू, राक्षस अन् संन्याशाजवळ जेव्हा केला, तेव्हा त्या तिघांपैकी कोणीही तिच्यावर बळजबरी करायचा प्रयत्न केला नाही, उलट या प्रत्येकाने तिची क्षमाच मागितली. पण एका राज्याच्या राजाने-विक्रमसिंहाने-तिच्याशी जबरदस्तीने राक्षस–विवाह करण्याची धमकी दिली. याच गोष्टीचा विचार करून नन्दिनीने विकट हास्य केले! या हास्याद्वारे तिने असे प्रकट केले की एक डाकू, राक्षस आणि संन्यासी यांच्याही पेक्षा राजा विक्रमसिंह नीच अन् दुष्ट आहे! तिचा हा आशय ओळखूनच विक्रमसिंहाने आपला विचार बदलला. त्यामुळे विक्रमसिंहाच्या मनात नीतिनियमांवर असलेली श्रद्धा आणि विश्वास प्रकट होतो, त्याचा भित्रेपणा किंवा मानसिक दौर्बल्य नव्हे!

डाकू आणि राक्षस यांचा सत्कार करण्याबद्दल तिने अशाकरता सांगितले कि त्या दोघांनीही आदराने तिला राजधानीस जाण्याची परवानगी दिली. पण संन्याशाला शिक्षा अशासाठी सुचवली की त्याने नन्दिनीला एका अपरिचित राजाच्या हवाली केले. आणि त्यामुळेच नन्दिनीवर आणखीच संकट कोसळले."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच प्रेतातील वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन झाडावर जाऊन लटकू लागला.

(कल्पित)












# दिवसाढवळ्या दगाबाजी

जमीनदार वीरभद्र गजपती याच्याजवळ एकदा एक भिल्ल तरुण आला आणि त्याच्या हातात काही पाळे-मुळे-काष्टौषधि इ० देऊन म्हणाला–"हुजूर, या वनस्पति केवळ विन्ध्य पर्वतातच सापडतात. त्यांचा काढा करून प्यायला तर शरीरातल्या सर्व आधिव्याधि नाहिशा होतात."

जमीनदाराने आपल्या दिवाणाला बोलवून त्या भिल्ल तरुणाला शंभर मुद्रा देण्याची आज्ञा केली.

परंतु दिवाणाने जमीनदाराला सल्ला दिला–"इतकं मोठं इनाम देण्यापूर्वी आपल्या वैद्यमहाराजांना बोलवून या वनस्पतींची परीक्षा तरी करवावी."

जमीनदाराने वैद्य धर्मदास याला बोलवून ते काम सांगितले. वैद्याने वनस्पतींची परीक्षा करून सांगितले–"या वनस्पतींचा काही उपयोग असला तरी तो तुमच्यासाठी नक्कीच नाही."

जमीनदार चिडून म्हणाला–"उपयोग असला तरी माझ्यासाठी नाही, मग काय त्या भिल्लासाठी आहे ?"

हसून धर्मदास म्हणाला–"बरोबर ओळखलंत महाराज ! हा भिल्ल जर जंगलात इकडे तिकडे सर्वत्र मिळणाऱ्या वनस्पति देऊन शंभर मुद्रा मिळवणार असेल तर त्या वनस्पतींचा खरा उपयोग आपणाला की भिल्लाला ?"

जरा विचित्र पद्धतीनेच, पण खरी गोष्ट प्रकट करणाऱ्या वैद्याची जमीनदार तोंड भरभरून स्तुति करू लागला. अन् त्या गडबडीत संधी साधून भिल्ल मात्र पळून गेला.



महाकाव्य कथा :

# मुद्राराक्षस ३

मगध राज्याचे शासक नंद यांनी चाणक्याचा अपमान केला. चंद्रगुप्ताने चाणक्याच्या मदतीने नन्दांचा पराभव करून मगध राज्य ताब्यात घेतले. आणि चाणक्य चन्द्रगुप्ताचा मंत्री बनला. युद्धात सैनिक-सहाय्य देणाऱ्या पर्वतकाचा चाणक्याने मोठ्या युक्तीने वध केला.



नंदांचा विश्वासू मंत्री राक्षस नंदांच्या पराभवानंतर आपल्या परिवाराला आपला मित्र व नगराचा प्रमुख जव्हेरी चन्दनदास याच्या आश्रयाला ठेवून पाटलीपुत्र सोडून निघून गेला.





चाणक्याच्या कारस्थानाला बळी पडलेल्या पर्वतकाला मलयकेतु नावाचा मुलगा होता. मंत्री राक्षसाने सरळ या मलयकेतुकडे जाऊन त्याच्याशी मैत्रीचा संबंध स्थापित केला.



नन्द वंशाचा समूळ नाश करणाऱ्या चंद्रगुप्त व चाणक्य या जोडगोळीचा सूड घेण्याचा राक्षसाने निश्चय केला होता. हे कार्य तडीला नेण्यासाठी राक्षस आजूबाजूच्या राजांना आपल्या-कडे वळवून घेण्याच्या प्रयत्नाला लागला.

राक्षसाच्या योजनांची वातमी चाण-क्याने आपल्या गुप्त हेरांकडून मिळवली. राक्षसाची बुद्धि व राजभक्ति चाणक्य उत्तम प्रकारे जाणून होता. त्यामुळे चाणक्याने ओळखले की या राक्षसालाच आपल्या पक्षात ओढून न घेता आले तर राज्यात शान्ति व सुव्यवस्था राखणं केवळ अशक्य आहे. तेव्हा राक्षसाला आपणाकडे वळवण्यासाठी चाणक्याने एक योजना बनवली.





चाणक्याने चन्दनदास सराफाला बोलवून आणून म्हटले की–"तू राज-द्रोह केला आहेस." यावर चन्दन-दासाने हा राजद्रोहाचा गुन्हा नाकबूल केला. चाणक्याने त्याला विचारले–"तू राक्षसाच्या कुटुम्बाला आपल्या घरात आसरा देऊन राजद्रोह नाही तर काय केलंस ?"

"माझ्या मित्राच्या बायकोपोरांची संकट कालांतील विनन्ति मी कशी बरं टाळू ?" चन्दनदास उत्तरला. मना-तल्या मनात चन्दनदासाच्या या गुणाची तारीफ करीत, उघडपणे मात्र चाणक्य म्हणाला-"यालाच मी राजद्रोह म्हणतो आणि तुला याबद्दल कारावासाची शिक्षा मी सुनावत आहे." असे म्हणून त्याने राजसेवकांना चन्दनदासाला कैद करण्याचा हुकुम दिला.





एक दिवस चाणक्याने चन्द्रगुप्ताला म्हटले! "राजा, काहीही करून मलय-केतु व राक्षस यांची मैत्री तोडून आपणाला राक्षसाला आपल्या बाजूला वळवायला हवे. यासाठी आपण दोघं एक नाटक करू. आपण लोकांच्यात अशी अफवा पसरवून द्यायची की आपणा दोघात काही वाकडेपणा आलेला आहे."

चन्द्रगुप्ताने या योजनेला आपली संमति दिली आणि दोघांनी मिळून एक योजना बनवली. त्याप्रमाणे वसंत-ऋतुच्या आगमनाप्रीत्यर्थ साऱ्या नगरात मोठा उत्सव साजरा करण्याबद्दल चन्द्रगुप्ताने दवंडी पिटवली.





यासाठी नगरद्वारावर तोरण बांधले जात असताना रागाने दाणदाण पाय आपटत चाणक्य तिथे पोचून ओरडला– "हे सारं बन्द करा आत्ताच्या आत्ता! नगरविगर काही सजवायचं नाही, उत्सवही नाही करायचा आत्ता! चालू लागा सर्वजण इथून! माझी आज्ञा आहे ही!" त्याचे हे वागणे पाहून सर्वांना फारच आश्चर्य वाटले.

जनतेने ही बातमी चन्द्रगुप्तापर्यंत पोचवली. त्याने भरलेल्या सभेत याबद्दल चाणक्याकडे जबाब मागितला, चाणक्य यामुळे चिडून म्हणाला– "मलयकेतु आणि राक्षस मिळून आपणावर हल्ला करण्याच्या प्रयत्नात आहेत. अशा परिस्थितीत उत्सवाची काय गरज?"





त्या दोघांच्यात थोडावेळ यावरून वादावादी झाली. चन्द्रगुप्त चाणक्याला एकदम म्हणाला–"मग राक्षसच आपणापेक्षा जास्त बुद्धिमान आहे असं म्हटलं पाहिजे." "असं काय? मग आत्ता यक्षणी मी आपल्या मंत्रीपदाचा त्याग करत आहे." असे रागाने म्हणून चाणक्य दरबार सोडून निघून गेला. (क्रमशः)




सुमेरुपुरात एक प्रसिद्ध वैद्य रहात असे, त्याचं नाव विश्वपति. विश्वपतीचे दोन शिष्य होते–अनन्त नि नीलकण्ठ.

अनन्त अतिशय हुषार व ग्रहणशील युवक होता. चरक, सुश्रुत यांच्यासारख्या महान् विशारदांच्या वैद्यक-शास्त्रावरील ग्रंथांतील सूत्रे सहज उल्लेखून तो विश्वपतीला चकित करून सोडी. त्याच्या बुद्धिमत्तेची प्रशंसा करता करता विश्वपतीच्या मनात विचार येई की हा 'गुरु से सवाई' महान् वैद्य बनणार.

पण नीलकंठ सामान्य ज्ञानी होता. तो गुरुजींचं अनुकरण करीत करीत रोग्यांचं निदान नि परीक्षण करीत असे. विश्वपति विचार करी की नीलकंठाला वैद्यकीय विद्येतली प्राथमिक सूत्र समजली तरी तो कसं तरी आपलं पोट भरू शकेल. म्हणून तो त्याच्याकडे फार लक्ष देत नसे.

काही काळ लोटल्यावर अनन्त आणि नीलकंठ विश्वपतीकडील आपलं शिक्षण संपवून आपल्या राहत्या गावी स्वर्णपुरला परत आले. त्यांनी स्वतंत्रपणे रोग्यांचा इलाज करण्याचा आपला व्यवसाय सुरू केला.

अशा रीतीने काही वर्षं गेली. एक दिवशी दीर्घ काळ रोगाने पछाडलेला एक श्रीमंत माणूस स्वर्णपुरहून विश्वपतिकडे आला. स्वर्णपुरचे नाव ऐकताच विश्वपतीला आपले शिष्य अनन्त नि नीलकंठांची आठवण आली.

विश्वपतीने त्या श्रीमंत माणसाला आपल्या दोन्ही शिष्यांबद्दल विचारले. त्यावर जो म्हणाला–"वैद्यजी, नीलकंठाचा व्यवसाय तर जोरात चालू आहे. तो खोऱ्यानं पैसे ओढतो आहे. पण अनन्ताला हा व्यवसाय काही आवडत नसावा. तो हा व्यवसाय सोडून आपल्या वाडवडिलांकडून

मोहना ठोंबरे



मिळालेल्या जमीनीची मशागत करून कसे तरी जीवन कंठण्याचा विचार करीत आहे.

हे ऐकून विश्वपतीला आश्चर्य वाटलं. जो अनन्त एक कुशल वैद्य बनून चांगला व्यवसाय करणार, तो असफल का झाला हे जाणण्याची विश्वपतीला इच्छा झाली. यासाठीच तो लगेच स्वर्णपुराकडे निघाला.

विश्वपति अनन्तच्या घरी पोचला. अनन्त आपल्या घरात कोणाशी तरी बोलत होता. विश्वपति बाहेर उभा राहिला आणि त्यांचे बोलणे ऐकू लागला.

अनन्त रोग्याला समजाऊन सांगत होता–"तुझा हा आजार अगदी किरकोळ आहे. थोडंसं पडसं झालंय तुला. त्यासाठी एवढा बाऊ काय करतो आहेस? थोडी हळद नि चन्दन एकत्र मिसळून चांगलं घोट आणि त्याचा लेप चेहऱ्यावर लाव. लवकरच ठीक होऊन जाईल सगळं. घाबरू नकोस. जा आता."

यावर नाराज होऊन रोगी म्हणाला–"एवढं जाणण्यासाठी तुमच्याकडे यायची मला काय जरूर होती? माझ्या आजीनी पण मला सांगितलं असतं." इतकं बोलून तो निघून गेला.

रोगी निघून गेल्यावर विश्वपति घरात गेला. अनन्तने नम्रतापूर्वक गुरुजींना प्रणाम केला. विश्वपतीने शिष्याला आलिंगन दिले आणि त्याची विचारपूस केली. अनन्त म्हणाला–"गुरुजी, मी येणाऱ्या रोग्यांना योग्य वैद्यकीय सल्ला देत असतो. तरी पण मोठ्या अधिक संख्येने रोगी माझ्याकडे येतात असे नाही. मला याचं कारण काही समजत नाही."

विश्वपति मंद-स्मित करीत म्हणाले–"असं होय? बरं, आपल्या नीलकंठचं कसं काय चाललंय?"

"त्याचा व्यवसाय खूप जोरात चालला आहे!" अनन्तने सांगितलं.

"त्यालाही भेटण्याची माझी इच्छा आहे.' चल येतोस माझ्या बरोबर?" विश्वपतीने विचारले.





विश्वपति आणि अनन्त जेव्हां नीलकंठाच्या घरीं गेले तेव्हां तिथे अनेक रोगी आपल्या पाळीची वाट पहात बसले होते. आत नीलकंठ एका रोग्याची नखशिखान्त परीक्षा करीत होता. विश्वपतीला समजलं की हाच रोगी काही वेळा पूर्वी अनन्तकडे आलेला होता. बाहेरच थांबून विश्वपति नीलकंठाच्या चिकित्सा-पद्धतीकडे पहात राहिला.

नीलकंठ रोग्याला समजाऊन सांगत होता–"थंडी-पडसं दहा रोगांसारखं असतं असं म्हणतात. वेळेवर औषधोपचार केला नाही की त्यातून अन्य रोगाला आमंत्रण मिळतं. तू घाबरू नकोस. माझ्याजवळ एक असा लेप आहे, ज्याचा उपयोग केल्याने थंडी-पडसं काही मिनिटांत पळून जाईल. मी आता तुझ्या चेहऱ्यावर तो लेप लावतो. थोड्या वेळात तुला बरं वाटेल." असं म्हणून जवळच्या एका बाटलीतील लेप नीलकंठाने रोग्याच्या चेहऱ्यावर लावायला सुरुवात केली.

यावर विश्वपतीने हलक्या आवाजात अनन्तच्या कानात सांगितले–"अनन्त, पहात आहेस न? नीलकंठ एकादं अद्भुत औषध आहे असं सांगून हळद नि चन्दन मिसळून तयार केलेला लेप रोग्याच्या चेहऱ्यावर लावतो आहे!"

अनन्तने आपला असंतोष प्रकट करीत म्हटलं–"गुरुजी, इतकंच नाहीं, थंडी-पडसं हा अत्यन्त किरकोळ आजार आहे आणि त्याच्यासाठी वैद्य-शास्त्रात काही औषध नाही हे जाणून ही हा रोग्याला विनाकारण घाबरवीत आहे. असं करणं मला मुळिच आवडत नाही."

विश्वपति हंसत हंसत म्हणाला-"नीलकंठ जें सांगतो आहे नि जे करतो आहे त्यात मला तर काही दोष दिसत नाही." विश्वपतीचं हे म्हणणं ऐकून अनंतला आश्चर्य वाटले.

विश्वपति अनन्तच्या खांद्यावर हात ठेवून प्रेमाने म्हणाला–"हे पहा अनन्त,

काहीं माणसं अशी असतात की जरा काही दुखलं-खुपलं की लगेच इलाज करण्यासाठी वैद्याकडे धाव घेतात. थंडी-पडशासाठी इलाज करायला आलेला माणूस अशांपैकीच एक आहे. अशी माणसं आली की वैद्याने त्यांना सान्त्वना देत असा विश्वास निर्माण केला पाहिजे की त्याच्या गुणकारक व आणि शक्तिवर्धक औषधाने रोग दूर जाईल आणि तो बरा होईल. रोग औषधांहून अधिक श्रद्धेने बरे होतात. हे रहस्य तू नीट जाणून घे. रोग्याची मानसिक दशा जाणून औषधोपचार करताना वैद्याचं व्यावहारिक ज्ञान जास्त उपयोगी पडतं, शास्त्रीय ज्ञान नव्हे! म्हणून नीलकंठाशी तुलना करता वैद्यक-शास्त्र तुला चांगलं माहीत असलं तरी व्यावहारिक ज्ञानाच्या अभावी तू व्यव-सायात मागे पडत आहेस. समजलं?"

विश्वपतीने नीट समजाऊन सांगितल्या-वर अनन्तला आपला दोष कळला. नीलकंठाने आज त्याला चांगलाच प्रत्यक्ष पाठ शिकविला होता. त्याने त्याचे अनुकरण करायचे ठरविले.

नंतर दोघे ही घरात गेले, नीलकंठला भेटले, आणि मनसोक्त गप्पा मारल्या. विश्वपतीने नीलकंठाची प्रशंसा करीत म्हटले–"तुला व्यवसायाचे मर्म बरोबर समजले आहे. तू रोग्याला जे समजाऊन सांगत होतास ते ऐकून मी प्रभावित झालो. तुला व्यवसायात दिवसें दिवस अधिकाधिक यश मिळणार याबद्दल मला खात्री आहे." यानंतर विश्वपति दोन्ही शिष्यांकडे एक-एक दिवस राहिले, त्यांचा पाहुणचार ग्रहण केला आणि आपल्या गावाकडे रवाना झाले.

या घटनेनंतर काही दिवसांनी स्वर्ण-पुराहून सुमेरुपुरला जाणाऱ्या-येणाऱ्या लोकांना विश्वपतीने विचारलं तेव्हा त्याला समजलं की नीलकंठ ही अनन्ता सारखा एक प्रसिद्ध व लोकप्रिय वैद्य बनत चालला आहे. हे जाणून त्याच्या आनंदाला सीमा राहिली नाही.






शस्त्रागाराच्या सेवकांनी येऊन कंसाला बातमी दिली कि उत्सवाचे प्रमुख आकर्षण असणारे ते धनुष्यच मोडून गेले आहे. कंसाला हे ऐकून असे वाटले की जणू त्याच्या पाठीचा कणाच मोडला! त्याच्या चेहरा एकदम चिंताग्रस्त दिसू लागला. नंतर कंस एकदम उठून उत्सवाची व्यवस्था पहाण्यासाठी निघाला. समारंभ-स्थानी एक सुंदर रंगमंच बनवला होता. राजा, मंत्री, बाहेरून येणारे राजे, राजाचे आप्त, निरनिराळे अधिकारी आणि राज-सेविका यांच्यासाठी या मंचावर ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे उचित अशी आसनें बनवली होती व त्यावर चढण्यासाठी छोटे-मोठे सोपान लावले होते. अत्र तत्र नयना-भिराम शिल्पांची योजना केली होती. विविध प्रकारच्या सजावटीच्या साहित्याचा, फुलांचा अन् धूप वगैरेचा उचित उपयोग करण्यात आला होता. या सर्वांवर नजर फिरवून नोकरांना योग्य त्या सूचना देऊन कंस आपल्या महालात परतला. आल्यावर चाणूर आणि मुष्टिक नावाच्या आपल्या मल्लांना त्याने सांगितले–"या जगात तुमची बरोबरी करू शकेल असा मल्लयोद्धा नाही. कृष्ण अन् बलराम नावाची दोन पोरं आजपर्यंत केवळ जंगलात, रानात भटकत होती. त्यांच्यात साहस, पराक्रम किंवा शौर्य नावालाही नाही. ते तुमच्याशी कुस्ती करतील तेव्हा तुम्ही उगीच जास्त वेळ त्यांच्याशी लढत राहू नका. एकाच



दणक्यात जर त्यांचा निकाल लावून टाकलात तर मला फारच आनन्द होईल."

राजाचे हे बोलणे ऐकून दोघेही मल्ल मोठ्या प्रसन्नतेने म्हणाले–" प्रभु, आम्हाला हे सर्व विस्ताराने सांगायची गरजच नाही. ती पोरं समोर आल्याबरोबरच आम्ही त्यांना चिरडून टाकू."

यानंतर कंसाने महामात्र नावाच्या माहुताला बोलावले आणि म्हटले–"तू तर माझा आप्त-मित्र आहेस, तुझ्याकडे आत्ता माझं एक काम आहे. वसुदेवाचे दोन्ही मुलगे फार दुष्ट आहेत, पण दोघेही बलवान आहेत. सध्या ते आपल्या नगरात आलेले आहेत. उद्या तू सर्वात अगोदर ब्रह्ममुहूर्तावरच आपल्या कुवलयापीड नावाच्या हत्तीला घेऊन राजवाड्याच्या दाराशीच तयार रहा. ते दोघे दाराजवळ येताच हत्ती त्यांच्यावर सोड. मग कुवलयापीड त्यांची छान हाडं मोडून टाकील."

दुसऱ्या दिवशी सकाळ झाली. राजाच्या आज्ञेप्रमाणे सर्व लोकांनी प्रवेश करून आपापली आसने ग्रहण केली. सर्वजण अत्यंत उत्सुकतेने कृष्ण व बलराम यांची वाट पहात होते. कंस स्वतः एका उच्च सुवर्णासनावर श्वेत वस्त्रे परिधान करून अन् मोत्यांचे अलंकार घालून बसला होता.

माजलेल्या हत्तीसारखे दिसणारे चाणूर अन् मुष्टिक प्रवेश करून कंसासमोर उभे राहिले. कुवलयापीडावर स्वार होऊन महामात्र आला आणि महाद्वाराजवळ त्याला थांबवून बलराम अन् कृष्णाची प्रतीक्षा करू लागला.

थोड्याच वेळात कृष्ण-बलराम द्वाराजवळ आले. सभेत उपस्थित असलेले सर्वजण मोठ्या आश्चर्याने त्यांच्याकडे पाहू लागले. दोघेही अगदी निश्चल अन् निश्चिन्त दिसत होते. द्वाराजवळ त्यांना पहाताच वाद्यवृन्दाचा नाद आणि प्रेक्षकांचा हर्षध्वनि गगनाला पोचून प्रतिध्वनित झाला! या कोलाहलातच महामात्रने कुवलयापीडाला त्यांच्या रोखाने पुढे घातले.



ही चाल ओळखून कृष्ण बलरामाकडे पाहून हसत म्हणाला–"दादा, कंसाने आपला संहार करण्यासाठी एक मत्त हत्ती तयार ठेवला आहे, पाहिलास? बिचारा कंस! आपणच मृत्युच्या जबड्यात अडकत आहोत, हे त्याला अजून समजलंच नाही! आता माझ्याकडे नीट लक्ष ठेव." असे म्हणत कृष्ण पुढे झाला. विशाल दात अन् भयानक सोंड असणाऱ्या आणि धरणी कंपित करत पुढे येणाऱ्या त्या रौद्ररूपी कुवलयापीड हत्तीला महामात्रने कृष्णासमोर आणले.

कुवलयापीडाशी युद्ध करीत आपल्या शक्तीची चुणुक दाखवून प्रेक्षकांचे थोडे मनोरंजन करण्याच्या मिषाने कृष्णाने प्रथम त्याला सोंडेने आपल्या छातीवर प्रहार करू दिला. नंतर मात्र तो एकदम उडी मारून त्याच्या दातांवर पाय देऊन उभा राहिला. डाव्या पायाने त्याने हत्तीच्या गंडस्थळावर लाथ मारली आणि त्याच्या पाठीवर जाऊन बसला! हत्तीने आपली सोंड लांबवून मागे त्याच्याकडे वळवताच कृष्णाने त्याच्या सोंडेला धरून खाली उडी मारली, अन् त्याने हत्तीच्या बगलेत हाताची मूठ आवळून जोरदार प्रहार केला! रागावून हत्ती मागे वळला त्याबरोबर कृष्ण त्याच्या पायांखालून मागे गेला आणि हत्तीची शेपूट पकडून त्याला गोल फिरवले. त्यामुळे हत्ती खाली पडला, पण त्याने झटकन उठून अत्यंत त्वेषाने





कृष्णावर सोंडेचा प्रहार केला आणि आपल्या दातांनी त्याला भोसकायचा प्रयत्न केला. आता मात्र हत्तीचा संहार करायचा निश्चय करून कृष्णाने उडी मारून त्याच्या चेहऱ्यावर लाथ मारली, आणि जोराने त्याचा एक दातच उपसून काढला! त्या दातानेच त्याने हत्तीचे मस्तक फोडायला सुरुवात केली. लवकरच कुवलयापीड धराशायी होऊन त्याने प्राण सोडला!

हत्तीच्या हल्ल्यामुळे कृष्णाच्या शरीरातून रक्त येत होते. भयंकर दिसणाऱ्या कृष्णाने त्याच स्थितीत हातात दात घेऊन सभास्थानीं प्रवेश केला. कृष्णाला पाहून कंस क्रोधाने कापू लागला. मग त्याने चाणूराकडे पाहून त्याला खुणेने कृष्णाशी युद्ध करायची आज्ञा दिली. त्याच प्रकारे मुष्टिकाला ही बलरामाशी युद्ध करायला सुचवले.

चाणूर आणि मुष्टिक हे दोघेही आन्ध्र प्रदेशचे रहाणारे मल्ल. त्यांना पाहून मत्त हत्तींचीच आठवण व्हावी! त्यांना असा अभिमान ही होता की अलम दुनियेत आपणाला हरवील असा कोणीही मल्ल नाही! असा हा चाणूर कृष्णा जवळ जाऊन व्यंग्यपूर्ण स्वरात म्हणाला—"कायरे, तू म्हणे गायी चारणाऱ्या पोरांना घाबरवून मोठी ख्याति मिळवली आहेस! पण आज माझ्याशी गाठ आहे बच्चमजी!"

कृष्णाने मोठ्या सहनशीलतेने उत्तर दिले—"बिचारा कंस तुझ्यावर मोठी आशा लावून बसला आहे, तेव्हा आज तुला आपल्या शक्तीचं काय प्रदर्शन करून दाखवायचं असेल ते दाखव." असे म्हणून कृष्णाने शड्डू ठोकला.

यावर लगेच चाणूर कृष्णाला भिडला. सभेत उपस्थित असलेले यादव हे पाहून कृष्णाच्या बाबतीत चिन्ता करू लागले. ते आपसात म्हणू लागले—"पर्वतप्राय हा चाणूर अन् बालक कृष्ण यांच्यात हे मल्लयुद्ध कसे? हा तर घोर अन्याय आहे! मल्लयुद्धाची ही बरोबर पद्धत नव्हे. मल्लयुद्धाच्या वेळी योध्यांचे सहाय्यक त्यांच्याबरोबर राहून ते दमतात तेव्हा योग्य उपचार करतात. कुशलता अन् केवळ हव्वीपणा यातला फरक तर कळला पाहिजे. खरं तर हा मनोरंजनाचा कार्यक्रम असायला हवा, दोन शत्रूंचं युद्ध नव्हे! जे घडलं तेच अधिक झालं! आता राजाने हे युद्ध थांबवून दोघांना बोलावून त्यांचा योग्य असा सत्कार करायला हवा."



ही त्यांची बोलणी ऐकून कृष्ण त्यांना म्हणाला,—"मला असंच लढू द्या याच्याशी. मनोबल, पराक्रम, सहनशीलता, उत्साह आणि विजय यांचं प्रदर्शन करणाऱ्या योद्ध्याला उंची, जाडी किंवा वय यांच्याशी काय मतलब? याचा वध करायचंच माझ्या मनात आहे. आपणा लोकांना मी नक्की प्रसन्न करीन, आपण चुपचाप पहात रहा! हा चाणूर करूर देशाचा निवासी आहे, त्याने आतापर्यंत अनेक मल्लयोद्ध्यांचा संहार केला आहे, म्हणूनच मी आज याचा वध करून यशाचा मानकरी बनणार आहे." असे म्हणून कृष्णाने चाणुराशी मल्लयुद्धाला सुरुवात केली.

त्या युद्धात मल्लयुद्ध प्रवीण चाणुरापेक्षा कृष्णाचे कौशल्यच अधिक वाटले. एकमेकांना झुलवत, हुलकावण्या देत, उड्या मारत, ढकलत, वाकत, दबत, अन् अधून मधून मागे सरकत त्यांनी बराच वेळ अद्‌भुत रीतीनें युद्ध केले! पाठी व डोक्यांची टक्कर होताना किंवा मुष्टिप्रहार करताना मोठा ध्वनि होत असे. एकमेकांना हाता पायांनी मारताना, दात व नखांनी क्षते करताना ते दृश्य प्रेक्षकांना फार भयानक भासले!

परंतु एकूण सर्व प्रकारच्या डाव-पेचात, पकडीत आणि युद्धकलेत कृष्णाचेच कौशल्य अधिक प्रशंसात्मक ठरले! दर्शकांना हर्षनाद करताना पाहून क्रुद्ध झालेल्या कंसाने हात उचलून असा काही संकेत केला की जणू त्याला म्हणायचे होते—"हा हर्षनाद थांबवा." कृष्णाने आणखी थोडा वेळ



आपल्या कुशलतेचे प्रदर्शन केल्यावर आता चाणुराचा वध करायचे ठरवले. चाणूर ही आता थकून शिथिल झाला होता, दुर्बळ झाला होता. अशा स्थितीत कृष्णाने त्याच्यावर चाल करून त्याच्या मस्तकावर जोरदार मुष्टिप्रहार केला आणि पुन्हा उडी मारून आपल्या गुडघ्यांनी त्याच्या छातीवर मारले. यावर चाणुराचे डोळेच बाहेर आले, रक्त ओकत तो खाली पडला आणि त्याचा प्राण गेला!

याच अवधीत बलरामानेही मुष्टिकाचा वध केला. दोन्ही मल्लयोद्धयांचा वध करून बलराम अन् कृष्ण विजयी होऊन रंगमंचावर उभे ठाकले. त्या दोघांनी कंसाकडे पाहिल्यावर कंसाच्या चेहऱ्यावर जी क्रूरता उभारून आली ती पाहून नंद वगैरे गोप भयकंपित होऊन अवाक् झाले!

देवकीने ज्या आपल्या आठव्या पुत्राला जन्मतःच दूर केले होते, तो आता चाणूराच्या हाती सापडून त्याचा वध होईल म्हणून तिचे प्राण तडफडत होते. बऱ्याच वर्षांनंतर एकदम भेटून लगेच काही वेळात तो चाणुराच्या हातून मरणार या विचाराने व्याकुल झालेल्या देवकीच्या डोळयातून त्याच चाणुराचे प्राण हरण करणाऱ्या पुत्राचे शौर्य पाहून आनंदाश्रू पाझरू लागले. वसुदेवाच्या आनंदाला तर सीमाच राहिली नाही!

परंतु इकडे कंसाच्या अंगाला घाम फुटला! असह्य क्रोधाने त्याचे शरीर कापू लागले, त्याची छाती धपापू लागली, त्याच्या डोळयातून ठिणग्या निघू लागल्या. एकवार चहूकडे पाहून त्याने सेवकांना बोलावून गरजून आज्ञा केली—"या दोघांना पकडून नगराबाहेर काढून लावा अन नंदाला बन्दिवान करून त्याच्या हातापायात बेडया अडकवा. बाकी सर्व गोपाळांचा शिरच्छेद करा. माझ्या राज्यात जिथे कुठे, कोणी गोप दिसेल तिथेच त्याला पकडून चांगली शिक्षा करा. त्यांची संपत्ति आपल्या कोषात जमा करा! त्या कुटिल वसुदेवाला चांगली शिक्षा द्या!"

हे बोलणे ऐकून सर्वांचे चेहेरे पांढरे पडले! देवकी पुन्हा शोकग्रस्त होऊन बेशुद्ध पडली.

आपल्या मातापित्यांची दयनीय स्थिती, मित्र आणि बांधवांची व्यथा आणि सभासदांची असहायता पाहून कृष्णाला क्रोध आवरेनासा झाला! विद्युत्‌गतिने तो सिंहासनारूढ कंसाजवळ पोचला.

इतक्या वेगाने तो गेला की सोपान चढताना तो कोणा सभासदाला दिसला सुद्धा नाही. या क्षणाला तो रंगपटावर होता. तर दुसऱ्याच क्षणी तो कंसाजवळ दिसला!

कृष्णाने कंसाच्या मुकुटावर इतक्या जोराने लाथ मारली की त्यात जडवलेले हिरे सुटून विखरून पडले! नंतर त्याने कंसाचे केस धरून त्याचे मस्तक झुकवले आणि त्याच्या मस्तकावर मुष्टिप्रहार केला. कंस काही हालचालही करू शकला नाही. कृष्णाने त्याला छातीवर आपल्या गुडघ्याने प्रहार केला. कंसाच्या गळ्यातले हार त्या प्रहाराने तुटून पडले, कर्णकुंडले गळून पडली, अंगावरची वस्त्रे सुटली! त्याच्या नाक, कान व तोंडातून रक्त वाहू लागले व डोळे बाहेर आले. कृष्णाने नंतर त्याला वरून खाली लोटून दिले. जोराने ढकलल्यामुळे त्याचे शव रंगद्वाराच्या आतील भागात जाऊन पडले!

इतक्या वेळात बलरामाने कंसाचा भाऊ सुनाम याचाही वध केला.

कृष्णाने ज्या हातांनी कंसाचा वध केला, त्याच हातांनी वसुदेवाला चरणस्पर्श करून त्याने नमस्कार केला. वसुदेवाने कृष्णाला गाढ आलिंगन देऊन आशीर्वाद दिला. त्याने नंतर देवकीलाही प्रणाम केला. तिनेही कृष्णाला आलिंगन देऊन त्याच्या मस्तकाचे अवघ्राण केले! यानंतर कृष्णाने उग्रसेन व अन्य वडिलधाऱ्या मंडळींना प्रणाम करून त्यांचे आशीर्वाद घेतले आणि सर्वांचा निरोप घेऊन बलरामासह तो आपल्या पित्याच्या घरी गेला.






# लबाड

कोणे एके काळी एका गावात दोन लबाड माणसे रहात होती. त्याची नावे होती वक्रबुद्धि आणि दुर्बुद्धि. गावोगाव फिरत ते एकदा एका गावात पोचले. त्यांना तेथे एका शेतात एक बैल दिसला. त्यांनी त्या बैलाला हाकलून दुसऱ्याच एका जागी नेले आणि तेथे बांधून ठेऊन एका धर्मशाळेत मुक्कामाला गेले. नंतर वक्रबुद्धि तिथेच थांबला अन् दुर्बुद्धि गावात गेला.

एवढ्या वेळात आपला बैल जागेवर नाही ही गोष्ट त्याच्या मालकाच्या लक्षात आली, अन् बैल हरवल्याची वार्ता तो गावभर सांगत सुटला. त्याच्याभोवती थोडीशी गर्दी जमली होती. लोक आपसात बैल हरवल्याबद्दल काही-बाही बोलत होते.

दुर्बुद्धि त्या गर्दीजवळ जाऊन म्हणाला–"तुम्ही लोक कुठलीशी गोष्ट हरवल्याबद्दल बोलत आहात. माझे गुरुजी फार विख्यात ज्योतिषाचार्य आहेत. सध्या ते याच गावच्या धर्मशाळेत उतरले आहेत. त्यांना याबाबत जाऊन भेटलात तर ते तुमची हरवलेली वस्तु बरोबर सापडवून देतील."

हे ऐकून ज्याचा बैल हरवला होता तो आसामी काही गावकऱ्यांना बरोबर घेऊन धर्मशाळेत गेला.

त्यांची सर्व हकिकत ऐकून वक्रबुद्धीने पेटीतून एक ताडपत्रांचा बनवलेला ग्रंथ काढला अन् त्यांची काही अधली मधली पाने पाहिल्यासारखे करून थोडा वेळ डोळे मिटून घेतले. कांही विचार केल्यासारखा अभिनय करून नंतर तो म्हणाला–"या धर्मशाळेच्या उत्तरेला एक मोठा वटवृक्ष आहे. तेथून पूर्वेला गेलं की एक उंचसे चिंचेचे झाड आहे. तेथे उभे राहून डावीकडे

जयंत खरे



पाहिलं की एक छोटेसे आंब्यांचे झाड दिसेल. बस, तिथेच आसपास तुम्हाला आपला बैल सापडेल."

नंतर दुर्बुद्धि व इतर काहीजण त्या माणसाबरोबर चालू लागले. वक्रबुद्धिने जी जागा सांगितली होती, तिथेच बरोबर तो बैल त्यांना सापडला! 'गुरुजीसाठी दक्षिणा' म्हणून दुर्बुद्धिने त्या माणसाकडून दहा रुपये वसुल केले!

अशा प्रकारे या लबाडांना चांगला फायदा झाला. यानंतर ते दोघे तो गाव सोडून पुढे निघणार, इतक्यात त्या गावचा ग्रामाधिकारी तिथे येऊन पोचला अन् म्हणू लागला—"अरे, तुम्ही तर जायला निघालात! बरं झालं मी वेळेत आलो. माझं हरवलेलं पान-दान मिळवून द्याल?"

हे ऐकून वक्रबुद्धि थोडावेळ विचारातच पडला. पण तो लबाडी करण्यात चांगलाच हुशार होता, त्यामुळे या समस्येतून वाचण्या-साठी तो म्हणाला—"आत्ता माझ्या विद्येला ही वेळ वर्ज्य आहे. तुम्ही उद्या सकाळी या. मी तुमचं काम नक्की करून देईन."

"बरंय महाराज, जशी आज्ञा. उद्या सूर्योदयाच्या वेळी मी पुन्हा आपल्या दर्शनाला येईन." असे म्हणून ग्रामाधिकारी तिथून निघून गेला.

या ग्रामाधिकाऱ्याच्या अनुयायात प्रारब्ध नावाचा एक माणूस होता, त्यानेच ते पानदान चोरले होते. ज्योतिषाचार्यांचे नाव ऐकताच त्याचे काळीज धडधडू लागले. त्याच रात्री तो धर्मशाळेकडे गेला आणि या लबाडांच्या खोलीजवळ जाऊन आतले बोलणे ऐकू लागला.

"ए बाबा, आपल्याला तर त्याच वेळी पळून जायला हवे होते. असं चोरासारखं रात्री निघून जाणं काही मला पसन्त नाही." वक्रबुद्धि म्हणाला.

"माझा काय दोष त्यात? ही चोरीची भानगड मला थोडीच माहीत होती? ह्यालाच प्रारब्ध म्हणतात, दुसरे काय, प्रारब्धच नव्हे तर काय?" दुर्बुद्धि म्हणाला.



त्यांच्या बोलण्यात आपले नाव ऐकून प्रारब्ध फारच घाबरला. तो लगेच खोलीत घुसला अन् त्यांचे पाय धरून म्हणाला—"महाराज, मला वाचवा! पानदान चोरलं म्हणून ग्रामाधिकारी माझी चामडी लोळ-वील! मी ते कुठे ठेवलंय हे सांगतो, पण माझं नाव नका सांगू त्यांना! माझे प्राण वाचवा!"

"ठीक आहे, ठीक आहे! सांग कुठं ठेवलंयस लपवून ते पानदान?" वक्रबुद्धिने त्याला रागावूनच विचारले.

पानदान लपवल्याची जागा वक्रबुद्धिला सांगून प्रारब्ध तिथून सटकला.

ग्रामाधिकारी म्हटल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सूर्योदयाबरोबर तिथे येऊन पोचला.

'स्मशानात जो मण्डप आहे ना तियल्या जिन्याखाली उकरून पाहिलंत तर पानदान सापडेल तुमचं. जा, लवकर जाऊन घेऊन या ते!' वक्रबुद्धिने त्याला आज्ञा केली.

ग्रामाधिकाऱ्याने स्मशानात जाऊन पाहिले तर ज्योतिषाने सांगितल्या जागी पानदान सापडले. मग काय! ग्रामाधिकारी फारच प्रसन्न झाला. इतक्यात राजाकडून एक दूत ग्रामधिकाऱ्याकडे आला अन त्याने एक खबर दिली.

ती खबर अशी—राजधानीच्या तटवर्ती भागात तीन दिवसांपूर्वी बाहेरून कुठूनशी



सात व्यापारी गलबतं येऊन पोचली. त्यांत खूप मौल्यवान माल भरलेला होता. गलबतांच्या व्यापाऱ्याने राजाशी एक पैज लावली. पैजेची अट होती—व्यापारी राजाच्या हाती एक लोखंडी पेटी देईल. त्या पेटीत काय काय वस्तु आहेत हे राजाने एका आठवड्यात सांगायचे. राजा बरोबर उत्तर देऊ शकला तर सर्वच्या सर्व सात जहाजे राजाच्या मालकीची होतील अन् उलट राजा बरोबर उत्तर न देऊ शकला तर आपले संपूर्ण राज्यच त्याने व्या-पाऱ्याच्या हवाली करावे!

राजाच्या दरबारात काही चांगले ज्योतिषी होते, फार विश्वास होता राजाचा



त्यांच्यावर! दरबारी ज्योतिषांनी डोकी हलवून साफ सांगून टाकलं की–पेटीतल्या वस्तु सांगायला आपण असमर्थ आहोत! अशात तीन दिवस तर उलटून गेले होते. आता उरलेल्या चार दिवसात पैज नाही जिंकली तर राजा आपल्या राज्यालाच मुकणार होता! राजा व्याकुळ झाला अन् सर्व गावांच्या अधिकाऱ्यांना निरोप पाठवला कि–जिथे जिथे म्हणून जे जे ज्योतिषी असतील त्यांना तावडतोब राजधानीत पाठवावे.

ग्रामाधिकारी आता वक्रबुद्धिला म्हणाला- "आपणासारखे ज्योतिषाचार्य आपल्या राज्यात असताना राजाला काय काळजी? आपण अन् आपला शिष्य-दोघेही माझ्याबरोबर राजधानीला चला.

नाइलाज होऊन हे दोघेही राजाकडे गेले. तेथे त्यांचे राजोचित स्वागत झाले.

ठरलेल्या मुदतीचा शेवटचा दिवस सुरू झाला होता! दुसऱ्या दिवशी सकाळी लोखंडी पेटीतल्या वस्तुंबद्दल सांगता न आल्यास राजाचे राज्य जाणार होते! अन् वक्रबुद्धि ते न सांगू शकला तर गुरुशिष्यांची-दोघांचीही डोकी उडवली जाणार होती!

दुर्बुद्धि वक्रबुद्धिला म्हणाला–"आपण आज रात्रीच पळून जाऊ या का?"

"कुठवर पळणार आपण पळून पळून? त्यापेक्षा आपण समुद्रात उडया टाकून पोहवेल तितके दूरदूर पोहत गेलो तर मुकाटयाने तरी मरू!" वक्रबुद्धिने सुचवले.

मध्यरात्रीच्या वेळीं दोघेही समुद्रकिनारी पोचले अन् पाण्यात उतरून पोहत पुढेपुढे जाऊ लागले! थोडया अंतरावर त्यांना काही गलबते दिसली. त्यापैकी एका गलबतावरून कुणाचे तरी बोलणे ऐकू येत होते.

"आजोबा, सांगा न त्या पेटीत काय काय आहे?" एक मुलगी विचारत होती.

"तुला काय करायचंय बाळ त्याच्याशी? खूप रात्र झालीय, जाऊन झोप बरं." म्हातारे आजोबा नातीला म्हणाले.

"ऊंहूं! पेटीत काय आहे ते सांगितल्याशिवाय नाहीच झोपणार जा आम्ही! सांगा ना." मुलगी हट्ट करत होती.

"सकाळ झाल्यावर नाही तरी कळणारच आहे. आत्ताच सांगतो चल. एक नीट–लोखंडी पेटीत एक पितळी पेटी आहे. पितळी पेटीत एक चांदीची पेटी अन् त्याच्या आत आहे एक सोन्याची पेटी! अन् सोन्याच्या पेटीत एक अत्तराची कुपी आहे, समजलं? जा पळ, झोप बरं आता!" आजोबा म्हणाले.

हा म्हातारा त्या व्यापाऱ्याचा मुख्य नाखवा होता.

ही गोष्ट ऐकताच दोघे लबाड प्राणी चुपचाप परत फिरले अन् सकाळ होताच त्यांनी राजाला लोखंडी पेटीचे रहस्य सांगून टाकले.

आता आनंदीआनंदच! व्यापाऱ्याने आपली सर्व गलबते राजाच्या हवाली केली.

राजाने वक्रबुद्धिला आपल्या दरबारी ज्योतिषांच्या प्रमुखाचे स्थान देऊ केले. परन्तु खरं म्हणजे दोघांचा ते पद मुळीच नको होते. कारण कधी न कधी त्यांची लबाडी उघडकीला आलीच असती!

त्याच दिवशी संध्याकाळी वक्रबुद्धि राजवाडयात राजाशी गप्पा मारत बसला होता, इतक्यात दुर्बुद्धि रडत ओरडत तेथे आला अन् म्हणाला–"गुरुजी, सत्यानाश झाला हो आपला! आपल्या घराला आग लागली अन् त्यात आपले सगळे ज्योतिषाचे ग्रंथ जळून खाक झाले हो!" असे म्हणून त्याने आपले भाजलेले हात पुढे केले.

"अरेरे, माझ्या जीवनाचा आधारच नाहीसा झाला की हो!" असे म्हणत वक्रबुद्धिनेही आपला चेहरा रडवा केला.

"तुम्ही लोक चिन्ता नका करू. मी आपल्या दरबारात तुम्हाला उच्च स्थान देईन." राजाने त्यांना सहानुभूति दाखवत आश्वासन दिले.

शेवटी त्या दोघा लबाडांची चाल सफल झाली! राजाच्या दरबारात आपले उरले सुरले जीवन ते सुखाने कंठू लागले.






महातल देशावर सिंहकेतु राजा राज्य करीत होता. त्याचा सेनापति होता वीरवर्मा. तो मोठा साहसी व पराक्रमी होता आणि युद्ध-विद्येत अत्यन्त निपुण होता. वीरवर्मा दिवसें दिवस थकत चालला. दृष्टि क्षीण होत चालली. थोडे काम केले की तो थकून जाई. वैद्यांनी सल्ला दिला की वीरवर्म्याच्या या दुखण्यावर रामबाण इलाज म्हणजे आराम. आतां येथून पुढे काया अधिक शिणविणे योग्य नाही. आता वय झाल्यावर वीरवर्म्याच्या मनात आले की आपण आपल्या सेनापति-पदापासून मुक्त व्हावे.

याबाबत खूप विचार करून तो एकदा राजाला भेटायला गेला. मंत्री पण त्यावेळी राजाच्या जवळच होता.

वीरवर्म्याने सेनापति-पदापासून मुक्त होण्याची आपली इच्छा राजाकडे प्रकट केली–"महाराज, आता पर्यंत मनोभावे आपली सेवा केली. आता शरीर साथ देत नाही. आता सेनापतीचं काम आपण दुसऱ्या कोणाला दिलं तर अधिक योग्य होईल. वैद्यांनी मला संपूर्ण विश्रांतीचा सल्ला दिला आहे, अशा परिस्थितीत आपण मला या जबाबदारीतून मुक्त करावं एवढीच प्रार्थना."

राजानी सर्व काही नीट ऐकून घेतले. वीरवर्म्याचं म्हणणं तर बरोबरच होतं, पण सेनापति-पदापासून वीरवर्म्याने मुक्त व्हावं हे ही राजाला पसंत नव्हत. तेव्हां अनिच्छेने राजा म्हणाला–तुझं सेनापतीच्या जबाबदारीतून मुक्त होणं मला मुळिच पसंत नाही." तरी पण तुझ्या इच्छेचा मी अवमान करणार नाही. एक काम कर. तुझे दोन्ही पुत्र अनेक वर्षं तुझ्या सहवासात राहून तुझ्याच सारखे सामर्थ्य-शाली झाले आहेत. दोघांच्या पैकी कोणा एकास तू सेनापति-पदासाठी निवड.

राजाचे बोलणे ऐकून वीरवर्मा थोडा वेळ गप्प बसला. आणि मग म्हणाला–"महाराज, माझे दोन मुलगे शूरवर्मा नि जयसिंह माझ्या पश्चात् सेनापति पदाची धुरा वाहण्यास समर्थ आहेत ही गोष्ट खरी आहे. माझ्या दृष्टीने दोघेही समान योग्यतेचे आहेत. म्हणून याबाबत निर्णय आपणच केला तर बरे. मी कोणा एकाची निवड केली तर दुसरा रागावेल. म्हणून दोघांमधून एकाची निवड करण्याचं काम महाराज, आपणच करावं!"

राजाला सेनापतीचे म्हणणे योग्य वाटले. राजा सिंहकेतुने शूरवर्मा नि जयसिंहला जवळ बोलविले आणि म्हणाला–"तुम्हाला माहीतच आहे की राजपदा प्रमाणे सेनापति-पद पिढीजात मिळत नाही. पण मला हे चांगलं माहीत आहे की शौर्य-पराक्रम व युद्ध-कौशल्यांत तुम्ही दोघे आपल्या वडिलांसमान आहात. आता मी तुम्हां दोघांची परीक्षा घेणार आहे. या परीक्षेत मला समजेल की ज्ञान-विज्ञान व व्याव-हारिक ज्ञानात तुम्हां दोघात कोण अधिक सरस आहे."

राजाची परीक्षेची ही कल्पना स्वीकार करीत शूरवर्मा व जयसिंह दोघांनी मंद-स्मित केले.

राजाने समजाऊन सांगितले–"पहा, समोरच्या तीन खोल्यांत निरनिराळ्या



जयंती पाथरे

वस्तु सुरक्षित ठेवलेल्या आहेत. त्या सर्व नीट पाहून तुम्ही हे सांगायचं की त्यापैकी कोणती वस्तु तुम्हाला अधिक पसंत आहे आणि का? नंतर सभासदांना तुम्ही ते सांगायचं. सभासदांना ज्याचं उत्तर अधिक योग्य वाटेल त्याला सेनापति-पद दिलं जाईल."

राजाचा एक सेवक आत आला नि शूरवर्माला बरोबर घेऊन गेला. आणि त्याला त्या खोल्या दाखवल्या.

शूरवर्माने तीन्ही खोल्यांतील वस्तूंचे बारकाईने निरीक्षण केले आणि परत येऊन सांगितले–"महाराज, दुसऱ्या खोलीत सुरक्षित ठेवलेली युद्ध-सामग्री मला सर्वांत अधिक पसंत पडली."

यावर राजा नि मंत्री हंसले.

नंतर शूरवर्माप्रमाणे राजाचा सेवक जयसिंहाला खोल्यांकडे घेऊन गेला. त्याने काळजीपूर्वक सर्व वस्तूंचे निरीक्षण केले आणि परत येऊन निवेदन केले–"मी संपत्तीचा संग्रह सर्वांत अधिक पसंत केला."

राजाने विचारले–"असं हो? पण धन-संपत्ति अधिक पसंत करण्याचे कारण काय बरे?"

"महाराज, या जगात सर्वांत महत्वाची कोणती वस्तु असेल तर ती म्हणजे धन. कारण धन असेल तर बाकीच्या खोल्यांतील युद्ध-सामग्री व खाद्य पदार्थांचा संग्रह सहज करता येईल. म्हणूनच मी धन-संपत्ति अधिक पसंत करतो." जयसिंहाने गंभीरता-पूर्वक आपला विचार सांगितला.

जयसिंहाचे हे उत्तर ऐकून सर्व सभासदांना अत्यन्त संतोष झाला आणि त्यांनी आनंदाने टाळ्या वाजविल्या.

नंतर राजाने आपल्या गळ्यांतील मोत्यांचा कंठा काढला, आणि तो जयसिंहाच्या गळ्यांत घालून म्हटले–"तुझे लौकिक ज्ञान प्रशंसनीय आहे. म्हणून सेनापति पदावर मी तुझीच नियुक्ति करतो."

सर्व सभासदांनी पुन्हा एकदा हर्षभराने स्वीकृतिसूचक टाळ्या वाजवल्या.





# भगवान साक्ष आहे

कुंदनपूर गावात गोविन्दराज नावाचा एक मोठा डाकू रहात होता. चोरी करणे हाच त्याच्या घराण्याचा धन्दा. गोविन्दराजचे वडील, आजोबा वगैरे सर्व डाकूच होते. तेव्हा चोरी करणे हीच त्यांची कुल-विद्या समजली जाई.

गोविन्दराजला एक बहीण होती. तिच्या मुलाचे नाव होते भगवान. मामा-जवळ राहून चौर्य-विद्या शिकण्यासाठी त्याच्या आईने त्याला गोविन्दराजकडे पाठवले.

भगवान हाडाचा डाकूच होता, त्यामुळे गोविन्दराजकडे राहून तो चोरीच्या विद्येत लवकरच इतका प्रवीण झाला की तो मामाहूनही अधिक कौशल्यपूर्वक चोऱ्या करू लागला! गोविन्दराजाच्या हे लक्षात आले तेव्हा तो चोरीला जाताना नेहमीच भाच्याला बरोबर घेऊन जाऊ लागला.

एके दिवशी गोविन्दराज आणि भगवान दोघे मिळून चोरी करण्यासाठी शेजारच्या गावी गेले. गावात पोचता पोचता अंधार झाला. त्यांना असे कळले की गावचा न्यायाधिकारी मोठा धनवान आहे. तेव्हां दोघांनी रात्री या न्यायाधिकाऱ्याकडेच चोरी करायचे ठरवले.

तो न्यायाधिकारी बिचारा सज्जन माणूस होता. त्याला कोणी मूलबाळ नव्हते, त्यामुळे ते पति-पत्नी नेहमीच जप, व्रत-वैकल्ये, पूजा-पाठ वगैरे करत असत.

न्यायाधिकारी रोज रात्री उशीराच घरी येई. ही गोष्ट मामा-भाच्यांना कळताच त्यांनी ठरवले की त्याच्याकडेच चोरीचे काम लवकरच उरकून घ्यावे. हा विचार ठरताच ते न्यायाधिकाऱ्याच्या घरात घुसले.



"फार भूक लागलीय मामा. कदाचित् काही खायलाही मिळेल, ते प्रथम पाहतो." भगवान म्हणाला.

"बरं मग, मी माडीवर जाऊन धन-संपत्ति सापडेल ती घेऊन येतो. तू खाण्याचं बघ. मी अगोदर आलो तर या झाडाखाली तुझ्यासाठी उभा राहीन. दोघं बरोबरच घरी जाऊ." मामा म्हणाला.

नंतर गोविन्दराज वरच्या मजल्यावर गेला आणि भगवान घरात शिरला. मुख्य दरवाजा नुसताच दार ढकलून लावून ठेवलेला होता. भगवानने आत शिरल्यावर आतून दाराला कडी घातली.

तो मांजरपावलाने दबकत स्वयंपाक-घरापर्यंत पोचला आणि त्याने आत डोकावून पाहिले. सगळे घर अगदी शान्त होते. न्यायाधिकाऱ्याची बायको पदर पसरून त्यावरच आडवी झाली होती. तिचा डोळा लागला होता. मागच्या बाजूला देवाच्या कोनाड्याजवळ निरनिराळे खाद्य-पदार्थ ठेवले होते. त्यांच्या वास नाकात शिरूनच भगवानला हुशारी आली.

खरे पाहता त्या दिवशी एकादशी होती. आणि त्याची पत्नी यांना उपास होता. सकाळी काहीच न खाता रात्री फराळ करायची त्यांची पद्धत होती. तिने वऱ्याचे तांदूळ-आमटी आणि साबुदाण्याची थालि-पिठे करून ठेवली होती, आणि पतीची वाट पहात ती जरा आडवी झाली. उपासाने थकवा आल्यामुळे तिला तेवढ्यात जराशी झोप लागली.

भगवान हळूच खाण्याच्या भांड्यांजवळ गेला अन् ताबडतोब त्या पदार्थांवर तुटून पडला. आधी त्याला सडकून भूक लागली होतीच अन् पदार्थही मोठे खमंग लागले. थालीपीठ फारच चविष्ट लागले त्याला. त्यामुळे सर्वच पदार्थ त्याने चट्ट करून टाकले अन् वर जवळ ठेवलेलं ताकही पिऊन घेतले त्याने! अगदी अमृतासारखे वाटले त्याला ते!.



खाऊन पिऊन भगवान अगदी तृप्त झाला. आता चुपचाप तिथून सटकायच्या विचारात तो होता, इतक्यात कोणीतरी घराचे दार खडखडावले!

त्या आवाजाची चाहूल लागून घरमाल-कीण जागी झाली आणि 'आले ऽऽ' असे ओरडून स्वयंपाकघराबाहेर निघून गेली! बाहेर आलेला माणूस स्वत: घरमालकच असणार अन् फराळासाठी आता तो थेट स्वयंपाकघरातच येणार! कुठूनच पळून जायला मार्ग राहिला नाही असे पाहून भग-वान पटकन् तिथेच माळ्यावर चढून बसला.

त्याच्या कल्पनेप्रमाणे घरमालक आपल्या पत्नीसह स्वयंपाकघरातच आला आणि त्याने बायकोला विचारले—"तू फराळाचं तयार केलं आहेस ना, वाढ लवकर. फार भूक लागली मला."

हो तर, केव्हाच तयार करून ठेवलंय सगळं! तुमचीच वाट पहात होते मी! असे म्हणत तिने देवाच्या कोनाड्याकडे नजर टाकली. पण तिथे तर तिला रिकामी भांडीच दिसली. "अरे मी केलेले फराळाचे पदार्थ कुठे गेले?" न्यायाधि-काऱ्याची बायको आश्चर्याने म्हणाली.

"कुठे जाणार? मी येईपर्यंत राहवलं नाही तुला अन् फराळाचं सगळं तूच खाऊन टाकलं असशील अन् काय?" न्यायाधिकारी



म्हणाला. तो उपाशी होता, आणि आता रिकामी भांडी पाहून त्याचे डोकेच भडकले!

"आतापर्यंत तुम्हाला वाढल्याशिवाय कधीतरी खाल्लं का? भगवान पहातो आहे मी खाल्लं की नाही ते!" बायको म्हणाली.

"तू नाही तर कोण खाणार? तिसरं येईलच कोण मुळी इथं?" नवरा रागाने म्हणाला.

माझा जरा डोळा लागला होता, त्यावेळी कदाचित–देवानेच खाल्लं असेल! भगवान जाणे खरं खोटं."

"मार मिळाला की बरोबर खरं बाहेर पडेल. थांब. आताच घेतो तुझा समाचार!"

असे म्हणून नवऱ्याने कोपऱ्यातली काठी उचलली.

हे सारे दृश्य पाहून भगवानला न्यायाधिकाऱ्याचा असह्य राग आला, आणि त्याने एकदम माळ्यावरून त्या नवराबायकोंच्या मधे उडी मारली! आणि–"आपल्या बायकोने खरं तेच सांगितलं. मीच भगवान, तुमच्या दोघांच्या फराळाचे जिन्नस मीच खाऊन टाकले. उगीचच आपल्या बायकोला का मारता?" असे तो म्हणाला.

इतक्यात बाहेरून–"भगवान" अशी हळू आवाजातली हाक ऐकून–"आलो आलो" असे म्हणत भगवान आरामात घराबाहेर आला.

गोविन्दराजने माडीवर सर्वत्र खूप पाहिले, पण त्याला चोरण्यालायक काहीच मिळाले नाही. थोडा वेळ त्याने झाडाखाली भाच्याची वाट पाहिली, इतक्यात त्याला स्वयंपाकघरातून उच्च आवाजातले काही बोलणे ऐकू आले. त्याने जरा जवळ जाऊन ऐकले तर त्याला त्या बोलण्यात 'भगवान' हा शब्दही ऐकू आला, नंतर तर त्याला खुद्द भगवानचाच आवाज ऐकू आला. आपला भाचा बहुतेक घरातल्या लोकांच्या हाती लागला या विचाराने तो घाबरून गेला आणि त्याने हळूच त्याला हाक मारली. अन् भगवान 'आलो' म्हणाला तेव्हा तर त्याला आश्चर्यच वाटले! नंतर घरी परतताना जेव्हा गोविन्दराजने आपल्या भाच्याचा पराक्रम सविस्तर ऐकला, तेव्हा–"अरे खरा डाकू, चोर कोणी असेल तर तूच! चोरी करून, घरमालकाला सांगून थाटात सुरक्षितपणे बाहेर आलास तू!" असे म्हणून आपल्या भाच्याची त्याने खूप स्तुति केली.

भगवान बाहेर पडल्यावर न्यायाधिकाऱ्याची बायको अचानक म्हणाली–"अरे! तुम्ही पहात काय उभे राहिलात? तो तर चोर असावा, पकडा त्याला!"

यावर न्यायाधिकारी भराभरा बाहेर आला, पण तोपर्यंत चोर दूर निघूनही गेला होता!



## नैसर्गिक आश्चर्य :



### विजेची झाडे

इंग्लंडमधे जास्त करून नेहमी ओक व पाइनवर वृक्षांवरच वीज पडते.

शहामृगाच्या बाबतीत एक असा चुकीचा समज सर्वश्रुत आहे की संकटकाळी तो आपले डोके वाळूत खुपसतो. परंतु हे खरे नाही. कोणताही आवाज झाला की शहामृग डोके खाली घालून तो एकाग्रतेने ऐकतो. संकटाची सूचना मिळाली तर तो सुद्धा इतर पक्ष्यांप्रमाणे पळू लागतो!






चांदोबातील नव...

## मोहेंजोदरोचा विनाश कसा झाला?

मोहेंजोदरोच्या अत्यंत प्राचीन संस्कृतीचा ह्रास कसा झाला याबद्दल सर्वांनाच थोडी माहिती आहे. परन्तु प्रत्यक्ष त्या शहराचा विनाश कसा झाला याबद्दल अशी माहिती कोणाला नाही. रशियाचे प्रमुख शास्त्रज्ञ श्री. एम. दिमित्रिव्ह यांच्या मते वेळोवेळी होणाऱ्या रासायनिक पदार्थांच्या विस्फोटांमुळेच या शहराचा विनाश झाला असावा.

## प्रवाळाचे नवीन बेट

पूर्व मलेशियाचा भाग कुडाक यापासून ईशान्येकडे ४० मैल अंतरावर समुद्रातून नुकतंच एक प्रवाळाचे बेट वर आले आहे.

## खरा मित्र

श्री लंकेतला एक शेतकरी आपले दोन कुत्रे बरोबर घेऊन जंगलात गेला आणि तिथेच अपघातात सापडून मरून पडला. तेव्हा त्याचा एक कुत्रा तिथेच मालकाच्या प्रेताला पहारा देत थांबला, तर दुसरा कुत्रा परत घरी गेला व त्याने अनेक प्रकारे भुंकून घर डोक्यावर घेतले, आणि त्याच्या कुटुम्बातल्या लोकांना घटनास्थलावर घेऊन गेला.

## राणीचे दागिने

३२०० वर्षांपूर्वी मिसर देशावर राज्य केलेल्या सम्राट फाराओ रामेसेसची राणी नेफेर टिटी हिच्या उध्वस्त झालेल्या समाधी-स्थानी नुकतेच तिचे दागिने सापडले आहेत.

# प्रामाणिकपणा

एका राजाच्या वृद्ध मंत्र्याचे देहावसान झाले. राजाने त्या मंत्र्याच्या मुलाची मन्त्रीपदावर नेमणूक केली. या नव्या मन्त्र्याने ज्या दिवशी मन्त्रीपद ग्रहण केले, त्याच दिवशी राजासमोर एक अडचण उपस्थित झाली. करवसुली करणारा अधिकारी पळून गेला.

आता राजा नव्या मन्त्र्याला म्हणाला–"हे पहा, यावेळी करवसुली अधिकारी नेमण्यापूर्वी आपल्याला त्याच्या प्रामाणिकपणाची परीक्षा घ्यायला हवी. परंतु हे कसे शक्य होईल ? तुझे वडील असते तर त्यांनी यावर काहीतरी योग्य अशी तोड काढली असती."

"महाराज, आपण दवंडी पिटवा. या पदासाठी येणाऱ्या उमेदवारांपैकी प्रामाणिक माणूस मी बरोबर शोधून देईन." मन्त्री म्हणाला.

दवण्डी ऐकून दहा माणसे राजाच्या दरबारात उपस्थित झाली. मन्त्र्याने त्यांना ज्या मार्गाने राजदरबारात यायला सांगितले होते, त्या मार्गात एक अंधारी खोली होती. हे सर्व दहाजण या वाटेनेच दरबारात आलेले होते. आता मन्त्र्याने त्यांना म्हटले–"तुम्ही सर्वांनी आता अगदी वेगाने माझ्याभोवती दहा प्रदक्षिणा घाला."

परंतु दहा पैकी एक सोडून बाकीच्यांनी असे करायला साफ नकार दिला. मन्त्र्याने त्या एकट्या व्यक्तीकडे इशारा करून म्हटले–"महाराज, हा तुमचा नवा करवसुली अधिकारी."

राजा आश्चर्याने मन्त्र्याकडे पाहू लागला. मन्त्री म्हणाला–"महाप्रभु, ज्या अंधाऱ्या खोलीतून चालत हे सर्वजण इथे आले, त्या खोलीत दोन ठिकाणी मी चांगल्या लखलखत्या चान्दीच्या नाण्यांचे ढीग ठेवले होते. या बाकीच्या नऊ जणांनी त्यातली नाणी आपल्या अंगच्या वस्त्रात लपवून आणली, आणि म्हणूनच त्यांनी वेगाने माझ्याभोवती प्रदक्षिणा करायला नकार दिला. यानंतर त्या माणसांची झडती घेतली गेली. तेव्हां मन्त्र्याचे म्हणणे खरेच ठरले. राजाने त्या दहाव्या माणसाला करवसुली-अधिकारी म्हणून नेमले.






गोपवरम् नावाच्या गावात वीरनारायण नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याची बायको भानुमति ही फार चांगली बाई होती. वीरनारायणने काहीही बोलायला तोंड उघडले की प्रथम त्याच्या तोंडून शिव्याच बाहेर पडत. त्यामुळे भानुमति जेव्हा नवी नवरी म्हणून घरात आली, तेव्हा आपल्या नवऱ्याच्या शिव्या-शापामुळे अन् एकसारख्या रागावण्यामुळे घाबरून तिला आजार जडला.

कसेबसे एक वर्ष गेले, अन् एक दिवस आपले सर्व धैर्य एकवटून भानुमतिने नवऱ्याला अशा एकसारख्या शिव्या न देण्याबद्दल सांगून पाहिले. पण उलट वीरनारायण रागावून म्हणाला–"जळो तुझं तोंड ते! पुन्हा असलं काही माझ्यासमोर बोललीस, तर तुझं कवरडंच मोडून ठेवीन!"

एका वर्षी गावच्या मध्यभागी असलेल्या दुर्गा-मन्दिरा समोर नवरात्रात कथा कीर्तन करायचा कार्यक्रम ठरला.

त्या दिवशी रात्री जेवायच्या वेळी वीर नारायणने रागावून आपल्या बायकोला म्हटले–"ए घुबडतोंडे, लवकर जेवायला वाढ! आपण कीर्तनाला जाऊ."

भानुमति लवकरलवकर आपले जेवण उरकून स्वयंपाकघर आवरू लागली. दुर्गा-मन्दिराजवळ हळूहळू गर्दीचा आवाज कमीकमी होऊन कथेकरी बुवांचा खणखणीत आवाज ऐकू येऊ लागला–"प्रेक्षकजनहो, नीट कान उघडून एका बर! देवानं आपल्याला तोंड दिलंय ते चांगलेचुंगले अन् स्वास्थ्यवर्धक पदार्थ खाण्यासाठी! कठोर वचन बोलण्यासाठी वा शिवीगाळ करण्यासाठी नव्हे बरं! शिवी देण्यापूर्वी माणसाने भल्याबुऱ्याचा नेहमी विचार

लीला राव



करावा. कारण आपल्या तोंडून वाईट वचन बाहेर पडायला अन् तथास्तु देवता अदृश्य रूपात 'तथास्तु' म्हणायला एक गाठ पडते. आणि बोललेलं ते वचन खरं होतं. म्हणूनच होईल तितकं चांगलंच बोलावं माणसाने!"

वीरनारायणने कथेकरीबुवांचे हे बोलणे ऐकले आणि पलंगावरूनच तो आपल्या बायकोला म्हणाला–"अग, अजून तू स्वयंपाकघरांतच खुडबुडते आहेस काय! जळलं तुझं तोंड, नेहमीच उशीर करतेस तू." वीरनारायण चिडून ओरडला.

दुसऱ्याच क्षणी मागल्या बाजूने भानुमतिचे किंचाळणे ऐकू आले.

"अहो माझा चेहरा भाजतो आहे हो! देवा रे, सहन नाही होत मला आग!" असं म्हणत भानुमति पटापट आपल्या चेहऱ्यावर थंड पाणी शिंपडू लागली, अन् वेदनेने ओरडतही राहिली.

भानुमतिच्या चेहऱ्याची आग काही केल्या थांबेना! तेव्हा वीरनारायण तिला बरोबर घेऊन जवळच्याच एका वैद्याकडे गेला.

वैद्य जेवत होते. बराच वेळ बाहेर येईनात.

तेव्हा चिडून वीरनारायण आपल्या बायकोला म्हणाला–"हा कोणी वैद्य आहे, की बकासुर? किती वेळ खातच बसलाय्! एकदाचा बाहेर का नाही येऊन धडपडत?"

मग काय अवकाश! दुसऱ्याच क्षणी वैद्य एकदम वेगाने बाहेर येऊन चबुतऱ्याजवळ कोसळला अन् कण्हू लागला! त्याची ही परिस्थिति पाहून वैद्याच्या पत्नीने हंबरडा फोडला!

वीरनारायण आपल्या बायकोला घेऊन दुसऱ्या एका वैद्याकडे गेला. या वैद्याने भानुमतिचा चेहरा तपासला अन् वीरनारायणला म्हणाला–"माझी पंचवीस रुपये फी दे."

आश्चर्याने वीरनारायण म्हणाला–"अहो वैद्य महाराज, अगोदर रोग्याला तपासून औषध तर द्या."

वैद्याने मुकाट्याने भिंतीला लावलेल्या लाकडी पाटीकडे बोट दाखवले. अन् तो चुपचाप आत निघून गेला! त्या पाटीवर लिहिले होते–'रोग्याला पहाण्याची फी रु. पंचवीस, तपासण्याची फी रु. पन्नास, आणि उपचार करण्याची फी रु. शंभर!'

वीरनारायण दातओठ खात खिशातून पंचवीस रुपये काढत म्हणाला–"ह्याच्या आईचं पोट जळून जाऊ दे. याने तर वैद्यकीचा व्यापारच मांडला आहे की!"

इतक्यात वैद्य तेथे आला आणि रुपये घेऊन त्याने भानुमतीला तपासायला सुरुवात केली. एवढ्यात वैद्याची आई ओरडू लागली–"अरे, लवकर आत ये रे. माझं पोट तर तव्यासारखं तापलं आहे. भाजतय् मला!"

आईची हाक ऐकून वैद्य पुन्हा आत निघून गेला. १५ मिनिटे वाट पाहून वीरनारायण बायकोला म्हणाला–"मला कळत नाही–हा वैद्य की व्यापारी? चल, आपण आणखी एकाद्या वैद्याकडे जाऊ." असे म्हणून त्याने खिशात उरलेले चाळीस रुपये एकदा मोजून पाहिले आणि ती दोघे तिथून निघाली.

रस्त्यात वीरनारायणला त्याचा मित्र शेषाचलम् भेटला. वीरनारायणच्या मनांत आले की बायकोच्या उपचारासाठी कदाचित आपल्याजवळचे पैसे पुरायचे नाहीत, म्हणून त्याने आपल्या मित्राला थांबवून म्हटले–





"जरा थाब दोस्त, तुझ्याजवळ आत्ता असले तर पन्नास रुपये हातउसने दे मला. मी उद्याच सकाळी तुझे पैसे परत करीन."

शेषाचलम् यावर दुःखी चेहरा करून म्हणाला–"तू अडचणीला माझ्याकडे पैसे मागितलेस, पण आत्ता ऐन वेळी माझ्या खिशात तेवढे पैसे नाहीत रे!" असे म्हणून तो पुढे निघून गेला.

"खिशात पैसे असूनही मला 'पैसे नाहीत' म्हणतो आहे! चोर साला!" वीरनारायण आपल्या बायकोजवळ बोलला.

दुसऱ्याच क्षणी शेषाचलम् मागे वळला. अन् वीरनारायणचा गळा धरून त्याला दरडावून म्हणाला–"तुझ्या खिशात असतील ते पैसे काढ, नाहीतर जीवच घेईन मी तुझा!"

वीरनारायण बिचारा भीतीने थरथर कापू लागला आणि ताबडतोब त्याने सर्व रक्कम शेषाचलमच्या हातावर ठेवली.

भानुमतिचे इकडे काय घडतंय याकडं मुळीच लक्ष नव्हते. ती आपली आपल्या वेदनेमुळे ओरडत, विव्हळत होती–"देवा, माझ्या चेहऱ्याची आग होतेय्. सहन नाही करवत मला देवा!"

वीरनारायण अगदी वैतागून गेला होता, त्यामुळे चिडून त्याने बायकोचे खांदे पकडून तिला गदागदा घुसळत म्हटले–"ए, तुला आपल्या एका डॉक्टरकडेच घेऊन जात आहे मी. ओरडू नकोस राक्षसणी!"

मग काय! दुसऱ्याच क्षणी भानुमतीचे एका राक्षसीत रूपान्तर झाले. वीरनारायण जोरात किंचाळून पळू लागला, राक्षसीच्या रूपातली भानुमति त्याचा पाठलाग करू लागली.

पळता-पळता दोघंही गावची सीमा ओलांडून एका आमराईत पोचले. तिथे पोचताच एकदा वीरनारायणने मागे वळून पाहिले. त्याला आपली बायको मागे न दिसता, त्याबदली दोन देव त्याच्या रोखाने येत असलेले दिसले.



भय अन् आश्चर्याने वीरनाराणने त्यांना विचारले–"तुम्ही कोण आहात?"

"आम्ही तर 'तथास्तु भगवान्' आहोत." त्या दोघा देवांनी उत्तर दिले.

आत्ता वीरनारायणच्या नीट लक्षात आले की, आपण दिलेल्या शिव्या खऱ्या होण्याचं कारण कोण आहे ते!

त्याने तावडतोब त्यांच्याकडे धाव घेतली आणि आपल्या रोखाने धावत येणारी राक्षसी त्यांना दाखवून म्हटले–"माझ्या चुकांबद्दल क्षमा करा मला! मी पुन्हा कधीही आपल्या तोंडाने शिव्यांचा उच्चार करणार नाही. पण माझ्यावर दया करून माझ्या बायकोला राक्षसिणीच्या रूपातून मुक्त करा ना!" अशी विनंती करत वीरनारायणने तथास्तु भगवानांच्या पायांवर लोटांगण घातले.

"तथास्तु! या क्षणापासून तुझ्या बायकोला राक्षसरूपातून मुक्ति मिळेल! इतकेच नव्हे, तर एका राक्षसासारख्या नवऱ्याकडूनही तिला मुक्ति मिळेल! एकसारखे उगीचच शिव्या देत सुटणाऱ्या माणसाबद्दल एखाद्याला भीती वाटेल कदाचित्, पण अशा व्यक्तीबद्दल त्याला आदर आणि प्रेम मात्र कधीच नाही वाटणार! हे पक्के लक्षात ठेव." असे म्हणून 'तथास्तु भगवान्' तिथून अदृश्य झाले.

राक्षसी रूपातून मुक्त झालेली भानुमति आपल्या पतीजवळ आली अन् आश्चर्याने म्हणाली–"अहो, तुम्ही असे इकडे तिकडे पहात भयाने कापत का आहात? अशा मध्यरात्रीच्या वेळी आपण गाव ओलांडून या आमराईत कसे काय आलो?"

"ती सगळी गोष्ट मी तुला नंतर सांगेन. आता अगोदर आपल्या घरी चल पाहू." असे म्हणत वीरनारायण आपल्या घराकडे वळला. आपल्या कोणत्याही प्रश्नावर सदान् कदा–"ए चुप बस भिकारणी" असं काही न म्हणता गप्प रहाणाऱ्या नवऱ्याला पाहून भानुमतीचा आनंद गगनात मावेना! ती मुकाट्याने आपल्या नवऱ्यामागून चालू लागली.





# मुनि आणि शिकारी

कुठल्याशा एका जंगलाजवळच्या एका गावात एक शिकारी रहात असे. जंगलातल्या जनावरांची मोठ्या निर्दयतेने शिकार करून तो आपली गुजराण करीत असे. त्यामुळे सर्वजण त्याला 'निर्दयी' म्हणूनच पुकारत!

एके दिवशी त्याला कुठलीच शिकार मिळाली नाही. शेवटी सगळं जंगल धुंडाळल्यावर त्याला एका मृगशावकाची शिकार मिळाली. आपली शिकार खांद्यावर टाकून तो घराकडे निघाला.

रस्त्यात त्याला एक मुनि दिसला. त्याने शिकाऱ्याला हाक मारली—"इकडे ये बेटा!"

निर्दयीने मुनिजवळ जाऊन विनयपूर्वक विचारले—"स्वामीजी, आज्ञा करा, काय गोष्ट आहे? का हाक मारली मला?"

"जखमांनी घायाळ झालेल्या त्या मृगशावकाला जमिनीवर झोपव पाहू!" मुनिने आज्ञा दिली.

निर्दयीने त्या पिल्लाला जमिनीवर झोपवले. मग मुनिने आपल्या कमंडलूतले पाणी घेऊन त्याच्या शरीरावर शिंपडले.

तावडतोब ते पिल्लू माणसाच्या आवाजात बोलले—"महाराज, सोडून द्या ना मला! मी माझ्या मातापित्यांचा एकुलता एक बच्चा आहे. माझी वाट पहात रडून रडून ते आतापर्यंत बेशुद्ध झाले असतील! तुला ही पुत्रवात्सल्याचा अनुभव असेलच की! तुझा मुलगा तुला दिसला नाही, तर तू सुखाने झोपू शकशील का?"

हे शब्द ऐकून निर्दयीला आपल्या मुलांची आठवण झाली. आपण रोज निर्दयतापूर्वक जी हत्या करतो ती मुलांसाठीच ना? आपली मुलं जशी आपल्याला प्यार असतात तशीच इतर सर्वांनाही आपापली मुलं आवडत असणारच की!

असा विचार करून निर्दयीने मृगशावकाला तावडतोब बंधनमुक्त केले, कसल्याशा पाल्याचा रस त्याच्या जखमांवर पिळला अन् त्याचा उपचार करून शिकारी स्वत: रिकाम्या हातानेच घरी परतला! त्या दिवशी त्याच्या घरातील सर्वांना उपास घडला!

दुसऱ्या दिवशी शिकाऱ्याने एका हरणाची शिकार केली. आणि हरीण आपल्या खांद्यावर टाकून तो गावाकडे परत फिरला. पुन्हा त्याला मुनि दिसला. मुनिने त्याला जवळ बोलवून कमंडलूतलं पाणी त्या हरिणावर शिंपडले.

ते हरिणही मनुष्यवाणीने बोलू लागले—"महाराज, माझी पत्नी गर्भवती असून तिचे दिवस आता पूर्ण भरले आहेत. तिला फारशी हालचालही करता येत नाही. मी तिला काही खाणं घेऊन जावं म्हणूनच काही भक्ष्य शोधण्यासाठी भटकत होतो, आणि तू माझीच शिकार करू पहात आहेस! हा कुठचा न्याय? तुझ्यासारखाच एक जीव म्हणून माझा विचार करून पहा!"

निर्दयीचे हृदय द्रवलं आणि विरक्त भावाने तो पुन्हा जंगलातून परतला. मुनिचे दर्शन घेऊन त्याने सांगितले—"स्वामीजी, आपणामुळे माझ्या मनात दया-धर्माची भावना जागृत झाली आहे, आणि त्यामुळेच मी शिकार करू शकत नाही. परंतु त्याचमुळे

तारा देशपांडे



माझी बायकोपोरं आज उपाशी मरत आहेत. मला ते दारुण दृश्य बघवत नाही. म्हणूनच मी ठरवलं आहे की या सर्वांना कारण बनलेल्या आपणापुढेच फास लावून प्राण द्यावा. म्हणून मी इथे आलो आहे.

मुनि थोडे हसत म्हणाला–"माझा उद्देश केवळ तुला जीवहिंसेपासून परावृत्त करण्याचाच होता, उपास करून कोणी प्राण द्यावा हा उद्देश कधीच नव्हता. केवळ शिकार करूनच पोट भरता येतं ही तुझी समजूत मात्र अगदीच चुकीची आहे.

"स्वामीजी, दुसरा कुठला उपाय असेल. तर कृपा करून सांगा ना!" निर्दयीने हात जोडून मुनिला विचारले.

मुनिने आश्रमाच्या आसपास चरणाऱ्या काही गायींकडे अंगुलिनिर्देश करीत म्हटले–"हे बघ, यापैकी तीन चांगल्या दुधाळ गायी तू इथून आपल्या घरी हाकलत घेऊन जा. त्यांची चांगली देखरेख कर. त्या जे दूध देतील, त्यापासून तुझे दिवस तुला अगदी सहज चालवता येतील."

मुनिच्या या बोलण्याने निर्दयी एकदम संतुष्ट झाला आणि तीन गायी घेऊन आपल्या गावी पोचला.

शिकाऱ्याला जंगलातून चांगल्या दुधाळ गायी घेऊन परतताना पाहून गावकऱ्यांना फार आश्चर्य वाटले.

निर्दयीने त्यांना सारी हकिकत सांगून म्हटले–"आजपासून मी शिकार करणं सोडलं आहे."

गाववाले त्याचं म्हणणं ऐकून फार खुश झाले. आणि ते त्याच्या मदतीला सरसावले. काही जणांनी त्याला गोठा बांधण्यासाठी जरूर ते बांबू दिले, तर काहींनी गवत वगैरे दिले.

अशा प्रकारे निर्दयी शिकारी आता गुराखी झाला, गोपालक बनला! त्याचे सारे कुटुंब आता मनापासून त्या गायींच्या सेवेला लागले. गायींना काही कमी पडू नये यासाठी सर्वजण खूप काळजी घेऊ लागले, आणि गायीचे दूध जवळच्या शहरात विकून मजेने आपलं पोट भरू लागले.






[१०]

['सोन्याची दरी' राज्यात येऊन मान्त्रिकाने राजाला फसवून त्याला सुवर्णप्रतिमेच्या मागील गृहेत कोंडले, आणि स्वत: राजाची वस्त्रे आणि आभूषणे घालून बाहेर आला. अद्भुत असा तो धबधबा पार करून विनोद मुनिच्या मदतीने मानवलोकाची सीमा ओलांडून स्वप्नभूमीत पोचला आणि तिथे त्याला एक विचित्र दृश्य दिसले. पुढे वाचा...]

जवळच्याच एका छोट्या खाईत एक विचित्र रूपाचा प्राणी आपल्या हातात एका लांब नळीचे टोक धरून उभा होता. त्याच्या समोरच एक मोठ्याश्या चेंडूच्या आकाराची एक वस्तु होती. त्याच्या हातातल्या नळीचे दुसरे टोक त्या चेंडूला जोडलेले होते, अन् आपल्या हातातल्या नळीचे टोक दातात घट्ट पकडून त्यात फुंकर मारताना त्याच्या तोंडात एक विचित्र प्रकाश चमकताना दिसत होता!

थोड्याच वेळात तो चेंडू प्रथम रक्तासारखा लाल आणि लगेच थोड्या वेळात एकदम काजळासारखा काळा होऊन त्यांतून एक प्रकारचा धूर निघू लागला. तो प्राणी थोडा पुढे झुकून तो धूर आपणाकडे ओढू लागला. असे करताना त्याचे डोळे घुबडाच्या डोळ्यासारखे चमकत होते.

मनोज दास



"महात्मा, मुनिवर! हे विचित्र दृश्य कसलं?" विनोदने मुनिला विचारले.

"हे सारे म्हणजे स्वप्नभूमिचा एक भाग आहे. पृथ्वीवरील जनता जी स्वप्ने पाहते तीच इथे प्रतिबिंबित होतात. एकाच प्रकारची स्वप्ने संक्षिप्त होऊन एक विशिष्ट रूप धारण करतात. आत्ता तुला जे दिसत आहे ते कित्येक हजार स्वप्नांचे एकत्रित असे छोटे रूप आहे. जी माणसे स्वत:ला फार बुद्धिमान समजतात, अशा वज्रमूर्ख माणसांनी पाहिलेल्या स्वप्नांचे हे संक्षिप्त रूप आहे. असली स्वप्न पाहणारी माणसे जगाला विषमय बनवतात. पैसे मिळवण्यासाठी ही माणसे कुमार्गाने जातात, खाद्यपदार्थात मिसळ करतात, वस्तूंचे भाव विनाकारण वाढवून गरीब जनतेचे शोषण करतात. गरीबी हटविण्याच्या घोषणा करतात. प्रत्यक्षात मात्र काही करीत नाहीत. त्यांच्या मनात असतो स्वार्थ! स्वार्था पोटी वाटेल त्या अन्यायी मार्गांनी हे फायदा मिळवतात. पाप करताना त्यांना लाज वाटत नाही. असा लाभ मिळवताना आपण किती अन्याय करतो याचे त्यांना भान नसते. उलट अशा वेळी त्यांना आनंदाचे भरते येते. बघ, त्या प्राण्याचा चेहरा कसा प्रफुल्लित दिसतो आहे!" मुनि म्हणाला.

विनोदने पुन्हा त्या खाईकडे पाहिले. तो विचित्र प्राणी मोठ्या आनंदाने धूर आपणाकडे खेचून घेत एकाद्या डुकरासारखा गुरगुरत होता! तो जसजसा धूर गिळत होता तसतसे त्याचे पोट मातीच्या रांजणासारखे फुगत होते! आणि आता हळूहळू त्याच्या चेहऱ्यावरचे हसू मावळून त्या जागी वेदना दिसू लागली!

"अरे! मला वाटतं ह्याला कसली तरी वेदना होत असावी!" विनोद आश्चर्याने म्हणाला.

"बरोबर! त्याला असह्य वेदना होत आहेत. जी माणसं दुसऱ्यांचं हित इच्छित नाहीत, त्यांची अशीच दुर्गति होते. अशांना शुद्ध हवाही मिळू शकत नाही." मुनि म्हणाला.



थोड्याच वेळात तो प्राणी खाली पडून तडफडू लागला. विनोदला त्याच्याकडे पाहवेना! त्याने आपली दृष्टि दुसरीकडे वळवली.

त्या बाजूला जमिनीवरून विचित्र अशा तेजोरेखा बाणांप्रमाणे वरच्या बाजूला प्रसारित होत होत्या. त्या तेजोरेखांना खेटूनच एक विशाल वटवृक्ष उभा होता. त्या तेजोरेखांपैकी एकच रेखा झाडाच्या ऊंच फांदीकडे पसरत होती. आणि गिधाडासारखे विचित्र पक्षी ती तेजोरेखा वर पसरू नये म्हणून आपले पंख फडफडावून तिला विझवायचा प्रयत्न करत होते!

तिथला तो प्रकाश जनतेसाठी हित-कामना करणाऱ्या लोकांच्या स्वप्नांचे स्वरूप आहे. दुर्बळ व्यक्तींची स्वप्ने नेहमी अर्धवटच राहतात!

"तेजोरेखा वर पसरायला अडथळा करणाऱ्या पक्ष्यांबद्दल काही सांगता येईल?" विनोदने विचारले.

"इतर माणसांच्या सुखसोयी पाहून मनात जळत रहाणाऱ्या माणसांचे प्रतीक म्हणजेच हे पक्षी. अशा व्यक्तींचे दुष्ट मनोरथ हाणून पाडायचे असतील तर बाकीच्यांनी अधिक दृढनिश्चयाने झगडले पाहिजे." मुनि उत्तरला. जरा वेळ गप्प राहून मुनि पुन्हा बोलू लागला–"आता आपल्याला संतुष्ट-शांत भूमीत प्रवेश





करायचा आहे. त्यासाठी एकाच झेपेत ही खाई ओलांडावी लागेल. येईल तुला ओलांडता?" मुनिने विचारले.

"माझ्यावर आपली कृपा असेल तर नक्कीच येईल ओलांडता." विनोद आत्मविश्वासाने म्हणाला.

"अरे वा! असा विश्वास असेल तर कितीही मोठं अन् अवघड कार्य साध्य करता येईल. आता तू माझ्याजवळ येऊन माझा हात धर, आणि आपली सारी शक्ति एकवटून माझ्याबरोबर पुढे उडी मार." असे म्हणत मुनिने विनोदचा हात आपल्या हातात घेतला.

विनोदने डोळे मिटून मुनिच्या म्हणण्याप्रमाणे पुढे उडी मारली. एकाद्या पावसाच्या थेंबाप्रमाणे अगदी सहजपणे त्या दरीपलीकडे पोचला. तेथे पोचल्यावर विनोदने डोळे उघडले व चहूकडे दृष्टि फिरवली. दिगंतापर्यंत पसरलेल्या रंगीबेरंगी बागा अन् उद्याने इंद्रधनुष्यासारखी सुन्दर दिसत होती. विविध पक्ष्यांचा कलरव कानी येत होता. मंद वारा त्याचे मन सुखवीत होता! रंगीबेरंगी फुलांसारखे भासणारे ढग त्याच्या मस्तकाभोवती तरंगत होते! त्याने इकडे तिकडे पाहिले, पण मुनिचा कुठे पत्ताच नव्हता! इतर सामान्य परिस्थितीत मुनिच्या गायब होण्यामुळे विनोदला काळजी वाटली असती. परंतु आत्ता विनोदला कसलीही काळजी नव्हती! विनोदच्या लक्षात आले की इथले वातावरणच चिन्ता, दुःख इत्यादींपासून मुक्त आहे. त्या प्रशान्त वातावरणात त्याचे मन पुलकित झाले. आणि आता तो आपली लहानपणी शिकलेली गाणी मधुर स्वरात गाऊ लागला. थोड्या वेळात सूर्योदय झाला. गातगातच विनोदने मागे वळून पाहिले–त्याच्या मागेच एक अनुपम सुन्दर अशी तरुणी बसलेली होती! विनोद अचानक आपले गाणे थांबवून तिच्याचकडे एकटक पाहू लागला.

"कृपा करून गाणं बन्द नको करूस, गा न!" ती तरुणी त्याला विनवू लागली.



तरीही विनोद थोडा वेळ जडवत उभाच राहिला, अन् नंतर जणू स्वगत बोलल्यासारखा म्हणाला.

"अरे! आश्चर्यंच आहे मोठं!"

"कसलं आश्चर्य?" त्या तरुणीने विचारले.

"खरं तर मी तुला आत्ता प्रथमच पहात आहे, पण तुझं हसणं मात्र मला चिरपरिचित असल्यासारखं वाटत आहे! तू कधी आमच्या 'सोन्याची दरी' वाल्या राज्यात तर नव्हती आलीस?" विनोदने विचारले.

ती मुलगी खळखळून हसली, अन् म्हणाली—"नाही! ही माझी सुन्दर दरी सोडून इतरत्र कुठे जायची जरूरच मला कधी पडली नाही! पण काय रे, तुला आमची ही दरी सुन्दर नाही वाटत?"

"सुन्दर? बाप रे! याहून सुन्दर अशा बगीचांची मी कल्पनाच नाही करू शकत! पण आत्ता मला एका गोष्टीची आठवण येत आहे—मी नेहमी आमचं राजधानीचं शहर सोडून, बाहेर जंगलातल्या झाडी अन् तिथे असणाऱ्या भग्नावशेषात खेळत आपला वेळ काढत असे. जणू काही आकाशातल्या ढगातूनच आल्यासारखा एक विचित्र पक्षी तिथे येऊन एका झाडाच्या फान्दीवर बसे. आणि म्हणे—'दूर तटावर रहाणारी युवराणी, युवराणी!'—अन् अशा वेळी मन्दमन्द हसणाऱ्या एका तरुणीचा चेहरा माझ्या नजरेसमोर स्पष्ट साकार होई! आत्ता तुला पाहून मला त्या तरुणीची आठवण येत आहे." विनोद म्हणाला.

"असं होय? मी या भूमिची युवराज्ञी आहे. मी जेव्हां जेव्हां झोपते तेव्हां तेव्हां झोपेतच नेहमी मला एका गाण्याचे सूर ऐकू येतात. ते गाणं अन् आता तू जे गाणं गात होतास ते अगदी एकसारखं आहे! मी पण तसे सूर गुणगुणायचा कितीदा प्रयत्न केला, पण जमलचं नाही. इथली वडीलधारी माणसं म्हणतात की या भूमीच्या पलिकडल्या बाजूला एक देव





आहे, अन् त्या देवाचा वर मिळवता आला, तरच असं गाणं गाता येईल. पण इथल्या लोकांना त्या देवाचं दर्शन करायला जाणं अशक्य आहे." त्या युवराज्ञीने चिन्तापूर्ण स्वरात म्हटले.

"पण मी तर गाणंच गातो आहे ना?" विनोद म्हणाला.

"हां हां! गाणंच! पण मी जर आपल्या आयुष्यांत एकदाच जरी असं गाऊ शकले तरी आपला जन्म धन्य झाला असं मानीन."

"खरंच, तुझा आवाज तर गोड आहे, मग तू का गाऊ शकत नाहीस?" विनोदने आश्चर्याने विचारले.

"मीच काय, पण इथला कोणीही माणूस गाऊ शकत नाही! असं गाण्याचं सौभाग्य आमच्या कुणाच्याच नशिबी नाही! पण खरी गोष्ट अशी की, इथे माझ्याशिवाय 'आपल्याला गाता यावं' असं कुणाला वाटत ही नसेल." युवराज्ञी म्हणाली.

या गोष्टीचे आश्चर्य करीतच विनोद एका शिळेवर बसला. युवराज्ञीही त्याच्या समोर बसली. हिचं रूप तर मूर्तिमंत संगीतच आहे! पण बिचारी स्वतः गाऊ नाही शकत!

विनोदला मुनिने सांगितलेली एक गोष्ट आठवली—कि इथले लोक म्हणजे सामान्य प्राणी नव्हेत. माणूस सोडून इतर कोणत्याही सजीव प्राण्याला बोलता येत नाही. तरीही अनेकदा माणसं नीट न बोलता सापासारखी फुत्कारतात, माकडांसारखी भांडतात अन् काही माणसं तर कुत्र्यासारखी भुंकतात!

विनोदच्या मनात आले की इतर प्राण्यांपेक्षा मनुष्य प्राणी किती भाग्यवान! माणूस मजेने हसू शकतो, सुन्दर गाणं गाऊ शकतो, अनेक चमत्कार करू शकतो. पण तरीही आपल्यातल्या अज्ञानामुळे अनेक माणसं आपणाला मिळालेल्या या खास शक्तींचा बरोबर वापर करत नाहीत. केव्हातरी मुनिने सांगितलेल्या या गोष्टी अगदी खऱ्याच आहेत, हे आत्ता विनोदच्या प्रत्ययास आले.

"युवराज्ञी, खरं पाहता आता तू ज्या देवाबद्दल बोललीस त्याचेच दर्शन घेण्यासाठी मी या भूमीत आलो आहे. पण तिथे जाण्याचा मार्ग मला माहित नाही. तू जर मला बरोबर रस्ता सांगितलास तर त्या देवाकडून तुला गाता येईल असा वर मी मिळवीन." विनोद मोठ्या उत्साहाने म्हणाला.

"मी पण तुला एक गुप्त गोष्ट सांगते— नीलपर्वताच्या शिखरावर एक विचित्र रोपटं आहे. त्याला वर्षभरात एकच फळ येतं. त्याला 'नक्षत्रफळ' असं म्हणतात. ते फळ जो खाईल त्यालाच ही भूमी ओलांडून त्या देवाच्या ठिकाणापर्यंत जाता येईल." युवराणीने उत्तर दिले.

"मग हे सगळं इतकं सोपं असतांना तू का नाहीं आता पर्यंत एकादं फळ खाल्लंस?" विनोदने विचारले.

विनोदचा प्रश्न ऐकून युवराणी एकदम हसली अन् म्हणाली—"अरे, तुम्ही मानवलोकातली माणसं जसं अन्न खाता, तसं आम्ही काही खात नाही."

यावर आश्चर्याने विनोदने विचारले— "मग तुमच्या शरीराला आवश्यक ती शक्ती कशी मिळते? तुमचा विकास कसा होतो?"

"एकाद्या फुलाचा विकास कसा होतो? तसाच आमचाही विकास होतो. सूर्यप्रकाशापासून आम्हाला आवश्यक ती शक्ती मिळते, त्यामुळे आम्ही तहान-भूक यांच्या पलिकडे असतो. इतकंच काय? तू सांग, तुला इथे आल्यापासून भूक लागली?" युवराणीने विचारले.

"होय, मला आत्ता भूक लागलेली नाही, ही गोष्ट खरीच. पण भूक नसताना फळ खाता येईलच की!" विनोद विचारू लागला.

"अशक्य! कारण जे काम इथे अनावश्यक आहे, ते कोणी करायचा प्रयत्न केला तरी त्याला ते करता येणार नाही." युवराज्ञीने स्पष्टपणे सांगितले.

इतक्यात एक हरीण तेथे धावत आले.

(क्रमशः)



# मारण्यास्त्र

दृढव्रती विक्रमादित्य झाडा जवळ परत आला, झाडावरून प्रेत खाली उतरवले नि खांद्यावर टाकून नेहमीप्रमाणे स्मशानाकडे जाऊ लागला. तेव्हा शवात वास करणाऱ्या वेताळाने त्याला विचारले— "राजन्, आपण एका देशाचे राजा असून ही काही क्षुद्र शक्ति मिळविण्यासाठी श्रम करणाऱ्या कापालिका प्रमाणें अशा अर्ध रात्रीच्या वेळी स्मशानात संचार करीत आहात याचे मला आश्चर्य ही वाटते अणि दुःख ही! आपण जशा अत्यन्त अवघड कामात यश मिळविण्याच्या कामी प्रयत्न करीत आहात, कोणी विचारवन्त माणूस आपले अवघड कार्य सिद्ध करण्यासाठी याहून अधिक परिश्रम करीत असेल असे मला वाटत नाही. पोहण्याची कला जाणणारा माणूस सहजा सहजी मिळणारी नाव सोडून पोहून नदी पार करीत नाही.

वेताळाच्या गोष्टी



तसं त्याने केलं तर त्याला अविचारीच म्हटलं पाहिजे. नागेन्द्रवर्मा नावाच्या एका राजाने अगदी असंच केलं. परिश्रम विसरण्यासाठी मी आपणांस ती गोष्ट एकवितो. ऐका–"

नागेन्द्रवर्मा मलय देशावर राज्य करीत होता. त्या देशात हळू हळू अराजकता वाढत चालली. परिणाम असा झाला की दिवसा-ढवळ्या लुटालूट, हत्या, आग लावणे असले प्रकार घडू लागले.

एक दिवशी राजाने या विद्रोही लोकांच्या कारवायांवर काय उपाय करावा याबाबत मंत्री मयूराक्षाशी सल्ला-मसलत केली. त्यांचे बोलणे चालू असताना एका सेवकाने प्रवेश केला आणि राजाला भेटण्यासाठी एक विदेशी व्यापारी आल्याची बातमी दिली.

परदेशी व्यापारी राज-महालात आला आणि त्याने मोठ्या अदबीने राजाला प्रणाम करून आपले निवेदन सादर केले– "महाराज, मी कांभोज राज्यांतील एक व्यापारी आहे. आपल्या शांति स्थापिण्याच्या प्रयत्नात माझे हे अस्त्र काही उपयोगी पडण्यासारखे असेल तर ते मी आपणास विकू शकेन." असं म्हणून व्यापाऱ्याने एक लांबड्या नळीसारखे साधन राजाच्या हाती दिले.

राजाने ते अस्त्र नीट बारकाईने पाहिले नि व्यापाऱ्याला विचारले–"या अस्त्राची विशेषता काय आहे बरे?"

यावर व्यापारी म्हणाला–"महाराज, या नळीच्या बुडाशी एक कळ बसविलेली आहे. आंगठ्याने ती दाबताच सुईसारखी तीक्ष्ण एक तार वेगाने बाहेर येते. आपला लक्ष्य बिंदु मनुष्य असो वा जनावर, ती तार तेथे पोंचून लक्ष्याचे प्राणहरण करील."

आश्चर्याने राजा काही बोलणार इतक्यात मंत्री म्हणाला–"प्रभु, या यंत्राच्या सामर्थ्याची नीट परीक्षा केल्यानंतरच आपण ते खरेदी करावे. हा व्यापारी एक-दोन दिवसानंतर पुनः भेटायला आला तर छान होईल."





मंत्र्याचा सल्ला राजाला पटला. मग व्यापाऱ्याने आपले यंत्र राजा जवळ ठेवले नि तो तेथून निघून गेला.

त्याच दिवशी रात्री आपल्या शय्या-गृहात राजा नागेन्द्रवर्मा गाढ झोपी गेला असता मध्य-रात्री एकदम खडबडून जागा झाला. ताबडतोब बिछान्यावरून खाली येऊन राजा ओरडला–"कोण आहे तिकडे?"

आपल्या तोंडावर मुखवटे चढवलेली दोन माणसे हातात तलवार घेऊन पुढे येत होती.

त्याच क्षणी राजाला आपल्या उशी खाली ठेवलेल्या मारणास्त्राची आठवण झाली. राजाने ते अस्त्र आपल्या हाती घेऊन त्या मुखवटाधारी व्यक्तींच्या रोखाने नेम धरून कळ दाबली. ते दोघे ही किंचाळू लागले आणि खाली जमिनीवर पडले.

ही आरडाओरड ऐकून राजाचे सैनिक व सेवक धावत-पळत तेथे जमा झाले. नीट पाहिल्यावर असं समजलं की मृत व्यक्तीत एक राजाचा अंगरक्षक ही आहे. मारणास्त्राच्या अद्भुत शक्ती बद्दल विचार करीत राजा अमळ उभा राहिला.

दुसऱ्या दिवशी विदेशी व्यापारी राजाला भेटायला आला. तेव्हां राजाने त्याला म्हटले–"तू तर मोठा कुशल व्यापारी दिसतो आहेस! तुझ्या मारणास्त्राची शक्ती अद्भुत आहे खरी! आम्हाला हजारोंच्या संख्येने ही अस्त्रे हवीत."

व्यापारी आनन्दाने म्हणाला–"मला आवश्यक ती सामग्री नि कारागीर पुरवलेत तर किती ही अस्त्रे मी आपणासाठी तयार करू शकेन! फक्त मला त्यांचा योग्य दर मिळाला पाहिजे."

राजा आपली स्वीकृति देणार एवढ्यात मंत्री मधेच बोलला–"महाराज, मी या व्यापाऱ्याला काही प्रश्न विचारू इच्छितो. आपण मला परवानगी द्यावी."

राजाने होकार दिला. मंत्र्याने व्यापाऱ्याला प्रश्न विचारला–"हे पहा, तुमच्या



देशात अशी मारणास्त्रें तयार करणारे किती लोक आहेत?"

"माझ्या शिवाय आणखी ही काही लोक आहेत. पण त्याचा काय उपयोग? आमच्या देशाच्या राजाने या मारणास्त्राच्या निर्मिती वर प्रतिबंध घातला आहे." व्यापाऱ्याने आपली नाखुशी दाखविली.

"तुमच्या राजाला शत्रूचे भय नाही का?" मंत्र्याने आणखी एक प्रश्न विचारला.

"का नाही? अवश्य आहे!" व्यापाऱ्याने उत्तर दिले.

मंत्र्याने विचारले—"तुमच्या देशात अराजकता माजलेली नाही का?"

"आहे, पण या राज्याशी तुलना केली तर कमी इतकेच!" व्यापाऱ्याने प्रश्नाचे उत्तर दिले.

यावर मंत्री राजाला उद्देशून म्हणाला—"प्रभु, आपण ऐकत आहात ना? कांभोज देशाच्या राजाने या मारणास्त्रांच्या निर्मितीवर बंदी घातली आहे. त्या देशाचा नागरिक हा व्यापारी मात्र ही अस्त्रें निर्माण करून पैसे मिळवू इच्छित आहे!"

मंत्र्याचे म्हणणे ऐकून राजा नागेन्द्रवर्मा अमळ गप्प राहिला आणि त्याने शांतपणे थोडा विचार केला. राजाने हातांतील अस्त्र मोडून फेकून दिले आणि मंत्र्याला उद्देशून म्हणाला—"या व्यापाऱ्याला एक हजार मुद्रा इनाम देण्याची व्यवस्था करा." यानंतर त्या व्यापाऱ्याला राज्याबाहेर काढून लावण्याबाबत आपल्या सेवकांना त्याने आज्ञा दिली.

मंत्र्याने राजाच्या आज्ञेबरहुकूम सर्व काही केले. एक आठवड्या नंतर देशांतील अराजकता दूर करण्याचे व शत्रुपक्षांतील पाताळयंत्री कारवाया करणारां विरुद्ध बन्दोबस्ताचे काम राजाने स्वतः आपल्या हाती घेतले. राजाने देश भर भ्रमण करून जनतेत देशभक्ति व ऐक्य यांची आवश्यकता प्रतिपादन केली. या प्रचारामुळे



देशात शांति व सुरक्षा स्थापित व्हावयास फार वेळ लागला नाही.

वेताळाने राजाला ही गोष्ट सांगितली आणि विचारले—"राजन्, माझ्या मनात अशी शंका येते की नागेन्द्रवर्मा परदेशी व्यापाऱ्याकडून मारणास्त्रांची निर्मिती करून ती अस्त्रे आपल्या सैनिकांना देऊन आपल्या शत्रूंचा नायनाट करू शकला नसता का? तसेच आत्मरक्षणासाठी ही अस्त्रे जनतेला देऊं शकला असता! हे काम तर फार सोपं होतं! पण राजाने असे न करता परिश्रमपूर्वक देशात भ्रमण करून देशभक्ति व ऐक्याचा प्रचार केला. याचे कारण काय असावे बरे? या माझ्या शंकेचं समाधान जाणून ही तू केलं नाहीस तर तुझ्या डोक्याची शकले-शकले होऊन जातील."

यावर विक्रमादित्यानें उत्तर दिले—"मारणास्त्राचा उपयोग करण्याचे राजाने टाळले ही नागेन्द्रवर्माची राजनैतिक चतुराई आहे. माणसाचे मनोविज्ञान राजाला बरोबर समजले होते असे मला वाटते. या कामी मंत्र्याने विदेशी व्यापाऱ्याला विचारलेले प्रश्न व त्यांची व्यापाऱ्याने दिलेली उत्तरे यांची खूप मदत झाली निःसंशय! ज्या देशाला शत्रूचे भय नाही असा देश विरळाच. तसेच असा समाज कुठे असेल जिथे जनतेला आत्मरक्षणाची आवश्यकताच नाही! या दोन समस्यांचे निराकरण जनतेत मारणास्त्रे वाटून कधीच होणार नाही! याचं प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे विदेशी व्यापाऱ्याने सांगितलेला कांभोज राजाचा स्वानुभव. जर सर्व लोकांच्या हाती मारणास्त्रे आली तर यत्किंचित् कारणे व मतभेदांच्या वेळी लोक त्यांचा साधन म्हणून उपयोग करतील. हे सर्व जाणूनच नागन्द्रवर्माने परिश्रम करून देशात भ्रमण केले नि जनतेत देशभक्ति व एकता या गुणांचा प्रचार केला. त्याचे हे कार्य अत्यंत प्रशंसनीय आहे असे मला वाटते."

राजाचे हे शब्द ऐकून वेताळ शवा सह पुनः अदृश्य होऊन झाडावर जाऊन बसला.

(कल्पित)





# अपुरी इच्छा

धर्मपुरी नावाच्या एका गावात एक मनुष्य रहात असे, त्याचं नाव सोमसुंदर. गावात त्याचं एक वाण-सौद्याचं दुकान होतं. त्याची देव-देवतांवर श्रद्धा-भक्ति होती, तसेच गरीबांबद्दल त्याला सहानुभूति वाटे. त्याची पत्नी कामेश्वरी पण एक आदर्श गृहिणी होती.

एक दिवशी दुपारी सोमसुंदरच्या घरी कृपानन्द नावाचा एक संन्यासी दाखल झाला आणि त्याने विचारले—"या वेळी या घरात मला आतिथ्य मिळू शकेल का?"

सोमसुंदरने संन्याशाच्या तोंडाकडे नीट निरखून पाहिले, त्याचा चेहरा अत्यन्त तेजस्वी होता. सोमसुंदरने लगेच संन्याशाला घरात नेले आणि छान स्वादिष्ट भोजनाची व्यवस्था केली.

जेवण झाल्यार संन्यासी सोमसुंदरला म्हणाला—"बेटा, तुझ्या आदरातिथ्याने मला आतिशय संतोष झाला. तुझी काही अपूर्ण इच्छा असली तर ती मला सांगशील? मी तुझी इच्छा आनन्दाने पूर्ण करीन."

संन्याशाने आणखी स्पष्टीकरण केले—"यात घाई करायचे काही कारण नाही. तू नीट चांगला विचार करून मग आपली अपुरी इच्छा सांग. अपुरी इच्छा म्हणजे प्रयत्न करून ही जी साध्य झाली नाही ती—हे नीट समजून घे."

अमळ विचार करून सोमसुंदर म्हणाला—"स्वामीजी, मी अनेक वर्षे व्यापार करीत आलो आहे. पण माझी काही प्रगति होत असलेली मला दिसत नाही. दारिद्र्याचं दु:ख मला सतत सतावीत असतं. मला या गरीबीच्या व्यथेतून आपण मुक्त करू शकाल? माझी अपूर्ण इच्छा ती हीच!"

सोमेश्वर

"ठीक आहे, एवढंच ना? आजपासून तुझं दारिद्र्य दूर झालं समज. हीच तुझी अपुरी इच्छा असं समजून मी आता जातो. दहा वर्षांनंतर मी पुन्हा तुला भेटायला येईन." असं म्हणून संन्यासी निघून गेला.

त्या दिवसापासून सोमसुंदरचा व्यापार दिवसें दिवस अधिक लाभदायक होऊ लागला. त्याचे सर्व बेत सफल होऊ लागले. जे काम तो हाती घेई ते तडीस जाऊ लागले.

हा हा म्हणता दहा वर्षांचा काळ लोटला. संन्यासी आपल्या वायद्यानुसार सोमसुंदरला भेटायला आला. सोमसुंदरने त्याचे छान स्वागत केले, त्याला पंचपक्वानांचे भोजन दिले.

जेवण झाल्यावर संन्यासी सोमसुंदरला म्हणाला—"हे बघ दहा वर्षांपूर्वी मी एकदा तुझ्याकडे आलो होतो. आता सुद्धा तुझी एकादी अतृप्त इच्छा असली तर सांग. पण एक गोष्ट लक्षात ठेव—एका माणसाची इच्छा मी एकच वेळा पूर्ण करू शकतो. म्हणून यावेळी तू एकादी इच्छा प्रकट केलीस नि मी ती पूर्ण केली तर यापूर्वी तुझी जी इच्छा मी पुरी केली होती, ती व्यर्थ जाणार. नीट विचार करून सांग. घाई नाही.

थोडा विचार करून सोमसुंदर म्हणाला—"स्वामीजी, जर मूळ-बाळ नसेल तर खूप संपत्ति असून त्याचा काय उपयोग? म्हणून मी संपत्तिचा त्याग करायला तयार आहे. मला संतति देऊ शकाल आपण?"



यावर संन्यासी मन्द-स्मित करीत म्हणाला—"बेटा, तू बरीच वर्षे व्यापार करीत आहेस. तुला त्यांतले कसब चांगले माहीत आहे. म्हणून पैसे मिळविण्यासाठी तुला कुणाच्या मदतीची आवश्यकता दिसत नाही. एकाद्या अनाथ बालकाचे पालन-पोषण केलेस तर संतान नसल्याचे तुझे दुःख कमी होईल. तेव्हां आपल्या दोन्ही इच्छांची पूर्ति तू स्वतःच करू शकतोस, हे सगळं नीट समजून घे."

सोमसुंदर थोडा वेळ गप्प राहिला नि मग त्याने साधूला विनविले—"स्वामीजी, आपणच कृपा करून मला मार्गदर्शन करा की मी कसली इच्छा बाळगावी?"

"जी इच्छा केल्याने तुला परम संतोष मिळेल, अशा प्रकारची इच्छा कर." संन्यासाने सल्ला दिला.

हे ऐकून सोमसुंदरला आपल्या असंतोषाचे मूळ कारण समजले. आपली एक इच्छा पूर्ण झाली की मनांत लगेच दुसरी इच्छा मूळ धरते. यामुळे जीवनात नित्य असंतोषच भरून राहतो.

सोमसुंदर नम्रतापूर्वक म्हणाला—"स्वामिन्, आता माझे डोळे उघडले. मला जीवनात संतोष मिळाला की पुरेसे आहे. असं झालं की माझ्या मनात कसल्याच प्रकारची कामना राहणार नाही!"

सोमसुंदरचा हा विचार ऐकून संन्याशाने संतोष पूर्वक होकार देत म्हटलं—"बरोबर, आता या क्षणापासून तुझ्या जीवनात असंतोष नावाची गोष्ट राहणार नाही. तुला जे काही मिळालं, त्यातच तू संतुष्ट राहशील." असं सांगून संन्याशाने सोमसुंदरचा निरोप घेतला.

सोमसुन्दरला अत्यंत आनंद झाला. संन्यासी पाठमोरा दूर दूर जात होता नि सोमसुंदर तो अदृश्य होईपर्यंत त्याच्याकडे संतोषाने पहात राहिला. आता सोमसुंदरच्या वाट्याला सुखच सुख आले. त्याने कसली ही इच्छाच ठेवली नाही.



महाकाव्य कथा :

## मुद्राराक्षस ४

चाणक्याचा मदतीने चन्द्रगुप्ताने नन्दांचा पराभव केला. चाणक्याने नन्दांचा मंत्री राक्षस याला चन्द्रगुप्ताच्या बाजूला वळविण्याची योजना आखली. चन्द्रगुप्ताशी मतभेद झाल्याचे ढोंग करून चाणक्य त्याचा दरबार सोडून निघून गेला.



चाणक्य व चन्द्रगुप्त यांच्यात वाद-विवाद झाल्याची वार्ता मलयकेतुला समजली. मलयकेतु आणि राक्षस यांना वाटलं की पाटलीपुत्रावर आक्रमण करण्याची हीच सोनेरी वेळ आहे. भविष्य काळात पुन्हा अशी संधि लाभणार नाही. असा विचार करून त्यांनी युद्धाची तयारी सुरू केली.





याच वेळी चाणक्याने एक बनावटी पत्र लिहविले. त्यात राक्षसाने चन्द्रगुप्ताला लिहिले की मलयकेतुचा संहार करण्याची वेळ आता जवळ येऊन ठेपली आहे.



मंत्री राक्षसाने उपयोगात आणलेली नन्द राजांची राजमुद्रिका चाणक्याने प्रयत्नपूर्वक मिळवली आणि त्याने लिहिलेल्या बनावटी पत्रावर ती अंकित केली. आणि मग हे पत्र आपल्या गुप्तचरां करवी मलयकेतुच्या राज्यात पाठवले.

पाटलीपुत्राच्या जवळ मलयकेतुच्या सैनिकांचा पडाव पडला होता. या गुप्त-चराने मलयकेतुच्या सैनिकांच्या तावडीतून सुटण्याचा प्रयत्न करीत असल्याचे नाटक केले आणि जाणून-बुजून त्यांचा बंदी बनला.





मलयकेतुला ही बातमी मिळाली. गुप्त हेरांच्या हातातील पत्र वाचून मलय-केतुला मोठेच आश्चर्य वाटले. ते पत्र पाहून मलयकेतुला वाटलं की राक्षस हा द्रोही आणि दगाबाज आहे. याशिवाय गुप्तचराने असे ही सूचित केले की मलयकेतुच्या बाजूचे काही राजे या राक्षसाच्या कटात सामिल

प्रथम मलयकेतुने राक्षसाचे म्हणणे समजून घेतले, तो म्हणाला—'या पत्राबाबत मला काहीच माहिती नाही.' तरी पण पत्रावर राक्षसाची मुद्रिका उठवलेली होती, म्हणून मलयकेतुने राक्षसाच्या म्हणण्यावर विश्वास ठेवला नाही. विरक्त होऊन तो तेथून निघून गेला.





यानंतर आपल्या विरुद्ध कट करणाऱ्या आपल्या आप्त-मित्रांचा मलयकेतुने संतापाच्या भरात खून केला. हे सर्व पाहून घाबरलेल्या लोकांनी एकत्र येऊन मलयकेतुवर हल्ला केला आणि त्याला कैद केले.

विरक्त होऊन राक्षसाने पाटलीपुत्राकडे प्रयाण केले. पाटलीपुत्रात प्रवेश करताच त्याला असे दृश्य दिसले की त्याच्या कुटुंबाचा आश्रयदाता चन्दनदास याला राज-सैनिकांनी बन्दी बनवून ते त्याला नगराबाहेर दूर घेऊन जात आहेत.





राक्षसाने जवळ जाऊन सैनिकांना विचारले–"तुम्ही चन्दनदासला का कैद करून घेऊन चालला आहात?" सैनिकांनी सांगितलं–"राक्षस आमच्या राजाचा शत्रु आहे. त्याच्या कुटुंबाला याने आश्रय दिला. या राजद्रोहाच्या अपराधास्तव याला मृत्युदंड फर्मा-वण्यात आला आहे. म्हणून आम्ही याला वध-स्थळी घेऊन चाललो आहोत."

"मीच तो राक्षस आहे. माझ्या परिवाराला आश्रय देणाऱ्या दयाळु माणसाला सोडून तुम्ही माझा वध करा." राक्षसाने सैनिकांना सांगितले. त्याच वेळी चाणक्य आपल्या परिवारा-सह तेथे येऊन पोचला आणि म्हणाला–"चन्द्रगुप्ताचा मंत्री बनवण्याचे वचन दिलेस तर तुझ्या मित्राचे प्राण वाचवून त्याला मुक्त केले जाईल."



यानंतर चाणक्याने राक्षसाला सांगितले–"तुला चन्द्रगुप्ताच्या पक्षात आणण्यासाठी जणू तूच लिहिले आहेस असे बनावटी पत्र मी पाठविले होते आणि इकडे चन्दनदासाला मृत्यु-दण्ड देण्याचे सोंग केले. चन्द्रगुप्ताचा मंत्री होण्याचे राक्षसाने मान्य केले. अशा प्रकारे चन्द्रगुप्ताने चाणक्याच्या मदतीने मगध राज्याबरोबर मंत्री राक्षसाला ही वश करून घेतले.



# विद्येचा महिमा

देवगिरी मध्ये सोमदेव नावाचा एक माणूस रहात असे. त्याला दोन मुलगे होते. मोठा मुलगा घरीच राहून शेतीवाडीचे काम करीत असे. दुसरा मुलगा जयदेव विद्या-प्रेमी होता. विद्या संपादन करण्याची इच्छा मनात ठेवून तो गुरूच्या शोधार्थ घर सोडून बाहेर पडला.

जयदेवाने कित्येक दिवस भ्रमण केले. धड अन्न मिळाले नाही, न झोप! शेवटी एका गावात एका घरासमोर बेशुद्ध होऊन पडला. ते घर होतं हरिशर्मा नावाच्या एका पंडिताचं!

हरिशर्मा जयदेवाला आपल्या घरात घेऊन गेला. प्यायला पाणी दिलं, त्याला न्हाऊ घातलं, जेवण दिलं आणि मग त्याची सारी हकिकत जाणून घेतली. जयदेव विद्या प्राप्त करण्यासाठी घर सोडून उत्तम गुरुच्या शोधार्थ भटकत आहे हे जाणून हरिशर्माला फार आनंद झाला. हरिशर्मा स्वत: एक विद्वान पंडित होता. म्हणून त्याने जयदेवाला तीन वर्षं आपल्या घरी ठेवून घेतलं, त्याच्या जेवणा-खाण्याची व विद्याभ्यासाची योग्य अशी व्यवस्था केली. जयदेवाची बुद्धि सूक्ष्म होती, म्हणून तीन वर्षांच्या कालात त्याने आपल्या गुरुकडून संपूर्ण ज्ञान संपादन केले.

तीन वर्षांनतर हरिशर्माने एकदा जय-देवला समजाऊन सांगितलं–"जयदेव, आणखी एका गुरुजवळ जाऊन आणखी काही विद्या शिकशील तर तुझे शिक्षण पूर्ण होईल. एक भिल्ल राजा तो गुरु आहे. तो तुला चौर्य-विद्या, शिकार वगैरे शिकवील. त्याच्याकडे मी तुला पोचवितो."

हरिशर्माने केलेल्या मार्गदर्शनानुसार जयदेव भिल्ल राजाकडे पोचला. हरिशर्माने पाठविलेला विद्यार्थी म्हणून भिल्ल राजाने

२५ वर्षापूर्वीच्या चांदोबातील गोष्ट



जयदेवला एक वर्ष पर्यंत आपल्या घरी ठेवून घेतले. त्याला चोरी करणे, चोराला पकडणे, जनावरांचा पत्ता लावणे, शिकार करणे वगैरे अनेक विद्या आणि कला शिकविल्या.

अशा रीतीने सर्व विद्या चांगल्या शिकून जयदेव आपल्या गावाकडे परत यायला निघाला. रस्त्यावर एका गावात पोंचला तेव्हां एका ब्राह्मणाच्या घरी त्याने प्यायला पाणी मागितले. त्या घराच्या मालकाने त्याला घरात बोलविले, त्याचा योग्य तो सत्कार केला आणि त्याची सर्व विचार-पूस केली. त्याची सर्व कथा ऐकून घर-मालकाने त्याला विचारले–"बेटा, तू एवढं शिक्षण घेतलंस, तुझी परीक्षा करण्यासाठी मी तुला एक प्रश्न विचारू का?"

"जरूर, मी तुमच्या प्रश्नाचे उत्तर देण्याचा प्रयत्न करीन." जयदेव म्हणाला.

"तू इथे येण्यापूर्वी या घरात कोण कोण आले होते? या घरासमोरून कोण गेले? सांगू शकशील?" घर-मालकाने विचारले.

जयदेव घराबाहेर गेला. थोडे निरीक्षण करून परत आला आणि सांगितलं–"मी येण्यापूर्वी आपल्या घरी चार माणसे आली होती. ते राजदूत वा सैनिक असावेत. आपल्या घरावरून ते पुढे गेले. त्यांच्या-पूर्वी एक माणूस आपल्या दारा समोरून गेला. त्याच्या डोक्यावर कोळशांचं पोतं होतं, बहुधा त्याने चोरी केलेली असावी."

हे ऐकून ब्राह्मण आश्चर्यचकित झाला आणि जयदेवाला म्हणाला–"माझ्या घरी चार राजदूत आले होते ही गोष्ट खरी आहे. खरं तर असं की राणीचा एक हिरा देवळा जवळ गळवटला. तो शोधून काढण्यापूर्वीच कुणाला तरी सांपडला असावा. म्हणून राजदूत सर्वांच्या घरी जाऊन झडती घेत आहेत. त्याच संबंधात आमच्या ही घराची झडती घेतली गेली. हिरा अर्थात् मिळाला नाहीच. तू म्हणतोस की एक चोर आमच्या घरावरून गेला. तू जर हरवलेला हिरा सापडवून दिलास, आणि चोराला पकडून दिलेस तर राजा तुला मोठं बक्षिस देईल.



जयदेव ब्राह्मणाला म्हणाला–"मी थोडा बाहेर जाऊन लगेच परत येतो." तो घरातून बाहेर पडला. रस्त्याकडे बारकाईने नीट पहात पहात तो एका घराजवळ येऊन थांबला, ते घर एका सोनाराचं होतं. जयदेवाने घरात प्रवेश केला, सोनाराला सोन्याचा भाव विचारला, तसेच त्याचे दागिने बनविण्याबाबत बोलणे केले, आणि तो परत आला. तो ब्राह्मणाला म्हणाला–"महाराज, मी चोराला पकडून देऊ शकतो. आपण राजदूतांना बोलवून घ्या." ब्राह्मणाने राजदूतांकडे निरोप पाठविला आणि जयदेवाला विचारलं–"पण तू चोराचा शोध कसा लावलास हे तर सांगशील?"

जयदेवाने आपला तर्क समजाऊन सांगितला–"युद्ध-विद्या शिकलेले राजदूत व सैनिक रस्त्याने चालतात तेव्हां त्याची पावलं समान अंतरावर पडतात हे लोक रस्त्याने चालताना सुद्धा रांगेत चालतात. म्हणून त्यांच्या पदचिन्हांच्या आधारे मी कयास बांधला की चार माणसे आपल्याकडे आली होती आणि ते राजदूत वा सैनिक असले पाहिजेत. त्यांना आपल्या घरावरून जाताना मी ओझरतं पाहिलं होतं."



"पण चोराचा पत्ता तुला कसा लागला?" ब्राह्मणाने विचारले.

"चोर रस्त्याच्या मधून चालत नाही. रस्त्याच्या कडे कडेने चालतो. या चोराच्या डोक्यावर कोळशाचं पोतं होतं. तो जसजसा चालत होता, कोळशांचा भुगा थोडा थोडा खाली पडत होता. कोळशांचं पोतं घेऊन तो सरळ चालत नव्हता. मधून मधून तो मागे वळून पहात होता. त्याच्या पावलांच्या खुणांवरून हे स्पष्ट लक्षात येते. कदाचित् असा विचार करून तो मागे वळून पहात असावा की आपला कोणी पाठलाग तर करीत नसेल! म्हणून मी असं अनुमान केलं की याने जरूर चोरी

केली असली पाहिजे. याशिवाय राजदूतांच्या पावलांच्या खुणां पेक्षा चोराच्या पावलांच्या खुणा थोड्या अस्तव्यस्त आलेल्या दिसल्या. म्हणून चोर इथून गेल्याला एक-दोन तास तरी झाले असावेत, मध्यंतरी आणखी काही चोरीची वार्ता नाही, तेव्हां बहुधा राजदूत याच चोराचा शोध करीत असावेत." जयदेवाने आपली कैफियत सांगितली.

त्या दोघांची अशी बोलणी चालू होती इतक्यात राजदूत येऊन हजर झाले. जयदेव त्यांना सोनाराच्या घरी घेऊन गेला. राजदूतांनी यापूर्वी सुद्धा या घराची झडती घेतलेली होती. पण त्यांनी पेटचा, कपाटे यांची तपासणी केलेली होती. चोर आपण चोरलेल्या वस्तु एकाद्या अडगळीच्या ठिकाणी अथवा भोकात लपवून ठेवतो. हे रहस्य जयदेवाला माहीत होतं. याच्याच आधारे त्याने राणीचा हरवलेला हिरा एका अडगळीच्या जागेतून बाहेर काढला. सोनाराने आपला गुन्हा कबूल केला. त्याने सांगितले–"राणीचा हिरा खाली पडलेला पाहताच मी तो उचलला आणि कुणाच्या मनात शंका यायला नको म्हणून एक पोतं कोळसा खरेदी करून अशा प्रकारे रस्त्याने चाललो की आपल्या कामासाठी गावाकडे चाललो आहे."

राणीचा हिरा सापडल्यावर राजा एकदम प्रसन्न झाला आणि जयदेवाला त्याने एक उत्तम बक्षिस दिले. जयदेवाने चोराला कसे पकडले याचे सारे वृत्त राजाने ब्राह्मणाच्या तोंडून ऐकले. त्याला जयदेवाचे अत्यन्त कौतुक वाटले. समस्त विद्यापारंगत जयदेवाला राजाने आणखी काही पुरस्कार दिले व आपल्या दरबारात त्याला मानाची जागा दिली. जयदेवाने राजाच्या दरबारांत इमाने-इतबारे अनेक वर्षे सेवा केली. जयदेवाच्या विद्येचा राजाला अनेक प्रकारे उपयोग झाला. राजाच्या अनेक अडचणींत जयदेवाने योग्य सल्ला दिला. शेवटी राजाने आपली एक मुलगी शारदा हिचा जयदेवाशी विवाह घडवून आणला. हरिशर्माला हे सर्व जाणून अत्यन्त संतोष झाला.






कंसाच्या मृत्यूची बातमी ऐकून मूर्तिमन्त दुःखाच्या पुतळयाच अशा त्याच्या बायका त्या सभामंडपात येऊन पोचल्या व आपल्या पतीच्या प्रेतावर पडून छाती पिटून विलाप करू लागल्या. त्यांची अशी खात्री होती की या जगात आपल्या पतीचाही संहार करू शकेल असा शूर वीर असणेच शक्य नाही. त्यांना कल्पनाही नव्हती की इतका शक्तिशाली असा पति केवळ एका बालकाच्या हातून असा मारला जाईल अन् त्यांना वैधव्यदशा प्राप्त होईल.

कंसाची आईही आपल्या सुनांबरोबरच शोक करत होती. आपला पति उग्रसेन याच्याजवळ जाऊन त्याला दोष देऊ लागली – "वज्रपातामुळे जमिनदोस्त झालेल्या पर्वतासारखा धरणीवर पडलेला आपला पुत्र पाहिलात? त्याची अंत्येष्टि करायला हवी ना? कृष्णाने आपल्या बाहुबलाने हे राज्य जिंकलंय, त्याच्याकडे आता कंसाची अंतिम क्रिया करण्यासाठी परवानगी मागा."

त्याच वेळी सूर्यास्त झाला, जणू काही अस्तमाना पूर्वी तो कंसाच्या मृत्यूचीच वाट पहात होता! त्या संध्याकाळी यादव-कुळांतल्या लोकांच्यात शोभून दिसणाऱ्या कृष्णाने कंसाच्या बायकांचा विलाप ऐकला. त्याच्या डोळयात त्यामुळे अश्रु उभे राहिले. आपल्या चहूबाजूंना असलेल्या बांधवांना उद्देशून तो म्हणाला–"मी बालसुलभ अधीरतेने विचार न करताच किती



स्त्रियांना वैधव्याच्या दुःखसागरात लोटले! पण मी तरी काय करू? जगाच्या कल्याणाच्या हेतूनेच मी या दुष्टाचा संहार केला आहे. यापुढील कार्यक्रमाबद्दल ही मी अगोदरच विचार करून ठेवलेला आहे."

त्याच वेळी उग्रसेन, शिवी आदि यादवांना बरोबर घेऊन तेथे येऊन पोचला. थोडा वेळ कृष्णासमोर उभे राहून त्याने मान खाली घालून दुःखाने अश्रु ढाळले, नंतर आपले मस्तक उचलून गदगदल्या आवाजात तो बोलू लागला-"बाळा, आज तू अत्यंत क्रूर व भयंकर शत्रूचा संहार करून अपूर्व यश संपादन केले आहेस. आता कंसाचा अग्निसंस्कार करायला हवा, त्यासाठी तू परवानगी दिलीस तर मी, माझी पत्नी व सुना-आम्ही सर्वजण तर्पण वगैरे करू. यानंतर मात्र मी जटा आणि वल्कलं धारण करून वनवासाला जाईन."

यावर कृष्ण म्हणाला-"आजोबा, या कार्यासाठी माझी परवानगी कशाला हवी? कंसाच्या अंतिम संस्काराला मी परवानगी देणार नाही असं वाटलं आपणाला? मी आत्ताच आपणखीही एक गोष्ट स्पष्ट करतो-मी राज्य किंवा संपत्तिच्या लालसेने कंसाचा वध केला नाही. तो करण्यामुळे मला जी यश-कीर्ति मिळेल तेवढीच मला पुरेशी आहे. मी आता गोकुळात परत जाऊन माझ्या गायी व माझ्या गोपाल सवंगड्यात मिसळून पुन्हा आपले दिवस खेळण्याबागडण्यात अन् नाच-गाण्यात घालवीन. मी हे निवेदन आपणाला संतुष्ट करण्यासाठी करत नाही. हे राज्य खरोखर आपलेच आहे. आपल्या पुत्राने ते हरण केले होते, ते मी आपणास परत मिळवून दिले इतकेच! आता आपण आपला राज्याभिषेक पुनश्च करवून घेऊन सुखाने राज्यपालन करा. आपल्या मनात माझ्याबद्दल काही वात्सल्य व प्रेमभाव असेल तर आपण माझी ही इच्छा मोडू नका."

इतके बोलूनच कृष्णाचे समाधान झाले नाही. त्याने तावडतोब सर्वांसमक्ष उग्रसेनाचा राज्याभिषेक करवला. उग्रसेनानेही कृष्ण-बलरामांचा उचित सत्कार केला. कृष्णाने खूप रुचिपूर्वक मथुरानगरी पहिल्यापेक्षाही अधिक सुन्दर व वैभवपूर्ण बनवली.

यानंतर एक दिवस कृष्ण बलरामाला म्हणाला-"दादा, आपण दोघेही लहानपणापासूनच शिक्षण, आचार-व्यवहार व दुनियादारी याबाबतीत काहीही ज्ञान न मिळवता नुसतेच वनात क्रीडा करीत राहिलो. पण मला वाटतं कि आता उशीरा का होईना, पण आपण एकाद्या गुरुजवळ राहून विद्यासंपादन करणे उचित होईल."

हा विचार मनात आल्याबरोबर बलराम व कृष्णाने तो आपल्या स्वजनांना सांगितला व त्यांची आज्ञा घेऊन ते अवन्तिपुरातील सांदीपनी नावाच्या एका ब्राह्मणाकडे गेले व आपले नाव, गोत्र वगैरे सांगून आपल्याला शिष्य म्हणून स्वीकारण्याबद्दल त्यांनी त्यांना विनन्ति केली. सांदीपनींनी त्या दोन्ही भावांना आपले शिष्य बनवले व अवघ्या चौसष्ट दिवसातच त्यांना चार वेद व त्यांची षडांगे यांचे सांगोपांग ज्ञान दिले. त्यानंतरच्या बारा दिवसात त्या दोघांनी धर्मशास्त्र, तर्कशास्त्र, न्यायशास्त्र, गणित, संगीत आणि सैनिक विद्याही शिकून घेतली. नंतरच्या पन्नास दिवसात अस्त्र-शस्त्र यांचाही त्यांनी पूर्णपणे अभ्यास केला.



त्यांच्या अध्ययन शक्तीबद्दल विस्मित होऊन सांदीपनी म्हणाले-"तुम्ही दोघे म्हणजे मानवरूप धारण केलेले चंद्र-सूर्य तर नव्हेत!"

बलराम व कृष्ण यांनी गुरुगृही राहून विद्याभ्यास पूर्ण केल्यावर भक्तिपूर्वक प्रणाम करून गुरुजींना म्हटले-"आपल्या कृपेने आम्ही विद्यापारंगत झालो. आता गुरुदक्षिणा म्हणून आमच्याकडून आपली काय अपेक्षा आहे ती सांगावी. आपली इच्छा कितीही दुर्घट असली, तरी आम्ही ती पुरी करू."

सांदीपनी यावर म्हणाले-"मला एक पुत्र होता. तो तीर्थाटनासाठी निघून गेला.



एक दिवस एका ठिकाणी तो समुद्रस्नान करीत असताना त्याला एका देवमाशाने गिळले? तेव्हापासून पुत्रशोक माझे हृदय जाळीत आहे. कृपा करून काहीही करून मला माझा पुत्र परत मिळवून द्या. बस, इतकीच माझी इच्छा आहे."

आपली गुरुदक्षिणा पुरी करायचा निश्चय करून कृष्णाने आपल्या मोठ्या भावाची आज्ञा घेतली व तो धनुष्यबाण घेऊन समुद्रतटावर गेला. त्याने समुद्राला आज्ञा केली–"आम्ही असं ऐकलं आहे की आमच्या गुरूचा मुलगा तुझ्या पाण्यात कुठे हरवला आहे. त्याला गिळणाऱ्या दुष्टाला ताबडतोब हजर कर."

दुसऱ्याच क्षणी समुद्र प्रत्यक्ष रूपात हात जोडून कापत कापत म्हणाला–"महाराज, पचजन नावाच्या एका राक्षसाने देवमाशाच्या रूपात येऊन आपल्या गुरुपुत्राला गिळले आहे. मी आत्ता ताबडतोब त्या राक्षसाला आपल्या पुढे हजर करतो."

आणि काय! त्याच क्षणी देवमाशाच्या रूपातल्या त्या पंचजन राक्षसाला समुद्राने किनाऱ्यावर फेकले! कृष्णाने तलवारीने त्या माशाचे पोट फाडले, पण त्याच्या पोटात गुरुपुत्र मिळाला नाही. त्याऐवजी एक विशाल असा शंख कृष्णाला मिळाला. त्या शंखावर मोहित होऊन कृष्णाने तो शंख आपल्या उपयोगासाठी जवळ बाळगला. तो शंख पंचजनाच्या पोटातून प्राप्त झाला म्हणून त्याचे नाव 'पांचजन्य' असे रूढ झाले.

परंतु गुरुपुत्राची समस्या अजून सुटलीच नव्हती–या युवकाचे काय झाले? मरून तो यमलोकात पोचला असावा असा विचार करून दक्षिणेकडे आपला मोर्चा वळवून कृष्ण यमलोकात पोचला. सिंहासनावर बसलेल्या यमराजाला आव्हान देऊन कृष्ण म्हणाला–"आमचे गुरु सांदीपनी यांचा पुत्र तू उचलून आणला आहेस. त्याला आत्ताच्या आत्ता माझ्या स्वाधीन कर. नाहीं तर मी तुझे प्राण हरण करीन."



यावर भयकम्पित होऊन यमराज उठून उभा राहिला व हात जोडून म्हणाला–"महात्मन, मी तर केवळ प्राण्यांच्या पापपुण्याचा निर्णय करतो. प्राण्यांचे प्राण आणायचं काम मी नाही करत! ते तर मृत्युचे काम!"

"मृत्युला इतका गर्व! आमच्या गुरुपुत्राला इकडे आणून त्याने मला इतक्या दूर यायला लावलं काय! समज आता त्याचे आयुष्यच संपुष्टात आले!" असे म्हणून कृष्णाने धनुष्याला बाण लावला. हे पाहून भयभीत होऊन, गुरुपुत्राच्या शरीरात पुन्हा प्राणसंचार करून त्याला बरोबर घेऊनच मृत्यु कृष्णासमोर आला.

अशा प्रकारे कृष्णाने समुद्र, यम आणि साक्षात् मृत्युलाही आपणासमोर थरथर कापायला लावलं आणि पांचजन्य व गुरुपुत्रही मिळवून तो आपल्या गुरुकडे परत आला. आश्चर्य व प्रसन्नतेने भाराऊन सांदीपनींनी आपल्या पुत्राला आलिंगन दिले व अशी अपूर्व गुरुदक्षिणा देणाऱ्या कृष्णाला त्यांनी अनेक उत्तम आशिर्वाद दिले.

यानंतर कृष्ण-बलराम यांनी थोडे दिवस गुरुगृही विश्राम केला आणि नंतर गुरुजींची आज्ञा घेऊन ते मथुरेला परतले.

उग्रसेन राजाने कृष्ण-बलराम यांचे भव्य स्वागत केले व त्यांची मिरवणूक काढली. आपले बांधव व सर्व परिवारासह तो या दोघांना समोरा गेला व वाजंत्री लावून त्यांना घेऊन तो नगरात आला. नंतर कृष्ण-बलराम वसुदेवाच्या घरी गेले व तेथे आपल्या विद्याभ्यासाचा सविस्तर वृत्तान्त त्यांनी सर्वांना सांगितला, आणि तेथंच ते मोठ्या सुखाने राहू लागले.

जरासंध मगध देशाचा राजा होता. त्याच्या आस्ति व प्रास्ति नावाच्या दोघी मुली त्याने कंसाला दिलेल्या होत्या. कंसाचा संहार करून आपल्या मुलींना वैधव्य दिल्याबद्दल त्याला कृष्णाचा भयंकर



क्रोध आला व या गोष्टीचा सूड घेण्याचा त्याने निश्चय केला. रागाने चिडून जाऊन त्याने अनेक राजांना बरोबर घेतले व एकवीस अक्षौहिणी इतके सैन्य बरोबर घेऊन तो मथुरे वर आक्रमण करण्यासाठी निघाला. यमुना किनारी तळ ठोकून त्याने आपले राजकुमार विन्द व अनुविन्द यांना दूत म्हणून कृष्णाकडे पाठवले. उग्रसेनच्या राजसभेत प्रवेश करून या दोघांनी सभेत बसलेल्या कृष्णाला जरासंधाचा संदेश ऐकवला.

"तू अन् तुझा भाऊ बलराम यांनी मोठ्या योद्धयाप्रमाणे मथुरेत प्रवेश करून कंस व त्याचा धाकटा भाऊ यांचा वध केला आहे. कंस माझा जावई होता. आपल्या मुलींच्या वैधव्यामुळे दुःखी होऊन मी तुझ्याशी युद्ध करायला आलो आहे. तू लवकरच युद्धाला तयार होऊन माझ्यासमोर ये. मी असा निश्चय केला आहे की आपणा दोघांपैकी कोणीतरी एकच जिवन्त राहील–मारीन किंवा मरीन हाच माझा निश्चय. आपण दोघंही एकाच वेळी या पृथ्वीवर जगणं अशक्य! माझ्यासमोर युद्धाला आलास की मी तुला मारून टाकीन. युद्धभूमीतून पळून तू पाताळात घुसलास तरी मी तुझा पाठलाग करून तुझा अन्त करीन. माझी



शक्ती, सामर्थ्य व पराक्रम याबद्दलची माहिती तुला अक्रूर किंवा तुझा धाकटा भाऊ सात्यकी यांच्या कडून मिळेल. मी उद्याच मथुरेला वेढा घालणार आहे. तेव्हां तयार!"

दूतांकडून जरासंधाचा हा निरोप ऐकून स्मितहास्य करीत कृष्ण बोलला–"मला फारच आनन्द होत आहे. मी उगीच बडबडणारा वाचाळ नव्हे. मी स्वतःच जरासंधाचे गर्वहरण करायच्या विचारात होतो, पण आता तोच स्वतः इथे आला आहे. पूर्वी एका राक्षसीने त्याचे शरीर जोडले होते, आता मी पुन्हा त्याचे दोन तुकडे करीन. मी ज्या प्रमाणे कंसाचा वध करून